# नीतिसिद्धान्त.

हा ग्रंथ,

विद्यमान सुप्रसिद्ध इंग्रज तत्त्ववेत्ते

हर्बर्ट स्पेन्सर

ह्यांच्या

" The Inductions of Ethics " ग्रंथावरून

धोंडो केशव कर्वे, बी. ए.,

पुणें फर्ग्युसन कालेजचे गणितशास्त्राचे प्रोफेसर

ह्यांनीं मराठींत लिहिला.

---

पुणें

प्रकाशक

बळवंत गणेश दाभोळकर.

---

सन १८९४.

मुंबई व पुणें येथील विद्वानांनीं

नवीन काढिलेल्या

**डेक्कन व्हर्न्याक्युलर सोसाइटी**

नामक संस्थेस

तिच्या स्तुत्य हेतूंप्रीत्यर्थ

हा ग्रंथ

**परवानगीवांचून**

प्रकाशकानें अत्यादरपूर्वक नम्रतेनें

नजर केला आहे.

# आजपर्यंत मीं प्रसिद्ध केलेले

## उपयुक्त ग्रंथ.

**नीतिशास्त्राचीं मूलतत्त्वें.**—हर्बर्ट स्पेन्सरकृत " The Data of Ethics ग्रंथावरून प्रो० चिंतामण गंगाधर भानु, बी. ए. ह्यांजकडून लिहिविला.—प्रती शिल्लक नाहींत.

**न्यायतत्त्वें.**—सदरप्रमाणें " Justice " वरून. किंमत २ रुपये; टपालखर्च ८३.

**ज्योतिर्विलास अथवा रात्रीची दोन घटका मौज.**—रा० रा० शंकर बाळकृष्ण दीक्षित, हल्लीं पुणें ट्रेनिंग कालेजचे उपगुरु ह्यांजकडून लिहिविलेला. ( ह्या ग्रंथास अनेक इंग्रजी व संस्कृत ग्रंथांचा आधार असून, खेरीज रा० दीक्षित ह्यांनीं ज्योति:शास्त्रसंबंधें संपादन केलेली स्वत:चीही बहुत माहिती जागोजाग गोंविली आहे. तसेंच, नक्षत्रें आणि तारा ह्यांची ओळख होण्याकरितां आकाशाचे ३ सुंदर चित्रपट योग्यस्थळीं जोडिले आहेत. )—आवृत्ति दुसरी. किंमत १॥ रुपया; टपालखर्च ८३.

**संसारसुख.**—दी राइट आनरेबल **सर जान लबॉक्**, एम्. पी. ह्यांच्या " The Pleasures of Iife " ग्रंथावरून रा० सा० **कृष्णाजी परशुराम गाडगीळ** ह्यांजकडून लिहिविला.—प्रती शिल्लक नाहींत.

**शास्त्ररहस्य.**—रा० रा० **ना० ल० फडके**, बी. ए.; रा० रा० **शं० बा० दीक्षित**, प्रो० **म० शि० गोळे**, एम्. ए.; प्रो० **वि० बा० भाटे**, बी. ए.; प्रो० **धों० के० कर्वे**, बी. ए.; रा० सा० **कृ० प० गाडगीळ**, पेन्शन्ड सबॉर्डिनेट जज्ज; प्रो० **चिं० गं० भानु**, बी. ए.; रा० रा० हरि नारायण आपटे व रा० रा० **रा० भि० जोशी** ह्या नऊ विद्वानांकडून निरनिराळ्या ९ विषयांवर निबंध लिहवून एकत्र तयार केलेला. किंमत २॥ रुपये; टपालखर्च ८३.

**आत्मनीतीचीं तत्त्वें आणि परोपकार.**—हर्बर्ट स्पे-

न्सर कृत " The Ethics of Individual Life" & "Beneficence" ह्या ग्रंथांवरून अनुक्रमें रा० रा० नारायण लक्ष्मण फडके, बी. ए. हल्लीं फ० असि० मास्तर ठाणें हायस्कूल व प्रो० धों० के० कर्वे, बी. ए. ह्यांजकडून लिहवून एकत्र केला.—प्रती शिल्लक नाहींत.

**नीतिशास्त्राचे सामान्य सिद्धान्त.**—हर्बर्ट स्पेन्सर कृत " The Inductions of Ethics " ग्रंथावरून प्रो० धों० के० कर्वे, बी. ए. ह्यांजकडून लिहिविला. किंमत १॥। रुपये; टपालखर्च ८३.

शनिवार पेठ, खत्रुतरखाना घरनंबर ३४, पुणें. } **बळवंत गणेश दाभोळकर.**

रिपोर्टर ऑन दी नेटिव्ह प्रेस मुंबई ह्यांजकडून मीं प्रकाशित केलेल्या ग्रंथांवर वेळोवेळीं उत्तम अभिप्राय प्रसिद्ध झाले आहेत. परंतु " शास्त्ररहस्य " ग्रंथावर खालील अभिप्राय सरकारी ग्याझिटांत नुकताच प्रसिद्ध झाला आहे म्हणून तो देतों:—

" The publisher's enterprise in getting educated men to write for him is praisworthy and deserves of encouragement. The essays are well written and valuable contributions to Marathi literature. The majority of essayists are university Graduates and The book is dedicated to the Honourable Mr. Justice Ranade."

" विद्वान् लोकांकडून लेख मिळविण्याचे बाबतींत प्रकाशकाचें दिसून येणारें धैर्य वाखाणण्यासारखें असून, उत्तेजन देण्याला पात्र आहे. निबंधही चांगले लिहिलेले आहेत, व मराठी ग्रंथसंग्रहांत ती मौल्यवान् भर पडली आहे. बहुतेक निबंधलेखक युनिव्हर्सिटीचे ग्राज्वेट आहेत आणि आनरेबल मि. जस्टिस रानडे ह्यांस हा ग्रंथ अर्पण केला आहे.

# ग्रंथ प्रकाशित करण्यांतील माझे हेतु.

व्यवहार दोन प्रकारांनीं होतो. स्वतःचें हित झालें म्हणजे झालें, मग दुसऱ्याचें कांहींका होईना, हा एक प्रकार; व दुसऱ्याचें हित पाहत असतां स्वहित साधावयाचें हा दुसरा प्रकार. पहिला प्रकार माणुसकीच्या दुर्बलतेमुळें होत असतो व त्यापासून द्रव्यसंपादन चांगलें होतें. दुसऱ्या प्रकारचा व्यवहार अंतःकरणाच्या समतेवर अवलंबून असल्यामुळें लक्ष्मीची कृपा बेताबाताची होते, तरी त्यापासून लोकांत मान्यता मिळते. पहिला प्रकार कमी दर्जाचा म्हणून एका बाजूस ठेविला; व दुसऱ्या प्रकारानें व्यवहार करीत असलें; तरी आतां त्यानें सर्वांचेंच 'बरें' म्हणून घेतां येतें असें म्हणतां येत नाहीं: जगांत अनेक मनुष्यें आहेत त्यांपैकीं पुष्कळांच्या माणुसकीचें दौर्बल्य तेथेंही आडवें येणारच; परंतु एवढें मात्र खरें आहे कीं, जी गोष्ट समंजस लोकांना पसंत पडली व जी चांगल्या हेतूनें व न्यायबुद्धीनें आपण करीत आहों, ती सर्वथैव बरी समजण्याला कांहीं हरकत नाहीं.

ग्रंथ प्रकाशित करण्यांत माझे हेतु कोणते ?—"पैसे मिळवावे" हा एकच हेतु आहे, असें पुष्कळांस स-

---

* जसे विचार तशीं स्वप्नें पडतात. माझ्या अंतःकरणांतील हेतु जसेच्या तसे येथें उमटवीत आहें तरी ते पुष्कळांस खोटेही वाटणार आहेत. परंतु ज्यांस खोटे वाटतील त्यांस खरे मानण्याविषयीं माझा बिलकुल आग्रह नाहीं; ज्यांस खरे वाटतील त्यांनीं मात्र तसेच समजण्याचे आहेत.

हर्जी वाटणार आहे. आणि तो हेतुही खरा आहे. अरण्यवास पतकरिला असतां प्रस्तुतच्या काळांत तेथेंही पैशाची अवश्यकता काय हें जर कळून येणारें आहे, तर व्यवहारांत वागणाऱ्या मनुष्याला पदोपदीं गरज लागत असल्यामुळें तो मिळविण्याचें त्याचें कर्तव्यच आहे. परंतु माझे ग्रंथ जे नेहमीं घेत आले आहेत ते माझ्या विचारांस अनुसरून म्हणतील कीं,—ग्रंथ प्रकाशित करण्यांत "पैसे मिळवावे" एवढाच जर माझा हेतु असता, तर जेथें डोक्याला यत्किंचित्‌ही श्रम देण्याची इच्छा नाहीं अशा जमिनींत अशा प्रकारचे खडतर ग्रंथ पेरण्याचें मला कांहींच कारण नव्हतें. पैसेच मिळवावयाचे आहेत तर ग्रंथप्रकाशनाची दिशा एकदम बदलली पाहिजे. धर्मबुद्धीनें पुराणग्रंथांचें श्रवण करणारीं वृद्ध माणसें दिवसेंदिवस दृष्टीससुद्धां पडण्याचा संभव जरी कमी आहे, तरी नवीन पिढींत 'न भूतो न भविष्यति' अशा गोष्टी चघळीत बसणारे व त्याच्याही आणखी पुढच्या पायरीचे 'ऐतिहासिक गप्पा*' ऐकून मिटक्या मारणारे वाचक हल्लीं पुष्कळ सां-

---

* 'तुम्ही आतां तात्त्विक विचारांचे ग्रंथ सोडून इतिहासाकडे वळाल तर लोकांवर फार उपकार होतील व त्यांची आज फार जरूर आहे' अशा अर्थाची कोणीं सद्‌गृहस्थांनीं मला शिफारस केली आहे. 'मागच्यास ठेंच पुढचा शहाणा' ह्या न्यायानें इतिहास हें जगाचें शिक्षण आहे व पुरातनकाळापासूनचा सार्यंत इतिहास जर आह्मांस मिळता तर त्यासारखी उपयुक्त वस्तु कोणतचि नव्हती असें मला वाटतें. पण इतिहासाइतका लिहिण्याला विकट ग्रंथ दुसरा नाहीं. तो लिहिणारा खरा मार्मिक व खरा कुशलच पाहिजे. ठिकठिकाणचे कागदपत्र मिळवून त्यांची जुळवाजुळव करण्यांत अश्रांत श्रम घेतले पाहिजेत,

पडणार आहेत आणि तशांच्या जवळून प्रेमाप्रेमानें दोन पैसे अधिकही काढितां येणार आहेत. इतकें तरी कशाला? वर्षाचे कांठीं दोन किंवा तीन ग्रंथ नियमितपणें प्रसिद्ध करण्यापेक्षां आणखी जास्त ग्रंथ प्रकाशित करितां येणार आहेत व त्यांत आणखी जास्त पैसाही मिळवितां येणार आहे. आणि ज्याअर्थीं ह्याच्या अगदीं उलट माझा क्रम आहे, त्याअर्थीं ग्रंथ प्रकाशित करण्यांत लौकिकदृष्टीहून कांहीं वेगळे माझे अंतस्थ हेतु आहेत हें सहज दिसून येणार आहे.

१. माझ्या ग्रंथप्रकाशनाचा मुख्य हेतु किंवा ग्रंथप्रकाशनरूपी इमारतीचा पाया 'परार्थाच्या पोटीं स्वार्थ' हा आहे. परार्थाविषयीं आमची जुनी कल्पना अन्नोदक-द्रव्यादिदान ही आहे व मनुष्यजातीच्या ज्ञानांत किंवा पर्यायानें सुखांत भर घालणें ही नवी कल्पना आहे. जुन्या कल्पनेपासून अपात्रीं दान होण्याची

---

पुष्कळ काळ घालविला पाहिजे, व त्यांची मोजदाद करून लोकस्थितीच्या मानानें वेतन देतां येणार नाहीं. लिहून द्या म्हटल्यास कोणास लिहून देतां येणार नाहीं, तो स्वतःच्याच आवडीनें तयार केलेला असला पाहिजे. उलटपक्षीं उपलब्ध असलेल्या ऐतिहासिक बखरींतून उपटाउपटी करून व कांहीं जुन्या माणसांचे काव्यालंकार त्यांत घुसडून देऊन एकादें थातुरमातुर बाव्हलें उभें करितां येईल. व त्यास खऱ्या मार्मिकाची व श्रमालु विद्वानाची गरज नसून एकादा शाब्दिक मार्मिक, पदरचें थोडें तिखटमीठ लावून वढाया मारणारा व साधारण गोष्टीसांग्या असला म्हणजेही बस आहे. पण कागद व शाई यांचा नास करून तें कदाचित् लोकांस फसविणें होईल. सारांश, योग्य ऐतिहासिक ग्रंथ मिळतील तर माझी तयारी आहे, नाहींपेक्षां दोन पैसे जास्त मिळण्याचा संभव आहे तरी माझें तिकडे पाहणें नाहीं.

विशेष भीति आहे, तेंच नव्या कल्पनेनें अपात्रीं दान होणें इष्ट आहे. जुन्या कल्पना एकाएकीं सोडवत नाहींत व नव्या एकदम स्वीकारवत नाहींत हीही गोष्ट खरी आहे. तथापि परार्थांत श्रेष्ठप्रतीचा परार्थ जर कोणता असेल तर तो 'इतरांच्या ज्ञानांत भर घालणें' हाच आहे. मात्र लक्ष्मीपुत्रांना तो सहजगत्या साधितां येईल, व दरिद्र्यास लोकांचीं दूषणें सोसून संपादावा लागेल. श्रीमंत गायकवाड सरकार यांहीं हा परार्थ उत्तम साधिला आहे (अलीकडे किती जारीनें सुरू आहे माहीत नाहीं) म्हणून नव्या पुण्यश्लोकनृपावलींत त्यांचें नांव पहिलें घातलें पाहिजे. असो.

२. माझ्या ग्रंथप्रकाशनाचा दुसरा हेतु विद्वानांस साथ देणें हा आहे. गटारावर किंवा, गटाराशेजारीं बसून ऊठबस करणें, डोकें अनेक व्यापांत गोंधळवणें, व डोकें घांसणें हे निरनिराळ्या प्रकारचे श्रम एकत्र न राहतां विभक्त होतील तर बरें. विलायतेंत ग्रंथकर्ते, प्रकाशक व विक्रेते निराळे असल्यामुळें प्रत्येकास आपापल्या धंद्याच्या पाठीस लागून उत्तम वजावणी करितां येते. आमच्या इकडे विक्रेत्यांस चांगलें वळण नाहीं तरी तें लागेल व मूळग्रंथकार नाहींत तरी सोधल्यास भाषांतररूप ग्रंथ लिहिणारेही मिळूं शकतील. मधली संस्था प्रकाशकाची दुर्मिळ आहे ती मिळाल्यास बरोबर दोरी चालेल. व पोहणाऱ्यास भोपळ्याप्रमाणें ग्रंथकारांस प्रकाशकाची मोठी साथ होईल.

३. तिसरा हेतु—स्वतःच्या ज्ञानांत भर घालणें. माझी स्वतःची विद्वत्ता अगदींच थोडी आहे. सन १८८१

सालीं पुणें ट्रेनिंगकालेजांतून पास झालेला मी एक फक्त मास्तर आहें. मास्तरपणाचा मला स्पर्श झाला नाहीं इतकेंच काय तें. इंग्रजी भाषेसंबंधानें माझें ज्ञान आणि आगगाडीवरच्या नोकरांचें ज्ञान हीं एकाच वर्गांत येतील. त्यांचें आगगाडीविषयक आणि माझें व्यवहारविषयक एवढा फरक. ट्रेनिंग सोडिल्यावर ५।६ वर्षें केसरी-मराठा वर्तमानपत्रांचा मी क्लार्क होतों तेवढ्या अवकाशांत विद्वानांचा सहवास घडला ती माझी इंग्रजी शाळा आहे. इंग्रजी भाषेच्या लायब्ररीकडे पहावें तों डोळे फिरतात व आपल्याला तर कांहीं येत नाहीं, आणि इकडे प्रापंचिक पडल्यामुळें पैशाच्यासंबंधानें डोळे फिरतात म्हणून यापुढें शिकण्याचीही आशा नाहीं. त्यांतल्या त्यांत ग्रंथप्रकाशकाचें सोंग घेऊन व विद्वानांच्या नादीं लागून स्वतःचें काम उरकून घेण्याला व दोन पैसे खिशांतही टाकायला ही युक्ति बरी आहे.

ह्या खेरीजही माझे एकदोन हेतु आहेत. ग्रंथ लिहिणारांना मी ज्या रकमा ( पुष्पपत्र ) देतों तेवढ्याही देणारा मिळणें सध्यांच्या स्थितींत जरी कठिण आहे, तरी त्यांच्या विद्वत्तेचा जितका सन्मान करावा किंवा त्यांच्या श्रमांचा परिहार व्हावा तसा होत नाहीं. तसेंच, जेवढ्या म्हणून कमी किंमतीला देववतील तेवढ्या कमी किंमतीनें मी ग्रंथ देतों तरी ह्याहून ते स्वस्त देतां यावयास पाहिजे आहेत. परंतु ह्या गोष्टी माझ्या नाइलाजाच्या असून, सर्वथैव लोकाश्रयावर अवलंबून आहेत ह्यामुळें तिकडे बोट दाखविणें ओढीला येतें.

**व० ग० दाभोळकर.**

## कायम वर्गणीदार व त्यांस मिळणारा फायदा.

१. ' नवी विटी नवें राज्य ' ह्या म्हणीप्रमाणें प्रत्येक ग्रंथाचे वेळीं नवे नवे वर्गणीदार सोधीत बसण्यास लागू नयेत म्हणजे ग्रंथप्रकाशनाचे कामीं मदत व्हावी, उत्तम उत्तम ग्रंथ हातीं घेण्यास उत्तरोत्तर उत्तेजन यावें, व साधेल तेवढी कमी किंमत घेऊन ग्राहकांस ग्रंथ देतां यावे ह्याकरितां ही कायम वर्गणीदारांची व्यवस्था योजिली आहे.

२. कायम वर्गणीदार म्हणजे परमेश्वरकृपेनें यानंतर माझे हातून जे कांहीं १०।५ ग्रंथ प्रकाशित होतील त्या प्रत्येकाच्या अमुक प्रती घ्यावयाच्या अशाबद्दल ठरविलेले वर्गणीदार. त्याबद्दल त्यांची संमति म्हणून घेण्यास नको. बाहेरगांवच्यांस व्ह्याल्युपेएबलें करावयाचीं व पुण्यांतल्यांकडे मनुष्याचे हातीं पावते करून पैसे आणावयाचे.

(अ) कायम वर्गणीदार झाले म्हणजे त्यांस अमुक ग्रंथ नको व अमुक हवा असें म्हणतां येणार नाहीं. कारण तशानें पहिल्या कलमांतील हेतु साधत नाहीं व 'कायम' ही संज्ञा निरर्थक होते. म्हणून कायम वर्गणीदार होणारांनीं मी प्रकाशित करीन तो प्रत्येक ग्रंथ घ्यावा लागेल.

३. आजपर्यंतच्या क्रमावरून वर्षाचे कांठीं २ ग्रंथ प्रकाशित होतील असा अजमास आहे. परंतु क्वचित् प्रसंगीं लहान असल्यास ३ ग्रंथ प्रकाशित होतील असें सोडवून ठेवितों.

(अ) जाहिराती देणें, प्रसिद्धिपत्रें पाठविणें वगैरेस

लागणारा खर्च वांचवावा व तोच कायम वर्गणीदारांस फायद्याच्या रूपानें द्यावा हा इरादा आहे. म्हणून ग्रंथ रवाना करितेवेळीं मात्र सूचना दिली असतां पुरे होणार आहे. परंतु कांहींकांचें ( फार थोड्यांचें ) म्हणणें पुढें अमुक ग्रंथ निघणार अशाबद्दलची जाहिरात आमचेकडे पाठवीत जावी ( संमति दिलेली आहेच असें समजून ) म्हणजे आह्मांस आगाऊ कळण्यास मार्ग होऊन वेळेनुसार तुम्हांस तेवढ्या ग्रंथापुरते आणखीही वर्गणीदार आमचेकडून मिळण्याचा संभव आहे. ठीक आहे. आणखीही मदत मिळण्याचा जर संभव आहे, तर तशा प्रकारें वागण्यास माझी कबुली आहे.

४. ग्रंथ अमुकच प्रकाशित करीन ह्याबद्दल आज यादी देणें प्रशस्त नाहीं. इंग्रजी भाषेंत रोज नवे नवे उत्कृष्ट ग्रंथ दृष्टीस पडतात व कांहीं लोकमान्य संस्कृत ग्रंथांचेंही भाषांतर होणें इष्ट वाटल्यास करावें लागेल. मात्र ग्रंथप्रकाशनाची दिशा आजपर्यंत मीं प्रकाशित केलेल्या ग्रंथांवरून जाणतां येईल व ते कितपत योग्यतेचे व संग्राह्य होतील ह्याचा अंदाज माझ्या हेतूंवरून करितां येईल.

५. ग्रंथांच्या किंमती १॥ आणि २ रुपये ह्यांच्या अजमासानें असतील. म्हणजे प्रतिवर्षीं ३ रुपयांपेक्षां कमी नाहीं परंतु फारफार तर ६ रुपयांपेक्षां जास्त नाहीं, इतक्या किंमतीचे ग्रंथ निघतील.

६. कायम वर्गणीदारांचीं नांवें प्रत्येक ग्रंथाचे आरंभीं छापिलीं जातील.

येणेंप्रमाणें रीतीनें जे कायम वर्गणीदार होतील त्यांस आजमिचीस खालीं लिहिल्याप्रमाणें फायदा देण्याचें मला पुरवत आहे.

( १ ) इतर वर्गणीदार होणारांकरितां जी किंमत ठेविली असेल त्यापेक्षां पुण्यांतील कायम वर्गणीदारांस ४ आणे कमी पडतील.

( २ ) बाहेरगांवचे वर्गणीदारांस टपालखर्च व व्ह्याल्युपेएबलखर्च पडणार नाहीं. फक्त किंमत द्यावी लागेल.

( ३ ) बाहेरगांवीं पांच प्रती एकत्र मागविणारांस खर्च न पडतां पांचाबद्दल ६ प्रती देण्यांत येतील.

हल्लीं ह्या नियमांप्रमाणें ज्या सद्गृहस्थांनीं मला कायमचा आश्रय दिला आहे त्यांचीं नांवें पुढें दिलीं आहेत.

# कायम वर्गणीदार.

रा. रा. गोपाळ विठ्ठल खानोलकर. ... ... ... ५
लक्ष्मण परशुराम कोल्हटकर. ५
एस्. एल्. जोशी... ...५
रा. सा. नारायण शिवराम बापट. ... ... ...५

भागीदार

रा. रा. कृष्णाजी केशव दाणे.
गोपाळ भिकाजी कारकून.
शिवराम आत्माराम मुरगुडकर.
वामन गंगाधर गाडगीळ.
श्री. रा. रा. शिवराम रामचंद्र सबनीस. ... ...५

भागीदार

रा. रा. रामकृष्ण दत्तात्रेय अंबेरकर. ... ... ...२
सुभानराव पाटणकर. ...१
मि. सालोमन सामसन. ...५

भागीदार

रा. रा. माधवराव बाजीराव व्यवहारकर. ... ...
हरि कान्होबा वालावलकर.
गणपतराव राघोबा धराधर.
यशवंत अनंतराव.
विनायक जिवाजी दाभोळकर.

---

रा. रा. नारायण गणेश घांगरेकर. ... ... ...४

भागीदार

रा. सा. जनार्दन केशव नातू.
रा. रा. नथो हरि चावळखेडकर.
नारायण बळवंत कुळकर्णी.
रा. रा. नरसो रामचंद्र वैद्य. ४

भागीदार

श्री. रा. सा. माणिकरावजी तालुकदार.
सदाशिव राजाराम.
हणमंतरावजी मदतगार.

---

रा. रा. रामराव महादेव वाठोडकर ... ... ...३
गोविंद जनार्दन पुनाळेकर. ३

भागीदार

भास्कर विष्णु दंडवते.
मि. सालोमन.

---

रा. रा. गोपाळ भास्कर गणपुले व मि. जे. एम्. राडरिक्स. ... ... ...२
नागोराव असि. मास्तर...२
गोविंद शंकर सुभेदार व तिरमल व्यंकटेश ... ...२
हरि रामचंद्र क्षीरसागर व मि. आर. रेऊबेन. ... ..२
रा. सा. रामचंद्र मोरेश्वर जोग. २
रा. रा. गणेश चिंतामण शाळिग्राम व गोविंद नारायण मेहेंदळे. ... ...२

रा. रा. दिनकर धोंडो साठ्ये २
आत्माराम सुर्वे व सुभेदार मेजर गणपतराव गायकवाड २
नारायण सीताराम रे. इन्स्पे. व कृष्णराव जागेश्वर भीष्म २
रा. रा. सदाशिव महादेव साने व एकनाथ विष्णु चावरे. २

---

रा. सा. वाय्. श्रीनिवासराव.
रा. रा. श्रीनिवास राघवेंद्र उमचिगी.
श्रीनिवास रामचंद्र जव्ये.
श्री. रा. रा. श्रीधर पांडुरंग वासुदेव.
श्रीरंग धुंडिनाथ जहागीरदार.
रा. रा. श्रीधर परशुराम सोमण
रा. सा. अनंतराव यशवंत फणसे
रा. रा. अमृत भवानजी शेळके.
अनंत अमृत मुंगी.
अण्णाप्पा नानाप्पा लेंगडे.
अमोलिक खेमचंद गुजर.
अण्णाजी वैजनाथ भातखंडे.
अमृत काशिनाथ साकळकर.
अण्णासाहेब पंडित.
आत्माराम नारायणशेट.
आप्पाजी विनायक कंट्रॅक्टर.
मि. आब्राहाम रेऊबेन भिजेकर.
रा. रा. केशव बळवंत पिडवई.
कृष्णाजी खंडो कुळकर्णी.
केशव विठ्ठल आठवले.
कृष्णाजी विष्णु देवधर
काशिनाथराव वैद्य.
कृष्णाजी बाळाजी भजलीकर.
कृष्णाजी आबाजी कळंबीकर
कोंडाजी दुलाजी टेमकर.
कृष्णाजी विष्णु आचार्य.
काशिनाथ विरेश्वर छत्रे.
कृष्णराव गोपाळ क्लार्क.
काशिनाथ जनार्दन मंत्री.
कृष्णाजी सदाशिव फाटक.
कृष्णशास्त्री विवलकर.
श्री. रा. रा. केशव नरहर गोसावी.
कृष्णराव नानासाहेब घोरपडे.
रा. सा. कृष्णराव सिद्धेश्वर देव.
रा. ब. कल्याण सिताराम चित्रे.
रा. रा. केशव बापूजी वकील.
खंडो सदाशिव तळवलकर.
गणेश काशिनाथ अग्निहोत्री.
गोविंद सिताराम टेंभुर्णीकर.
गणपतराव गोपाळ वर्वे.
गोविंद व्यंकटेश वकील.
गंगाधर गोपाळ अटेरकर.
गोविंद व्यंकटराव मासूर.
गोविंद धोंडदेव भागवत.
गणपतराव काशिनाथ कामत.
गोविंद काशिनाथ फडणीस.
गोपाळ कृष्ण रानडे.
गणेश बल्लाळ आचार्य.
गणेश बळवंत जोशी.
गणेश नारायण वैजापूरकर.
रा. सा. गणपतराव मल्हार घारपुरे
गणेश रामकृष्ण दातार.
रा. रा. गोविंद मल्लीनाथ थेंगे.
गिरराव वकील.
गणेश रामचंद्र ओझे.
गुरुराव नारायण देशपांडे.
गोपाळ नरहर मोदगीकर.
गंगाधर भालचंद्र रत्नपारखे.

गोपाळ केशव पिटके.
गोविंद महादेव म्हात्रे.
गोपाळ गोविंद घटवाई.
गोविंद केशव बापट.
गुरुराव बळवंत कृष्णगिरी.
गणेश कृष्ण देशपांडे.
गणेश रघुनाथ फाटक.
गणेश नारायण मेहेंदळे.
जी. एल्. पेडणेंकर.
गणेश बळवंत सिंदगी.
गोपाळराव महादेव घाणेकर.
श्री. रा. रा. गणपतराव विठ्ठलराव गायकवाड.
रा. सा. गोविंद श्रीधर आपटे.
रा. रा. गणेश परशुराम दातार.
रा. सा. गोविंद बळवंत लघाटे.
रा. रा. गणेश महेश्वर दातार.
घनश्याम सुबराव वागळे.
चेनमलप्पा भावेप्पा मुगी.
चिंतामण नारायण थिटे.
चूनीलाल खुशालदास.
रा. सा. चिंतामणराव नारायण मुजुमदार.
रा. रा. जयराम गोविंद सब् पो० मा०.
जगन्नाथ रावजी टुल्लू.
जगन्नाथ लक्ष्मण मानकर.
रा.सा. जयशंकरभाई परमानंद.
रेव्हरेंड पी. टिमोथी.
रा. रा. डी. आर. अभ्यंकर.
रा. रा. त्र्यंबक नागनाथ दफ्तरदार.
त्र्यंबक हरि आचार्य.
तुकाराम गणेश पाठक.

दत्तात्रेय कृष्ण सांभारे.
दत्तात्रेय रंगनाथ पेंडसे.
दत्तात्रेय कृष्ण पेंढारकर.
देवजी मुळजी ठक्कर.
दामोदर सदाशिव करंबेळकर.
दामोदर लक्ष्मण ठोंबरे.
नारायण वामन टिळक.
नारायण लक्ष्मण फडके.
नारायण गोपाळ देशपांडे.
नारायण विनायक साठे.
नटेश आप्पाजी द्रवीड.
नारायण बाळकृष्ण नाखरे.
नरहर बाळाजी टे० इन्स्पे०
नारायण बाळकृष्ण पेंढारकर.
नरहरि राजाराम दिघे.
नारायणराव हरि गरूड.
पी. नारायणस्वामी नायडू.
निळकंठ रामचंद्र सुखठणकर.
रा. सा. नारो भास्कर सहस्रबुद्धे.
रा. रा. पांडुरंग बाळकृष्ण चाचड.
परवत दाजीबा,
पुरुषोत्तम जयराम अघारकर.
रा. सा. पांडुरंग नारायण देशपांडे.
रा. रा. परशुराम पांडुरंग शेठ्ये.
पृथ्वीगीर हरिगीर हिर्डीकर.
परशुराम गोविंद दिवाण.
पुरुषोत्तम रामचंद्र म्हाडदळकर
रा. रा. बाळकृष्णभाऊ गाडेकर
बाळाजी परशुराम जोशी.
बाबाजी राघोजी देसाई.
बाळकृष्ण सिताराम ट्रेझरर
रा. सा. बाळाजी गणेश गोखले
रा.रा. बापु सखाराम आठवले.

बाळकृष्ण रामचंद्र देशपांडे.
बळवंत काशिनाथ अग्निहोत्री.
रा. सा. बाबूराव चव्हाण.
रा. रा. बाबु अपण्णा चिवटे.
बाळकृष्ण नारायणराव.
प्रो० भास्कर रामचंद्र आर्ते.
रा. सा. भगवंत बळवंत प्रधान.
रा. रा. भगवंत रामचंद्र देसाई.
महादेव वामन गद्रे.
मंगेश जिवाजी तेलंग.
महादेव नारायण कुळकर्णी.
महादेव शिवराम चव्हाण.
डा० मोरेश्वर गोपाळ देशमुख.
रा. रा. मल्हार खंडेराव चिटणीस
महादेव यशवंत भडभडे.
महादेव विठ्ठल तांदळे.
मुगुटराव श्रीपत हुंडे.
मोरेश्वर वासुदेव कर्वे.
रा. सा. महादेव रघुनाथ नाडकर्णी.
रा. रा. मोरेश्वर हरिश्चंद्र ठाकूर.
मोरेश्वर राघोबा तळपदे.
मोरेश्वर विष्णु तेंडुलकर.
मोरेश्वर त्र्यंबक साठे.
महादेव बाबुराव करंदीकर.
मार्तंड लक्ष्मण गुप्ते.
महादेव रामचंद्र गुप्ते.
महादेव विनायक केळकर.
सौ० माणकुबाई कोठारे.
रा. रा. यशवंत गणेश प्रधान.
यशवंतराव भास्करजी.
यशवंत पांडुरंग गोडांबे.
यशवंत गोरोबा दळवी.
रा. सा. रामचंद्र यशवंत चौबळ.
रा. रा. रामचंद्र आबाजी देसाई.
श्री. रा. रा. रघुनाथराव वामन केकरे.
रा. रा. आर. जी पत्की.
रा. सा. राघवेंद्र भीमराव मुंदेसाई.
रामचंद्र नारायण आंबेगांवकर.
रघुनाथ महादेव केळकर.
रा. रा. आर. के. कुंटे.
रामचंद्र गोपाळ कामत.
राणू रावजी आरू.
रामचंद्र भिकाजी कांपरेंकर.
रामचंद्र नारायण शेंडे.
रामचंद्र परशुराम पोंक्षे.
रावजी रंगनाथ विपट.
रामचंद्र लक्ष्मण देसाई.
रामचंद्र नारायण करंदीकर.
रामकृष्ण नरहर जोशी.
आर. डब्ल्यु. बाळाजी.
रामचंद्र केशव लिमये.
रावजी भवानराव पावगी.
रावजी शिवराम गोंधळेकर.
रा. सा. लक्ष्मण गोविंद ऋषी.
रा. रा. लक्ष्मण गोविंद भालेराव.
रा. ब. लालशंकर उमयाशंकर.
रा. रा. लक्ष्मण जयराम मोजणीदार.
लक्ष्मण रघुनाथ महाजन.
लक्ष्मण माणिकजी.
रा. ब. वामनराव तात्या बर्वे.
रा. रा. विश्वनाथ वासुदेव फडके.
विष्णु वामन बापट.
विश्वनाथ गणेश करडोले.
विष्णु वि० श्रीखंडे.

रा.सा.वासुदेव केशव मावळणकर
रा. रा विठ्ठल शिवराम पवार.
विश्वंभर बाळकृष्ण उपासनी.
आनरेबल विष्णु रघुनाथ नातू.
रा. रा.विष्णु कृष्ण भाटवडेकर.
विनायक धोंडदेव दुबळे.
वामनराव व्ही. बोरवणकर.
वासुदेव हरि निरंतर.
विनायकराव भिकोबा चित्रे.
विठ्ठल सदाशिव करकरे.
विष्णु व्यंकटेश दातार.
विष्णु गोपाळ पांवसकर.
रा. रा. विठ्ठल तात्या देसाई.
रा.सा विनायक त्र्यंबक आगाशे.
विष्णु मोरेश्वर महाजनी.
रा. रा. विष्णु भिकाजी खरे.
विठूजी खंडूजी पिसाळ.
वामन कृष्ण ताम्हनकर.
वरघरकर इलायझा ऐझाक.
विनायक कृष्ण मुळे.
वासुदेव कृष्ण सुभेदार.
विनायक लक्ष्मण सोमण.
वासुदेव नारायण जोग.
व्ही. के. काळे.
विष्णु नारायण गाडगीळ.
विष्णु विठ्ठल भिडे.
विनायक गणेश हसबनीस.
शिवलिंगू हुकाजी.
शंकर यज्ञेश्वर गर्गे.
शिवरतनसिंह वर्मा.
श्रीकुमार शंकरसिंह वर्मा.
शंकर विश्वनाथ गटणे.
खा. ब. शालोम बापूजी.

रा. रा. शंकर कानोजी मालंडकर.
शिवराम गंगाधर सालवर्डीकर.
संभाजीराव गोविंद वागळे.
सखाराम महादेव भागवत.
सदाशिव रामचंद्र गाळवणकर.
स. ब. साम्युअल इसाक जावलीकर.
रा. सा. सखाराम दिनकर चांदोरकर.
रा. रा. सदाशिव विश्वनाथ वैद्य.
सुंदरजी लक्ष्मण स्टे० मा.
सदाशिव धोंडदेव साठे.
से० ने० ला० वांद्रें.
,, डिग्रज.
,, यंग हिंदु युनियन क्लब मुंबई.
,, नाशीक सिटी.
,, वासीम.
,, गडइंग्लज.
से० वाचनमंदीर चिकोडी.
से० ने० ला० मालेगांव सिटी.
हरि वासुदेव काळे.
हरि मथुरा रेडकर.
हरि बळवंत ठाकूर.

## कायम वर्गणीदारांस आभारप्रदर्शन, सूचना व विनंति.

ह्या ग्रंथापासून पुढें प्रकाशित होणारे माझे ग्रंथमालिकेस आपण जो कायमचा आश्रय दिला आहे त्याबद्दल मी आपला अत्यंत आभारी झालों आहें. ग्रंथप्रकाशनाच्या कामीं मोठी अडचण येते ती ग्राहक मिळण्याची; पण ते ग्राहकच जर सिद्ध आहेत, तर आतां प्रकाशकाला मोठी मदत झाली आहे, इतकेंच नाहीं, उत्तेजन मिळालें आहे हें काय विचारावें! आपण आश्रय दिल्यापासून व्यवहारदृष्टीनें माझ्या चरितार्थापुरते दोन पैसे मला मिळतील ही गोष्ट क्षणभर एका बाजूस ठेविली व विचार केला, तर माझ्या द्वारें मराठींत उत्तम ग्रंथ प्रकाशित करण्याचें आपण पतकरिलें आहे असें म्हणण्याला किंवा ह्यापुढील ग्रंथप्रकाशनाचें सर्व श्रेय आपणांकडे आहे असें मानण्याला आतां कांहींएक हरकत नाहीं असें मला वाटतें. अर्थात् माझे जे हेतु आहेत त्यांतले बहुतेक आपलेच आहेत.

आतां आपणांस सूचना म्हणून एवढीच करावयाची कीं, उभयपक्षीं विश्वासानें वागणें ही आपणांवर मोठी जबाबदारी पडली आहे. आणि ती उभयपक्षांकडून उत्तमप्रकारें संभाळिली जाईल अशी मला पूर्ण उमेद आहे. कित्येक मित्रांचें ठिकाण बदलल्यास ( कायम वर्गणीदारांत आपलें नांव छापिलें आहे हें ध्यानांत ठेवून ) तेंही त्यांनीं अगत्य कळविलें पाहिजे.

याखेरीज आपणांस थोडी विनंति आहे. आपण दि-

लेल्या आश्रयाबद्दल मी फार संतुष्ट आहें, व नवीन ग्रंथांचें प्रकाशन होण्याला एवढासुद्धां आश्रय पुरे आहे, तथापि आपापल्या मित्रमंडळींत आणखी जर कायम वर्गणीदार होण्यासारखे असतील तर त्यांस शिफारस करण्याला आपण विसरावयाचें नाहीं; कारण कायम वर्गणीदारांची संख्या बरीच वाढल्यास मला विशेष बळकटी येऊन, आपणांसही आतांपेक्षां थोडा जास्त फायदा देतां येणार आहे.

आपला,

ब० ग० दाभोळकर.

---

### कायम वर्गणीदारांखेरीज
## ह्या ग्रंथास असलेल्या वर्गणीदारांस विनंति.

कायम वर्गणीदारांखेरीज हा ग्रंथ घेणारे आणखी बरेच वर्गणीदार आहेत. त्यांत कांहीं सद्गृहस्थ माझे बहुतेक ग्रंथ घेणारे असे आहेत परंतु कायम वर्गणीदारांच्या व्यवस्थेकडे त्यांचें इतकें लक्ष्य गेलें नाहीं असें वाटतें; व कांहीं तर अगदींच अपरिचित असल्यामुळें त्यांना ती व्यवस्था माहीत असण्याचा संभव नाहीं. म्हणून आपणा सर्वांस अशी विनंति आहे कीं, एकंदर हकीकत लक्ष्यांत आणून कायमचा आश्रय देण्याची आपली सोय असेल, तर कृपा करून तारीख १९ जानेवारीचे आंत मला कळवावें.

आपला,

ब० ग० दाभोळकर.

## ह्यापुढील निघणाऱ्या ग्रंथाबद्दल सूचना.

मोक्षमुल्लर भट्ट ( प्रो० मॅक्समुलर ) यांचा वेदांताकडे फार कल आहे हें सर्वत्र प्रसिद्ध आहे. ' धर्म ' विषयावर फार महत्त्वाचीं अशीं पुष्कळ व्याख्यानें त्यांनीं दिलीं आहेत तीं सर्व इंग्लिश भाषेंत प्रसिद्ध झालीं असून त्यांचे ७ व्हाल्युम ( भाग ) आहेत. ते ७ भाग मिळून सुमारें ४० रुपये किंमत होईल. ह्या व्याख्यानांचें सार मराठी भाषेंत आणण्याचा आमचा विचार ठरला आहे. सातही भागांतील सारांशाचा एक ग्रंथ करावयाचा कीं दोन भागांत तो द्यावयाचा ह्याचा निश्चय मात्र झाला नाहीं. तथापि तो फारच थोड्या किंमतीनें मराठींत द्यावा अशी इच्छा आहे; निदान ( दोन भागांत द्यावा लागला तर ) ४ रुपयांस तरी देतां आलाच पाहिजे असा विचार आहे.

हा ग्रंथ लिहिण्याचें काम आमचे विद्वान् मित्र रा० रा० शंकर बाळकृष्ण दीक्षित यांनीं स्वीकारिलें आहे. विशेष खुलाशाची जाहिरात मागाहून प्रसिद्ध होईल. वर्गणीदार होण्याचें असेल त्यांनीं आपलीं नांवें नोंदण्यास हरकत नाहीं.

बळवंत गणेश दाभोळकर.

# प्रस्तावना.

प्रस्तुत ग्रंथाचें नांव वाचिल्याबरोबर त्यांतील मजकुराविषयीं जो गैरसमज होण्याचा संभव आहे तो प्रथमतः दूर केला पाहिजे. ' नीतिसिद्धांत ' किंवा 'नीतिशास्त्राचे सामान्य सिद्धांत ' हे शब्द पाहतांक्षणींच ' खरें बोलावें ', ' चोरी करूं नये ', ' पुरुषानें पत्नीव्रतानें व स्त्रीनें पातिव्रत्यानें रहावें ' इत्यादि जे लोकमान्य नीतिनियम आहेत ते मनांत येतात. तेव्हां, हे सिद्धान्त ह्या पुस्तकांत सिद्ध केलेले असावे असा तर्क होतो. अशा अजमासानें पुस्तक हातांत घेऊन वाचूं लागलें व प्रकरणामागून प्रकरणें गेलीं तरी अपेक्षित सिद्धांत दृष्टीस पडले नाहींत म्हणजे वाचकांस अचंबा वाटण्याचा संभव आहे. वाचकांनीं अशा घोंटाळ्यांत पडूं नये यासाठीं ह्या पुस्तकांतील सिद्धान्त कोणत्या प्रकारचे आहेत ह्याविषयीं येथें दिग्दर्शन करितों.

कोणत्याही लोकांची सामाजिक स्थिति आणि त्यांचे नीतिविचार ह्यांचा परस्परांशीं संबंध असतो. निरनिराळ्या जातींतील लोकांच्या नीतिविषयक समजुतींत तर फरक आढळतोच, पण एका जातींतल्या लोकांत देखील निरनिराळ्या स्थितींत निरनिराळे समज होते असें दिसून येतें. लोकांची सामाजिक स्थिति आणि त्यांचे नीतिविचार ह्यांमध्यें जो स्वाभाविक संबंध आढळून येतो, त्याकडे आपल्या लोकांचें लक्ष्य गेलें होतें असें वाटत ना-

हीं. पाश्चिमात्य लोकांतही अलीकडेच ह्या गोष्टीचा विचार होऊं लागला आहे. आणि असें होणें स्वाभाविकच होतें. कारण नीतिशास्त्राचा उगम ईश्वरापासून आहे असा लोकांचा समज असल्यामुळें तें लोकांना अचल वाटत असे. श्रद्धेमुळें असा समज होऊन विचारांचें क्षेत्र आकुंचित झाल्यावर, लोकांचे नीतिविचार त्यांच्या सामाजिक स्थितीवर अवलंबून असतात हें तत्त्व त्यांच्या लक्ष्यांत येणें कठिण होतें. परंतु पुढें उत्क्रमणतत्त्वाचा उदय झाल्यानंतर विचारी लोकांस नीतीच्या उत्पत्तीविषयीं शंका येऊं लागली. आधिभौतिक सृष्टींतील फेरफार जसे उत्क्रमणतत्त्वावर चालले आहेत तसेच आध्यात्मिक सृष्टींतील फेरफारही त्याच तत्त्वावर चालले असावे असें त्यांस वाटूं लागलें व ह्या नवीन उपपत्तीच्या शक्यतेबद्दल पुरावाही डोळ्यांपुढें पाहिजे तितका दिसूं लागला. उत्क्रमणतत्त्वाचा उदय झाल्यापासून उत्क्रमणाच्या पायावर नीतीची इमारत उभारण्याचा यत्न चालू आहे व त्याबरोबरच सामाजिक स्थिति आणि नीतिविचार ह्यांमध्यें काय संबंध असतो तो शोधून काढण्याकडे विचारी लोकांचें लक्ष्य लागलेलें आहे. विशेष प्रकारच्या सामाजिक स्थितींत विशेष प्रकारचे नीतिविचार उद्भूत होत असतात व ती स्थिति बदलली म्हणजे ते विचारही बदलत जातात ही गोष्ट दिवसेंदिवस लोकांच्या लक्ष्यांत येत चालली आहे. ज्याप्रमाणें निरनिराळ्या प्रकारचीं धान्यें पिकविण्याकरितां निरनिराळ्या प्रकारच्या जमिनी व खतें लागत असतात त्याचप्रमाणें विशिष्ट नीतिवि-

चार उद्भूत होण्याला विशिष्ट सामाजिकस्थिति असावी लागते. ह्या पुस्तकांत जे सामान्य सिद्धान्त दिले आहेत ते अशा प्रकारचे आहेत. पृथ्वीवरील अनेक जातींतील लोकांच्या सामाजिकस्थिति आणि त्यांचे नीतिविचार ह्यांचें परीक्षण करून हे सिद्धान्त काढिलेले आहेत. आरंभीं सांगितलेले नीतिसिद्धान्तही अप्रत्यक्षरीतीनें क्वचित् स्थळीं आढळतील, परंतु ते देणें हा ह्या पुस्तकाचा मुख्य हेतु नव्हे.

उत्क्रमणतत्त्व एका बाजूस ठेविलें तरी एरव्हींही ह्या पुस्तकांत ज्या पद्धतीनें नीतीचा विचार केला आहे त्या पद्धतीनें इकडे कोणीं केला असावासें वाटत नाहीं. कदाचित् कोणीं केला असल्यास त्याची पुष्कळांस माहिती तरी नाहीं. ह्यासाठीं ह्या पुस्तकांतील अपरिचित विचारसरणीबद्दल चार शब्द लिहिले पाहिजेत. ह्या विचारसरणींत एका नियमानें बद्ध अशा अनेक गोष्टींचें परीक्षण करून तो नियम शोधून काढावयाचा असतो. त्या नियमाविषयीं पूर्वीं आपणांस कांहीं माहिती नसते त्या नियमाचीं अनेक गोष्टींवर झालेलीं कार्यें मात्र आपल्या डोळ्यांपुढें असतात. त्या कार्यांवरून त्यांचा कारणरूप जो नियम त्याचें अनुमान करावयाचें असतें. अशा रीतीनें शोधून काढिलेल्या नियमास 'विशेषपरीक्षापूर्वक सामान्यसिद्धान्त' असें नांव दिलें असतां चालेल. शास्त्रीय शोध करण्याचे कामीं ह्या विचारसरणीचा फार उपयोग आहे. मनुष्याच्या ज्ञानाचा बहुतेक भाग ह्या विचारसरणीचेच द्वारें त्यास प्राप्त झाला आहे. मात्र ह्या विचारसरणीचा उपयोग पहिल्या-

नें ह्या ज्ञानाची प्राप्ति ज्यांना झाली त्यांनीं केला होता. क्षुल्लक गोष्टींतही मनुष्यें नकळत ह्या विचारसरणीचा उपयोग करीत असतात. पुष्कळ सारखे पदार्थ पाहिले म्हणजे त्यांचा सारखेपणा लक्ष्यांत येतो तो ह्या विचारसरणीनेंच. मनुष्याच्या जातिविषयक कल्पना अशाच बनतात. गुरुत्वाकर्पणाचा नियम आतां सर्वांस माहीत आहे. तो ह्या विचारसरणीच्याच साह्यानें शोधून काढितां आला. झाडावरून फळ खालीं पडणें, हातांत कोणताही पदार्थ घेतला असतां तो जड लागणें, भरती-ओहोटी येणें, चंद्राचें पृथ्वीसभोंवतीं व बाकीच्या उपग्रहांचें आपापल्या जनकग्रहाभोंवतीं फिरणें, पृथ्वीचें व इतर ग्रहांचें सूर्याभोंवतीं फिरणें वगैरे गुरुत्वाकर्पणाच्या नियमांचीं कार्यें आहेत. हीं सर्व मनुष्यांच्या डोळ्यांपुढें होतीं, परंतु गुरुत्वाकर्पणाची त्यांस कल्पना नव्हती. त्यांचें परीक्षण करून त्यांवरून गुरुत्वाकर्पणाचा नियम न्यूटन ह्यानें शोधून काढिला. नवीन शोध लाविण्याचे कामीं ह्या विचारसरणीचा उपयोग करणें मोठें कठिण काम आहे. मनुष्याचे अंगीं विशालबुद्धि व कल्पकता असल्यावांचून त्याला ह्या पद्धतीचा उपयोग करितां येणार नाहीं. प्रत्येक शास्त्रांतील सामान्य नियम ह्या विचारसरणीच्या साह्यानेंच कळून आले आहेत. अशा रीतीनें नियम शोधून काढिले तरी ते सर्वस्वीं खरे असतात असें नाहीं. नियम शोधून काढिल्यानंतर ते सर्व ठिकाणीं लागू पडतात कीं नाहीं तें पाहिलें पाहिजे. ते जर सर्व ठिकाणीं लागू पडले तरच ते सर्वांशीं खरे मानितां येतील; नाहींतर ते अंशतः मात्र खरे असूं शक-

तील. सर्व ठिकाणीं लागू पडणारा नियम असल्यास त्यास पूर्णानुमान किंवा पूर्णसिद्धान्त व सर्व ठिकाणीं लागू पडणारा आहे कीं नाहीं हें माहीत नसल्यास त्यास अपूर्णानुमान किंवा अपूर्णसिद्धान्त म्हणतात. उदाहरणार्थ, सूर्याभोंवतीं फिरणाऱ्या ग्रहांच्या गतींची परीक्षा केल्यावर असें दिसून येतें कीं, ते पश्चिमेकडून पूर्वेकडे फिरतात. आतां आजपर्यंत माहीत असलेल्या ग्रहांसंबंधानें जरी हा नियम खरा आहे, तरी उलट दिशेनें फिरणारा दुसरा एकादा ग्रह सांपडणार नाहीं म्हणून कशावरून? आपल्या जनकग्रहासभोंवतीं उलट दिशेनें फिरणारे कांहीं उपग्रह सांपडले आहेत. तेव्हां सूर्याभोंवतीं उलट दिशेनें फिरणारा एकादा ग्रहही कदाचित् सांपडेल. ह्यासाठीं ग्रह पश्चिमेकडून पूर्वेकडे फिरतात हें अपूर्णानुमानच समजलें पाहिजे. असल्या अनुमानांची संभवनीयता कित्येक प्रसंगीं अधिक असेल व कित्येक प्रसंगीं कमी असेल आणि ती अनुभवानें जाणितां येईल. उदाहरणार्थ, गुरुत्वाकर्षणाचा नियम असंख्य ठिकाणीं लागू पडतो हें अनुभवानें समजतें, तेव्हां त्या अनुमानाची संभवनीयता फार आहे, किंबहुना तो बहुतेक सर्वांशीं खरा आहे असें म्हटलें तरी चालेल. तथापि ज्याअर्थी त्या नियमाखालीं येणाऱ्या प्रत्येक प्रश्नाचा विचार करणें शक्य नाहीं त्याअर्थी त्यास पूर्णानुमान म्हणतां येत नाहीं. ज्यावेळीं कोणत्याही नियमाखालीं येणाऱ्या प्रत्येक प्रश्नाचा विचार करितां येतो व त्याला तो नियम लागू पडतो तेव्हां त्याला पूर्णानुमान म्हणतात. उदाहरणार्थ, इंग्रजी महिन्यांचे

दिवस बत्तिसांहून कमी असतात हें पूर्णानुमान आहे. परंतु पूर्णानुमान शास्त्रीयदृष्ट्या बहुतेक निरुपयोगीच असतें. कारण त्यापासून नवीन ज्ञान होण्याचा संभव नसतो. ज्यांची संभवनीयता फार असते अशा अपूर्णानुमानांचेंच शास्त्रीय शोधांत महत्त्व आहे. आणि ह्या विचारसरणीनें इतर शास्त्रांत ज्याप्रमाणें अमोलिक शोध लागले आहेत व त्यांचा जगाला केवढा तरी उपयोग झाला आहे; त्याप्रमाणें नीतिशास्त्रांतही नवे शोध लागून त्यापासून मनुष्यजातीचें कल्याण होण्याचा संभव आहे.

आतां पहिल्यानें ह्या पुस्तकांत विषयाची जुळणी कशी केलेली आहे तीबद्दल थोडा खुलासा करून मग चार सामान्य गोष्टींचा उल्लेख करण्यास बरें. प्रथमतः मनुष्याच्या नीतिविचारांत घोंटाळा उत्पन्न होण्याचीं कारणें कोणतीं आहेत त्याबद्दल विस्तारपूर्वक विचार केला आहे. नंतर त्या कारणांच्या धोरणानें नीतीचे विभाग करून व त्या परस्परांमधील भेद दाखवून 'नीति' ह्या शब्दाची निरनिराळे लोक कशी ओढाताण करितात व पाहिजे त्या गोष्टी नीतींत घालून पाहिजे त्या बाहेर टाकितात हें दाखविलें आहे. मग अनेक लोकांच्या नीतिविचारांचें परीक्षण करून नीतीची कसोटी ठरविली आहे. लोकदृष्टीच्या नीतीसंबंधानें हा विचार झाल्यानंतर वास्तविक नीति व लोकदृष्टीची नीति ह्यांमधील फरक दाखविला आहे. मग मनुष्याच्या नीतिविषयक आचरणाचे ठळकठळक विभाग करून त्या प्रत्येकाचा वेगळा विचार केला आहे व त्याचा सामाजिक स्थितीशीं काय संबंध असतो हें शोधून काढण्या-

चा प्रयत्न केला आहे. आणि शेवटल्या प्रकरणांत ह्या पुस्तकांतील सगळ्या पुराण्यांचें व नीतिसिद्धान्तांचें सार दिलें आहे.

आपणांला पूज्य वाटणाऱ्या आमच्या पूज्य धर्मग्रंथांत देवांविषयीं जें वर्णन दिलें आहे त्यावर कित्येक प्रसंगीं स्पेन्सर साहेबांनीं जी टीका केली आहे ती कित्येकांस कटु वाटेल. परंतु तींत कमी-अधिक न करितां ती जशीच्या तशीच देणें बरें वाटलें. आपल्या धर्मग्रंथांबद्दल लोक काय म्हणतात तें शांतपणें ऐकून घेण्याइतकें धर्मौदार्य हल्लींच्या स्थितींत प्रत्येक मनुष्याच्या अंगीं असलें पाहिजे. आणि त्यांत स्पेन्सरसाहेबांसारख्या अलौकिक तत्त्ववेत्त्यांचे विचार तर अवश्य ऐकून घेतले पाहिजेत. स्पेन्सर साहेबांची आमच्या धर्मग्रंथांतील गोष्टीवरील टीका व ख्रिस्ती मिशनऱ्यांची टीका ह्यांत महदंतर आहे. ख्रिस्ती मिशनऱ्यांना आपल्या डोळ्यांतलें मुसळ लपवून ठेवून आमच्या डोळ्यांतलें कुसळ दाखवावयाचें असतें. परंतु स्पेन्सरसाहेबांसारख्या महात्म्यांजवळ तसा आपपर भाव नाहीं. त्यांना ऋग्वेद सारखा व बायबलही सारखेंच. त्यांच्या तीव्र विचारवज्राच्या आघाताखालीं सर्वांचेंच चूर्ण होऊन जातें. ईश्वरप्रणीत असा ग्रंथ असणें संभवनीय नाहीं असें त्यांचें ठाम मत आहे. पृथ्वीवरील ईश्वरप्रणीत किंवा प्रासादिक मानिलेले सर्व धर्मग्रंथ मनुष्यांनीं लिहिले आहेत असा पक्का ग्रह झाल्यानंतर त्यांवर पाहिजे तशी खरमरीत टीका करण्याला संकोच न वाटणें साहजिक आहे. आह्मांलाच इतर धर्मग्रंथांतील गोष्टींवर वेडीवांकडी

चर्चा करण्याला कोठें शंका वाटते ? आपल्या धर्मग्रंथां-
तील गोष्टींविषयीं कोणीं वेडेवांकडें लिहिलें तर मात्र
आपणांला तें कटु लागतें. स्पेन्सर साहेबांची टीका शां-
तपणें वाचून तिचें मनन करण्याला आणखी एक कारण
आहे. त्यांनीं दुष्टपणानें दुसऱ्यांना चिडविण्याच्या हे-
तूनें ही टीका केलेली नाहीं. केवळ सत्यान्वेषणाच्या
हेतूनें आमच्या ग्रंथांतील गोष्टींविषयीं विचार करून
त्यांना जीं अनुमानें निघतात असें वाटलें तीं त्यांनीं का-
ढिलीं आहेत. आतां स्पेन्सरसाहेब अगदीं परकी अ-
सल्यामुळें त्यांस कदाचित् आपलेकडील गोष्टींविषयीं
यथायोग्य कल्पना करितां आली नसेल. परंतु तसें अ-
सल्यास त्यांच्या विचारांचें परीक्षण करण्याची ज्यां-
च्या अंगीं योग्यता असेल त्यांनीं आपलीं मतें प्रसिद्ध
करावीं व त्यांसही कळवावीं. स्पेन्सरसाहेब आग्रही ना-
हींत. युक्तिवादाला ते नेहमीं तयार आहेत. सदसद्वि-
वेकबुद्धीसंबंधानें त्यांनीं आपलें मत मागाहून कसें ब-
दललें ह्याबद्दल प्रस्तुत पुस्तकांतच एका ठिकाणीं उल्ले-
ख केला आहे.

नीतिविषयक समजुतींचा विचार करितांना पुराव्या-
दाखल कित्येक ठिकाणीं इतकीं उदाहरणें दिलीं आहे-
त कीं, निरनिराळ्या लोकांच्या त्याच त्याच समजुती
पुनःपुनः वाचणें अगदीं कंटाळवाणें होऊन जाण्याचा
संभव आहे. परंतु ह्या ठिकाणीं एवढें लक्ष्यांत ठेविलें
पाहिजे कीं, करमणूक करून देणें हा ह्या पुस्तकाचा
उद्देश नव्हे. मिळेल तितका पुरावा मिळवून त्यापासून
सत्य शोधून काढणें हा उद्देश आहे. एकादा भानगडी-

चा खटला न्यायाधीशापुढें चालला असला म्हणजे अनेक साक्षीदारांना छेडून छेडून प्रश्न विचारून त्यांजकडून निघेल तितकी माहिती काढण्याला जसें त्यानें कंटाळतां उपयोगाचें नाहीं, त्याचप्रमाणें नीतिविषयक सामान्यसिद्धांत काढितांना पुष्कळ उदाहरणांना कंटाळून चालणार नाहीं. जितकीं उदाहरणें अधिक तितकी सिद्धान्ताची संभवनीयताही अधिक. ही माहिती मिळविण्यासाठीं **स्पेन्सर** साहेबांना पुष्कळ प्रयास पडले आहेत. तेव्हां एवढ्या श्रमानें जो संग्रह त्यांनीं केला आहे तो एकदां वाचून टाकण्याला तरी आह्मीं कंटाळतां कामा नये.

ह्या पुस्तकांत स्थळांचीं, मनुष्यांचीं व मनुष्यजातींचीं नांवें फारच आलीं आहेत. त्यांजबद्दल विशेष माहिती **स्पेन्सर** साहेबांनींही आपल्या पुस्तकांत दिली नाहीं. ती मिळविण्याचें काम त्यांनीं वाचकांवरच सोंपवून दिलें आहे. इंग्रजी जाणणाऱ्या वाचकांना बरीच माहिती त्यांच्या पंचरस शिक्षणामुळें मिळालेली असते व आणखी माहिती मिळविण्याचीं त्यांना थोडींबहुत साधनेंही असतात. परंतु निवळ मराठी वाचकांना कोणत्याही गोष्टीबद्दल अधिक-उणी माहिती मिळविण्याला साधनें नाहींत. ह्यासाठीं त्यांच्याकरितां प्रसिद्ध स्थळें व पुरुष ह्यांबद्दल ‘सकलविद्यासंग्रह’ (Encyclopedia) नामक पुस्तकांतून माहिती मिळवून ती ठिकठिकाणीं टीपांतून दिली आहे व कित्येक ठिकाणीं मूळांतच गोंविली आहे. ह्या माहितीनें वाचकांची थोडीशी करमणूकही होईल व ती त्यांना इतर प्रसंगींही

उपयोगीं पडेल अशी आशा आहे. कित्येक अप्रसिद्ध व अर्वाचीन नांवांची माहिती मिळविण्याला सुलभ साधन जवळ नसल्यामुळें ती देतां आली नाहीं.

ह्या ग्रंथांत स्पेन्सर साहेबांनीं इतके उतारे घेतले आहेत कीं, प्रत्येक ठिकाणीं पुस्तकाचें व ग्रंथकर्त्याचें नांव देणें कंटाळवाणें झालें असतें. म्हणून कित्येक महत्त्वाच्या ठिकाणीं मात्र नांवें देऊन बाकीच्या उताऱ्यांबद्दल पुरवणींत खुलासा केला आहे. ज्या पुस्तकांतून व ज्या पृष्ठावरील उतारा घेतलेला असेल त्या पुस्तकाचें नांव व त्या पृष्ठाचा अंक त्यांनीं दिला आहे. त्यांच्या मूळ पुस्तकाच्या वाचकांसाठीं तसें करणें जरूर होतें, कारण पुराव्याचा पडताळा पाहण्याचें जर कांहीं वाचकांच्या मनांत आलें तर अशा माहितीवांचून तें त्यांस फार कठिण जाईल. आणि ही माहिती त्यांनीं दिली नसती तर पुराव्याचा खरेपणा वाचकांच्या मनांत तितका बिंबला नसता. परंतु मराठी वाचकांना ती माहिती अगदीं निरुपयोगी होईल. इंग्रजी पुस्तकांचीं नांवें व पृष्ठांक देऊन त्यांना ह्या पुस्तकांतील उताऱ्यांच्या खरेपणाबद्दल पडताळा पाहतां येणार नाहीं. परंतु मराठी वाचकांसाटीं एवढें मात्र येथें सांगून ठेवणें जरूर वाटतें कीं, स्पेन्सर साहेबांनीं ह्या ग्रंथांत अनेक लोकांविषयीं जी माहिती दिली आहे—मग ती इतर ग्रंथकारांचे शब्द अवतरणांत घेऊन दिलेली असो किंवा आपल्याच शब्दांनीं सांगितलेली असो—तीबद्दल आधार दिला नाहीं असें एकही स्थळ नाहीं.

ह्या पुस्तकांतील सिद्धांत चांगले लक्ष्यांत आले म्ह-

णजे एका शंकेचें चांगल्या रीतीनें समाधान होईल. नानाप्रकारच्या लोकांत नानाप्रकारच्या नीतिविषयक समजुती कां आढळून येतात हा मोठा बिकट प्रश्न आहे. ईश्वरानें प्रत्येक जातीच्या लोकांस निरनिराळा धर्म लावून दिलेला आहे व त्या त्या धर्माप्रमाणेंच त्या त्या लोकांनीं वागलें पाहिजे, असें ह्या प्रश्नाचें एक ठरींव उत्तर कित्येक लोकांकडून मिळत असतें. जें जसें आढळतें तें तसें ईश्वरानेंच केलें आहे असें म्हणून आपल्या अज्ञानावर पांघरूण घालण्याची मनुष्याला अनेक युगांची संवय झाली आहे. व ह्या संवईमुळें कोणत्याही गोष्टीविषयीं आपण अज्ञानी आहों असें त्याला वाटतच नाहीं. अज्ञानाचेंच ज्ञान नसलें म्हणजे तें दूर करण्याविषयीं तरी बुद्धि होते आहे कशाला? प्राचीन काळच्या लोकांचें कित्येक गोष्टींविषयींचें अज्ञान त्यांच्या सर्वज्ञतेच्या घमेंडीमुळेंच कायम राहिलें. आपली मति चालत नाहींशी झाली कीं लागलाच तेथें ईश्वराला आणून आपण मोकळें व्हावयाचें! पाऊस कां पडतो ह्या प्रश्नाचें उत्तर देतां आलें नाहीं कीं लागलेंच इंद्राचा ऐरावत सोंडेंत पाणी घेऊन तें चोंहोंकडे फेंकितो किंवा वरुणदेव स्वर्गांत बसला आहे तो मेघांकडून वृष्टि करवितो म्हणून कांहीं तरी उत्तर ठोकून दिलेंच! अशा रीतीनें स्वतः अज्ञानांत पडण्याचा व दुसऱ्यांना अज्ञानांत घालण्याचा यत्न न करितां, नम्रपणानें आपणाला ह्या गोष्टींचीं कारणें समजत नाहींत असें म्हटलें तर किती चांगलें होईल? कारणें समजत नाहींत असें वाटत असलें म्हणजे तीं शोधून काढण्याचा प्रयत्न करा-

वा असें कोणाला तरी वाटेल व तीं मनुष्याच्या आटो-क्यांत असल्यास कालांतरानें तीं त्याला कळूंही लाग-तील. ह्या पारिग्राफाच्या आरंभीं जो प्रश्न दिला आहे त्याच्या उत्तराची दिशा आतां ठरल्यासारखी झाली आहे. अनेक युगेंपर्यंत भिन्न परिस्थितींमुळें विविधस-माजांतील लोकांच्या मनांवर जे नानाप्रकारचे संस्कार होत गेले त्यांमुळें त्यांमध्यें निरनिराळ्या प्रकारच्या नी-तिविषयक समजुती उत्पन्न झाल्या असाव्या. वरील ठरींव उत्तरापेक्षां आतां दिलेलें उत्तर किती बरें सुयुक्तिक दि-सतें? त्याचा चांगला उमज पडण्याला ह्या पुस्तकांती-ल मर्म नीटरीतीनें लक्ष्यांत आलें पाहिजे. कदाचित् कित्येकांचें ह्या उत्तरानें समाधान होणार नाहीं. पण तें न झालें तर आपलें ह्या गोष्टीविषयीं अज्ञान कबूल करणें फार चांगलें. जेथें तेथें ईश्वराला मध्यें घालणें म्हणजे ईश्वर काय करितो हें जसें काय आपणास सर्व समजतेंच आहे असें दाखविणें होय. ईश्वर खरोखर जरी ह्या गोष्टी आपल्या हातानें करीत असला तरी त्यांविषयीं आपलें अज्ञान प्रकट केल्यानें आपण ईश्व-राच्या घरीं दोषी होणार नाहीं, परंतु जर तो त्या क-रीत नसला—व तसें असणेंच अधिक संभवनीय आहे—तर मात्र आपण त्याच्यावर भलताच आरोप केल्यामु-ळें तो आपणावर रुष्ट होण्याचा संभव आहे.

तत्त्वशोधनाच्या पाठीस लागलेल्या लोकांना ह्या पु-स्तकापासून एक महत्त्वाचा उपयोग आहे. नानाविध लोकांच्या सामाजिक स्थिति आणि त्यांच्या नीतिविष-यक समजुती ह्यांविषयीं स्पेन्सरसाहेबांनीं शेंकडों ग्रंथ

वाचून जी माहिती संकलित करून वाचकांपुढें ठेविली आहे ती त्यांचीं मतें ज्यांस पसंत नसतील त्यांनीं देखील जशीच्या तशीच घेण्यास हरकत नाहीं. शेंकडों ग्रंथकारांचे अनुभव त्यांच्या शब्दांनीं दिलेले असल्यामुळें स्पेन्सरसाहेबांच्या मतांचा त्यांस स्पर्श देखील झालेला नाहीं. स्पेन्सरसाहेबांनीं त्या पुराव्यावरून अनुमानें मात्र काढिलीं आहेत. त्यांनीं दिलेला पुरावा अशा प्रकारचा आहे कीं, तो सर्वांनीं कबूलच केला पाहिजे. कोणाला जर दिलेल्या पुराव्यावरून निराळीं अनुमानें निघतात असें वाटत असेल, तर तीं त्यांनीं खुशाल काढावीं. हजार ठिकाणचा पुरावा एकत्र करण्याचें अति कठिण काम त्यांनीं केलें आहे, त्याचा उपयोग जसा ज्याला पाहिजे तसा त्यानें करून घ्यावा.

मनुष्याचीं मतें कशींही असोत, त्याला सृष्टींत आपल्या सभोंवतीं चाललें आहे काय ह्याचें ज्ञान अवश्य असलें पाहिजे ह्याविषयीं मतभेद नाहीं. असल्या ज्ञानाचा संग्रह ह्या पुस्तकांत पुष्कळ आहे. ह्या दृष्टीनें सामान्य वाचकालाही ह्या पुस्तकाचा बराच उपयोग होईल. पुस्तकांतील मर्म समजण्याची जरी त्याला शक्ति नसली तरी पृथ्वीवरील अनेकविध जातींतिल लोकांच्या आचारविचारांचें जें ठिकठिकाणीं वर्णन आलें आहे तें नुसतें वाचतां येणाऱ्या मनुष्यासही समजण्यासारखें आहे. लहानशा पुस्तकांत इतक्या माहितीचा संग्रह केलेला फारच क्वचित् आढळून येतो. ह्या पुस्तकाच्या वाचनानें अगदीं सामान्य मनुष्याच्या अंगींही बराच बहुश्रुतपणा येईल.

केवळ करमणुकीसाठीं कादंबऱ्यांसारखीं पुस्तकें वाचणारे जे लोक आहेत त्यांनाही ह्या पुस्तकाचा उपयोग करून घेतां येईल. सृष्टीच्या कोणत्याही भागाचें अवलोकन केलें असतां त्यांत चित्रविचित्रपणा ओतप्रोत भरलेला असतो असें दिसून येईल. जडसृष्टीप्रमाणेंच मानसिक सृष्टींतही वैचित्र्य दिसून येतें. ज्यांचें आपणांस आश्चर्य वाटेल किंवा ज्यांचा आपणांस किळस येईल अशा प्रकारचे नीतिविचार पृथ्वीवरील अनेक लोकांत आढळून येतात. त्यांचा संग्रह ह्या पुस्तकांत झालेला आहे. कल्पनासृष्टींतील असंभवनीय प्रकार वाचून करमणूक करून घेण्यानें जो आनंद होतो त्याच्या अनेक पटीनें, असंभवनीय वाटणारे परंतु प्रत्यक्ष सृष्टींत दृष्टिगोचर होणारे प्रकार वाचून मनाला आनंद होईल व त्यांचें कारण काय असावें तें समजून घेण्याची इच्छा उत्पन्न होऊन ज्ञानप्राप्तीकडे लक्ष्य लागेल.

ह्या पुस्तकाच्या उपयोगाची आणखी एक दिशा आहे. आपल्या लोकांची स्थिति कूपमंडूकासारखी झाली आहे. विहिरींतल्या बेडकाला विहीर हेंच कायतें जग असें वाटत असतें व त्याच्या बाहेर त्याची दृष्टि पोंहोंचत नाहीं. हल्लीं जगांवर चोहोंकडे चाललें आहे काय व पूर्वीं जगांतील लोकांची स्थिति काय होती ह्याची आह्मांला बिलकुल माहिती नसल्यामुळें आपले आचारविचार तेच चांगले व आपण मानितों तीच खरी नीति असे दुराग्रह आमच्या डोक्यांत खिळून गेले आहेत. लोकांचे हल्लींचे व पूर्वींचे आचारविचार आणि समजुती ह्यांची माहिती असली म्हणजे आपण

आपल्या मनाविरुद्ध देखील आपली व त्यांची तुलना करीत असतो व त्यापासून आपल्या आचरणावर लक्ष्यांत न येण्यासारख्या रीतीनें फरक पडत असतो. अनेक लोकांच्या नीतिविषयक समजुतींची माहिती करून देणारें आपल्या भाषेत एकही पुस्तक नाहीं असें वाटतें. ती उणीव ह्या पुस्तकानें बरीच दूर होईल अशी उमेद आहे. अनेक लोकांच्या चित्रविचित्र समजुती कळून आल्या म्हणजे मनाचा कोतेपणा नाहींसा होऊन आश्चर्यानें मनुष्य थक्क होऊन जातें, व इतरांच्या समजुती ज्या कारणांनीं उत्पन्न झाल्या त्याच कारणांनीं आपल्याही झाल्या असतील असें वाटून, आपल्या समजुतींतच विशेष चांगुलपण असण्याचें कारण नाहीं असा विचार मनांत येऊं लागतो. लोकांच्या समजुतींतील चमत्कारिकपणा जसा आपल्या नजरेस येतो तसाच आपल्या समजुतींतील चमत्कारिकपणा त्यांच्या नजरेस येत असेल असाही विचार मनांत आल्यावांचून राहत नाहीं. असे विचार डोक्यांत येऊं लागले म्हणजे आपलें तेवढें सर्व चांगलें व दुसऱ्याचें वाईट हा दुराग्रह नष्ट होऊन जातो, व निःपक्षपातानें आपल्या समजुतींतील गुणदोषांचें परीक्षण करण्याची योग्यता मनुष्याचे अंगीं येते.

आतां स्पेन्सरसाहेबांचे नीतिशास्त्रावरील सर्व ग्रंथ मराठी वाचकांस उपलब्ध झाले आहेत. तेव्हां त्यांबद्दल सामान्यतः चार शब्द लिहिणें जरूर आहे.

स्पेन्सरसाहेबांच्या 'नीतिमीमांसा' प्रकरणाचे एकंदर पांच ग्रंथ आहेत. पैकीं चार ( नीतिशास्त्राचीं मूलतत्त्वें, न्याय, आत्मनीति, आणि परोपकार ) मराठींत प्रसिद्ध

झाले आहेत व हा पांचवा. त्यांचा अनुक्रम मात्र ते ज्या क्रमानें प्रसिद्ध झाले आहेत तसा नाहीं. आज पंधरा वर्षे स्पेन्सरसाहेबांना आपली प्रकृति क्षीण झाली व आपला आतां लवकरच अंत होईल किंवा एकदम अंत झाला नाहीं तरी कदाचित् ग्रंथ लिहिण्याचें सामर्थ्य आपल्या अंगीं राहणार नाहीं असें वाटत आहे. त्यामुळें विशेष महत्त्वाचीं पुस्तकें अगोदर लिहावीं व कमी महत्त्वाचीं मागून लिहावीं असा क्रम त्यांनीं आरंभिला आहे. चित्रकार ज्याप्रमाणें पहिल्यानें चित्राचा आराखडा पुरा करून मग सवडीसवडीनें त्याचे निरनिराळे भाग तयार करितो त्याचप्रमाणें स्पेन्सरसाहेबांनीं आपल्या ग्रंथमालिकेच्या संबंधानें केलें आहे. पहिल्यानें स्पेन्सरसाहेब मासिक व त्रैमासिक पुस्तकांतून तुटकतुटक निबंध लिहीत असत. परंतु व्यवस्थितरीतीनें आपले विचार प्रदर्शित करण्यासाठीं प्रचंड ग्रंथरचना करण्याचा विचार जेव्हां त्यांच्या मनांत आला, तेव्हां वेळ मिळाला तर आपणास किती विषयांवर किती ग्रंथ लिहावयाचे आहेत हें त्यांनीं पहिल्यानें ठरविलें. व त्यांचा परस्पर संबंध दिसून येईल अशा रीतीनें एक कोष्टक तयार करून तें आपल्या एका पुस्तकांत प्रसिद्ध केलें. प्रथम कांहीं वर्षेपर्यंत अनुक्रमानेंच पुस्तकें लिहिण्याचें त्यांचें काम चाललें होतें. परंतु पुढें सगळीं पुस्तकें आपल्या हातून कदाचित् संपणार नाहींत असें मनांत येऊन, प्रत्येक विषय पुरा करण्याचे नादास न लागतां त्यांनीं मधले मधले महत्त्वाचे विषयविभाग निवडून काढून त्यांवरच लिहिण्यास सुरुवात केली. ह्या-

मुळें त्यांचे नीतिमीमांसेवरील ग्रंथ प्रसिद्ध करण्याचा क्रम व त्यांचा वास्तविक अनुक्रम ह्यांमध्यें मेळ राहिला नाहीं. त्यांचे हे ग्रंथ इंग्रजींत ज्या क्रमानें प्रसिद्ध होत गेले त्याच क्रमानें मराठींतही प्रसिद्ध झाले आहेत. त्यांचा वास्तविक अनुक्रम येणेंप्रमाणें आहे:—नितिशास्त्राचीं मूलतत्त्वें ( The Data of Ethics ), नीतिसिद्धान्त ( The Inductions of Ethics ), आत्मनीतीचीं तत्त्वें (The Ethics of Individual Life ), न्यायतत्त्वें ( Justice ), आणि परोपकार ( Beneficence ). असें हें पंचविभागात्मक नीतिमीमांसा प्रकरण ईश्वरकृपेनें गेल्यावर्षींच **स्पेन्सर** साहेबांच्या हातून तडीस गेलें व त्याच्याच कृपेनें मराठी वाचकांना त्याचा इतक्या लवकर लाभ होत आहे.

**स्पेन्सर**साहेबांच्या नीतिग्रंथांवांचून काय अडलें होतें असा एक प्रश्न विचारण्यांत येत असतो, त्याला **स्पेन्सर** साहेबांनींच एके ठिकाणीं उत्तर दिलें आहे. विद्याप्रसारामुळें व नवीन शास्त्रीय शोधांमुळें ज्या प्रकारचा संस्कार इंग्लिश लोकांवर झाला आहे त्याच प्रकारचा संस्कार हिंदुस्थानवासी लोकांवर होत आहे व हिकडील लोकांच्या विचारांना तिकडलेंच वळण लागत आहे. ह्यासाठीं त्या लोकांना दिलेलें उत्तर आमच्याही लोकांना लागू पडण्यासारखें आहे म्हणून तेंच येथें देतों. धर्मग्रंथांचा लोकांच्या मनावर पूर्वीं जो दाब होता व त्यांचें त्यांना जें महत्त्व वाटत असे ती स्थिति आतां बदलली आहे. त्यामुळें धर्मग्रंथांत सांगितलेल्या नीतीविषयींही त्यांची पूज्यबुद्धि शिथिल किंवा नष्ट

झाली आहे. ह्यासाठीं केवळ व्यावहारिक दृष्टीनें नीती-
चा विचार करून तिची अवश्यकता लोकांचे नजरेस
आणून देणें अत्यवश्यक झालें आहे. प्रस्तुत काळाला यो-
ग्य अशा नवीन समजुतींचें ग्रहण होण्यापूर्वींच जुन्या
समजुती कवडीमोल म्हणून टाकून दिल्या जात आ-
हेत. ह्या स्थितीसारखी घातक स्थिति दुसरी कोणतीही नाहीं.
पूर्वींपासून चालत आलेल्या समजुती ज्यांना टाकाऊ वाट-
तात त्यांपैकीं बऱ्याच लोकांना असें वाटतें कीं, त्यांचे
जागीं नवीन समजुती उत्पन्न होण्याची अवश्यकता नाहीं.
त्यांची जागा तशीच रिकामी राहिली तरी चालेल. आ-
णि जुन्या समजुतींचे जे अभिमानी आहेत त्यांना असें
वाटतें कीं, हल्लींच्या समजुती जर नाहींशा झाल्या तर
दुसऱ्या कशानेंही मनुष्याच्या वर्तनाला आळा पडण्या-
चा संभव नाहीं. ह्या दोन मतांच्या लोकांत थोडेंसें सा-
म्य आहे. हल्लीं प्रचलित असलेल्या समजुती नष्ट हो-
ण्याच्या मार्गास लागलेल्या आहेत व लवकरच त्यांचा
अंत होणार ही गोष्ट दोघांच्याही लक्ष्यांत आली आहे.
एका वर्गांतील लोकांना त्यांच्या नाशानें रिती राहिले-
ली जागा भरून काढण्याची जरूरी वाटत नाहीं व दु-
सऱ्या वर्गांतील लोकांना ती भरून निवण्याची शक्यता
दिसत नाहीं. मिळून दोघांनाही ती जागा रितीच राहील
असें वाटतें. मात्र पहिल्या वर्गांतील लोकांना त्या
स्थितीबद्दल आनंद वाटतो व दुसऱ्या वर्गांतील लोकां-
ना दुःख होतें. पुरातन नीतीविषयक समजुती नाहींशा
होणें हें पहिल्या वर्गांतील लोकांच्या मताप्रमाणें इष्ट
असो किंवा दुसऱ्या वर्गांतील लोकांच्या मताप्रमाणें अ-

निष्ट असो, तें काम इतक्या वेगानें सुरू झालें आहे कीं, तो वेग कमी करणें शक्तीबाहेरचें काम आहे. आतां सांगितलेल्या दोन्ही वर्गांतील लोकांस जी स्थिति संभवनीय वाटत आहे तिच्या स्पर्शकालाला सुरुवात झाली आहे. करितां पूर्वींच्या समजुतींची जागा नवीन समजुतींनीं भरून काढिली पाहिजे असें ज्यांस वाटत असेल त्यांनीं लवकर सावध होऊन आपल्या उद्योगास लागलें पाहिजे.

नीतीला व्यावहारिक स्वरूप देऊन तिची शास्त्रीय पायावर इमारत उभारण्याचा यत्न करण्याची अवश्यकता उत्पन्न होण्याला आतां सांगितलेलें एक कारण आहेच, पण त्याशिवाय आणखीही एक महत्त्वाचें कारण आहे. नीतिशास्त्रकारांनीं नीतीला जें उग्र स्वरूप दिलें आहे, त्यामुळें केवढें तरी नुकसान झालें आहे. मूढश्रद्धा आणि अतिविरक्ति ह्यांचा नीतीला स्पर्शही होऊं न देतां नीतीला जर मोहक स्वरूप दिलें तर त्यापासून अगणित फायदा होण्याचा संभव आहे. उदाहरणांनीं ही गोष्ट चांगली लक्ष्यांत येईल. कल्पना करा, कीं एक बाप मोठा तीव्र आहे. तो आपल्या मुलांना कित्येक उपयोगी व कित्येक निरुपयोगी अशा गोष्टी करावयास सांगतो आणि त्यांजवर खरमरीत अंमल गाजवून त्यांजकडून त्या करून घेतो. एक अंमल कडकडीत आहे तर आहे आणि त्याच्या वर्तनांत स्निग्धताही बिलकुल नाहीं असें समजा. मुलांनीं आनंदानें खेळत असावें व उत्तेजन मिळेल ह्या आशेनें त्यांनीं बापाकडे पहावें तों त्याची खुनशी व तापट मुद्रा त्यां-

च्या नजरेस पडावी. अशी स्थिति असली म्हणजे त्या बापाविषयीं मुलांना काय बरें वाटेल ? साधेल तितकें त्याच्या दृष्टीआड असावें व आपणांला जो सुखोपभोग घेणें असेल तो त्याच्या नकळत घ्यावा असें त्यांना वाटणें साहजिक आहे. त्याचा कडक अंमल त्यांना तिरस्करणीय निदान अप्रिय तरी वाटेल. आतां ह्याच्या उलट उदाहरण घेऊं. दुसरा एक बाप आहे, तो आपल्या मुलांकडून त्यांच्या व इतर मनुष्यांच्या हिताच्या ज्या गोष्टी असतील त्या करून घेण्यांत काडीइतकीही कसूर न करितां निरर्थक गोष्टींबद्दल त्यांस बिलकुल त्रास देत नाहीं. आणि यथायोग्य सुखोपभोग घेण्यास तो उलटी त्यांस मदत करितो व सुखोपभोगाचीं साधनें त्यांस आणून देऊन त्यांच्या खेळांत त्यांस उत्तेजन देतो. अशा बापाच्या अंमलानें मुलांवर त्यावेळीं व्हावयाचें तितकें कार्य होऊन शिवाय त्यांच्या मनांवर चिरकालिक ठसा उमटतो. प्रस्तुतचीं प्रचलित नीतिशास्त्रें आणि अर्वाचीन तत्त्ववेत्त्यांचें व्यावहारिक दृष्टीचें नीतिशास्त्र ह्यांमधील भेद वरील उदाहणांवरून स्पष्ट होईल.

पुरातन नीतिशास्त्रांच्या अत्युग्रस्वरूपामुळें जसें नुकसान होतें तसेंच त्यांमध्यें नीतीचे जे मनःकल्पित असाध्य नियम घालून दिले आहेत त्यांमुळें होतें. प्राथमिक स्थितींतल्या निःसीम स्वार्थाला कंटाळून नीतिशास्त्रकारांनीं निःसीम परार्थानें वर्तन सर्वांवर लादण्याचा प्रयत्न केला. परंतु बहुतेक मनुष्यांत आढळून येणारे दोष त्यांच्या शक्तीबाहेरच्या गोष्टी त्यांस करावयास

सांगून कधींही नाहींसे होत नसतात. नीतिशास्त्रांत घालून दिलेल्या अतिविरक्तीच्या नियमांचा उलट मात्र परिणाम होतो. आपणाला तें वर्तन असाध्य आहे असें समजून मनुष्य त्याबद्दल मुळींच प्रयत्न करीनासा होतो. मनुष्याला जर पांच हात उडी मारावयास सांगितलें तर तो शक्त्यनुसार प्रयत्न करील व त्याची उडी नेमकी पांच हात गेली नाहीं तरी तीन किंवा चार हात जाऊं शकेल. पण जर त्यास पंचवीस हात उडी मारावयास सांगितलें तर तो जाग्यावरून हालावयाचाच नाहीं. कारण आपण प्राण दिला तरी आपली इतकी उडी जावयाची नाहीं हें त्यास पक्कें माहीत असल्यामुळें तो निराश होतो व यत्न करण्याला त्याला हुरूपच येत नाहीं. अशक्य गोष्टी घडवून आणण्याचा यत्न केल्यानें शक्य असतात त्याही घडून येत नाहींत. आहाराबाहेरचे नियम व आहारांतले नियम ह्यांचें सान्निध्य असल्यामुळें पहिल्यांविषयीं अविश्वास उत्पन्न झाला म्हणजे दुसऱ्यांविषयींही अविश्वास उत्पन्न होतो व साध्य नियम पाळण्याची देखील मनुष्याची प्रवृत्ति होत नाहीं.

ह्या कारणांवरून नवीन नीतिशास्त्राची किती अवश्यकता आहे हें दिसून येईल. स्पेन्सर साहेबांनीं आपल्या ग्रंथांत ज्या मतांचें प्रतिपादन केलें आहे त्यांचे संबंधानें हा विचार झाला. परंतु त्यांचीं मतें ज्यांना पसंत पडण्यासारखीं नसतील त्यांना देखील त्यांच्या ग्रंथांपासून मोठा फायदा करून घेतां येण्यासारखा आहे. आपल्या मतांचें स्पष्टीकरण करण्यासाठीं त्यांनीं अनेक प्रकारची माहिती मोठ्या शिताफीनें आपल्या पुस्तकांत

गोंवून दिली आहे. त्या माहितीसाठीं तरी त्यांचीं पुस्तकें सर्वांनीं अवश्य वाचावीं अशी त्यांची योग्यता आहे.

सरतेशेवटीं, आणखी चार महिने स्पेन्सर साहेबांशीं सहवास घडवून देणाऱ्या प्रकाशकांचे व प्रारब्ध कृत्य तडीस गेल्यावद्दल जगच्चालकाचे आभार मानून ही प्रस्तावना संपवितों.

पुणें, ता० २७ नोव्हेंबर, सन १८९४. } धोंडो केशव कर्वे.

# अनुक्रमणिका

# शुद्धिपत्र.

| पृष्ठ | पंक्ति | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ८ | १ | मनुष्याचें | मनुष्यांचें |
| १३ | २१ | देन | दोन |
| ,, | २९ | पैशाची | पैशाची मदत |
| ४३ | २० | त्यांची | त्याची |
| ४५ | ९ | नाहीं. | नाहीं, [ही |
| ४९ | २० | ओळखण्याचीही | ओळखण्याची |
| ४६ | ३ | असतांही | असतां ही |
| ५२ | ५ | मनुष्याचा | मनुष्यांचा |
| ५३ | ३ | मनुष्य | मनुष्यें |
| ५७ | २० | रूढीचा | रूढींचा |
| ५७ | २२ | रूढी | रूढि |
| ६६ | ८ | लोकाच्या | लोकांच्या |
| ८४ | ५ | वर्तनाची | वर्तनाचीं |
| ९५ | १४ | खरा | खरा-खोटा |
| १०९ | २४ | आहे | आहे. |
| १२९ | २१ | टोळींच्या | टोळीच्या |
| १३२ | २१ | भूषणा द | भूषणास्पद |
| १४९ | १८ | शरीर | शिर |
| १५२ | ११ | ययास्यो द्विजते | ययास्योद्विजते |
| १७१ | २२ | झासें | झालें |
| १७९ | २२ | होती.त्या अर्थात् | होती. अर्थात् |
| २०० | १ | लोक | विचार |

| पृष्ठ | पंक्ति | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| २११ | ८ | राजकर्त्या | राज्यकर्त्या |
| २१६ | ६ | ह्याबद्दल | त्याबद्दल |
| २२० | २४ | आहेत | झाले आहेत |
| २२३ | १७ | क्ररपणा | क्रूरपणा |
| २२४ | १ | ज्यांचें | ज्याचें |
| २५१ | १७ | खोटेंपणाचें | खोटेपणाचें |
| २५४ | २३ | खोटं | खोटें |
| ३३० | २५ | देशांत याकुती लोकांना सुद्धां | देशांत सुद्धां याकुती लोकांना |
| ३३३ | ७ | स्वर्ग वर्णन | स्वर्गवर्णन |
| ३३७ | २५ | सामथ्य | सामर्थ्य |
| ३४५ | १७ | मांटेच्या | मांटेनच्या |
| ३५१ | १२ | त्याचें | त्यांचें |
| ३६६ | ८ | श्वेतकेतुर्नचक्ष मे | श्वेतकेतुर्न चक्षमे |
| ३७४ | २४ | येत नाहीं | येतात. |
| ३७७ | २२ | खन | खून |
| ३९४ | २५ | ह्यांत | ह्यांत वर्णिलेल्या |
| ३९५ | २ | प्रवृति | प्रवृत्ति. |
| ३९९ | २४ | सहकार्यांचे | सहकार्यांचे |
| ४०४ | १० | सव | सर्व |

# प्रकरण १

## नीतिविचारांचा घोंटाळा

ज्याला आपण भूगोल म्हणतों तो मूलारंभीं कोठें होता व त्याचें स्वरूप काय होतें हें सांगणें कठिण आहे. पण एका विशेष स्थितीनंतर त्याच्या पृष्ठभागावर व अंतर्भागीं कोणत्या प्रकारचे फेरफार होत जाऊन त्याला हल्लींचें स्वरूप प्राप्त झालें असावें ह्याविषयीं सप्रमाण व संभवनीय तर्क करितां येतात. भूगोलाच्या पलीकडे इतर सृष्टींत काय व्यापार चालले आहेत ह्याविषयीं मनुष्याचें ज्ञान फार मर्यादित आहे. तथापि इतर सृष्टींतही एकसारखे फेरफार होत असावे असें म्हणण्याला सबळ कारणें आहेत. अनादिकालापासून सृष्टींत जे फेरफार होत आहेत त्यांमुळें तिचें स्वरूप प्रतिक्षणीं बदलत आहे. ह्यांपैकीं एका प्रकारचे फेरफार घडून येण्याची जी क्रिया तिला 'उत्क्रमग' किंवा 'परिणाम' अशी संज्ञा आहे. पूर्वीच्या शुद्ध स्वरूपांत विकार होऊन मिश्र किंवा संकीर्ण स्वरूप उत्पन्न होणें अथवा पूर्वीच्या अस्पष्ट व अव्यवस्थित स्वरूपांतून स्पष्ट व व्यवस्थित स्वरूप उत्पन्न होणें हीं उत्क्रमणाचीं कार्यें होत. सृष्टींतील सर्व पदार्थांवर उत्क्रमणाचीं कार्यें घडलीं आहेत. उत्क्रमणानें पृथ्वीवर अतिसूक्ष्म वनस्पतींपासून मोठमोठे गगनचुंबी वृक्ष निर्माण झाले आहेत व अतिसूक्ष्म जीवांपासून देवमाशा एवढाले प्रचंड प्राणी उत्पन्न झाले आहेत. जडद्रव्यानें बनलेल्या सृ-

ष्टींतच हें उत्क्रमण दिसून येतें असें नाहीं, तर मानसिक सृष्टींतही तें आढळतें. अतिमूढ प्राण्यापासून उत्क्रमणानेंच विचारवान् मनुष्यप्राण्याची उत्पत्ति झाली आहे. जडसृष्टीपासून अगदीं भिन्न अशा रीतीनें मानसिकसृष्टीचा विचार करितां येत नाहीं, कारण जडद्रव्यांनें बनलेल्या शरीराची विशेषस्थिति असेल तरच विशेष प्रकारचे मानसिक व्यापार करण्यास तें समर्थ होतें; तथापि सोईसाठीं मानसिकसृष्टीचीच कसकशी उन्नति होत गेली हें पाहिलें असतां तेथेंही उत्क्रमणाचा प्रभाव दृष्टीस पडतो. प्रस्तुत ग्रंथांत आपणांस नीतिविचारांचा ऊहापोह कर्तव्य आहे आणि नीतिविचारांचा मानसिकसृष्टींतच समावेश होतो; तेव्हां मानसिकसृष्टीला लागू पडणारें उत्क्रमणतत्त्व तिच्या ह्या भागालाही लागू पडेलच. अर्थात् उत्क्रमणाचे नियम नीतिविचारांच्या उन्नतीलाही लागू पडतील. उत्क्रमणाच्या स्वरूपाकडे लक्ष्य दिलें असतां असें अनुमान करितां येईल कीं, सभोंवतालच्या पदार्थांच्या गुणधर्मादिकांचें मनुष्याला प्राथमिकस्थितींत जें अनिश्चित व असंबद्ध ज्ञान असतें त्यापासूनच त्याच्या नीतिविषयक कल्पना व मनोवृत्ति बनत गेल्या असाव्या, व प्रथम त्या अस्पष्ट आणि अव्यवस्थित असून पुढें त्या हळूहळू स्पष्ट व व्यवस्थित होऊं लागल्या असाव्या. नीतिकल्पनांना व्यवस्थित स्वरूप येऊं लागण्याचे सुमारासच नीतिविचार इतर विचारांहून भिन्न आहेत ह्याविषयीं अंधक कल्पना मनुष्याचे मनांत येऊं लागली असावी. तोंपर्यंत नीतिविचार इतर विचारांतच गुरफटलेले राहून नंतर हळूहळू

ते भिन्न होत गेले असावे व पुढें मनुष्याची बरीच मानसिक उन्नति झाल्यावर त्यांना अगदीं स्वतंत्र स्थल मिळालें असावें.

नीतिविचार कसे उद्भूत झाले हें मनांत आणिलें म्हणजे त्यांमध्यें जो घोंटाळा दिसून येतो त्याबद्दल आश्चर्य वाटणार नाहीं. मनुष्यसमाजाची उन्नति होत असतां आरंभीं तर हा घोंटाळा फारच असावयाचा. आणि सुधारणेबरोबर जरी तो उत्तरोत्तर कमी होत गेला असला तरीं मनुष्याच्या सध्यांच्या अर्धवट सुधारणेच्या स्थितींत अजूनही तो बराच शिल्लक असला पाहिजे. अमुक वर्तन योग्य किंवा अयोग्य आहे अशा समजुती अनेक कारणांनीं बनत असतात व समाजव्यवस्थेंत किंवा लोकांच्या व्यवसायांत फेरफार झाले असतां त्या समजुतींमध्येंही बदल होत असतो. असल्या समजुतींचा हल्लींही सुकाळ असल्यामुळें सध्यांच्या नीतिविचारांत बराच गोंधळ दिसून आल्यावांचून राहणार नाहीं.

प्रथमतः नीतिविषयक भावनांचे जे मुख्य विभाग आहेत त्यांचा विचार करून त्यांपासून उत्पन्न होणाऱ्या परस्परविरुद्ध कल्पना व समजुती पाहूं.

आरंभीं नीतीला धर्माहून वेगळें अस्तित्व नसतें. प्राथमिकस्थितींत धर्म आणि नीति ह्यांमध्यें मनुष्यांना भेदच करितां येत नाहीं. त्यामुळें नीतिविचारांचा धर्मविचारांतच समावेश झालेला असतो. आणि धर्माचें आद्यस्वरूप म्हटलें म्हणजे ‘पूर्वजांची पूजा’ हें होय. ह्या स्थितींत मनुष्याची नित्याच्या व्यवहारांत जी दूरदृष्टि दिसून येते तीच त्याच्या धर्मसंबंधी आचरणांत देखील

दिसून येते. आपल्या पूर्वजांच्या आत्म्यांना अन्न वगैरे देऊन जें तृप्त करावयाचें तें त्यांनीं आपणांवर संकटें आणूं नयेत किंवा आपणांवर संकटें आलीं असतां त्यांपासून त्यांनीं आपणांला सोडवावें व इतर प्रकारें आपलें कल्याण करावें म्हणून.

सीलोनांत वेद्दा जातीचे रानटी लोक आहेत ते तेथील मूळचे रहिवासी असावे. त्या लोकांचे देव म्हटले म्हणजे भूतयोनींत प्रविष्ट झालेले त्यांचेच पूर्वज होत. हे लोक भुतांना बलि देत असतां पुढील मंत्राचा उच्चार करितांना आढळतात. "ये आणि ह्या बलीचें सेवन कर. तूं जिवंत असतांना ज्याप्रमाणें आमचें पोषण केलेंस त्याप्रमाणेंच आतांही कर." दुसऱ्या एकाद्या प्रसंगीं मृताच्या आत्म्यानें आपणास चांगली शिकार सांपडून द्यावी अशी तो इच्छा करितो व त्यासाठीं त्याला कांहीं देणें देतो. आफ्रिकेच्या दक्षिणभागीं राहणारे झूलू म्हणून लोक आहेत तेही भुताखेतांची पूजा करणारे व त्यांना बलि देणारे आहेत. मेलेलीं मनुष्यें भुतें होतात व त्यांना अन्नोदकादि दिलें नाहीं तर तीं आपल्या आप्तांस त्रास देतात असें त्यांना वाटतें. आपला कोणी आप्त त्याच्यासाठीं बलि दिले नाहींत म्हणून आपणास तीक्ष्ण शब्दांनीं टोंचीत आहे व मारीत आहे अशीं त्या लोकांना स्वप्नें देखील पडतात. स्वप्नांत त्या आप्तानें म्हणावें "मला मांस खाण्याची इच्छा झाली आहे." त्यावर ज्याला स्वप्न पडत असेल त्यानें स्वप्नांतच उत्तर द्यावें "माझ्याजवळ बैल नाहींत. गुरांच्या गोठ्यांत तुला बैल दिसतात काय?" ह्या उत्तरावर लागलेंच

प्रत्युत्तर मिळावें कीं " तुझ्याजवळ एकच बैल आहे पण तो मला पाहिजे. " आस्ट्रेलियांतील जादूगार वैदू एकादा चांगला पारधी मेला असला तर लोकांना स-भोंवतीं जमवितो व त्याची वाखाणणी करून जवळच त्याचें प्रेत पडलेलें असतें त्याच्याजवळ जाऊन तें काय बोलतें तें ऐकण्याचा बहाणा करितो आणि लोकांना सांगतो कीं त्याच्या शत्रूंचा जर तुम्हीं चांगला सूड उगवाल तर तो तुमचें कल्याण करील. त्यानें मला वचन दिलें आहे कीं " असें झालें असतां मी आप-ल्या टोळींतील लोकांस त्रास देणार नाहीं; त्यांना भेव-डावणार नाहीं; त्यांना चुकवून भलत्याच वाटेला लावि-णार नाहीं; त्यांजमध्यें रोगांच्या सांथी उत्पन्न करणार नाहीं; व रात्रीं अकराळविकराळ शब्द करणार नाहीं. " हे थोडेसे मासले दिले आहेत त्यांवरून तशा स्थितीं-तील इतर लोकांविषयीं कल्पना करितां येईल. बहुधा रानटी लोकांची समजूत अशी असते कीं मेलेल्या माण-सांचीं शरीरें जरी नाहींशीं झालीं तरी त्यांचे आत्मे भुतांच्या रूपानें इकडेतिकडे फिरत असतात व जिवंत मनुष्यांचें बरेंवाईट करणें त्यांच्या हातांत असतें. ज्यां-वर तीं भुतें खुष असतात त्यांचें तीं कल्याण करितात व ज्यांवर त्यांचा रोष होतो त्यांना तीं त्रास देतात. अशा समजुतींमुळें रानटी लोक भुतांना अन्नपाणी व वस्त्रें देतात आणि तीं देतांना त्यांच्या इच्छेप्रमाणें वागण्या-चें कबूल करितात व मदतीसाठीं त्यांची प्रार्थना करितात.

धर्माच्या आद्यस्थितींत प्रत्येक कुटुंबांतलीं मनुष्यें आपल्या पितरांना तृप्त करण्यासाठीं मात्र बलि वगैरे

देत असतात. त्या स्थितींत कुटुंबांतील मनुष्यांचा माल परस्परांशीं संबंध असून, निरनिराळीं कुटुंबें परस्परांशीं स्निग्धःइताच्या नात्यानें किंवा शत्रुत्वाच्या नात्यानें वागत असतात. पुढें युद्धासाठीं वगैरे अनेक कुटुंबें एका नाइकाच्या हाताखालीं वागूं लागलीं म्हणजे त्या नाइकाला सर्व मनुष्यें भिऊं लागतात. हा त्या नाइकाचा दरारा जिवंतपणींच कायम राहतो असें नाहीं; तर मेल्यानंतरही त्याचा आत्मा भूतयोनींत प्रविष्ट होऊन तो आपणास त्रास देईल असें त्यांस भय वाटत असतें. ह्यामुळें बलि देऊन, प्रार्थना करून व त्याच्या इच्छेप्रमाणें वागण्याचें कबूल करून त्यालाही तृप्त करण्याची अवश्यकता उत्पन्न होते. एकाद्या पराक्रमी पुरुषानें योद्धा किंवा राज्यकर्ता ह्या नात्यानें लोकांचे मनांत भीति किंवा पूज्यबुद्धि उत्पन्न केलेली असली तर त्याच्या आत्म्याला खुष ठेविण्याविषयीं त्यांचे मनांत प्रबल इच्छा उत्पन्न झाली असेल व जिवंतपणीं कायद्याच्या किंवा हुकुमांच्या रूपानें त्यानें ज्या आपल्या इच्छा प्रदर्शित केल्या असतील त्यांप्रमाणें वागण्याकडे त्यांची प्रवृत्ति झाली असेल. अनेक लोकांना जिंकून ज्यानें विस्तीर्ण राज्य स्थापित केलें असेल त्या राजाविषयीं तर लोकांचे मनांत विलक्षणच भय व पूज्यबुद्धि हीं उत्पन्न झालीं असतील आणि त्याच्या सर्वशक्तिमान् आत्म्यापुढें अगदीं नम्र होऊन त्याला शरण जाणें हें त्यांना अत्यवश्यक वाटलें असेल; व पराक्रमी पुरुषांच्या आत्म्यांच्या शक्तिमत्तेबद्दल दृढग्रह झाल्यानंतर त्यांनाच मनुष्य 'देव' म्हणूं लागला असेल. धर्मविचारांची

मजल येथपर्यंत आल्यानंतर, देवांच्या म्हणजे प्राचीन महाप्रतापी राजांच्या आज्ञांना अनुसरून वागणें हें चांगलें व योग्य वर्तन आणि त्यांविरुद्ध वागणें हें वाईट व अयोग्य वर्तन असा समज उत्पन्न होणें स्वाभाविक आहे.

सर्व लोकांमध्यें उत्क्रमणाच्या ह्या पायऱ्या दिसून येतात. दक्षिण पासिफिक महासागरांत फ्रेंड्ली बेटें आहेत त्यांत टोंगा नांवाचें बेट आहे. तेथील लोकांविषयीं मारिनर लिहितोः—

" सुधारलेल्या राष्ट्रांत ज्या कित्येक कृत्यांची अपराधांत गणना होते त्यांविषयीं बहुतेक प्रसंगीं ह्या लोकांना कांहीं वाटत नाहीं. त्या कृत्यांनीं देव, सरदार व वृद्ध मनुष्यें ह्यांचा मात्र अपमान झाला नाहीं म्हणजे झालें. "

पश्चिम आफ्रिकेंत गोल्ड कोस्ट ( सोन्याचा किनारा ) नामक इंग्लिश लोकांची एक वसाहत आहे तेथील मूळच्या लोकांविषयीं मेजर एलिस ह्यानें जी हकीकत दिली आहे तींत त्यानें लिहिलें आहे कीं, देवांचा अपमान करणें व त्यांना बलि वगैरे देण्याचे कामांत हयगय करणें ह्या गोष्टींतच काय तें पाप आहे, पाप म्हणून आणखी कांहीं नाहीं अशी त्या लोकांची समजूत आहे. तो म्हणतोः—

" मनुष्यांनीं एकमेकांचे भयंकर अपराध केले तरी ह्या लोकांच्या देवांना मध्यें पडण्याचें कांहीं कारण दिसत नाहीं. ते असले अपराध शांतपणें पाहत असतात. असल्या अपराधांबद्दल एकमेकांचें शासन करणें

हें मनुष्याचें काम आहे व तें त्यांचें त्यांनींच झेंपेल त्याप्रमाणें उरकावें असें त्यांना वाटतें. सुधारणेच्या मार्गांत ज्यांचें बरेंच पुढें पाऊल पडलेलें आहे त्या लोकांच्या देवांना मनुष्याच्या परस्परांमधील व्यवहारांतही मन घालावेंसें वाटतें व वाईट वर्तन करणाऱ्या मनुष्यांचा त्यांना राग येऊन ते त्यांना शिक्षा करितात. परंतु ह्या लोकांच्या देवांना राग येण्यासारखीं कारणें म्हटलीं म्हणजे त्यांजकडे दुर्लक्ष्य करणें, त्यांच्या सामर्थ्याविषयीं संशय घेणें किंवा त्यांची थट्टा करणें हीं होत. "

वरील उदाहरणांत पितरांचा किंवा देवांचा आपणांवर रोप होऊं नये म्हणून त्यांचा सन्मान राखणें व त्यांस देणग्या वगैरे देऊन खुप ठेविणें ह्याच्या पलीकडे आणखी धर्माचरण नाहीं अशी त्या लोकांची समजूत दिसते. ही पायरी सोडून जरा वरच्या पायरीवर गेलें म्हणजे ज्या वर्तनाला आपण 'नीति' म्हणून म्हणतों त्याचा धर्मविषयक कल्पनांत समावेश झालेला आढळतो. ह्या स्थितींत धर्माज्ञा पाळण्याचा मुख्य हेतु ईश्वराला संतुष्ट ठेविणें हाच असतो. प्राचीन मेक्सिकन् लोकांमध्यें आईबापें आपल्या मुलांस कोणत्या प्रकारचा उपदेश करीत तें दाखविण्यासाठीं झूरिटा नामक स्पानिश् ग्रंथकारानें कांहीं मासले दिले आहेतः—

" तूं कोणावर विषप्रयोग करूं नको. कारण देवानें उत्पन्न केलेल्या प्राण्याला मारण्यानें तूं देवाचा गुन्हा केल्याप्रमाणें होईल. तुझा अपराध उघडकीस येऊन तुला शिक्षा होईल आणि त्याच प्रकारचें मरण तुला भोगावें लागेल. "

" तूं कोणाला दुःख देऊं नको, व्यभिचाराचे वाटेस जाऊं नको आणि चैनबाजी करूं नको. चैनबाजी हा नीच दुर्गुण आहे. त्याच्या नादीं लागणाऱ्या मनुष्याचा सर्वस्वी नाश होतो आणि तशा वर्तनानें देवांचाही रोष होतो. "

" नम्र व्हा. नम्रतेनें ईश्वराची प्रीति संपादन करितां येते व शक्तिमानांना वश करून घेतां येतात. "

मनुष्याच्या वर्तनाचा बरेपणा केवळ ईश्वराच्या इच्छेवर अवलंबून असतो हें मत हीब्र्यू लोकांच्या ग्रंथांत फारच स्पष्ट रीतीनें सांगितलेलें आहे. शेन्कल म्हणतोः—" देवानें घालून दिलेले नियम पाळणें हें मनुष्यांचें कर्तव्य असल्यामुळें पाप करणें म्हणजे देवावर उठून बंड करण्याप्रमाणें आहे. " धर्माज्ञा देवाच्या आज्ञा असतात म्हणूनच त्या पाळण्याची अवश्यकता उत्पन्न होते असें त्यांच्या ग्रंथांतून वारंवार सांगितलेलें आहे. लेव्हिटिकस म्हणून बायबलाच्या जुन्या करारांत एक पुस्तक आहे त्यांत हीब्र्यू लोकांचे धर्मसंबंधी विधि वगैरे सांगितले आहेत. त्या पुस्तकांत म्हटलें आहेः—

" मीं केलेले जे ठराव असतील व मीं दिलेले जे हुकूम असतील तेच तुम्हीं मानिले पाहिजेत. मी सर्वेश्वर असून तुमचा देव आहें ह्यासाठीं माझेच हुकूम तुम्हांस पाळिले पाहिजेत. "

ह्यानंतर लिहिलेल्या ग्रंथांवरूनही हे त्यांचे विचार दिसून येतात. ब्रूच म्हणतो बुक् आफ् वुइस्डम् ( ज्ञानाचें पुस्तक ) नामक ग्रंथाच्या कर्त्याचें असें मत दिसतें कीं, " ईश्वराच्या इच्छेला अनुसरून वागणें हाच

सद्गुण." त्याचप्रमाणें आणखी एक टीकाकार म्हणतो:—
"एक्लिझिआस्टिकस पुस्तकावरून नीतीच्या वर्तनाचा मुख्य हेतु देवाच्या आज्ञा पाळणें हाच दिसून येतो."

वर्तनाचे परिणाम चांगले होतील कीं वाईट होतील हें पाहून त्याचा चांगलेपणा किंवा वाईटपणा ठरविण्याचा विचार त्यावेळीं लोकांच्या स्वप्नींही येत नसे. जें वर्तन देवाच्या इच्छेप्रमाणें असेल तें चांगलें व जें त्याच्या इच्छेविरुद्ध असेल तें वाईट हा समज हीब्र्यू लोकांच्या विचारांत किती खिळून गेला होता हें पाहणें असल्यास देवाच्या आज्ञेप्रमाणें वागणाऱ्या लोकांस दाखविलेली बक्षिसांची लालूच व त्याच्या आज्ञेविरुद्ध वागणारांस दाखविलेलें शिक्षेचें भय हीं पहावीं. देवानें रेखून दिलेल्या मार्गानें जाणाऱ्या मनुष्यास विपुल संतति व संपत्ति मिळेल अशीं ठिकठिकाणीं आश्वासनें दिलेलीं आहेत, व ज्या गोष्टींत नीतीचा कांहींएक संबंध नाहीं त्यांतही देवाच्या इच्छेबाहेर जरा पाऊल पडलें कीं शिक्षेचें भय घातलें आहे. सुंता न करणें व मनुष्यगणती करणें हीं हीब्र्यू धर्मशास्त्रांत घोर पातकें मानिलीं आहेत. ह्यांचा वास्तविक नीतीशीं बिलकुल संबंध नाहीं. परंतु त्यांबद्दलही कडक शिक्षा सांगितल्या आहेत.

देवाच्या आज्ञा पाळणें, यज्ञयागादि कर्में करणें व प्रार्थनापर पद्यें गाणें इत्यादि गोष्टी करितांना त्यांच्या मोबदला आपणांला मिळणाऱ्या फायद्याचा विचार लोकांच्या मनांत येत असे हें इतर प्राचीन लोकांच्या ग्रंथांवरून स्पष्ट दिसून येतें. ऋग्वेदांत ही गोष्ट

सिद्ध करणाऱ्या पुष्कळ ऋचा आढळतात त्यांपैकीं कांहीं येथें दिल्या आहेतः—

[१]वधीर्हि दस्युं धनिनं घनेनँ एकश्चरन्नुपशाकेभिरिंद्र । धनोरधि विषुणक्ते व्यायन्नयज्वानः सनकाः प्रेतिमीयुः ॥ पराचिच्छीर्षा ववृजुस्त इंद्रायज्वानो यज्वभिः स्पर्धमानाः । १. ३३. ४,५.

[२]नाना ह्यग्नेऽवसे स्पर्धंते रायो अर्यः । तूर्वंतो दस्युमायवो व्रतैः सीक्षंतो अव्रतं ॥ ६. १४. ३.

[३]वाचस्पतिं विश्वकर्माणमूतये मनोजुवं वाजे अद्या हुवेम । स नो विश्वानि हवनानि जोषद्विश्वशंभूरवसे साधुकर्मा ॥ १०. ८१. ७.

---

१. हे इंद्रा, प्रोत्साहन देण्याला मरुद्देव समीप असतां तूं आपल्या कठिण वज्रानें धनवान् वृत्राचा नाश केलास. तुझ्या धनुष्याच्या प्रभावानें ते ( वृत्राचे अनुयायी ) सर्व दिशांनीं गेले व गेल्यानंतर यज्ञ न करणारे सनक मरण पावले. हे इंद्रा, यज्ञ न करणारे ते ( इंद्राचे अनुयायी ) यज्ञ करणाऱ्यांशीं लढत असतां त्यांना तोंडें फिरवून परत जावें लागलें.

२. हे अग्ने, तुझ्या शत्रूंचीं धनें शत्रूंपासून दूर होऊन तुझें स्तवन करणाऱ्यांचें रक्षण करण्यासाठीं आपापसांत स्पर्धा करितात. तुझें स्तवन करणारे लोक तुझी स्तुति न करणाऱ्या शत्रूंशीं लढत असतां व्रतांच्या ( तुझ्या स्तोत्रांच्या ) साह्यानें त्यांचा पराभव करूं इच्छितात.

३. मंत्रांचा स्वामी, विश्वाचा उत्पन्नकर्ता आणि मनोवेगानें गमन करणारा असा जो देव त्याला तृप्त करण्यासाठीं आह्मी आज यज्ञांत आहुति देतों. तो सुखाचा उत्पादक आणि साधुकर्मा देव आमच्या रक्षणासाठीं आमच्या हवनांचें सेवन करो.

गव्यंत इंद्रं सख्याय विप्रा अश्वायंतो वृषणं वाजयंतः । जनीयंतो जनिदामक्षितोतिमा च्यावयामोऽवते न कोशं ॥* ४. १७. १६.

ह्या सर्व ठिकाणीं फलप्राप्तीची इच्छा स्पष्ट दिसून येते. पहिल्या उदाहरणांत ती गुप्त आहे. परंतु यज्ञ करणारांचा जय झाला व यज्ञ न करणारे पळून गेले व मेले हें सांगण्यानें यज्ञाचें फलच ध्वनित होतें.

ईजिप्शियन् लोकही देवाजवळ अशा प्रकारचा अदलाबदलीचा व्यवहार करण्याची इच्छा करीत. ईजिप्टचा राजा रामेसीस ह्यानें एका प्रसंगीं आमन देवाची मदत मागितली त्यावेळीं त्यानें शंभर बैलांचे जे अनेक यज्ञ केले होते त्यांची देवाला आठवण दिली. प्राचीन ग्रीक लोकांमध्येंही अशा प्रकारच्या समजुती होत्या. ग्रीक लोकांच्या इलियड नामक काव्यांत ह्या समजुतीचीं अनेक उदाहरणें आहेत. क्रायसीस ह्यानें एकदां अपालो देवाचें ( सूर्याचें ) देऊळ सुशोभित केलें होतें. ह्या पुण्यकृत्याबद्दल देवावर आपला हक्क लागू झाला आहे असें त्यास वाटत होतें व आपल्या शत्रूंचा सूड उगविण्यासाठीं जेव्हां त्यानें अपालोची प्रार्थना केली त्यावेळीं हा आपला हक्क पुढें केल्यावांचून तो राहिला नाहीं. ह्यावरून स्पष्ट दिसतें कीं, मनुष्याच्या आचरणाचे जे बरेवाईट परिणाम होतात ते सृष्टिनियमांच्या अनुरोधानें घडून येत नसून, तें आचरण ईश्वरास

---

* गाई, घोडे, अन्न व स्त्रिया ह्यांची इच्छा करणारे आम्ही विप्र इच्छा पुरविणाऱ्या, स्त्रिया देणाऱ्या व रक्षण करणाऱ्या इंद्राला स्तवितों.

पसंत असेल किंवा नसेल त्याप्रमाणें त्यानें प्रत्यक्ष घडवून आणिलेले असतात, असा लोकांचा समज असतो.

यूरोपाच्या इतिहासांत ज्या कालाला मध्ययुग म्हणतात त्या कालांत यूरोपांतील लोकांचेही समज अशाच प्रकारचे होते हें तेथील लोकांच्या इतिहासाची ज्याला थोडीबहुत माहिती असेल त्याला सांगावयास नको. ह्यावेळीं युद्धांत मदत मागण्यासाठीं लोक ईश्वरासमान मानिलेल्या साधूंची प्रार्थना करीत. आपल्या अपराधांची क्षमा व्हावी व पापांचें क्षालन व्हावें म्हणून येशू ख्रिस्ताची आई जी कुमारी मेरी तिचीं देवालयें बांधण्याविषयीं नवस करीत व मोक्षप्राप्तीसाठीं पवित्र क्षेत्रांची यात्रा करीत किंवा धर्मयुद्धांत* जाऊन आपणांला झेंप-

---

* यूरोपाच्या इतिहासांत धर्मयुद्धें फार प्रख्यात आहेत. त्यांना क्रूसेड्स असें म्हणतात. पालेस्टाइन प्रांताला ख्रिस्ती लोक पवित्रभूमि असें म्हणतात. कारण ख्रिस्ती धर्माचा उत्पादक जो येशू ख्रिस्त त्याचा त्या प्रांतांत जन्म होऊन ख्रिस्ती धर्माचें बीज त्या प्रांतांतच पेरिलें गेलें. त्या प्रांतांत अनेक पवित्र क्षेत्रें आहेत, त्यांत जरूशलेम हें मुख्य आहे. ख्रिस्ती लोक त्या क्षेत्रांची यात्रा करण्यास जात असत. पुढें सातव्या शतकांत पालेस्टाइन प्रांत मुसलमान लोकांनीं हस्तगत केला व ते तेथील राज्यकर्तेच झाल्यामुळें ख्रिस्ती यात्रेकरूंना त्यांजपासून उपद्रव होऊं लागला. दोनतीनशें वर्षेपर्यंत ह्या गोष्टीची कोणीं फारशी दाद घेतली नाहीं. परंतु पुढें कित्येक ख्रिस्ती वैराग्यांनीं यूरोपखंडभर फिरून ह्या गोष्टीची चोहोंकडे चांगली माहिती करून दिली व अनेक ख्रिस्ती राजांचींही मनें वळविलीं. तेव्हां कांहीं राजे व सरदार बरोबर सैन्य घेऊन पालेस्टाईन प्रांत मुसलमानांपासून सोडविण्यासाठीं निघाले. अशा रीतीनें अकराव्या शतकाच्या अखेरीस धर्मयुद्धांस सुरुवात झाली. हीं युद्धें दोनशें वर्षेपर्यंत चाललीं होतीं. ह्या युद्धांसाठीं पैशाची मदती

ण्यासारखी चाकरी करीत; आणि ह्या सर्व गोष्टी करीत असतांना हीब्र्यू लोकांपासून घेतलेली पूर्वीची कल्पना–ईश्वराच्या आज्ञा ज्या पाळावयाच्या त्या ईश्वराच्या आज्ञा म्हणूनच–कायम होती. आणि ह्या कल्पनेची जोडीदार कल्पनाही त्यांच्या मनांत खिळलेली होती, ती ही कीं, बऱ्यावाईट ज्या गोष्टी घडून येत असतात त्या ईश्वराच्या इच्छेचा परिणाम असून स्वाभाविक कारणांमुळें उत्पन्न झालेलीं कार्यें नव्हत. ही दुसरी कल्पना मनुष्याचे मनांत पूर्णपणें बिंबल्यावांचून त्याच्याहातून वर सांगितलेल्या गोष्टी घडावयाच्या नाहींत. पूर्वींच्या लोकांत गुलामांना मुक्त करितेवेळीं ज्या मंत्रांचा उच्चार करण्याची चाल होती त्यांवरूनही त्यावेळच्या समजुती स्पष्ट दिसून येतात. “ सर्वशक्तिमान् देवाच्या भीतीमुळें व माझ्या आत्म्याला सुख व्हावें म्हणून मी तुला मुक्त करितों. ” किंवा “माझ्या पापांचें क्षालन व्हावें म्हणून मी तुला मुक्त करितों ” अशा अर्थाचे ते मंत्र असत. हल्लीं सुद्धां ह्या कल्पनेचा शेष पुष्कळ लोकांच्या डोक्यांत राहिला आहे. केवळ ईश्वराच्या इच्छेनें योग्य आणि अयोग्य ठरत असतें व बरेंवाईट होत असतें हा अजून सामान्यलोकांचाच समज आहे असें नाहीं, तर पुष्कळ धर्मशास्त्रवेत्त्यांचा व नीतिशास्त्रवेत्त्यांचाही आहे. इंग्लिश लोकांत मेलेल्या बायकोच्या बहिणीशीं विवाह करणें धर्मविरुद्ध व बेकायदेशीर मानिलें जातें. ह्या गोष्टीला कायदेशीरपणा

करणें किंवा सैन्यांत शिपायाची चाकरी करणें हें मोठें पुण्यकर्म समजलें जात असे.

आणण्याकरितां पार्लमेंटांत ज्यावेळीं सूचना आली त्या-वेळीं बड्या धर्माधिकाऱ्यांनीं जी चळवळ उडवून दिली तीवरून त्या लोकांचे समज अद्यापि कसे आहेत हें कळून येतें. नीतिशास्त्रवेत्त्यांचे समज पाहणें असल्यास त्यांच्या नीतिग्रंथांवरील टीका व व्याख्यानें ह्यांचें अव-लोकन करावें. विशेषतः क्केकरपंथानुयायी जोनाथन डायमंड ह्याचें पुस्तक पहावें. नीति म्हणून मानिलेल्या कित्येक गोष्टी, सृष्टिनियमांना अनुसरून त्यांपासून हो-णाऱ्या परिणामांकडे पाहिलें असतां, अवश्यक आहेत व कित्येक अनवश्यक आहेत, अशा प्रकारची पुसट-पुसट कल्पना पुष्कळ दिवसांपासून लोकांच्या डोक्यांत शिरत आहे, तथापि साधारणपणें लोकांचा समज पाहिला असतां, नीतीचा उगम सृष्टिनियमांत नसून तो ईश्वरा-च्या इच्छेंत आहे, असाच आहे.

यूरोपांतील लोकांचे पूर्वीचे व अलीकडले समज दिले आहेत त्याचप्रकारचे समज बहुतक सर्वत्र आढ-ळतील. तेथें मध्ययुगांत ज्या गोष्टी घडत होत्या त्या हल्लींही पुष्कळ ठिकाणीं मोठ्या प्रमाणावर घडत आ-हेत. तेथेंही त्या अद्यापि घडत आहेत, पण त्यांचें प्रमाण फार कमी झालें आहे आपल्या देशांत त्या अजून ब-ऱ्याच आढळून येतात. आपण जीं धर्मकृत्यें करितों त्यांतील कित्येकांचा उद्देश आपणांस ऐहिकसुखप्राप्ति व्हावी हा असतो व कित्येक आपल्या पापांचें क्षालन व्हावें व मोक्षप्राप्ति व्हावी ह्या उद्देशानें केलेलीं अस-तात. सृष्टीचे नियम व त्यांपासून होणारीं कार्यें ह्या कल्पनांनीं आह्मांवर अजून फारसा परिणाम केला

नाहीं असें म्हटलें असतां चालेल. सर्व कांहीं ईश्वराच्या इच्छामात्रेंकरून घडत असतें असा आमचा दृढ समज आहे. झाडाचें पान हाललें तरी तेंही ईश्वराच्या इच्छे-वांचून हालत नाहीं असें आपण म्हणत असतों. ह्याव-रून ईश्वराची इच्छा ही झाडाचें पान हालण्याला का-रण आहे, त्याचें कारण वारा नव्हे,असें आमचें मत स्पष्ट दिसतें. इतक्या क्षुल्लक गोष्टीपर्यंत जर आह्मीं ईश्वरा-च्या इच्छेला नेलें आहे, तर नीतीचा उगम ईश्वराच्या इच्छेंत आहे असें आमचें मत असावें ह्यांत आश्चर्य नाहीं.

प्राचीन लोकांच्या पुराणांतून व प्रस्तुतच्या रानटी लोकांच्या दंतकथांतून देवादिकांच्या युद्धांविषयीं वर्णनें आढळतात. हीं युद्धें कित्येक प्रसंगीं आपआपसांतच झालेलीं आहेत व अन्य प्रसंगीं इतर शत्रूंबरोबर झाले-लीं आहेत. स्कांडिनेव्हियन्, मांगोलियन्, हिंदु, अ-सीरियन्, ग्रीक इत्यादि लोकांच्या सर्वच देवांचा युद्धांत नेहमीं जय होत असे असें नाहीं. तथापि देवांचें दैत्यां-वर व देवांपैकींच कांहींचें इतरांवर जें वर्चस्व स्थापित होत असे तें केवळ युद्धांत पराक्रम करून शत्रूला जिं-किल्यामुळें होत असे. हीब्र्यू लोकांमध्यें मात्र हा प्र-कार फारसा नाहीं, तथापि त्यांचा देवही जरी प्रत्यक्ष नाहीं तरी परोक्ष रीतीनें शत्रूंचा निःपात करणारा आहे असे त्याविषयीं वारंवार उल्लेख आढळतात.

ज्यांचें पुराणादि ग्रंथांत व दंतकथांत वर्णन आढळ-तें ते देवत्व पावलेले प्रतापी राजे व योद्धे ज्यावेळीं हें जग सोडून जातात त्यावेळीं त्यांनीं सुरू केलेलीं मोठ-मोठीं युद्धें व आपसांतील लढाया त्यांचे पाठीमागेंही

चालू राहतातच. ते जिवंत असतांनाच त्यांना देवांप्रमाणें मान मिळूं लागला असल्यामुळें, ते मेल्यानंतरही, त्यांनीं ज्या आज्ञा केल्या असतील किंवा आपल्या इच्छा प्रदर्शित केल्या असतील त्यांप्रमाणें वागणें हें लोकांना कर्तव्य वाटूं लागतें. त्यांच्या इच्छा अर्थातच ज्या शत्रूंशीं ते लढत असतील त्यांना आपल्या पाठीमागें राहणाऱ्या लोकांनीं जिंकावें अशा असणार. आणि अशा इच्छा त्यांनीं प्रत्यक्ष सांगितल्या नसल्या तरी देखील त्या असाव्या अशी कल्पना करून पाठीमागचे लोक पूर्वींचीं युद्धें व लढाया चालू ठेवणारच. सभोंवतालच्या लोकांशीं युद्धें करून त्यांस पादाक्रांत करण्याचा जो कित्ता देवत्व पावलेल्या पराक्रमी राजांनीं स्वतः उदाहरणानें घालून दिलेला असतो तोच त्यांचे अनुयायी गिरवूं लागतात, आणि अशा रीतीनें परकी लोकांवर स्वाऱ्या करण्याला धर्माचें अनुमत मिळूं लागतें.

प्रथमतः अशा गोष्टींना धर्माचें नुसतें अनुमतच असतें पण पुढेंपुढें त्या अनुमताला आज्ञेचें स्वरूप येतें. परकी लोकांचा विध्वंस करणें व त्यांचे देश जिंकिणें हें ईश्वरानें मनुष्याला सांगितलेलें कर्तव्यच बनतें. हा क्रम मनांत आणिला म्हणजे हल्लींच्या रानटी लोकांत व प्राचीनकाळच्या इतिहासांत ज्या कित्येक चमत्कारिक गोष्टी आढळतात त्यांचें आश्चर्य वाटणार नाहीं. एका फिजियन् सरदाराची अशी गोष्ट सांगतात कीं, त्याच्या मनाला एकदां अतिशय अस्वस्थता उत्पन्न होऊन त्याला अगदीं वेड लागल्यासारखें झालें; आणि तसें होण्याचें कारण जेव्हां त्याला विचारिलें तेव्हां तो म्हणालाः—

" मीं शत्रूचे फारच थोडे लोक मारिल्यामुळें मजवर ईश्वराचा कोप झाला आहे." असीरियन् राजांनीं देवाच्या आज्ञांविषयीं अशींच चमत्कारिक विधानें केलीं आहेत. दुसरा शाल्मेनेझर स्पष्ट म्हणतो " आशुरानें ( देवानें ) मला परकी लोकांचे देश जिंकून ते हस्तगत करण्यासाठीं मोठ्या आग्रहानें सांगितलें." तिगलथ पिलेसर म्हणतो:—" आशुरानें आणि दुसऱ्या श्रेष्ठ देवांनीं मला आपली सरहद्द पलीकडे हटविण्यास सांगितलें." सेनाचेरिव हा आपणाला आशुराचा हस्तक म्हणवितो व युद्धांत त्याची आपणास मदत असे असेंही सांगतो. आशुर्वानिपाल म्हणतो:—" युद्धाचा पुरस्कार करणारे सर्व देवच आहेत. मी त्यांच्या चाकरीस राहिलेला मनुष्य आहें." ईजिप्ट देशचा राजा दुसरा रामेसीस ह्यानेंही आपल्या विलक्षण पराक्रमांविषयीं अशाच प्रकारचा उल्लेख केला आहे. हीब्र्यू लोकांमध्येंही देवाच्या आज्ञेनें लढाया चालविल्याविषयीं वर्णनें आहेत.

निरनिराळ्या समाजांमध्यें ज्यावेळीं रणें माजून राहतात त्यावेळीं जीं भयंकर कृत्यें करणें भाग पडतें त्यांना जर अशा रीतीनें धर्माची परवानगी मिळालेली नसली तर सामाजिक अवश्यकतेमुळें तरी त्या कृत्यांची कर्तव्यांत गणना होऊं लागते. आत्मसंरक्षणासाठीं अत्यवश्यक असें वर्तन व योग्य किंवा चांगलें समजलें जाणारें वर्तन ह्या दोहोंची नेहमीं संगति असावी लागते. जेव्हां एकाद्या समाजांत लोकांचें नित्याचें वर्तन त्यांच्या समजुतीविरुद्ध होऊं लागतें, तेव्हां सवईनें वि-

रुद्ध आचरण अंगवळणीं पडत जाऊन पूर्वीच्या समजुती नाहींशा होतात व आचरणाला अनुरूप अशा नवीन समजुतींना उत्तेजन मिळत गेल्यामुळें त्या दृढ होत जातात. अशा रीतीनें सरासरीच्या मानानें लोकांचा जो वर्तनक्रम असेल त्याप्रमाणें सरासरीच्या मानानें लोकांचे विचार बनतपर्यंत हा क्रम चालू राहतो. ह्याला उदाहरणें कोणत्याही समाजांत पाहिजे तितकीं मिळण्यासारखीं आहेत. ख्रिस्ती लोकांत रविवारीं व्यावहारिक काम करणें हें पातक समजलें जात असे व पुष्कळ लोकांचा ह्या समजुतीवर दृढविश्वास असे. परंतु हल्लींच्या चढाओढीच्या काळांत बहुतेक लोकांना रविवारीं काम करणें अवश्य झाल्यामुळें दिवसेंदिवस लोकांची समजूत पालटत चालली व आतां रविवारीं काम करणें ह्यांत कांहीं पाप नाहीं असें सामान्य लोकांना देखील वाटूं लागलें आहे. अजून देखील धर्माच्या कामाव्यतिरिक्त इतर काम रविवारीं करणें हें पाप आहे असेंच बहुतेक ख्रिस्तीलोक म्हणतील, पण हें त्यांचें म्हणणें केवळ शाब्दिक आहे. त्यांच्या समजुती खरोखर पालटल्या आहेत हें ते निःशंकपणें रविवारीं पाहिजे तें काम करितात ह्यावरून दिसून येतें. * भिन्नभिन्न समाज ज्यावेळीं एकमेकांना शत्रूसारखे

* वेडगळ समजुतींनीं मनुष्याला एकदां पछाडलें म्हणजे त्यांतून बाहेर पडणें सुशिक्षित मनुष्यांनाही किती जड जातें ह्याविषयीं वरील समजुतीचें १३ वर्षांपूर्वीं घडून आलेलें स्वतः-च्या अनुभवाचें एक उदाहरण आहे. म्याट्रिक्युलेशनच्या परीक्षेचे वेळीं माझी तोंडी परीक्षा सोमवारीं व्हावयाची होती, परंतु त्या दिवशींच मला मुंबई सोडून बाहेर जावयाचें होतें ह्यासाठीं माझी परीक्षा अगोदर घेण्याविषयीं मीं आपल्या परी-

पहात असतात त्यावेळीं शत्रूच्या लोकांची हानि करणारें जें जें वर्तन असेल तें तें केवळ योग्यच नव्हे तर प्रशंसनीयही मानिलें जाऊन त्याची कर्तव्यांत गणना होऊं लागते; दुसऱ्या कोणत्याही गुणापेक्षां शत्रूच्या लोकांचा निःपात करण्यांत दाखविलेलें कौशल्य अधिक वाखाणिलें जातें; शत्रूचीं घरें जाळणें व प्रांतांचे प्रांत उद्ध्वस्त करून टाकिणें हीं कृत्यें अभिमान बाळगिण्यासारखीं वाटूं लागतात; आणि मारलेल्या लोकांच्या मस्तकांचे प्रचंड ढीग रचून ठेविणें किंवा दुसरीं कांहीं विजय चिन्हें करून ठेविणें ह्यांत विजयी सरदार आणि त्यांचे अनुयायी ह्यांना इतका डौल वाटत असतो कीं, त्यावरून आपण खरोखरच मोठीं महत्कृत्यें केलीं आहेत असें त्यांस वाटत असावेंसें दिसतें.

अशा प्रकारचे विचार व मनोविकार प्राचीनकाळच्या काव्यांतून व इतिहासांतून बरेच प्रमुखत्वानें दिसून येतात. आणि मनुष्यसमाजाची उन्नति चाललेली

---

क्षकास विनंति केली. त्यानें ती मान्य करून मला रविवारीं आपल्या घरीं बोलाविलें व तेथें माझी परीक्षा घेतली. नंतर तेथून निघून जाण्याचे पूर्वी एका पाद्री गृहस्थाशीं माझें बरेंच दळणवळण असे त्यास मी भेटावयास गेलों. त्यानें माझ्या परीक्षेची हकीकत विचारिली व ती मीं सांगितली. ख्रिस्ती परीक्षकानें रविवारीं परीक्षा घेतली हें ऐकून त्यानें इतकी तिरस्कारयुक्त मुद्रा केली व त्या परीक्षकाविषयीं इतका तिटकारा आपल्या बोलण्यांत दर्शविला कीं जणो काय त्यानें एकादें घोर पातकच केलें होतें. हा मिशनरी इंग्लंडांतील एका युनिव्हर्सिटीचा बी. ए. असून गणितशास्त्र पारंगत होता. त्यानें हें केवळ ढोंग केलें असावें असेंही संभवनीय नव्हतें. कारण तो मनुष्य सरळ मनाचा व पापभीरु होता.

असतां ह्या विचारांत फारसा फरक झालेला आढळून येत नाहीं. अजूनही मनुष्याचे ह्यासंबंधाचे विचार बहुतेक पूर्वीसारखेच आहेत असें म्हटलें तरी चालेल. धर्मपुस्तकांतून लिहिलेले व व्याख्यानादिकांच्या प्रसंगीं लोकांना वर-वर दाखवावयाचे विचार एका बाजूस ठेवून खरोखर मनुष्याच्या मनाची स्थिति काय आहे हें पाहिलें असतां आतां सांगितलेल्या गोष्टीची सत्यता ध्यानांत येईल. बहुतेक लोकांच्या मनांत सगळ्या सद्गुणांमध्यें शौर्याला आदिस्थान मिळतें. केवळ अन्यायानें व दुष्टपणानें उपस्थित केलेल्या युद्धांत मरण पावणाऱ्या सरदारांविषयींही लोकांच्या तोंडून प्रशंसापर शब्द निघालेले पाहिजे तितके ऐकण्यांत येतात. धारातीर्थीं मरण येणें ह्यासारखें दुसरें चांगलें मरण नाहीं अशी आमचीही पूर्वीपासून समजूत होती व तिला स्वराज्याचे वेळीं उजळा मिळालेला होता. हल्लीं सुधारलेल्या म्हणविणाऱ्या युरोपियन राष्ट्रांनीं जगावर चोहोंकडे जी राजरोस पुंडाई चालविली आहे ती त्या त्या राष्ट्रांतील बहुतेक लोकांना मान्य आहे. आणि निरुपद्रवी लोकांचे देश गिळंकृत करितांना गरीब निरपराधी लोकांची कत्तल उडविण्याचे जे प्रसंग येतात त्यांच्याविरुद्ध कोणी ब्र हीं काढीत नाहीं.

हा वेळपर्यंत नीतिविषयक भावनांचा एक प्रकार सांगितला. ह्या भावनांमुळें स्वतःच्या किंवा स्वकीयांच्या फायद्यासाठीं परकीयांशीं पाहिजे त्या प्रकारचें वर्तन करण्यास हरकत नाहीं अशा अर्थाच्या समजुती उत्पन्न होत असतात. मनुष्याच्या उन्नतींत नीतीच्या

ह्या भागाचाच उदय अगोदर झालेला दिसतो. युद्धकालांत तर दुसऱ्या विचारांना बहुतकरून अवकाशच मिळत नाहीं. नीतीच्या ह्या भागाला 'बहिर्नीति' किंवा 'शत्रुभावात्मकनीति' असें नांव देऊं. बहिर्नीति हें नांव देण्याचें कारण आपल्या समाजाच्या बाहेर जे लोक असतील त्यांनाच हे विचार लागू करावयाचे असतात. पहिल्या भागाच्या नांवावरूनच नीतीच्या दुसऱ्या भागाची कल्पना करितां येईल. स्वकीयांशीं सलोख्यानें रहावें व जेणेंकरून एकमेकांना मदत होईल अशा रीतीनें त्यांच्याशीं वर्तन करावें अशीही इच्छा मनुष्याचे मनांत उत्पन्न होत असते व त्या धोरणानें आणखी एका दिशेनें नीतिविचारांची वाढ होत असते. नीतीच्या ह्या दुसऱ्या भागाला 'अंतर्नीति' किंवा 'मित्रभावात्मकनीति' असें नांव देऊं. अंतर्नीति म्हणण्याचें कारण आपल्या समाजांतील लोकांशींच ह्या विचारांचा विशेष संबंध असतो. आतां मित्रभावात्मक नीतीचा कसा उदय होतो तें पाहूं.

आत्मसंरक्षणासाठीं किंवा दुसऱ्यांना जिंकिण्यासाठीं जेव्हां एका समाजाचा दुसऱ्या समाजाशीं संबंध येतो तेव्हां परकी समाजांतील लोकांचें हरएकप्रकारें नुकसान करणें अवश्यक होऊन जातें व अशा वर्तनाला लोक सद्वर्तन मानूं लागतात. परंतु एकाच समाजांतील मनुष्यांनीं परस्परांशीं अशा रीतीनें वर्तन करण्याची अवश्यकता उत्पन्न होत नाहीं. उलट त्यांना एकमेकांशीं त्याच्या विरुद्ध वागणें भाग पडेल. कधींकधीं एका समाजांतील लोकही परस्परांशीं भांडतील व प्रसं-

गीं दंडेलीवरही येतील. परंतु साधारण मानानें त्यांचें एकमेकांशीं वर्तन न्यायाचें व सलोख्याचें असल्यावांचून त्यांचा एकमेकांवर विश्वास बसणार नाहीं; व विश्वासावांचून परकी समाजांतील लोकांशीं युद्धांत टिकाव धरण्याला ज्या प्रकारची जूट पाहिजे तशी जूट त्यांना करितां येणार नाहीं. एका समाजांतील लोकांनीं मिलाफानें राहून एकमेकांस मदत होईल अशा रीतीची वागणूक ठेविणें हें त्या समाजाच्या उत्कर्षाला कारणीभूत होतें व त्यामुळें इतर लोकांना जिंकिण्याची त्यांच्या अंगीं ताकद येते. ह्याचा स्वाभाविक परिणाम असा होतो कीं ज्या समाजांतील लोकांचे हातून तसें वर्तन घडतें ते समाज पुढें सरसावतात व बाकीचे पाठीमागें राहतात. व्यक्तींमध्यें जशी चढाओढ असते तशीच समाजांमध्येंही असते. व त्यामुळें अधिक सामर्थ्यवान् समाजांची निवड होत असते. आणि अधिक सामर्थ्य येण्याला एका समाजांतील लोकांनीं परस्परांशीं सलोख्यानें वागणें जरूर आहे असें आतां सांगितलेंच आहे. ह्यावरून असें दिसून येईल कीं, मित्रभावात्मक नीतीचे विचार मनुष्याच्या मनांत येण्याला जीवनार्थकलहामुळें मदत होते.

एका समाजांतील लोकांची परस्परांशीं मित्रत्वानें वागण्याकडे प्रवृत्ति होण्याला आणखीही एक कारण आहे. राज्यकर्त्या पुरुषांना लोक नेहमीं भिऊन वागतात व बहुधा ते त्यांच्या इच्छेआड जात नाहींत. आपल्या राज्यांतल्या लोकांमध्यें आपसांत कलागती उत्पन्न होऊं देणें हें आपणांस अपायकारक आहे हें स-

हज त्यांच्या ध्यानांत येतें व अशा प्रकारचें वर्तन आपल्या लोकांच्या हातून न होऊं देण्याविषयीं ते फार तत्पर असतात. त्यांतून त्या राजांना देवांप्रमाणें मान मिळूं लागला असला तर त्यांच्या आज्ञांना धर्माज्ञांचेंच स्वरूप येतें व त्यांच्या पश्चात् देखील लोक त्या पाळीत असतात. समाजबांधवांमध्यें एकोपा उत्पन्न करणाऱ्या सलोख्याच्या वर्तनाला अशा रीतीनें ईश्वराचा किंवा धर्माचा आधार मिळतो व त्याच्या विरुद्ध वर्तन पाप मानिलें जातें. नीतिशास्त्रांची उत्पत्ति अशा रीतीनें झालेली दिसते आणि म्हणूनच अनेक जातींच्या लोकांचे जे सहस्रावधि मनुष्यसमाज आपल्या दृष्टीस पडतात त्यांच्या नीतिनियमांमध्यें जेणेंकरून समाज विस्कलित होण्याची फार भीति असेल अशा आचरणाचा निषेध केलेला आढळतो.

अशा रीतीनें उत्पन्न होणारे नीतिनियम एका पिढीपासून दुसरीला व दुसरीपासून तिसरीला मिळत जाऊन त्यांची परंपरा कायम राहते ह्याविषयीं पाहिजे तितका पुरावा मिळतो. ब्रह्मदेश आणि सयाम् ह्या देशांत राहणारे कारेन म्हणून लोक आहेत ते आपले सर्व कायदे व वर्तनाचे नियम पूर्वांच्या पिढ्यांतील शिष्टांनीं केलेले आहेत असें मानितात. स्कूलक्राफ्टवरून समजतें कीं अमेरिकेंतल्या इंडियन लोकांमध्यें डकोट म्हणून एक जात आहे त्या जातींतील लोक आपल्या पूर्वांच्या दंतकथा व वचनें ह्यांचा आपल्या कुटुंबांतील मनुष्यांपुढें पाठ करितात आणि त्याप्रमाणें आपलें आचरण ठेविण्याविषयीं आपल्या मुलांना उपदेश करितात.

अमेरिकेंतल्या इंडियन लोकांमध्येंच इरोकोई म्हणून लोक होते त्यांविषयीं मार्गन म्हणतो कीं, जेव्हां त्यांच्या टोळ्यांचे नाईक मरत तेव्हां त्यांच्या उत्तरक्रियेंतील एक मुख्य भाग म्हटला म्हणजे त्यांच्या पूर्वापार कायद्यांचा व वहिवाटींचा उच्चार करावयाचा. आणि त्यांच्या टोळ्यांचे नाईक म्हणजे त्यांचे राजेच समजावयाचे. ह्या चालीवरून त्या कायद्यांविषयीं लोकांची पूज्यबुद्धि व्यक्त होते. वास्तविक ते त्यांचे नीतिनियमच होते. आणि त्यांना एका प्रकारचें दैवी महत्त्वही आलेलें होतें.

नीतिनियमांना व्यवस्थित स्वरूप येऊन त्यांचें शास्त्र बनण्याच्या पूर्वींचे उपदेशक नीतिविरुद्ध भयंकर कृत्यांविषयींही फारसें तिरस्कारपूर्वक लिहीत नाहींत; कारण त्या कृत्यांचा दुष्टपणा नुकताच कांहीं लोकांच्या नजरेस येऊं लागलेला असतो. नित्यक्रमाच्या बाहेरील साधारण गोष्टींचा निषेध व चांगल्या रीतीनें वागण्याविषयीं उपदेश हीं त्यांच्या लेखांत विशेष आढळतात. प्राचीन हिंदुलोकांच्या ग्रंथांत ह्याचीं पुष्कळ उदाहरणें आहेत. त्या उदाहरणांत आणखीही एक गोष्ट दिसून येते. निःसीमस्वार्थाचा वीट येऊन त्यावेळीं बऱ्याच लोकांचें मन निःसीमपरार्थाकडे वळलें होतें. आणि लोकांस उपदेश करणाऱ्या मनुष्यांतच ह्या मताचा विशेष जोर असल्यामुळें त्याचा त्यांनीं ठिकठिकाणीं उल्लेख केलेला आहे. उदाहरणार्थ, महाभारताच्या उत्तर भागांत पुढील श्लोक आढळतोः—

सहस्व श्रियमन्येषां यद्यपि त्वयि नास्ति सा ।
अन्यत्रापि सतीं लक्ष्मीं कुशला भुंजते सदा ॥*

शांतिपर्व, अ० १०४.

आणि भारवि कवीनें किरातार्जुनीयांत म्हटलें आहे:—

युक्तानां खलु महतां परोपकारे ।
कल्याणी भवति रुजत्स्वपि प्रवृत्तिः ॥ †

सर्ग ७, श्लो० १३.

त्याचप्रमाणें एका तामिळ काव्यांत पुढील अर्थाचीं वचनें आहेत:—

" संपत्ति मिळविण्याचा मुख्य हेतु म्हटला म्हणजे परोपकार करण्यास समर्थ होणें हा होय. "

" ज्याला आपलीं परोपकारविषयक कर्तव्यें समजतात व ज्याच्या हातून तीं घडतात तोच खरोखर जिवंत आहे असें म्हणावयाचें. ज्याला तीं कर्तव्यें समजत नाहींत तो जिवंत असूनही मेल्याप्रमाणेंच आहे."

चिनीलोकांच्या प्राचीनग्रंथांतून जे विचार आढळतात त्यांवरून मित्रभावात्मक नीतीची कल्पना त्या लोकांत चांगल्या उन्नत स्थितीस जाऊन पोहोंचली होती असें दिसतें. पहिल्या प्रतीच्या पांच सद्गुणांविषयीं लिहितांना त्यांचा नीतिकार कन्फ्यूशिअस म्हणतो:—

---

* तुझ्याजवळ जरी संपत्ति नसली तरी इतरांच्या संपत्तीबद्दल तूं विषाद मानूं नको. चांगल्या मनाचे लोक दुसऱ्यांजवळ संपत्ति असली तरी तिचा उपभोग घेतात. अर्थात् इतरांच्या संपत्तीपासून त्यांना आनंद होतो.

† आपणांस दुःख देणारांसही सुख देण्याविषयीं परोपकाररत थोरपुरुषांची स्वाभाविक प्रवृत्ति असते.

" माणुसकीचा गुण सर्वांत श्रेष्ठ होय. माणुसकी म्हणजे जातिधर्मादिकांचा विचार मनांत न आणितां प्रत्येक मनुष्यानें इतरांविषयीं जी प्रेमबुद्धि धारण करणें अवश्य आहे ती होय. पहिलें स्थान माणुसकीला दिल्यानंतर दुसरें स्थान न्यायाला दिलें पाहिजे. पक्षपात न करितां प्रत्येक मनुष्याला त्याचा वांटा मिळूं देणें हा न्याय होय. "

आणि आणखी एका ठिकाणीं तो म्हणतोः—

" आपल्याहून वरच्या पायरीचे लोक आपणाशीं ज्या रीतीनें वागले असतां आपणास खपत नाहीं त्या रीतीचें वर्तन आपण आपल्या खालच्या पायरीवरील लोकांशीं करूं नये; जे आपल्या मागें असतील त्यांचें ज्या प्रकारचें वर्तन आपणास आवडत नसेल त्या प्रकारचें वर्तन आपण पुढल्या माणसांशीं करूं नये; व डाव्या बाजूच्या लोकांची जी वागणूक आपणास पसंत नसेल ती आपण उजव्या बाजूच्या माणसांशीं करूं नये. "

प्राचीनकालच्या ईजिप्शियन् लोकांमध्येंही मित्रभावात्मक नीतीची बरीच उन्नति झालेली दिसते. ईजिप्शियन् लोकांच्या प्राचीनग्रंथांची ज्याला चांगली माहिती आहे असा एक ग्रंथकार म्हणतोः—

" ख्रिस्ती लोकांच्या पवित्र पुस्तकांतून ज्या ज्या म्हणून सद्गुणांचें वर्णन केलेलें आढळतें त्या सर्वांचा ईजिप्शियन् लोकांस पूर्णपणें उमज पडलेला होता. भक्ति, दानधर्म, नम्रपणा, आत्मसंयमन, पातिव्रत्य, पत्नीव्रत, दुर्बलांचें संरक्षण, दीनांवर उपकार, वरिष्ठांशीं लीनता,

धनिकांविषयीं सन्मानबुद्धि, इत्यादि सर्व सद्गुणांचा त्यांच्या ग्रंथांत उल्लेख आढळतो. आणि त्यांची लिहिण्याची शैलीही फार उत्तम आहे. ”

ईजिप्शियन् लोकांचींच धर्मतत्त्वें हीब्र्यूलोकांनीं उचललीं असावीं ह्याविषयीं क्युएनन ह्यानें पुरावा दिला आहे. त्याच नीतितत्त्वांवरून पुढें मोझेस ह्यानें आपलें आज्ञादशक तयार केलें. आणि त्या दहा आज्ञांचें सार ख्रिस्तीधर्माचें जें मुख्य वर्तनतत्त्व मानिलें जातें त्यांत आलें आहे. “ इतरांनीं तुझ्याशीं ज्या प्रकारचें वर्तन करावें असें तुला वाटतें त्या प्रकारचें वर्तन तूं इतरांशीं कर ” हें तत्त्व व मोझेसच्या दहा आज्ञा ह्यांच्या धोरणानेंच आपलें वर्तन ठेविलें पाहिजे असें हल्लींचे ख्रिस्तीलोकही म्हणतात.

ह्या उदाहरणांवरून अशी ढळढळीत गोष्ट दिसून येते कीं, कोणत्याही कारणानें असो, पण प्रत्येक समाजांत मित्रभावात्मकनीतीचा उदय झाल्यावांचून राहत नाहीं. कधींकधीं हे विचार मुग्धरूपानें असतात. म्हणजे ते लोकांच्या मनांत येऊन त्यांच्या आचरणांतही दिसून येतात पण त्यांविषयीं बडबड केली जात नाहीं. केव्हांकेव्हां त्यांना शास्त्राचें स्वरूप येऊन त्यांची फार चर्चा केली जाते, सूत्रांसारख्या लहानलहान वाक्यांत नीतिनियम ग्रथित करून ते लोकांकडून पाठकरविले जातात व अशा रीतीनें पिढ्यान्पिढ्या ते जशाचे तसेच राहतात. कित्येक समाजांत ह्या विचारांची फारशी वाढ होत नाहीं, परंतु कित्येकांत त्यांचा पुष्कळ विस्तार होऊन अगदीं बारीकसारीक गोष्टींकडे

सुद्धां लक्ष्य दिलें जातें. मित्रभावात्मकनीतीचे विचार उत्पन्न होऊन त्यांच्या धोरणावर वर्तनाचे नियम ठरणें व ते अंशतः तरी अमलांत येणें हें प्रत्येक समाजाच्या अस्तित्वाला अत्यवश्यक आहे. असें न होईल तर थोड्याच कालांत समाज विस्कळित होऊन जाईल.

शत्रुभावात्मकनीति आणि मित्रभावात्मकनीति ह्या दोहोंचाही कसा उगम होतो हें वरील विवेचनावरून ध्यानांत येईल. कोणताही समाज झाला तरी त्यांत हे दोन्ही प्रकारचे विचार आढळावयाचेच. ह्या दोहोंमधील विरोध तर स्पष्टच आहे. आतां मित्रभावात्मकनीतीच्या नियमानें वागावयाचें व एका घटकेनें शत्रुभावात्मकनीतीच्या नियमानें वागावयाचें असें झाल्यानें मनुष्याच्या वर्तनांत असंबद्धता उत्पन्न होते. दोहोंमध्यें तोडजोड होणें तर शक्यच नाहीं. बरें, एक सोडून देऊन दुसरीच्याच धोरणानें चालावें तर तेंही साध्य नाहीं. ह्यामुळें नीतिविचारांचा घोंटाळा झाला आहे, आणि ह्यामुळेंच एका मनुष्याला एक न्याय व दुसऱ्या मनुष्याला दुसरा न्याय असें वर्तन प्रत्येकाच्या हातून घडत असतें. प्रत्यहीं अशा प्रकारचीं पाहिजे तितकीं उदाहरणें घडून येत असतात, परंतु मौज ही कीं, आपल्या वर्तनांतील विसंगतपणा मनुष्यांच्या लक्ष्यांत येत नाहीं. संवईमुळें इतक्या ढळढळीत गोष्टीकडेही मनुष्याचें मन जात नाहीं.

कारणावांचून अफगाणिस्थानावर किंवा ब्रह्मदेशावर स्वारी करण्याची गोष्ट इंग्लंडांतील बहुतेक बिशप लोकांना पसंत होते व अशा कामांत ईश्वरानें मार्गदर्शक

व्हावें व मदत करावी म्हणून ते त्याची प्रार्थना करिता-त. हा प्रकार जसा व्हावा तसाच आहे असें इंग्लिश लोकांना वाटतें व त्याबद्दल कोणी आपलें आश्चर्य प्रकट करीत नाहीं. पण लढाई न करितां तह करावा ह्या मताचें प्रतिपालन करण्याकरितां जर एकादी सभा भरली व तिचें अध्यक्षस्थान एकाद्या बिशपानें स्वीकारिलें तर मात्र त्याचें वर्तन अयोग्य वाटून त्याच्यावर कटुशब्दांचा भडिमार केला जातो. निरनिराळ्या राष्ट्रांच्या प्रतिनिधींची एक मंडळी स्थापन करावी व राष्ट्राराष्ट्रांत भांडणें उत्पन्न झाल्यास त्यांचा निकाल त्या मंडळीनें करावा आणि तो सर्वांनीं मान्य करावा असा विचार लोकहितासाठीं झटणाऱ्या कांहीं परोपकारी गृहस्थांनीं पुढें आणिला असतां तो लोकांस पसंत पडत नाहीं. अशाच एका प्रसंगीं आपलें विरुद्धमत प्रतिपादीत असतां लार्ड क्रानब्रूक म्हणालाः—"युद्धापेक्षां शांततेचीच स्थिति राष्ट्राला अधिक घातक होईल अशी मला जबर शंका आहे." हें त्याचें बोलणें ऐकून 'तूं आपल्यावर जितकी प्रीति करितोस तितकीच शेजाऱ्यावर कर' ह्या स्वर्गीयतत्त्वाचा उपदेश करणाऱ्या पाद्री मंडळानें माना डोलविल्या. त्याचप्रमाणें ख्रिस्ती धर्माचा वडा अधिकारी डॉक्टर मूरहाऊस हा, इंग्लिश लोकांना युद्धाच्या कामाला योग्य करण्यासाठीं त्यांना उत्कृष्ट प्रकारचें शारीरिक व नैतिक शिक्षण देण्याच्या अवश्यकतेविषयीं जोरदार रीतीनें भाषण करीत असतांना, आपली इच्छा प्रदर्शित करितो कीं:—"कुत्र्यांनीं कोल्ह्याला कोंडिलें असतां तो जसा सांपडेल त्याचा चावा घेत घेत मरतो त्या-

प्रमाणें त्यांनीं प्रसंग आला असतां मेलें पाहिजे." आणि सरतेशेवटीं तो म्हणतो:–"आपल्या लोकांच्या अंगीं हे नैतिक गुण येण्यासाठीं व त्यांचा विकास होण्यासाठीं आपण त्यांना उत्तेजन दिलें पाहिजे; आणि माझा पूर्ण विश्वास आहे कीं, देवाच्या कृपेनें त्यांच्या मनांत प्रेरणा होऊनच हें काम होईल. एरव्हीं होणार नाहीं." बड्या धर्माधिकाऱ्याच्या असल्या पांडित्याविरुद्ध धर्माधिकाऱ्यांपैकीं किंवा इतर मंडळीपैकीं कोणी कांहीं बोलत नाहीं. अर्थात् ते विचार त्यांच्या पसंतीस उतरतात. प्रीति, शांतता, परोपकार हीं ख्रिस्ती धर्माचीं रहस्यें आहेत; पण ख्रिस्ती देवळांनीं सुशोभित झालेल्या त्या अंग्लभूमींतील लोकांचे विचार-आणि ते पुन्हां धर्मोपदेशकांच्या तोंडून निघालेले-कसे आहेत ते पहा. ह्या विचारांशीं जुळण्यासारखें इतर गोष्टींतही त्यांचें वर्तन दिसून येतें. पायांनीं खेळण्याच्या चेंडूचा एक खेळ आहे तो फार भयंकर आहे. त्या खेळाचे सामने होतात त्यांत सरासरीनें दर आठवड्यास एक मनुष्य दगावतें. ह्या सामन्यांच्या हकीकती वाचण्यासाठीं लोक अगदीं उतावीळ झालेले असतात. त्याचप्रमाणें ज्या वर्तमानपत्रांत मल्लयुद्धांची इत्थंभूत हकीकत दिलेली असते व जगांत शांतता राखण्यासाठीं कोणत्या उपयांची योजना करावी ह्या प्रश्नाचा विचार करण्यासाठीं भरलेल्या सभेची हकीकत चारदोन ओळींत संपविलेली असते, तीं वर्तमानपत्रें विकत घेण्यासाठीं लोकांच्या झुंडीच्या झुंडी धांवतात. आणि ज्या सचित्र वर्तमानपत्रांतील निंमे चित्रें मनुष्यवधासंबंधाचीं किंवा मनुष्यवधाला कारणी-

भूत होणाऱ्या प्रसंगांचीं असतील त्यांना त्यांचेकडून उदार आश्रय मिळतो.

मनुष्याच्या नीतिविचारांत फारच दिखाऊपणा शिरला आहे. बाहेर शिकवावयाचे विचार निराळे व वर्तनाला प्रवृत्त करणारे अंतर्यामींचे विचार निराळे. मित्रभावात्मकनीतीचे उच्चविचार हे पुष्कळ अंशीं शिकवावयाचे विचार होत. त्यांचें मनुष्यांला लोकांपुढें प्रदर्शन करावेंसें वाटतें. परंतु आचरणाची वेळ येते तेव्हां बहुधा शत्रुभावात्मकनीतीच्या विचारांचा मनुष्याच्या मनावर पगडा बसतो. ह्यासंबंधानें मनुष्याची स्थिति इसापनीतींतल्या " खोंकड आणि बोका " ह्या गोष्टीप्रमाणें होते. ह्या दोन प्रकारच्या विचारामुळें उत्पन्न होणारी इंग्लिश लोकांच्या आचरणांतील असंबद्धता वर दाखविलीच आहे, त्यापेक्षांही अधिक यूरोपांतील इतर देशांत आढळते. शत्रूवर सुद्धां उपकार करावा ह्या तत्त्वाचा प्रसार करण्याकरितां मोठमोठ्या मंडळ्या स्थापिल्या जाऊन त्यांच्या मार्फत ठिकठिकाणीं उपदेशक नेमण्यांत आले आहेत, परंतु प्रत्यक्ष आचरणावर त्यांच्या उपदेशाचा कांहींएक परिणाम होत नाहीं. कित्येक देशांत प्रत्येक मनुष्यानें अमुक मुदतपर्यंत सैन्यांत चाकरी केली पाहिजे असा नियम आहे व त्याप्रमाणें विद्यार्थिदशा संपतांच लोक हें आपलें कर्तव्य करून मग कायमचा उद्योग पतकरितात. हें जें लष्करी शिक्षण प्रत्येक मनुष्याला मिळत असतें त्याचा उपयोग शत्रूवर उपकार करण्याकरितां होतो कीं अपकार करण्याकरितां होतो हें सांगावयास नको. शत्रूंवर उपकार करा म्हणून उ-

प्रदेश करीत फिरणाऱ्या मिशनरी मंडळ्यांच्या एजंटां-
ना देखील हें लष्करी शिक्षण मिळालेलें असतें व ह्या-
विरुद्ध कोणी चकारशब्द सुद्धां काढीत नाहीं. फ्रेंच-
लोक जो एवढा अवाढव्य सैन्याचा खर्च निमूटपणीं सो-
शीत आहेत तो आपल्या देशांत किंवा इतर ठिकाणीं एकादें
महत्कृत्य करून मनुष्यजातीच्या सुखाची वृद्धि कर-
ण्यासाठीं नव्हे, तर त्यांच्याच अन्यायाच्या व जुलमी
वर्तनाबद्दल यथायोग्य प्रायश्चित्त मिळून जे प्रांत त्यांज-
कडून घेतले गेले आहेत ते परत मिळविण्यासाठीं होय.
हा सूड घेण्यासाठीं फ्रेंचलोक इतके उतावीळ झाले आ-
हेत कीं, कधीं एकदां आपण लढाई सुरू करूं असें
त्यांस झालें आहे. व जो कोणी आपणांस तसें करूं
देईल असें त्यांस वाटतें त्याच्या हातांत राज्यसूत्रें दे-
ण्यास ते तयार होतात. नुकतीच एक देशाभिमानाची
लाट येऊन तीसरशी एका शूर शिपायाच्या हातांत
सर्व सत्ता जाण्याचा समय आला होता.

प्रॉटेस्टंट मताचा उत्पादक जो मार्टिन लूथर त्याची
जन्मभूमि, आणि ख्रिस्ती धर्माच्या उज्ज्वल स्वरूपाचें
माहेरघर, असा जो जर्मनी देश त्याचीही स्थिति वर-
च्यासारखीच आहे. तेथल्या हल्लींच्या बादशहानें सिं-
हासनारूढ होतांना आपल्या सैन्यांतील शिपायांना जे
आपले विचार कळविले त्यांत राष्ट्राचे विचार प्रतिबिं-
बित झाले होते असें म्हणण्यास हरकत नाहीं. प्रथमतः
उच्चपदाच्या प्राप्तीबद्दल ईश्वराचे त्यानें अनेक प्रकारें
आभार मानिले, नंतर त्याच्या इच्छेचें गौरव करून,
आपलें वर्तन नेहमीं ईश्वराला प्रिय होईल असेंच ठेव-

विण्याविषयीं आश्वासन दिलें आणि सरतेशेवटीं म्हणालाः—"माझे पूर्वज स्वर्गांतून मजकडे पाहत आहेत हें मला नेहमीं ध्यानांत बाळगिलें पाहिजे. मलाही तेथें जावयाचें आहे व जेव्हां तसा प्रसंग येईल तेव्हां ह्या सैन्याचा मीं कसा उपयोग केला ह्याचा हिशोब मला द्यावा लागेल. त्यावेळीं ह्या सैन्यानें अभिमान बाळगिण्यासारख्या व उज्ज्वलकीर्तीच्याच गोष्टी सांगण्याचा सुदीन प्राप्त झाला पाहिजे." ह्या विचारांना ख्रिस्तीधर्माच्या तत्त्वांत बिलकुल थारा मिळावयाचा नाहीं. परंतु ज्या लोकांच्या मनावर ख्रिस्ती धर्माचें केवळ वरून पूट दिलेलें असेल त्यांच्या आचरणावर त्याचा परिणाम कसा व्हावा? तथापि दोन्ही प्रकारच्या विरोधी विचारांची सांगड जोडून देण्याची इच्छा मनुष्याला फार असते. वर सांगितलेल्या जर्मन् बादशहानेंच नुक्तें एकदां मल्लयुद्धांना उत्तेजन देणाऱ्या मंडळ्यांविषयीं प्रशंसापर भाषण केलें व लागलीच ईश्वराची प्रार्थना करून त्या भाषणाची समाप्ति केली.

समाजांतील लोकांशीं मित्रभावानें वागण्याची अवश्यकता असल्यामुळें उत्पन्न झालेले अंतर्नीतीचे नियम व परकीयांशीं शत्रुभावानें वागण्याची संवय झाल्यामुळें हाडीं खिळलेले बहिर्नीतीचे नियम ह्या दोहोंचाही मनुष्याच्या मनावर कसा परिणाम होतो व बहिर्नीतीच्या विचारांचें मनुष्याच्या मनावर अजून किती वर्चस्व आहे हें पहावयाचें असल्यास अंतर्नीतीचा उपदेश करणाऱ्या धर्मोपदेशकांची संख्या व बहिर्नीतीचे नियम अमलांत आणण्यासाठीं बाळगिलेल्या सैन्यांतील शिपायांची सं-

रुया ह्यांमधील प्रमाण पहावें. लक्षावधि धर्मोपदेशक “ शत्रूंवर प्रीति करा ” “ शत्रूंच्या अपराधांची क्षमा करा ” इत्यादि अत्युच्च तत्त्वांचा उपदेश करीत फिरत आहेत, व मनुष्याचा जीव घेण्याच्या विद्येमध्यें ज्यांनीं प्रावीण्य संपादन केलें आहे असे कोट्यवधि शिपाई शत्रूंचा सूड घेण्यासाठीं किंवा निरुपद्रवी लोकांना त्रास देण्यासाठीं तत्पर होऊन बसले आहेत.

परंतु एवढावेळपर्यंत सांगितलेल्या ह्या दोन प्रकारच्या नीतिविचारांबरोबरच आणखी एका प्रकारच्या नीतिविचारांची वाढ होत आहे. ह्या तिसऱ्या प्रकारच्या नीतीच्या कल्पनेंत धर्म, ईश्वर इत्यादिकांचा विचार बिलकुल केला जात नसून सृष्टिक्रमानुसार स्वाभाविक रीतीनें घडून येणाऱ्या गोष्टींचा मात्र विचार केलेला असतो. ह्या नीतिविचारांचा रोंख वर्तनाच्या उपयोगावरून त्याची किंमत ठरविण्याकडे आहे. हळूहळू अशा प्रकारचे नीतिविचार उद्भूत होणें स्वाभाविकच होतें. कारण ईश्वरांश मानिलेल्या राजांनीं घालून दिलेले नीतिनियम असोत किंवा स्वाभाविक अवश्यकतेमुळें ते उत्पन्न झालेले असोत, त्यांच्या उपयोगाकडे लक्ष्य जाऊनच ते प्रथम अस्तित्वांत आलेले असतात. व हें कारण थोड्याबहुत अंशांनीं बहुतेकांच्या लक्ष्यांत आलेलें असतें. एकदां धर्माज्ञा कायम झाल्या म्हणजे त्या जरी ईश्वराच्या आज्ञा अशा समजुतीवर पाळिल्या जातात, तरी त्यांच्या अवश्यकतेबद्दलही थोडीबहुत कल्पना मनुष्याचे डोक्यांत असतेच.

ह्या नीतिविचारांचें बीज कधींकधीं अगदीं अशि-

क्षित लोकांमध्येंही आढळून येतें. मादागास्कर येथील लोकांविषयीं एका शोधकानें पुढील माहिती दिली आहे:—

" व्यभिचार, चोरी आणि खून ह्या अपराधांबद्दल शिक्षा करण्याचे कायदे त्यांजमध्यें आहेत. कोणीं कोणाच्या आईबापांना शिव्या दिल्या तर त्या अपराधांबद्दलही दंडाची शिक्षा ठेविलेली आहे. ते कधींही भलत्या कारणासाठीं शपथ घेत नाहींत. आणि ह्या गोष्टींचें कारण त्यांना विचारिलें तेव्हां ते म्हणाले ' वर्तनाचे असे नियम असणें सोईचें आणि योग्य आहे; असे कायदे नसते तर आम्हांला एका ठिकाणीं राहतां आलें नसतें.' "

अखेरीअखेरीस लिहिलेल्या हीब्र्यू ग्रंथांतही ह्या विचारांची झुळूक नजरेस पडते. त्यांच्या ग्रंथांत जरी बहुतेक ठिकाणीं ईश्वराची इच्छा आणि ईश्वराचें भय ह्याच कल्पना जिकडेतिकडे प्रमुखत्वानें आढळून येतात तरी क्वचित् प्रसंगीं उपयोगाच्या कल्पनेचेंही बीज आढळतें. एक्लिझिआस्टिकस नामक ग्रंथाच्या कर्त्यानें वर्तनाचे जे कित्येक नियम दिले आहेत ते खचित त्याच्या समजुतीप्रमाणेंही ईश्वराच्या आज्ञेचा परिणाम नव्हत. दुसऱ्यावर अवलंबून राहणें, अन्नाची चाड बाळगिणें, बोलतांना सावधपणा राखणें, खाण्यापिण्याचे कामांत नेमस्तपणानें वागणें इत्यादि उपदेशाच्या गोष्टी निवळ अनुभवावरून सांगितलेल्या दिसतात. कित्येक ईजिप्शियन् तत्त्ववेत्त्यांनीं केवळ उपयोगाकडे लक्ष्य देऊन नीतीचा विचार केला होता असें दिसतें. त्यांनीं उप-

योगात्मक नीतीचें पायाशुद्ध शास्त्रच बनविलें होतें. पूल लिहितो:—

"पुष्कळ वर्षांपासून निरर्थक झालेल्या धर्माचारांचा टाहोटेप ह्याला कंटाळा आलेला होता. दीर्घकाल चालत आलेल्या व चालू धर्माशीं एकजीव होऊन गेलेल्या अनंत रूढाचारांच्या भानगडींत न पडतां, स्वतःचें अवलोकन व अनुभव ह्यांच्या धोरणानें केवळ उपयोगाच्या पायावर नीतीची इमारत उभारण्याचा त्यानें यत्न केला आहे. त्याचीं जीं अनेक वचनें आहेत त्यांत सदाचारानें वागण्यापासून इहलोकीं कोणते फायदे होण्यासारखे आहेत तें दाखविलें आहे. परलोकाच्या कल्पनेला त्याच्या नीतिशास्त्रांत स्थलच नाहीं." ह्या विचारांबद्दल आपला अभिप्राय देतांना तो म्हणतो:—

"हें ईजिप्शियन् तत्त्वज्ञांचें नीतिशास्त्र त्यांच्या धर्ममिश्रित नीतिशास्त्रापेक्षां श्रेष्ठ आहे. कारण त्यांत निरर्थक गोष्टींना बिलकुल अवकाश दिलेला नसून अवश्य कर्तव्यांचा मात्र विचार केलेला आहे. पण मनुष्याचें इहलोकींचें कल्याण हें ह्या नीतिशास्त्राचें जनक आहे; ईश्वरभक्ति आणि बंधुप्रीति ह्यांपासून सद्गुणांचा उगम होतो असें त्यांत सांगितलेलें नाहीं म्हणून लोक नाकें मुरडतील तर मुरडोत."

अखेरीस झालेल्या ग्रीक तत्त्वज्ञान्यांचा सुद्धां उपयोगात्मक नीतिवरच विशेष भर होता. प्लेटोचे संवाद व आरिस्टाटलाचें नीतिशास्त्र ह्यांत नीतिविचार धर्मविचारांपासून बरेच भिन्न केलेले असून नीतीची इमारत उपयोगाचे पायावर उभारण्याचा यत्न केलेला दिसतो.

प्राचीन लोकांना सोडून अर्वाचीन लोकांविषयीं विचार करूं लागलें असतां दिवसेंदिवस नीतिविचारांना धर्मविचारांपासून भिन्न करण्याकडे लोकांची प्रवृत्ति होत आहे असें दिसतें. पेली म्हणून एक इंग्लंडांत ईश्वरविद्याप्रवीण व तत्त्ववेत्ता पुरुष होऊन गेला. त्यानें दोन्ही प्रकारांनीं नीतीची सिद्धता करून दाखविली आहे. धार्मिक लोकांसाठीं ईश्वराच्या आज्ञांवरून सद्वर्तन कोणतें व दुर्वर्तन कोणतें तें ठरविलें आहे, व धर्मविचारांवर ज्यांची श्रद्धा नाहीं त्यांच्यासाठीं केवल परिणामांकडे लक्ष्य देऊन योग्य वर्तन कोणतें व अयोग्य कोणतें तें दाखविलें आहे. ह्या तत्त्ववेत्त्याच्या मरणानंतर त्यानें दिलेली नीतीची पहिली उपपत्ति मागें पडली, परंतु दुसरीची मात्र चांगल्या रीतीनें वाढ झाली. बेन्थाम आणि मिल्ल ह्यांनीं तर उपयोगाचीच कसोटी वर्तनाला लाविली पाहिजे, दुसरी कोणतीही लावितां येत नाहीं, असें सप्रमाण सिद्ध केलें आहे. ईश्वराच्या आज्ञेविषयीं विचार न करितां ज्या वर्तनानें मनुष्यजातीचें कल्याण होईल तें सद्वर्तन आणि ज्यानें अकल्याण होईल तें दुर्वर्तन, हें ह्या नीतीचें ढोबळ तत्त्व आहे. नीतीचें वर्तन करण्याला ईश्वराची आज्ञा म्हणून जें कारण दाखविलें जातें तें अजीबात नाहींसें करून त्याच्या जागीं मनुष्यजातीचें कल्याण हें कारण घातलें पाहिजे असें मिल्ल ह्याचें ठाम मत झालें होतें. ईश्वराविषयीं त्याचे विचार कसे होते तें समजलें म्हणजे त्याचें असें मत होणें किती स्वाभाविक होतें तें कळून येईल. तो एकदां म्हणालाः—
" ज्यांचीं कृत्यें मनुष्याच्या अत्युच्च नीतिविचारांच्या

कसोटीस उतरणार नाहींत त्या लोकांच्या परमेश्वराला मी कधीं ‘ चांगला ’ म्हणणार नाहीं. आणि तसें न म्हणण्याबद्दल जर तो मला नरकास जाण्याची शिक्षा देत असला तर ती मी खुशाल भोगीन. ”

चांगल्या किंवा वाईट वर्तनाची आणखीही एक कसोटी आहे व तिचाही उगम इतर नीतिविचारांबरोबरच झालेला आहे. कोणत्याही प्रकारचें वर्तन संवईनें अंगवळणीं पडत चाललें म्हणजे त्याविषयीं आवड उत्पन्न होते. एका समाजांतील लोक एकाच प्रकारचे नीतिनियम पाळीत असल्यामुळें त्या सर्वांची त्या नियमांच्या चांगुलपणाबद्दल सारखीच समजूत बनते. दीर्घकालपर्यंत एकमेकांच्या सहवासांत राहण्यानें मनुष्यांमध्यें कांहीं कल्पना व समजुती उत्पन्न झाल्या आहेत. त्यांच्या योगानें समाजाच्या हिताचें जें वर्तन असेल त्याविषयीं मनुष्याच्या मनांत सहजीं आवड उत्पन्न होते. व जें अहिताचें असेल त्याविषयीं तिरस्कार वाटतो. हा जो मनुष्याला बोध होतो तो त्याच्या मनावर अनेक युगांचा जो संस्कार झाला आहे त्यामुळें होतो. त्यावेळीं मनुष्याचें लक्ष्य ईश्वराच्या आज्ञेकडे किंवा वर्तनाच्या परिणामांकडे जात नाहीं. ही मनुष्याची बरें-वाईट ओळखण्याची शक्ति कांहींशी मनुष्येतर प्राण्यांच्या उपजतबुद्धीसारखी असते. तेथें विचाराचें कारणच नाहीं. मनांत प्रश्न उद्भवल्याबरोबर चांगलें कोणतें आणि वाईट कोणतें हें अंतर्ज्ञानानेंच समजतें. जीवनार्थकलहानें ज्यांच्या अंगीं जीवनसामर्थ्य अधिक असतें अशा प्राण्यांची जी निवड होत असते

तीमुळें मनुष्याच्या मनांत अशी बुद्धि उत्पन्न होण्याला मदत झाली असावी असें दिसतें. मनुष्याचें क्षणोक्षणीं जें वर्तन चाललें असतें तें करितांना त्याला विचार करण्याला अवकाश मिळत नाहीं. कोणतें वर्तन चांगलें व कोणतें वाईट हें तत्काल समजणें जरूर असतें. हें समजलें तरी त्याप्रमाणेंच मनुष्य वागतो असें नाहीं. तथापि ह्या ज्ञानाचा त्याच्या आचरणावर पुष्कळ परिणाम होतो. ज्या मनुष्यांच्या बऱ्यावाईटाच्या कल्पना त्यांच्या समाजस्थितीला योग्य अशा असतात त्यांच्या अंगीं जीवनसामर्थ्य अधिक उत्पन्न होतें व त्यांची जीवनार्थकलहांत इतर मनुष्यांवर सरशी होते. अशा रीतीनें सभोंवतालच्या स्थितीप्रमाणें मनुष्याची सदसद्विचारबुद्धि बनत असते.

वर सांगितलेल्या प्रकारची सदसद्विचारबुद्धि ज्या लोकांत थोडीशी सुधारणा झाली आहे त्यांमध्येंही आढळून येते. कुक म्हणतोः—

"टाहिटी बेटांतील लोक सदसद्विवेकबुद्धीच्या स्फूर्तीनें बरेंवाईट ओळखतात. व इतरांनीं ज्या प्रकारचें वर्तन आपणांशीं केलें असतां ते त्यांना दोष देतील त्या प्रकारचें वर्तन त्यांकडून इतरांशीं घडलें असतां त्यांच्या इच्छेविरुद्ध त्यांचें मन त्यांना खाऊं लागतें."

कित्येक सुधारलेल्या लोकांच्या पूर्वस्थितींतही अशा प्रकारची बुद्धि उत्पन्न झाली होती. प्राचीन हिंदुलोकांच्या पुस्तकांत ह्याबद्दल पुरावा आढळतो. एकदां द्रौपदीला आपल्या सदाचारसंपन्न भर्त्याच्या विपत्तीबद्दल फार वाईट वाटलें त्या प्रसंगाचें वर्णन महाभारतांत दिलें

आहे. असल्या साधुवृत्तीनें वागणाऱ्या मनुष्यावर संकटें आणणारा देव किती अन्यायी असला पाहिजे असें म्हणून ती ईश्वराला दोष लावीत होती. परंतु युधिष्ठिरानें तिला उत्तर दिलें:—

वल्गु चित्रपदं श्लक्ष्णं याज्ञसेनि त्वया वचः ।
उक्तं तच्छ्रुतमस्माभिर्नास्तिक्यं तु प्रभाषसे ॥
नाहं कर्मफलान्वेषी राजपुत्रि चराम्युत ।
ददामि देयमित्येव यजे यष्टव्यमित्युत ॥
अस्तु वात्र फलं मा वा कर्तव्यं पुरुषेण यत् ।
गृहे वा वसता कृष्णे यथाशक्ति करोमि तत् ॥
धर्म एव मनः कृष्णे स्वभावाच्चैव मे धृतम् ।
धर्मवाणिज्यको हीनो जघन्यो धर्मवादिनाम् ॥
न धर्मफलमाप्नोति यो धर्मं दोग्धुमिच्छति ।
यश्चैनं शंकते कृत्वा नास्तिक्यात्पापचेतनः ॥
अतिवादाद्वदाम्येष मा धर्ममभिशंकिथाः ।
धर्माभिशंकी पुरुषस्तिर्यग्गतिपरायणः ॥*

वनपर्व, अ० ३१

---

* हे याज्ञसेनि, तूं जें चांगलें आणि सुकुमार भाषण केलेंस तें मीं ऐकिलें, परंतु तूं नास्तिकपणाचें भाषण करीत आहेस. राजपुत्रि, मी जें कर्म करितों तें त्यापासून मला फल मिळेल ह्या लालचीनें करीत नाहीं. जें देणें योग्य आहे तें मी देतों व जीं यज्ञादिक कर्में कर्तव्य आहेत तीं मी करितों. फल मिळो वा न मिळो, मनुष्याचें जें कर्तव्य आहे तें करण्यासाठीं मी घरीं किंवा वनवासांत असतां माझ्यानें होईल तितका यत्न करीत असतों. माझे सर्व विचार स्वभावतःच कर्तव्याकडे लागलेले आहेत. फलासाठीं धर्माचरण करणारा पुरुष नीच होय. गाईचें जसें दूध काढावें तसें धर्माचरणापासून जो स्वहित मिळवूं इच्छितो त्याला तें मिळत नाहीं. आणि जो पापात्मा धर्माचरण करून नास्तिक-

त्याचप्रमाणें आणखी एका प्राचीन ग्रंथांतही असे विचार आढळतात. पुढील अर्थाचा श्लोक रामायणांत आहे.

" सदाचाराचें वर्तन मनुष्यानें केलेंच पाहिजे. जरी स्वर्ग नसता व ईश्वर नसता तरी देखील सदाचारानें वागणें हें मनुष्याचें कर्तव्य राहिलें असतें. योग्य वर्तन कोणतें तें ओळखून त्याप्रमाणें वागणें हें मनुष्याला अवश्यक आहे "*

' मनःपूतं समाचरेत् ' म्हणून जें एक सुभाषित आहे त्यावरूनही आपल्या लोकांत सदसद्विवेकबुद्धीला बरेंच महत्त्व दिलें होतें असें दिसतें. मनाला जें आचरण शुद्ध वाटतें तें सद्वर्तन व जें अशुद्ध वाटतें तें दुर्वर्तन. वरील सुभाषिताचा विपरीत अर्थ करण्याचा जो प्रघात पडला आहे त्याप्रमाणें मात्र समजतां कामा नये. मनुष्याचें आचरण नेहमींच सदसद्विवेकबुद्धीच्या उपदेशाप्रमाणें होतें असें नाहीं. ही

---

बुद्धीनें शंकित होतो त्यालाही त्याचें फल मिळत नाहीं. तूं कर्तव्यकर्माविषयीं शंकित होऊं नको. ती शंका घेणारा पुरुष पशूच्या जन्मास जातो.

* स्पेन्सर साहेबांनीं आपल्या पुस्तकांत संस्कृत ग्रंथांच्या इंग्लिश भाषांतराचीं जीं पुस्तकें आहेत त्यांतून उतारे घेतले आहेत. त्यांनीं ज्या पुस्तकांतून उतारे घेतले आहेत तीं पुस्तकें येथें व मुंबईसही मिळण्यासारखीं नाहींत असें शोधाअंतीं समजलें. स्पेन्सर साहेबांनीं इंग्लिश वाचकांसाठीं पुस्तकाचें नांव व पृष्ठ हीं दिलीं आहेत, परंतु संस्कृत ग्रंथांच्या नांवापलीकडे कांहीं माहिती दिली नाहीं. तेव्हां संस्कृत ग्रंथांतील मूळ श्लोक काढावयाचा म्हणजे सर्व ग्रंथ चाळीत बसण्यावांचून दुसरा मार्ग नाहीं. ज्या ठिकाणीं धोरणानें मूळ श्लोक सांपडण्यासारखे होते त्या ठिकाणीं ते काढण्याचा प्रयत्न कांहीं विद्वान् मित्रांच्या साह्यानें झालेला आहे. ज्या ठिकाणीं मूळ सांपडलें नाहीं त्याठिकाणीं भाषांतरावरच निर्वाह करणें भाग पडलें.

बुद्धि त्याला चांगलें कोणतें आणि वाईट कोणतें हें सांगते. मनुष्याच्या हातून वाईट काम घडलें तरी आपण वाईट काम करीत आहों हा विचार त्याचे मनांत येत असतो व त्याचें मन त्याला खात असतें.

चिनी लोकांमध्यें सदसद्विवेकबुद्धीला विलक्षण महत्त्व दिलें जातें असें एडकिन्स ह्यानें त्या लोकांविषयीं जी माहिती दिली आहे तीवरून समजतें. तो म्हणतोः—

"त्यांच्यापुढें जर एकाद्या नवीन धर्ममताचें प्रतिपादन केलें तर त्याचें परीक्षण करण्याची त्यांची रीति अगदीं भिन्न आहे. त्यांत सांगितलेल्या गोष्टी नीतीला अनुसरून आहेत कीं नाहींत हें ते पाहतात. त्या धर्मांतील नीति जर त्यांच्या नीतिविचारांच्या कसोटीस उतरली तर ते त्या धर्माचा चांगुलपणा आढेवेढे न घेतां एकदम कबूल करितात. तो धर्म ईश्वरप्रणीत आहे कीं नाहीं व ईश्वरप्रणीत असल्यास त्याबद्दल प्रमाणें काय आहेत ह्या विचारांच्या भानगडींत ते पडत नाहींत. धर्म कसाही उत्पन्न झालेला असो, तो चांगला असला म्हणजे झालें, असें त्यांस वाटतें." दुसऱ्या एका ठिकाणीं कन्फ्यूशिअस ह्याच्या नीतिविचारांविषयीं लिहितांना पापाविषयीं त्यांची कल्पना काय होती तें एडकिन्स ह्यानें सांगितलें आहे. ईश्वराचा हुकूम मोडणें हें पापाचें लक्षण तो करीत नसे. त्याच्या मताप्रमाणें ज्या वर्तनानें आपली योग्यता कमी झाली असें मनुष्याला वाटतें व जें त्याच्या सदसद्विवेकबुद्धीस पसंत पडत नाहीं तें पाप. ह्या ठिकाणीं नेहमीं आढळून येणाऱ्या विचारसरणीचा अगदीं व्युत्क्रम झालेला आढळतो. प्रथमतः आपला

धर्म ईश्वरप्रणीत आहे असें लोकांस वाटतें व त्यामुळें आपल्या धर्मांत जी नीति सांगितली असेल तीच खरी नीति, असा त्यांचा समज होतो. पण ह्या ठिकाणीं धर्मावरून नीतीची पारख न करितां नीतीवरून धर्माची परीक्षा केली आहे. अशा प्रसंगीं नीति ठरविण्याचा मार्ग अर्थात् सदसद्विवेकबुद्धि हाच होय.

अलीकडील सुधारलेल्या लोकांमधल्या ग्रंथकारांमध्येंही मनुष्यांत सदसद्विवेकबुद्धीचें अस्तित्व कबूल करणारे व ह्या बुद्धीलाच नीतीची कसोटी मानणारे लोक आहेत. त्यांचे दोन वर्ग आहेत. पहिल्या वर्गांतील लोकांचें मत वर सांगितलेल्या कन्फ्यूशिअस ह्याच्या मताप्रमाणें आहे. ईश्वराच्या म्हणून मानिलेल्या आज्ञा कशाही असोत, सदसद्विवेकबुद्धीला जें बरें वाटेल तेंच चांगलें. ह्या निकालावर अपील नाहीं असें त्यांस वाटतें. हे लोक आणखीही थोडेसे पुढें जातात व म्हणतात कीं ज्या आज्ञा ईश्वराच्या म्हणून मानिल्या जातात त्या ईश्वरापासून मिळालेल्या आहेत कीं नाहींत हें ओळखण्याला सदसद्विवेकबुद्धि हें एक साधनच आहे. ज्या आज्ञा ह्या बुद्धीच्या कसोटीला उतरतात त्या ईश्वरापासून मिळणें शक्य आहे, परंतु ज्या त्या कसोटीला उतरत नाहींत त्या ईश्वरापासून निघणें असंभवनीय आहे. त्या लोकांप्रमाणें दुसऱ्या वर्गांतील लोक सदसद्विवेकबुद्धीला प्राधान्य देत नाहींत. ते ईश्वराच्या आज्ञांना पहिलें स्थल देऊन त्यांच्या खालच्या पायरीवर सदसद्विवेकबुद्धीला बसवितात. त्यांच्या मताप्रमाणें ह्या बुद्धीचें काम एवढेंच कीं ईश्वराच्या आज्ञांना अनु-

सरून चांगलें कोणतें व वाईट कोणतें हें तिनें मनुष्याला नेहमीं दाखवीत असावें. ह्या दोन वर्गांतील लोकांच्या विचारांमध्यें पुष्कळ साम्य आहे. सदसद्विवेकबुद्धीला जें बऱ्यावाईटाचें ज्ञान होतें तें परिणामांकडे लक्ष्य जाऊन होत नाहीं. असेंच ह्या दोन्ही वर्गांतील लोकांचें मत आहे. ह्या बुद्धीच्या उत्पत्तीविषयींही दोघांचे विचार सारखेच आहेत. ह्यासंबंधानें जरी त्यांनीं प्रत्यक्ष कांहीं म्हटलें नसलें तरी ईश्वरानेंच ती मनुष्यांत उत्पन्न केली आहे असें त्यांस वाटतें. सदसद्विवेकबुद्धि मनुष्यस्वभावाशीं खिळलेली आहे असें त्यांचें मत असल्यामुळें व मनुष्यस्वभाव सर्वत्र सारखाच आहे ह्या सामान्य समजुतीवरही त्यांचा विश्वास असल्यामुळें, बऱ्यावाइटाचे विचारही सर्व मनुष्यांमध्यें सारखेच असले पाहिजेत असें त्यांचें मत असणें स्वाभाविक आहे.

परंतु सदसद्विवेकबुद्धीचा उल्लेख करितांना आरंभीं तिच्या उत्पत्तीविषयीं जें दिग्दर्शन केलें आहे त्यावरून लक्ष्यांत येईल कीं, ह्या बुद्धीच्या अस्तित्वाविषयीं जरी वरील नीतिकारांचे विचार पसंत केले तरी तिच्या उत्पत्तीविषयीं मतभेद होणें शक्य आहे. मनुष्याचे अंगीं बरेंवाईट ओळखण्याचीही विलक्षण शक्ति आहे खरी, पण ती दैवी कारणांनीं उत्पन्न झालेली दिसत नाहीं. मनुष्याला ज्याप्रमाणें ईश्वरानें प्रत्यक्ष घडविलेला नसून तो इतर प्राण्यांपासून उत्क्रमणानें उत्पन्न झाला आहे त्याचप्रमाणें मनुष्यस्वभावाचे घटकही उत्क्रमणानेंच अस्तित्वांत आलेले आहेत. स्थितिभेदाच्या मानानें मनुष्याला निरनिराळ्या प्रकारचें वर्तन करणें भाग पड-

ळें व वर्तनाच्या अनुरोधानें त्याच्या मनावर संस्कार होत जाऊन सदसद्विवेकबुद्धि बनत गेली आहे. उत्पत्तीचा प्रकार मनांत आणिला असतांही बुद्धि परिस्थितीचे मानानें भिन्न असली पाहिजे हें तेव्हांच दिसून येईल. आणि वस्तुस्थितिही तशीच आहे. ' मनुष्यस्वभाव सर्वत्र सारखा आहे ' वगैरे सिद्धांत अंशतः मात्र खरे आहेत. ते सृष्टींतील सर्व मनुष्यांना लागू पडणारे नाहींत. ह्या पुस्तकांत पुढें पृथ्वीवरील नानाविध लोकांच्या विलक्षण समजुतींचीं उदाहरणें दिलीं आहेत त्यांवरून दिसून येईल कीं एकच गोष्ट एका ठिकाणच्या लोकांना चांगली वाटते, दुसऱ्या ठिकाणच्या लोकांना वाईट वाटते व तिसऱ्या ठिकाणचे लोक तीविषयीं उदासीन असतात. तेव्हां निदान एवढें तरी खचित आहे कीं बऱ्यावाईटाचें मनुष्यांना जें सहज ज्ञान होत असतें तें सर्व ठिकाणच्या मनुष्यांमध्यें सारखें नसतें.

सदसद्विवेकबुद्धीनें वर्तनाचा बरेपणा किंवा वाईटपणा ठरविण्याचा जो नीतीचा प्रकार आहे तो बहुतेक उपयोगात्मक नीतीसारखाच आहे. जें वर्तन समाजाच्या हिताचें असेल तें चांगलें व जें अहिताचें असेल तें वाईट असें उपयोगात्मक नीतीचे अनुयायी म्हणतात. आणि त्या त्या सामाजिक स्थितीस योग्य असें जें वर्तन असेल तें चांगलें व अयोग्य असेल तें वाईट असेंच सदसद्विवेकबुद्धीला वाटत असतें, व सामाजिक स्थिति बदलली म्हणजे सदसद्विवेकबुद्धींतही बदल होतो असें तिच्या उत्पत्तीचें कारण पाहिलें असतां दिसून येतें.

ह्यावरून ह्या दोन मतांचा किती मिलाफ आहे हें लक्ष्यांत येईल.

आतां, पूर्वीं एवढावेळपर्यंत जें विवेचन झालें त्याचा थोडक्यांत सारांश दिला असतां बरें पडेल. हा सारांश देतांना पूर्वींचा क्रम व विचारांची दिशा हीं क्वचित् प्रसंगीं बदललीं जातील.

ज्यांच्या अंगीं जीवनसामर्थ्य अधिक असेल त्यांनीं जगावें व ज्यांच्या अंगीं तें जरूरीपेक्षां कमी असेल त्यांनीं मरावें हा सृष्टिक्रम चाललेला आहे. ह्यामुळें प्राण्याच्या सर्व शक्तींचा व्यय सभोंवतालच्या स्थितींत राहण्याची त्याच्या अंगीं योग्यता आणण्याचे कामीं होत असतो. मनुष्यप्राणी ह्या नियमाला अपवाद नाहीं. अनादिकालापासून मनुष्यांची निवड होत गेली असेल. ज्या मनुष्यांच्या कल्पना व समजुती त्यांच्या परिस्थितीला योग्य असतील त्यांचाच जीवनार्थकलहांत निभाव लागला असेल व ज्यांच्या तशा नसतील तीं नाहींशीं होऊन त्यांची जागा त्यांच्यावर सरशी करणाऱ्या लोकांनीं भरून काढिली असेल.

कांहीं विशेष प्रकारच्या स्थितीमुळें उत्पन्न झालेले अपवाद शिवाय करून बाकीच्या रानटी व सुधारलेल्या अशा दोन्ही प्रकारच्या लोकांना आत्मरक्षणासाठीं बाहेरच्या लोकांशीं शत्रुत्वानें वागावें लागे व समाजांतल्या लोकांशीं मित्रभावानें वागणें भाग पडे. असें दोन प्रकारचें वर्तन मनुष्याला करावें लागल्यामुळें दोन प्रकारच्या कल्पना व समजुतीही त्यांजमध्यें उत्पन्न होणें अपरिहार्य झालें.

ज्या ठिकाणीं स्वदेशीय धर्म प्रचलित असतो त्या ठिकाणीं ह्या दोन प्रकारच्या नीतिनियमांमधील विरोध तितका स्पष्टपणें दिसून येत नाहीं. शत्रूंचा नाश करणें व अंतस्थ कलह नाहींसे होतील अशा रीतीचें वर्तन ठेविणें ह्या दोन्ही प्रकारच्या आज्ञा एकाच अधिकृत पुरुषाकडून होत असतात; मग तो अधिकृत पुरुष त्या वेळीं राज्य करणारा राजा असो अथवा ईश्वरांश मानिलेला पूर्वीचा राजा किंवा शास्त्रकार असो. अशा प्रसंगीं नीतिनियम पाळण्याची जी अवश्यकता उत्पन्न होते ती त्यांच्या परिणामाकडे लक्ष्य देऊन होत नाहीं. तर आज्ञापालनाच्या कर्तव्यामुळें होते आणि दोन्ही प्रकारच्या आज्ञांचा उगम एकच असल्यामुळें त्या दोहोंमधील विरोध ढळढळीत रीतीनें लक्ष्यांत येत नाहीं. परंतु ज्या स्वदेशीय धर्मांत शत्रुभावात्मक नीति आणि मित्रभावात्मक नीति ह्या दोहोंचाही उगम एक असून दोहोंचाही अधिकार सारखा मानिला जातो त्याची जागा जर ख्रिस्तीधर्मासारख्या परकी धर्मानें बळकाविली, व त्या आगन्तुक धर्मांत जर मित्रभावात्मक नीतीची मात्र अवश्यकता दर्शविली असून शत्रुभावात्मक नीतीचा तिरस्कार केलेला असला, तर ह्या दोन प्रकारच्या नीतिनियमांतील असंबद्धता अगदीं उघड उघड दिसूं लागते. ख्रिस्तीधर्माचा चोहोंकडे प्रसार झाला तरी राष्ट्राराष्ट्रांतील वैमनस्यें व युद्धें चालूच होतीं व तीं अजूनही चालूच आहेत असें म्हटलें तरी चालेल. अशी स्थिति असल्यामुळें शत्रुनीतीच्या विचारांची अवश्यकता सरली नव्हती. आणि नवीन धर्मांत हे विचार

नसल्यामुळें पूर्वीच्या स्वदेशीय धर्मांतले ह्यासंबंधाचे विचार लोकांच्या मनांत कायम राहिले. पण पूर्वी जो ह्या विचारांना धर्माचा आधार होता तो मात्र मग नाहींसा झाला. कारण लोकांनीं ख्रिस्ती धर्माचा अंगीकार केलेला असल्यामुळें ख्रिस्ती धर्माच्या आज्ञा मात्र धर्मसंमत मानिल्या जाऊं लागल्या. अशा रीतीनें शत्रुनीतीच्या विचारांना जरी धर्माची अनुज्ञा नाहींशी झाली तरी मनुष्याच्या आचरणांत फरक पडला नाहीं. तें परिस्थितीप्रमाणेंच व्हावयाचें. ख्रिस्ती धर्माच्या सूक्ष्म आच्छादनाखालीं लोकांचा पूर्वीचा धर्म कायम राहिला, व ख्रिस्ती धर्म लोकांना जीं कर्तव्यें करावयास सांगतो तीं पूर्वीच्या धर्माला कबूल नाहींत आणि पूर्वीचा धर्म ज्या गोष्टी करावयास सांगतो त्या ख्रिस्ती धर्माला मान्य नाहींत असा गोंधळ मात्र उडून गेला. हल्लीं ख्रिस्ती धर्माचा आणि त्यांत प्रतिपादन केलेल्या नीतीचा पोकळ शब्दांनीं गौरव केला जातो व नव्या धर्मतत्त्वांप्रमाणें वागण्याची अवश्यकता बाह्यतः कबूल केली जाते. पण पूर्वीच्या धर्माचा जरी बाहेरून तिरस्कार केला जातो तरी त्याचा मनुष्याच्या मनावर जो संस्कार झालेला आहे त्यामुळें त्या धर्माच्याच धोरणानें त्याचें आचरण घडत असतें. दोन्ही धर्मांवर त्यांचा विश्वास असतो आणि वेळ पडेल त्याप्रमाणें मनुष्य त्यांचा उपयोग करीत असतो. आतां एकाच्या धोरणानें वागावें व अंमळशानें दुसऱ्याच्या धोरणानें वागावें अशा रीतीनें दोहोंच्या साह्यानें तो आपला मार्ग कसा तरी काढीत असतो, व दोन प्रकारच्या विरोधी विचारांमुळें उत्पन्न हो-

णाऱ्या असंबद्धतेविषयीं डोळेझांक करीत असतो.

नीतिविचारांमध्यें घोंटाळा उत्पन्न होण्याचें हें पहिलें कारण आहे. सामान्य लोकांना धर्म आणि नीति ह्यांमध्यें भेद करितां येत नाहीं. जो आचार प्रचलित धर्माला संमत असेल त्यावांचून दुसरी नीति नाहीं असें त्यांना वाटतें. पूर्वीच्या धर्माज्ञांचाही त्यांच्या मनावर संस्कार असतोच व त्यांप्रमाणें त्यांचे हातून वर्तनही घडत असतें. परंतु ह्या वर्तनाचा नीतीशीं कांहींएक संबंध नाहीं असें त्यांस वाटत असतें. ह्याचा परिणाम असा झाला आहे कीं, सद्गुणांचे आणि कर्तव्यांचे दोन वर्ग झाले आहेत. एका वर्गाचा नीतींत अंतर्भाव झालेला आहे व दुसऱ्याचा नाहीं. आणि ह्या दोहोंमध्यें इतका विरोध आहे कीं, त्यांचा कोणत्याही प्रकारें मेळ बसविणें शक्य नाहीं.

आणखी एक प्रकारचा घोंटाळा आहे तो परस्परविरोधि नीतिशास्त्रांपासून उत्पन्न होणारा नसून नीति कशाला म्हणावें ह्या शंकेपासून उत्पन्न होणारा आहे. ईश्वराच्या आज्ञांवरून नीति न ठरवितां अनुभवानें कळून येणाऱ्या वर्तनाच्या परिणामांवरून ठरविली पाहिजे, असें कित्येक नीतिकारांचें म्हणणें आहे. त्यांच्या मताप्रमाणें मनुष्याचें कल्याण साधणें हा नीतीचा हेतु आहे. ह्या शिवाय घोंटाळ्याचें आणखी एक कारण आहे. कित्येकांना ह्या नीतीच्या कल्पना पसंत नाहींत. मनुष्याला नीतीचा मार्ग दाखविण्यासाठींच सदसद्विवेकबुद्धि अस्तित्वांत आली आहे असें त्यांस वाटतें. नीतिशास्त्रें पाहण्याची किंवा परिणामांकडे लक्ष्य देण्याची

मुळींच अवश्यकता नाहीं; मनुष्यानें सदसद्विवेकबुद्धीचा आश्रय केला म्हणजे झालें. ह्या दोन नीतिकारांच्या मतांत फारसा भेद नाहीं. ज्या मनोवृत्तींच्या धोरणावर सदसद्विवेकबुद्धि जात असते त्यांची पहिल्या प्रकारचे नीतिकार मुळींच किंमत करीत नाहींत व दुसऱ्या प्रकारच्या नीतिकारांची त्यांजवरच सर्व भिस्त असते; तथापि दोहोंपासून कार्य एकच होतें. पहिल्या प्रकारचे नीतिकार उपयुक्ततेकडेच लक्ष्य देतात व दुसऱ्या प्रकारचे सदसद्विवेकबुद्धीकडे देतात; पण सृष्टिक्रमामुळेंच सदसद्विवेकबुद्धि उपयुक्ततेवर अवलंबून असते.

नीतिविचारांच्या अशा घोंटाळ्यांतून बाहेर तरी कसें पडावें ह्याचीच मोठी पंचाईत आहे. लोकांचीं बाहेर मिरविण्याचीं मतें काय आहेत त्यांचा विचार न करितां प्रथमतः वर्तनाविषयीं लोकांच्या खऱ्या खऱ्या कल्पना काय आहेत त्या पाहूं. असें करणें किती उपयोगाचें आहे तें पुढें समजेलच व त्यावरून असें दिसून येईल कीं, एवढावेळपर्यंत जो घोंटाळा दाखविण्यांत आला तो कांहींच नव्हे.

# प्रकरण २

## कोणत्या कल्पना व समजुती नीति-विषयक समजाव्या ?

मागील प्रकरणांत नीतीचे जे मित्रभावात्मकनीति आणि शत्रुभावात्मकनीति असे दोन भाग केले आहेत ते पुष्कळांस रुचणार नाहींत. लहानपणापासून धर्मशिक्षणामुळें व सामान्यलोकमतामुळें कांहीं विशेष गोष्टींचा मात्र नीतीशीं संबंध आहे असा मनुष्याचा ग्रह झालेला असतो व त्याव्यतिरिक्त सर्व गोष्टी त्यांना निराळ्या प्रकारच्या वाटतात. उदाहरणार्थ ख्रिस्तीलोक घ्या. बायबलांत ज्या दहा आज्ञा दिल्या आहेत त्यांत सर्व नीतीचा समावेश झाला आहे व त्यांबाहेर नीति म्हणून नाहीं अशी साधारण लोकांची समजूत असते. ह्या देवाच्या दहा आज्ञांचा संबंध एका समाजांतील लोकांनीं परस्परांशीं कसें वागावें ह्या गोष्टीकडे असून एका समाजानें दुसऱ्या समाजाशीं कसें वागावें ह्याबद्दल त्यांत मुळींच उल्लेख नाहीं. ह्यामुळें मागील प्रकरणांत जिला मित्रभावात्मकनीति म्हणून म्हटलें आहे तीच कायती नीति अशी लोकांची समजूत झालेली आहे. मित्रभावात्मक व शत्रुभावात्मक असे नीतीचे दोन विभाग करणें व शत्रुभावात्मक नीतींत ज्या गोष्टींचा समावेश होतो त्यांस नीतीचे सदरांत घालणें हें लोकांना कसेंसेंच वाटतें.

तथापि टोळ्यांटोळ्यांमध्यें व राष्ट्राराष्ट्रांमध्यें लढाया

चालविणें व त्यांसाठीं जरूर त्या गोष्टी करणें ह्यांतही बऱ्यावाइटाची व योग्य--अयोग्याची निवडानिवड मनुष्य करीत असतात ही गोष्ट कोणाच्याही लक्ष्यांत येण्यासारखी आहे. मनुष्याच्या नेहमींच्या व्यवहारांतील सामाजिक वर्तनावर ज्याप्रमाणें लोक टीका करितात व त्यांच्या समजुतींप्रमाणें तें चांगलें किंवा वाईट, योग्य किंवा अयोग्य हें ठरवितात; त्याचप्रमाणें लढाईत एकाद्या मनुष्यानें कांहीं विशेष प्रकारचें वर्तन केल्यास त्याबद्दलही ते तशीच चर्चा करितात व तें वर्तन योग्य किंवा अयोग्य वाटेल त्याप्रमाणें त्याची निंदा किंवा स्तुति करितात. तर मग एका प्रकारच्या योग्य किंवा अयोग्य वर्तनाचा विचार नीतीनें करावयाचा व दुसऱ्या प्रकारच्या वर्तनाचा करावयाचा नाहीं असें म्हणावयाचें कीं काय? बरें, तसें म्हणावयाचें असल्यास हें दुसऱ्या प्रकारचें वर्तन योग्य कीं अयोग्य हें ठरविण्याचें काम कोणत्या शास्त्रावर सोंपवावयाचें? एकंदरींत मनुष्याच्या वर्तनासंबंधानें लोकांच्या कल्पना इतक्या अव्यवस्थित आहेत कीं, एका प्रकारच्या वर्तनाला नीतीचा स्पष्ट आधार आहे असें मानिलें जातें व त्याच जातीच्या दुसऱ्या प्रकारच्या वर्तनाला तो नाहीं असें मानिलें जातें. तथापि त्या दुसऱ्या प्रकारच्या वर्तनालाही तितकाच किंवा त्याहूनही बळकट आधार असतो.

ह्या दोन भिन्न स्वरूपांच्या आधारांचें अस्तित्व, ख्रिस्तीधर्माच्या आज्ञा व द्वंद्वयुद्धें* करणाऱ्या लोकांचे

* आमच्या लोकांना युरोपियन लोकांमधील द्वंद्वयुद्धांची

नियम ह्यांचे मनुष्याच्या वर्तनावरील परिणाम पाहिले असतां, स्पष्ट रीतीनें ध्यानांत येईल. कांहीं विशेष प्र-

---

खरी कल्पना होणें कठिण आहे. ह्यासाठीं त्यांबद्दल थोडी वि-स्तारपूर्वक माहिती देणें जरूर आहे. अलीकडे दोन-अडीचशें वर्षे द्वंद्वयुद्धाला जें स्वरूप आहे तें पूर्वी नव्हतें. पूर्वी दोन मनु-ष्यांमध्यें जर कांहीं तंटा उपस्थित झाला तर त्याचा निर्णय क-रण्यासाठीं सरकारी अधिकाऱ्यांच्या देखरेखीखालीं वादीप्र-तिवादींमध्यें द्वंद्व होत असे व त्याच्या निकालावर वादाचा नि-काल अवलंबून असे. अशा प्रसंगीं सत्यपक्षाच्या बाजूनें लढणा-ऱ्या मनुष्याला ईश्वर सामर्थ्य देतो आणि नेहमीं त्याचाच जय होतो असें सर्वांस वाटत असे. इसवी सन ५०१ ह्या वर्षी बर्ग-डी येथील राजानें ह्या संबंधाचा कायदा पहिल्यानें अमलांत आ-णिला. जर्मनी देशांतील पूर्वीच्या कायद्यांत पुढील शब्द आहेतः— "जर दोन मनुष्यांमध्यें जमिनीबद्दल किंवा पैशाबद्दल कांहीं वा-द उपस्थित झाला, तर वादीप्रतिवादींनीं आपापल्या तर्फेचा ए-केक मनुष्य द्यावा व त्यांच्या मल्लयुद्धाचा जसा निकाल होईल त्याप्रमाणें वादाचा निकाल करावा." जर्मनींतून हे कायदे फ्रा-न्सांत गेले व तेथून इंग्लंदांत गेले. बहुतकरून वादीप्रतिवादी स्वतःच द्वंद्व करीत, परंतु म्हातारे लोक, पाद्री, बायका व कांहीं बडेलोक आपले मुखत्यार देत असत. इसवी सन १३८५ त फ्रा-न्स देशांत एक गमतीचा खटला झाला व त्यामुळें अशा प्रसंगीं ईश्वर सत्यपक्षास मदत करितो ही लोकांची वेडगळ समजूत बरीच कमी होऊं लागली. जीन क्यारोग नांवाच्या मनुष्याच्या बायकोनें जाकें लेग्रीस नांवाच्या मनुष्यावर असा आरोप आणिला कीं त्यानें रात्रीं नवऱ्याच्या वेषानें आपल्या खोलींत शिरून आपणाशीं अनीतीचें आचरण केलें. द्वंद्वयुद्धानें ह्या वादाचा नि-काल करावा म्हणून पार्लमेंटानें ठराव केला. हें युद्ध तेथील रा-जा सहावा चार्लस ह्याच्या देखरेखीखालीं झालें. त्यांत लेग्रीस ह्याचा पराभव होऊन त्याला त्याच जाग्यावर फांशीं दिलें. पुढें कांहीं काळानें खरा गुन्हेगार सांपडला व त्यानें आपला गुन्हा कबूल केला. इंग्लंदांत ही न्यायाची पद्धति इतर देशांइतकी रूढ झाली नाहीं. तथापि तेथेंही ती पुष्कळ वर्षेपर्यंत चालली हो-ती. इसवी सन १८१७ त एका खुनाच्या खटल्यांत आरोपीनें

संगीं सभ्य मनुष्यानें दुसऱ्याला द्वंद्वयुद्धासाठीं हटकलें-
द्वंद्वानें निकाल व्हावा म्हणून विनंति केली. त्या संबंधानें लार्ड एलन्बरो म्हणाला:—'आमच्या देशाचा असा कायदा आहे कीं, द्वंद्वयुद्धानें वादाचा निकाल करण्याविषयीं पक्षकारानें जर विनंति केली तर दुसऱ्या पक्षकाराकडून कायदेशीर हरकत आल्यावांचून ती विनंति अमान्य करितां येत नाहीं." सरतेशेवटीं ही विनंति मान्य झाली परंतु फिर्यादीच्या तर्फेनें लढणारा मनुष्य पुढें न आल्यामुळें आरोपी सुटून गेला. पुढल्याच वर्षीं हा कायदा बंद केला.

अलीकडल्या काळांत आढळून येणारा द्वंद्वाचा प्रकार आतां सांगितलेल्या प्रकारापासूनच उत्पन्न झाला. दोन मनुष्यांमध्यें वाद उपस्थित झाला असला तर द्वंद्वानें त्याचा निकाल होतांना 'ईश्वर सत्यपक्षाला मदत करितो' ही कल्पना लोकांच्या डोक्यांत होतीच. त्यामुळें एकाला दुसऱ्यानें शिव्या दिल्या किंवा लागण्यासारखें कांहीं म्हटलें कीं लागलेच ते न्यायाच्या कोर्टांत न जातां आपसांतच युद्धानें निकाल करीत, व कोण खरा हें ठरवीत. हा प्रकार वाढतां वाढतां इतका वाढला कीं, जर एकानें दुसऱ्याचा अपमान केला व तो त्यानें निमूटपणीं सहन केला तर तो मनुष्य खरोखरच नीच असें लोकांना वाटे, व पुष्कळ लोकांना केवळ लोकापवादासाठीं द्वंद्वयुद्धास तयार व्हावें लागे. ह्या युद्धांत शस्त्रांचा उपयोग करण्याची परवानगी असल्यामुळें अनेक प्रसंगीं असल्या द्वंद्वांचेवेळीं खून झालेले आहेत. इसवी सन १८४३ त कर्नल फासेट आणि लेफ्टेनेंट मनरो ह्यांजमध्यें अशा प्रकारचें युद्ध होऊन फासेट ह्याला गोळी लागून तो मेला. त्यावेळीं व्हिक्टोरिया राणीचे भ्रतार प्रिन्स आल्बर्ट ह्यांनीं द्वंद्वयुद्धें बंद व्हावीं अशाविषयीं बरीच खटपट केली. तीमुळें द्वंद्वयुद्धें करणें किंवा तीं करण्यास मदत करणें हा गुन्हा समजला जावा अशाविषयीं कायदा करण्यांत आला. इतर देशांतून हा प्रघात अजून बराच चालू आहे. गेल्या शतकांतील पुष्कळच मोठेमोठे लोक द्वंद्वयुद्धें लढलेले आहेत. फाक्स आणि पिट् हीं नांवें इंग्लंडच्या इतिहासांत प्रसिद्ध आहेत. हे व ह्यांच्या योग्यतेचे दुसरे लोक असल्या कामांत पडत.

च पाहिजे व ज्या मनुष्याला अशा रीतीनें हटकलें असेल त्यानेंही लागलीच आपली कबूली दर्शविली पाहिजे असा सर्व यूरोपखंडभर अनेक शतकेंपर्यंत समज होता व त्याच्या अर्ध्याहून अधिक भागांत तो अजूनही आहे. कोणाचें कर्ज काढिलें असतां तें फेडण्याच्या कर्तव्यापेक्षां वरील कर्तव्याचें महत्त्व अधिक समजलें जातें. एकवेळ मनुष्य खोटें बोलला तरी पतकरेल, पण अशा प्रसंगीं त्याच्या हातून लज्जास्पद वर्तन घडतां कामा नये. कोणाचा कोणीं अपमान केला असेल तर ज्याचा अपमान झाला असेल त्याचें पहिलें कर्तव्य म्हटलें म्हणजे त्यानें आपणावरचा कलंक लागलाच काढून टाकिला पाहिजे. आणि हा काढावयाचा कसा, तर ज्यानें अपमान केला असेल त्याला द्वंद्वयुद्धासाठीं आव्हान करून. आणि असें तो न करील तर त्याचें वर्तन इतकें निंद्य समजलें जातें कीं, त्याचे मित्र त्याला हलकट समजून त्याची संगति सोडून देतात; जणों काय त्यानें चोरी किंवा तिच्यापेक्षांही एकादें नीच कृत्य केलें आहे! नीतिविषयक म्हणून मानिलेल्या गोष्टींच्या संबंधानें योग्य व अयोग्य ह्या कल्पना व त्यांमुळें उत्पन्न होणाऱ्या पसंती व नापसंती दर्शविणाऱ्या मनोवृत्ति व समजुती ह्या जितक्या स्पष्ट व जोरदार असूं शकतील तितक्या स्पष्ट व जोरदार कल्पना, मनोवृत्ति व समजुती द्वंद्वयुद्धाच्या प्रघातांत आहेत ह्यांत बिलकूल संशय नाहीं. असें असतां एका गोष्टीचा नीतिशास्त्रांत अंतर्भाव करावयाचा व दुसरीचा करावयाचा नाहीं असें करून कसें चालेल?

हल्लींची नीतीची कल्पना विस्तृत केली पाहिजे हें येथवरील विवेचनावरून सहज लक्ष्यांत येईल.मनुष्याच्या वर्तनासंबंधानें अशा अनेक गोष्टी आहेत कीं, त्यांविषयींच्या कल्पना व समजुती 'नीति' म्हणून मानिलेल्या गोष्टींच्या कल्पनांहून व समजुतींहून स्वभावतः भिन्न नाहींत. तेव्हां शास्त्रीय दृष्टीनें अशा सर्व गोष्टींचा नीतींत अंतर्भाव करावा लागेल.

रानटी व अर्धवट सुधारलेल्या लोकांमध्यें रूढीनें ठरलेल्या कर्तव्यांत यत्किंचित्‌ही कसूर करून चालत नाहीं. हीं कर्तव्यें केलींच पाहिजेत असा सार्वत्रिक समज व्यक्त करण्याचे फारसे प्रसंगच येत नाहींत; कारण त्यांच्या विरुद्ध वर्तन केल्याचीं उदाहरणेंच बहुधा आढळून येत नाहींत. परंतु कोणीं रूढीविरुद्ध वर्तन केल्यास तें लोकांस किती दुःसह होतें हें कधींकधीं अशा अपराधासाठीं राजाला सुद्धां गादीवरून काढण्यास किंवा प्रसंगीं त्याला देहान्तशिक्षा देण्यासही लोक तयार होतात ह्यावरून स्पष्ट दिसतें. रूढीविरुद्ध वर्तन करणें अयोग्य समजलें जातें हें सिद्ध करण्यास आणखी पुराव्याची जरूर नाहीं.ज्यांचा नीतीशीं कांहींएक संबंध नाहीं असें आपणांस वाटतें अशा रूढीचाही नीतींत अंतर्भाव केलेला पुष्कळ ठिकाणीं आढळून येतो, व कित्येक रूढी तर धडधडीत अनीतिकारक असूनही त्या नीतिकारक समजल्या जातात.

नीतीचीं मुख्य अंगें कोणतीं आहेत हें शोधून पाहण्यासाठीं अनेक लोकांच्या नीतिविषयक समजुती कशा आहेत हें उदाहरणें घेऊन पाहिलें पाहिजे. मुसलमान लो-

कांच्या कित्येक जाति आहेत त्यांत तंबाकू ओढण्या इतकें दुसरें कोणतेंही घोर पातक नाहीं असें समजतात. पालग्रेव्हच्या लेखावरून असें समजतें कीं, प्राण्याला ईश्वर समजून त्याची पूजा करणें हें वहाबी लोकांत अत्यंत मोठें पातक मानिलें जातें. ते तंबाकू ओढणें हें त्याच्या खालोखाल पातक मानितात. ह्या पापांशीं तुलना केली असतां खून, व्यभिचार व खोटी साक्ष देणें हीं त्या लोकांना क्षुल्लक पातकें वाटतात. त्याचप्रमाणें सैबीरियाच्या आसपास राहणाऱ्या रशियन् लोकांच्या कित्येक जाति आहेत त्यांत तंबाकू ओढणें हें महापातक समजलें जातें व इतर पातकांपेक्षां ह्या पातकाचा घोरपणा व्यक्त करणारी त्यांची अशी समजूत आहे कीं, ह्या पातकाची क्षमा म्हणून होण्याचा संभव नाहीं. “ पश्चात्तापानें इतर पातकांचें क्षालन होऊं शकेल परंतु ह्या पापाचें मार्जन व्हावयाचें नाहीं. ” जें आचरण आपणांला अगदीं निरुपद्रवी असें वाटतें व ज्याविषयीं आपण अगदीं उदासीन असतों त्याबद्दल वरील उदाहरणांत दर्शविल्याप्रमाणें कित्येकांना जो तिटकारा वाटतो तो घोर अपराधांबद्दल आपणांस ज्या प्रकाराचा तिटकारा वाटतो त्याच जातीचा आहे.

लिव्हिंग्स्टोन नांवाचा प्रवासी लिहितो कीं आफ्रिकाखंडातल्या बेचुआना प्रदेशांतील एका प्रांताचा राजा मुलीहवंग ह्याला जेव्हां युरोपियनलोकांमध्यें पुरुषाला एकाहून अधिक बायका करण्याची परवानगी नसते असें समजलें तेव्हां तो आश्चर्यानें म्हणाला:—“ सर्वंथं राष्ट्रांचीं राष्ट्रें असल्या विलक्षण कायद्यांपुढें कशी

मान वांकवितात ह्याची मला कल्पना करवत नाहीं." एक ग्रीकधर्माचा अनुयायी आरब व त्याचे मित्र ह्यांनाही इंग्लिश लोकांमध्यें लग्नाची एक बायको जिवंत असतां दुसरी करण्याला प्रतिबंध असतो हें समजल्यावर मोठें आश्चर्य वाटलें. पहिल्यानें त्यांना ती गोष्ट खरीच वाटेना. ती ऐकिल्याबरोबर ते तिरस्कारयुक्त मुद्रेनें म्हणाले:—" असें असणें अशक्य आहे. पुरुषाची एका बायकोनें तृप्ति व्हावी तरी कशी ? " पुरुषांच्याच समजुती अशा प्रकारच्या असतात असें नाहीं. झांबिझीच्या कांठीं राहणारे माकोलोलो म्हणून लोक आहेत त्यांच्या बायकांविषयीं लिव्हिंग्स्टन् म्हणतो कीं, इंग्लंडांत प्रत्येक पुरुषाला एकेकच बायको असते हें ऐकून त्या चकित झाल्या. त्यांच्या समजुतीप्रमाणें एक बायको असणें हें सभ्य मनुष्याला शोभत नाहीं. रीड नांवाचा प्रवासी आफ्रिकाखंडांतील भूमध्यवृत्ताच्या जवळील प्रदेशांतल्या बायकांच्या संबंधानें लिहितो:— " आपल्या नवऱ्याला दुसरी बायको करण्याची ऐपत आहे असें जर एकाद्या मनुष्याच्या बायकोला वाटलें तर ती त्याला दुसरें लग्न करण्यासाठीं अगदीं मनापासून आग्रह करिते; आणि जर त्यानें तिचें ऐकिलें नाहीं तर ती त्याला 'कृपण','कवडीचुंबक' इत्यादि दूषणें देते."

आराकान येथील स्त्रियांच्या समजुती अशाच प्रकारच्या आहेत. पहिल्या बायकोला दुसऱ्या बायकोविषयीं कोणत्याही प्रकारचें असमाधान किंवा मत्सर वाटत नाहीं. उलट आपल्या नवऱ्यानें दुसरें लग्न करावें अशी पहिल्या बायकोची इच्छा असते. कारण

घरांतील कामाकाजाला व नवऱ्याला पोसण्यासाठीं मेहनत करण्याला आपणाला एक मदतनीस मिळाला असें तिला वाटतें. इंग्लंडांत दोन बायका करणें म्हणजे अनीति आहे असें समजलें जातें एवढेंच नव्हे तर कायद्याच्या दृष्टीनें तो एक शिक्षेस पात्र असा गुन्हा मानिला जातो. परंतु वर सांगितलेल्या उदाहरणांत एकच बायको करणें हें कमी प्रतीचें समजलें जाऊन अधिक बायका न करणारांची प्रसंगीं निंदा केली जाते. ह्यावरून एकपत्नीकत्वाची चाल त्या लोकांस पसंत नाहीं असें स्पष्ट दिसतें.

पुष्कळ ठिकाणीं स्त्रीपुरुषांमधील संबंधाविषयींच्या समजुती आपल्या समजुतीपेक्षां फार भिन्न आढळतात. प्रवासवर्णनाच्या पुस्तकांवरून कित्येक वाचकांस ही गोष्ट माहीत झालेली असेल कीं, पुष्कळ रानटी लोकांमध्यें आपल्या घरीं कोणी पाहुणा आला असतां रात्रीं त्याच्याकडे आपली बायको किंवा मुलगी पाठवून देणें ही सभ्यपणाच्या पाणहुचाराची रीति समजतात. अशा लोकांच्या राजाला जरी एकाद्या पाहुण्याचा आदरसत्कार करावयाचा असला तरी तो देखील तसेंच वर्तन करितो. अनेक युरोपियन प्रवाशांचा रानटी लोकांच्या कित्येक राजांनीं व सरदारांनीं अशा रीतीचा पाहुणचार केलेला आहे. कित्येक ठिकाणीं ह्याहून थोडासा निराळा प्रकार आढळतो. चिनूक लोकांविषयीं असें लिहिलें आहे कीं:—

"ह्या लोकांच्या सर्व जातींमध्यें मासे मारण्याचे आंकडे, मण्यांच्या माळा किंवा असेच दुसरे कांहीं पदार्थ एकाद्या मनुष्याजवळून घेऊन त्यांच्या मोबदला

आपली बायको किंवा मुलगी त्याजकडे पाठविण्याची चाल आहे. कोणी आपल्या जिनसांबद्दल अशा प्रकारचा मोबदला घेण्यास नाकबूल होणें म्हणजे त्या स्त्रीच्या सौंदर्याबद्दल शंका घेणें होय असें त्यांस वाटतें. ह्यामुळें त्यांना अशा प्रसंगीं फार राग येतो. इंडियन-लोकांना कडकपणानें वागविण्याचे आह्मांस अनेक प्रसंग येत; परंतु त्यांच्या स्त्रिया त्यांनीं आह्मांकडे पाठविल्या असतां आह्मीं त्यांना परत पाठविलें म्हणजे त्या स्त्रीपुरुषांस जितकी चीड येई तितकी दुसऱ्या कशानें-ही येत नसे. ”

एशिया खंडांतील कित्येक लोकांच्या समजुती ह्याच्याही पलीकडे गेल्या आहेत. अर्मन नांवाचा प्रवासी लिहितोः—

“ चुक्ची लोक त्यांच्या देशांत जे प्रवासी जातात त्यांजकडे आपल्या बायका पाठवितात व आपल्या मुलींशीं लग्नें करण्याविषयीं त्यांना विनंति करितात; आणि ही त्यांची विनंति जर त्यांनीं अमान्य केली तर त्यांना विलक्षण प्रकारचा संताप येतो. ”

ह्या सर्व उदाहरणांवरून असें स्पष्ट होतें कीं, ज्या गोष्टी आपणांस अत्यंत निंद्य वाटतात त्यांबद्दल त्यांस लाज वाटत नाहीं एवढेंच नव्हे, परंतु जो मनुष्य त्या करण्याचें नाकबूल करील त्याबद्दल त्यांचे मनांत तिटकारा उत्पन्न होतो. कारण त्या न करणें हें अयोग्य असें त्यांना वाटतें.

आतां स्त्रीपुरुषांमधील संबंधाविषयीं कित्येक मध्यमावस्थेंतील लोकांच्या समजुतींत व सुधारलेल्या लोकांच्या

समजुतींत आणखी एक निराळ्या प्रकारचा फरक दिसून येतो तो पाहूं. निरनिराळ्या जातींच्या किंवा निरनिराळ्या पायऱ्यांवरच्या लोकांनीं परस्परांमध्यें शरीरसंबंध करूं नयेत अशा प्रकारच्या वहिवाटी किंवा नियम फार प्राचीनकाळापासून आढळून येतात. हे नियम मोडणारांना शिक्षाही फार कडक होत असत, व ज्याठिकाणीं अजूनही त्या नियमांचें महत्त्व आहे त्याठिकाणीं त्या अजूनही होतात. महाभारतांत द्रौपदी-स्वयंवराचे वर्णनांत, ज्यावेळीं द्रौपदीनें महत्त्वाकांक्षी कर्णाचा धिक्कार केला त्या प्रसंगीं तिचे तोंडांत "मी त्या नीचकुलोत्पन्न* मनुष्यास वरणार नाहीं." अशा अर्थाचे शब्द घातले आहेत. भिन्नजातीय लोकांमध्यें विवाहादि संबंधाच्या प्रतिबंधाविषयीं आमच्या लोकांच्या हल्लींच्या कल्पना आमच्या मध्यमावस्थेंतील पूर्वजांच्या कल्पनांहूनही मागसलेल्या आहेत. हल्लीं एकाद्या ब्राह्मणानें क्षत्रिय, वैश्य किंवा शूद्र स्त्रीशीं विवाह केला असतां त्याचा जितका छल होईल तितका पूर्वीं झाला नसता. पूर्वीं देखील अशा प्रकारचे विवाह गौणच समजले जात, परंतु अगदींच शास्त्रविरुद्ध समजले जात नसत; व अशा संबंधांपासून होणाऱ्या संततीचे दायविभाग वगैरे ठरलेले असत. हल्लीं अशा प्रकारचे

---

* आदिपर्वाच्या १३७ व्या अध्यायांत पुढील श्लोक आहेः— दृष्ट्वा तु तं द्रौपदी वाक्यमुच्चैर्जगाद नाहं वरयामि सूतम् । सामर्षहासं प्रसमीक्ष्य सूर्यं तत्याज कर्णः स्फुरितं धनुस्तत् ॥ मूळ श्लोकांत जरी नीचकुलोत्पन्नत्वाचा स्पष्ट उल्लेख नाहीं, तरी टीकेंत 'नीचकुलयोगादमर्षः' असें म्हटलें आहे.

विवाह अत्यंत अनीतिकारक समजले जातात. यूरोपां-
तही अशा प्रकारचे प्रतिबंध असत व ते मोडणारांना
शिक्षाही भोगाव्या लागत. फ्यूडल सिस्टिमच्या वेळेस
फ्रान्स देशांत जो सरदार आपल्या खालच्या पदवीच्या
घराण्यांतील स्त्रीशीं लग्न करी त्याचा व त्याच्या वं-
शजांचा दांडपट्याचे खेळांत प्रवेश होत नसे. पण पांच
शतकांपूर्वी अशा प्रकारच्या संबंधांविषयीं जो तिटकारा
उत्पन्न होत असे तसा हल्लीं होत नाहीं. कित्येक प्र-
संगीं जरी थोडीशी नापसंती दर्शविली जाते, तरी दुस-
ऱ्या कांहीं प्रसंगीं अशा संबंधाची वाखाणणीही केली
जाते. टेनिसन्चें मिलर्स डॉटर (दळणाऱ्याची मुलगी)म्ह-
णून एक काव्य आहे तें व ब्राउनिंगबाईची लेडी जर-
ल्डाईन हिचें विवाहवृत्त म्हणून एक कादंबरी आहे ती;
हीं पुस्तकें फारच लोकप्रिय झालीं आहेत. ह्या पुस्त-
कांत उच्चनीच मानिलेल्या कुळांतील मनुष्यांच्या विवा-
हांचेंच वर्णन आहे. अशा प्रकारच्या संबंधांविषयीं युरो-
पियन लोकांत हल्लीं ज्या मनोवृत्ति उत्पन्न होतात त्या
जरी नीतिविषयक गोष्टींबद्दल उत्पन्न होणाऱ्या मनो-
वृत्तींसारख्याच असतात,तरी त्या नीतिविषयक समजल्या
जात नाहींत. कारण ह्यासंबंधानें कोणत्याही प्रकारची
धर्माज्ञा नाहीं व ज्या गोष्टींना लोक 'नीति' म्हणून
समजतात त्यांत ह्या गोष्टीचा समावेश होत नाहीं. ए-
काद्या श्रीमंत व प्रतिष्ठित ब्राह्मणानें जर एकाद्या द-
रिद्री ब्राह्मणाच्या मुलीशीं लग्न लाविलें तर आपल्या
लोकांत त्या मनुष्याविषयीं ज्या प्रकारची तिरस्कारबु-
द्धि उत्पन्न होईल त्याच प्रकारची वर सांगितलेल्या

संबंधांत युरोपियन लोकांमध्यें होते. आमचे लोकही अशा प्रकारच्या तिरस्कारबुद्धीचा संबंध नीतीशीं लाविणार नाहींत. वास्तविक पाहिलें असतां अनीति म्हणून समजल्या जाणाऱ्या गोष्टींविषयींचा तिटकारा व अशा प्रकारचा तिटकारा ह्या दोहोंच्या स्वरूपांत भेद नाहीं.

आतां स्त्रीपुरुषांतील श्रमविभागासंबंधानें कित्येक लोकांचे विचार पाहूं. उत्तर व दक्षिण अमेरिकेंतील इंडियन लोकांत लढाईच्या व पारधीच्या संबंधाचीं मात्र कामें पुरुष करितात. बाकीचीं सर्व प्रकारचीं हलकीं व श्रमाचीं कामें बायकांनाच करावीं लागतात. ह्या चालींचा त्यांच्या मनावर विलक्षण प्रकारचा अंमल बसला आहे व त्यांचें यत्किंचित्‌ही उल्लंघन करणें अगदीं नीचपणाचें कृत्य समजलें जातें. पाटागोनिया येथील लोकांच्या संबंधानें फाकनर म्हणतोः—

"स्त्रियांचीं कर्तव्यें त्यांनींच केलीं पाहिजेत ह्या विषयींचा नियम इतका कडक आहे कीं, कोणत्याही प्रसंगीं नवऱ्यांनीं त्यांना मदत करण्याची सोय नसते. आणि अगदीं जीवावरच्या प्रसंगीं कोणीं केलीच तर त्याची अगदीं नाचक्की झाल्यावांचून राहत नाहीं.

आणि ह्या चाली तेथील बायकांनासुद्धां पसंत झालेल्या आहेत. पुढील उतारा डकोट लोकांच्या संबंधानें आहे.

"भांडखोर बायका भांडतां भांडतां अगदीं निकरावर आल्या म्हणजे त्या एकमेकींना अगदीं काळजाला वर्मीं पाडणाऱ्या ज्या शिव्या देतात त्या ह्या संबंधाच्या असतात. हा मासला पहाः—'निर्लज्जे, मीं तुझ्या नवऱ्याला परसा पेटविण्याकरितां सरपण घरांत नेतांना पा-

हिलें आहे. तुझ्या नवऱ्याला बायको व्हावें लागलें त्या वेळीं तूं कोठें होतीस?' "

ह्या गोष्टींविषयीं इतकी तिरस्कारबुद्धि उत्पन्न होण्याला त्यांचे मनांत फारच प्रबल मनोवृत्ति उत्पन्न होत असल्या पाहिजेत हें उघड आहे. आतां आणखी उदाहरणें घेऊं. ज्यांच्या भारानें पाठीचा कणा मोडून जाईल असे घराच्या कामीं लावावयाचे मजबूत चिरे एस्किमो लोकांच्या बायका वाहून नेत असतात, व मनांत कोणत्याही रीतीचे दयेचे विकार उत्पन्न न होतां पुरुष त्यांजकडे प्रशांत मुद्रेनें पाहत असतात. अशा प्रकारचें वर्तन जर सुधारलेल्या लोकांमधील पुरुषांच्या हातून होईल तर तें फारच तिरस्करणीय समजलें जाईल. ह्या गोष्टींच्या संबंधानें धर्माच्या किंवा मानीव नीतीच्या कांहीं आज्ञा नसल्यामुळें सुधारलेल्या व रानटी लोकांत एकाच प्रकारच्या वर्तनाविषयीं जे अगदीं विरुद्ध प्रकारचे मनोविकार उत्पन्न होतात ते केवल रूढिभेदामुळें उत्पन्न होतात असें म्हटलें पाहिजे.

नीति म्हणून मानिलेल्या गोष्टी व ज्यांचा नीतींत समावेश होत नाहीं अशा गोष्टी ह्या दोहोंमुळें उत्पन्न होणाऱ्या मनोवृत्ति व समजुती ह्यांमधील सारखेपणा दर्शविण्यासाठीं आणखी कांहीं उदाहरणें घेऊं. आतां विशेष टीका करीत न बसतां उतारे मात्र दिले असतां बरें पडेल.

" काफरलोक शेजारच्या हाटेंटाट, बुशमेन् वगैरे लोकांमध्यें सुंता करण्याची चाल नाहीं म्हणून त्यांचा तिरस्कार करितात. आणि ह्या कारणामुळें ते त्यांच्या

शेजारीं वसत नाहींत व त्यांच्याशीं अन्नव्यवहार करीत नाहींत."

"एक मायोरून जातीचा मनुष्य ख्रिस्ती झाला होता त्याला मरतांना अतिशय वाईट वाटलें. कारण ख्रिस्ती झाल्यामुळें आपले इष्टमित्र आपल्या शरीराचा खाण्याच्या कामीं उपयोग करणार नाहींत व तें किड्यांच्या भक्षस्थानीं पडेल हें त्यास पक्कें माहीत होतें."

"वाम्बारा लोकाच्या परटिणी साफ नागव्या होत्या, तथापि आमच्या लमाणांतील लोक त्यांजकडे पाहत असतांही त्यांनीं लाजल्याचें कांहींएक चिन्ह दर्शविलें नाहीं."

वाकाविरांडो म्हणून लोक आहेत त्यांच्या संबंधानें टामसन् ह्यांनें अशीच हकीकत लिहिली आहे. तो म्हणतो कीं असें असलें तरी त्या बायका विनयशील व नीतिमान् आहेत. "कपड्यांचा नीतीशीं कांहींएक संबंध नाहीं. ह्या प्रांतांतील सर्व लोकांमध्यें हेच अधिक नीतिमान् आहेत. आणि सभ्य रीतीनें चालणाऱ्या मसाई लोकांशीं तुलना केली असतां तर हे लोक केवळ नीतीचे पुतळे आहेत असें म्हणण्यास हरकत नाहीं."

पेटेरिक् नांवाचा प्रवासी हसन्ये आरब लोकांच्या संबंधानें लिहितोः—"मला असें आढळून आलें आहे कीं, विवाहित बायकांचीं मनें आकर्षून घेण्यासाठीं जर इतर लोकांनीं प्रयत्न केले तर त्याबद्दल त्या बायकांच्या नवऱ्यांना मोठा अभिमान वाटतो. आठवड्यांतून तीनचार दिवसच त्यांचा लग्नाचा संबंध असतो व बाकीचे दिवस मोकळे असतात. इतर पुरुषांनीं आपल्या

वायकांकडे अशा रीतीनें लक्ष्य देणें हें त्यांच्या मोहक स्वरूपाचें लक्षण आहे असें त्यांना वाटून त्याबद्दल ते भूषणच मानितात. "

" खोंडलोकांमध्यें स्त्रियांच्या पातिव्रत्याला मुळींच मान नाहीं. एकाद्या स्त्रीशीं व्यभिचार केल्यामुळें पुरुषांना जरी शिक्षा झाल्या तरी त्या स्त्रीच्या अब्रूला काडीइतका धक्का लागत नाहीं. पुरुषाच्या पत्नीव्रताबद्दल मात्र त्यांचा मोठा कटाक्ष असतो. विवाहित पुरुषाच्या हातून व्यभिचार घडणें हें अत्यंत निंद्य समजलें जातें व अनेक प्रसंगीं अशा अपराध्यांना त्यांचे कित्येक सामाजिक हक्क हिरावून घेऊन शिक्षा केली जाते."

आपणांला फारच आश्चर्य वाटण्याजोग्या समजुतींचीं दोन उदाहरणें सरतेशेवटीं राखून ठेविलीं आहेत. पहिलें उदाहरण टाहिटी बेटांतील लोकांचें. कुकसाहेबानें त्यांजविषयीं माहिती दिली आहे. आपल्या लोकांना जें आचरण लज्जास्पद वाटतें त्याबद्दल त्यांना कांहींच वाटत नाहीं; परंतु ज्याविषयीं आपण अगदीं उदासीन असतों त्याविषयीं त्यांना विलक्षण प्रकारची लज्जा वाटते. पुष्कळ मनुष्यांनीं एकत्र जमून परस्परांच्या देखत जेवणें हें त्यांस अनीतीचें वर्तन वाटतें. ते लोक म्हणतात कीं "प्रत्येक मनुष्यानें एकांतांत जेवणें हेंच योग्य आहे व म्हणून आम्हीं त्याप्रमाणें जेवितों."

दुसरें उदाहरण तितकेंच विलक्षण असून त्याहूनही आश्चर्यकारक आहे. मनुष्यांना जिवंतपणीं पुरण्याची चाल वाचकांच्या फारशी ऐकण्यांत नसेल. पासिफिक महासागरांत न्यू हेब्रिडीज म्हणून द्वीपसमूह आहे त्यांत

व्हेट नांवाचें एक बेट आहे; तेथील लोक एकाद्या वृद्ध सरदाराला किंवा राजाला जर त्यांच्या आप्तांनीं जिवंतपणीं पुरलें नाहीं तर त्यांच्या कुळाला मोठा बट्टा लागला असें मानितात. अशाच प्रकारची चाल फिजी बेटांत होती व तिच्याविषयीं लोकांची फार पूज्यबुद्धि असे. एक मनुष्य आपल्या आईला जिवंतपणीं पुरण्याच्या विचारांत असतां त्याला कोणीं प्रवाशानें तूं तसें करणार काय म्हणून विचारिलें. त्यावेळीं तो म्हणाला,—"आईवर माझें फार प्रेम आहे आणि म्हणूनच ही गोष्ट मी करणार. हें पवित्र कृत्य करण्याचा माझ्यावांचून दुसऱ्या कोणालाही अधिकार नाहीं. ती माझी आई आहे व मी तिचा मुलगा आहें याकरितां माझ्या हातूनच तिचा असा शेवट लागला पाहिजे." इहलोकींचें अस्तित्व संपलें म्हणजे परलोकींच्या अस्तित्वाला प्रारंभ होतो असा त्या लोकांचा समज आहे. तेव्हां, वृद्धापकाळ येऊन येथील आयुष्य कष्टमय होण्यापूर्वींच येथून सुटका झाल्यास परलोकींच्या सुखमय जीविताचा लाभ लवकर मिळूं लागेल असें त्यांस वाटतें.

जिवंतपणीं पुरण्यापेक्षां जिवंतपणीं जाळणें फार भयंकर आहे. परंतु त्याचाही अनुभव पाऊणशें वर्षांपूर्वीं आपल्या लोकांस होता. तेव्हां आपणांस वरील चालीचें फारसें आश्चर्य वाटूं नये. तथापि तें वाटल्यावांचून राहत नाहीं. कारण परकी लोकांच्या चालीरीतींतील चूक मनुष्याच्या लवकर ध्यानांत येते ही एक गोष्ट, व त्या चालीचें स्वरूप थोडेंसें तरी भिन्न आहे ही दुसरी. बाकी दोन्ही चालींमध्यें साम्य पुष्कळ आहे. नवऱ्या-

च्या प्रेताबरोबर आपणाला जिवंत जाळून घेण्यास तयार होणाऱ्या स्त्रीला आपल्या अंगावर जितके केश आहेत तितकीं वर्षें पतिसह स्वर्गवास घडेल असें वाटत असे, व तिला जिवंत जाळणाऱ्या लोकांसही आपण मोठें पुण्यकृत्य करीत आहों असें वाटे. त्याचप्रमाणें फिजियन् लोकांमध्यें आपणांस जिवंतपणीं पुरून घेण्यास तयार होणाऱ्या लोकांना आतां आपण ह्या लोकींच्या कष्टमय जीवितापासून मुक्त होऊन स्वर्गीच्या अलभ्य सुखाचा लाभ घेऊं लागणार म्हणून आनंद होई, व वडील माणसांस जिवंत पुरणाऱ्या त्यांच्या आप्तांना आपल्या हातून वडिलांस मुक्ति मिळणार म्हणून कृतकृत्यता वाटे.

सारांश काय कीं, जगांतील अनेक लोकांच्या नीतिविषयक समजुतींमध्यें फारच वैचित्र्य आहे. एका ठिकाणच्या लोकांना जी नीति वाटते तिजबद्दल दुसऱ्या ठिकाणच्या लोकांस कांहींच वाटत नाहीं व तिसऱ्या ठिकाणचे लोक तिला अनीति समजतात. जें आचरण कांहीं लोकांना घोरपाप म्हणून वाटतें तेंच दुसऱ्या कांहीं लोकांना महत्पुण्य असें वाटतें. ज्या आचरणाबद्दल एका ठिकाणच्या लोकांस शिक्षा होते त्याच आचरणाबद्दल दुसऱ्या ठिकाणच्या लोकांस बक्षीस मिळतें. जी गोष्ट केल्याबद्दल एका समाजांतील मनुष्याला आनंद होतो तीच गोष्ट केल्याबद्दल दुसऱ्या समजांतील मनुष्याला त्याचें मन खात असतें. आतां ह्या सर्व गोष्टींची मीमांसा करून काय निष्पन्न होतें तें पाहूं.

मनुष्यसमाजाची उन्नति होत असतां रूढींपासूनच कायद्यांची उत्क्रान्ति होत असते असें दिसून येतें.

प्राथमिकस्थितींतील समाजांचे व्यवहार पाहिले असतां रूढि हाच कायदा असें आढळतें. " आमचे आजेपणजे तसें करीत आले म्हणून आह्मी करितों " असे उद्गार आपल्या आचरणाचें समर्थन करितांना प्राथमिक स्थितींतील लोकांच्या तोंडून नेहमीं निघत असतात. ज्यावेळीं समाजाचें नियमन करण्याकरितां धर्मशास्त्राची अवश्यकता वाटण्यापर्यंत मजल येऊन ठेपते त्यावेळीं रूढींच्या पायावरच धर्मशास्त्राची इमारत उभारिली जाते. स्मृतिग्रंथांत रूढींचा व दंतकथांचा संग्रह केलेला असतो व पुढें ईश्वराच्या आज्ञा म्हणून दडपून दिलेल्या कित्येक गोष्टी असल्या ग्रंथांत सामील होत जातात. स्मृतिग्रंथांतून जे नियम दिलेले असतात ते एकाद्या ईश्वरी अवतार मानिलेल्या पुरुषापासून प्राप्त झाले वगैरे विधानें जरी केलेलीं असलीं तरी त्या नियमांत बहुतकरून तत्कालीन रूढींचाच भरणा असतो. बायबलाच्या जुन्या करारांतील लेव्हिटिकस नामक पुस्तकांत हीब्र्यू लोकांचे धर्माचार वर्णिले आहेत. ह्या पुस्तकांत असे अनेक प्रघात आढळतात कीं ज्यांचा आतां कोणी धर्मांत किंवा नीतींत अंतर्भाव करणार नाहीं. तथापि त्यांचें त्यावेळीं महत्त्व होतें. शास्त्रांचीही प्राणि किंवा वनस्पति ह्यांच्या शरीरांप्रमाणेंच कांहीं कालपर्यंत वाढ होत असते व पुढें प्रसंगविशेषीं हा व्यापार बंद पडतो. म्हणजे आरंभीं जसजशा रूढि बदलत जातात तसतसे शास्त्रनियमांतही फेरफार होत जाऊन नवे शास्त्रग्रंथ निर्माण होतात व त्यांचा लोकांवर अंमल चालतो. परंतु पुढें शास्त्रग्रंथांचा विस्तार

बंद होत जाऊन त्यांना आलेलें स्वरूप तसेंच कायम राहतें. त्यानंतर अस्तित्वांत आलेल्या रूढि शास्त्रांत न शिरतां रूढि ह्या रूपानेंच कायम राहतात. फार प्राचीन पूर्वजांपासून चालत आलेल्या रूढि असल्यामुळें त्यांचा धर्मशास्त्रांत किंवा कायद्यांत समावेश झालेला असो किंवा अलीकडच्या काळांतील असल्यामुळें त्या रूढींच्याच रूपानें कायम राहिलेल्या असोत, त्यांच्या शुद्धस्वरूपाचें मुख्य तत्त्व म्हटलें म्हणजे मेलेल्या लोकांचा जिवंत लोकांवरील अंमल हें होय.

मागील प्रकरणांत सांगितलेल्या कारणांनीं पूर्वजांविषयीं मनुष्याच्या मनांत पूज्यबुद्धि व भीति हे मनोविकार असतात; ह्यामुळें पूर्वजांपासून चालत आलेल्या रूढींच्या संबंधानें मनुष्याचे मनांत कर्तव्यबुद्धि उत्पन्न होते. आणि धर्मशास्त्रांचा व कायद्यांचा उगम रूढींतच असल्यामुळें त्यांच्याविषयींही तशीच बुद्धि उत्पन्न होते. फार प्राचीनकालापासून चालत आलेल्या किंवा एकाद्या ईश्वराचा अवतार म्हणून मानिल्या गेलेल्या राजानें किंवा साधूनें आपल्या अधिकारानें घालून दिलेल्या रूढींचा नियम पाळिलाच पाहिजे ही मनुष्याची समजूत जसजशी दृढ होत जाते तसतशी सामान्यतः कोणत्याही प्रकारचा कायदा कोणत्याही कारणानें एकदां अस्तित्वांत आला म्हणजे त्याच्या नियमांविषयींही तशीच समजूत होते. असें होतां होतां नवे कायदे कोणते व जुने कोणते हा भेद नाहींसा होऊन कायदा म्हटला म्हणजे तो पाळिलाच पाहिजे, व तो पाळणें हेंच योग्य वर्तन होय व न पाळणें हें गैर

वर्तन होय, असा साधारणपणें लोकांचा समज होऊन जातो. आणि ज्यावेळीं तत्कालीन राजा ईश्वराचा अवतार आहे असा लोकांचा समज असतो त्यावेळीं तर फारच लवकर लोकांची तशी समजूत होऊन जाते. आणि एकदां कोणत्याही प्रकारची दृढ समजूत होऊन गेली म्हणजे तिचा अंमल मनुष्याच्या मनावर दीर्घकालपर्यंत राहतो. पुढील उतारा पेरूव्हियन् लोकांच्या संबंधानें आहे.

" त्या लोकांमध्यें देहान्तशिक्षा म्हणजे अगदींच साधारण गोष्ट होती. कारण ते म्हणत कीं, अपराध्याला जी शिक्षा करावयाची ती त्याच्या अपराधाबद्दल नव्हे, तर देवांप्रमाणें मानिलेला जो यांका त्याची आज्ञा मोडिल्याबद्दल होय. "

ह्या कल्पनेचें प्राचीनकाळच्या व हल्लींच्याही धर्मविषयक कल्पनांशीं बरेंच साम्य आहे. अशाच प्रकारच्या कल्पना कायद्याच्यासंबंधानेंही उत्पन्न होतात. ज्यांबद्दल नीतिशास्त्राचें ठाम मत नाहीं अशा गोष्टींत जरी कायद्यामुळें उत्पन्न होणारी अवश्यकता व नीतीमुळें उत्पन्न होणारी अवश्यकता ह्या दोहोंमध्यें साधारणतः भेद मानिला जातो, तरी कायद्याप्रमाणें वर्तन करणें ह्या गोष्टीचा नीतीशीं संबंध जोडण्याचा पुष्कळ लोकांच्या मनाचा कल होतो. ही गोष्ट मनुष्यांनीं जरी आपल्या तोंडानें कबूल केली नाहीं तरी त्यांच्या तोंडून वारंवार जे उद्गार निघत असतात त्यांवरून व्यक्त होते. कायदा पाळणें हें योग्य होय व तो मोडणें हें अयोग्य होय असें मानिलें जातें. कायद्याला अनुसरून वर्तन केलें

असतां तें लोकांना पसंत पडतें व त्याच्या विरुद्ध वर्तन केलें असतां तें नापसंत होतें. जणूं काय जें वर्तन कायद्यानें अवश्य झालें तें नीतीच्याही दृष्टीनें अवश्यच असतें! ज्याला नीतीच्या दृष्टीनें बिलकुल महत्त्व देतां येणार नाहीं असा एकादा कायदा मोडल्याबद्दल जरी कोणा मनुष्यावर आरोप ठेवण्यांत आला असला, तरी त्याला म्याजिस्ट्रेटापुढें आणिल्यावर त्याच्या मनाची काय स्थिति होते? न्यायाधीशाला तर आपलें वर्तन गैर वाटतच असेल, पण सभोंवतालच्या प्रेक्षकांना सुद्धां आपलें वर्तन अनीतीचें वाटत असेल व त्याबद्दल आपला त्यांना तिटकारा आला असेल असे विचार त्याच्या मनांत घोळत असतात. व प्रेक्षकांचीही खरोखर तशीच स्थिति होते. मनुष्यगणती करितेवेळीं कुटुंबांतील मुख्य मनुष्यानें घरांतील सर्व मनुष्यांच्या माहितीचा तक्ता भरून दिला पाहिजे असा कायदा असतो व तसें करण्याचें कोणी नाकबूल करील तर त्याच्यावर खटला करण्याचा सरकारी कामगारांस अधिकार असतो. अथवा कांहीं जिन्नस उत्पन्न करण्याकरितां किंवा विकण्याकरितां सरकारांतून परवानगी घ्यावी लागते तशी परवानगी न घेतां कोणी मनुष्य तो जिन्नस उत्पन्न करील किंवा विकील तर त्यावर खटला करितां येतो. ह्या गोष्टींचा नीतीशीं जरी संबंध नाहीं, तरी नीतीशीं संबंध असणाऱ्या गोष्टींत अपराध घडला असतांना अपराध्याबद्दल लोकांचा ज्या प्रकारचा समज होतो, त्याच प्रकारचा समज अशा कायद्यांच्या दृष्टीनें अपराध करणाऱ्यांविषयींही होतो. कर्कश वाद्यें वाजवून शेजारच्या

लोकांस त्रास देणें किंवा भलभलत्याच ठिकाणीं घाण करून रोगकारक दुर्गंधी चोहोंकडे पसरूं देणें हे नीतीच्या दृष्टीनें अपराध होत. हे अपराध करणारे मनुष्य व आतां सांगितलेल्या प्रकारचे अपराध करणारे मनुष्य ह्या दोहोंविषयींही लोकांच्या मनांत सारखीच तिरस्कारबुद्धि उत्पन्न होते. ह्यावरून दोन गोष्टी सिद्ध होतात. पहिली, कायद्याविषयीं व नीतिविषयीं लोकांच्या समजुती सारख्याच प्रकारच्या असतात व त्यांमध्यें त्यांस भेद करितां येत नाहीं. दुसरी, ज्या ठिकाणीं कायदा व नीति ह्यामध्यें विरोध येतो त्या ठिकाणीं कायद्याची सरशी होते. वर जें परवाने घेण्याविषयीं उदाहरण दिलें आहे त्यावरून ही गोष्ट चांगली व्यक्त होईल. परवान्यावांचून पदार्थ उत्पन्न करणें व विकणें हें आचरण नीतीच्या दृष्टीनें योग्य ठरेल व तसें करूं देण्याची मनाई करणें हें नीतिदृष्ट्या अयोग्य होईल. कारण तसें करणें म्हणजे मनुष्याच्या स्वाभाविक हक्काचे आड येणें होय. अशा वेळीं नीतीची जागा कायदा पटकावितो व कायदा तीच नीति असें लोकांना वाटूं लागतें. कदाचित् त्यांमधील भेद कायम राहिला तरी कायद्याला अनुकूल असें वर्तन करण्याविषयींचे मनोविकार, नीतीला अनकूल असें वर्तन करण्याविषयींच्या मनोविकारांपेक्षां प्रबल होतात, व पहिल्या प्रकारचें वर्तन योग्य आणि दुसऱ्या प्रकारचें अयोग्य असे लोकांचे ग्रह बनून जातात.

कोणत्या तरी कारणानें एकाद्या व्यक्तीला किंवा व्यक्तिसमुदायाला अधिकार मिळाला म्हणजे त्याचा अंमल लोकांवर कसा चालतो हें सहकार्यकारी मंड-

ळ्यांच्या व्यवस्थेविषयीं कायदे पाहिले म्हणजे दिसून येईल. कांहीं विशेष कामासाठीं स्थापन केलेल्या एका-द्या मंडळीच्या व्यवस्थापकांस जर मंडळीचे उद्देश वि-स्तृत करून पूर्वी ज्या गोष्टींचा त्यांत समावेश होत न-व्हता त्यांचा समावेश करावा असें वाटलें, किंवा ज्यां-चा पूर्वीच्या उद्देशांशीं संबंध नाहीं अशीं अगदीं नवीं कामें हातांत घ्यावीं असें वाटलें, तर त्यांना तसें कर-ण्यास सवड असते. म्हणजे कागदांचा कारखाना उ-भारण्यासाठीं जर मंडळी स्थापन झाली असली तर ति-ला कापडाचा किंवा प्रसंगीं लोखंडाचाही कारखाना उ-भारितां येईल. असें करावयाचें असल्यास व्यवस्थाप-कांनीं ही गोष्ट भागीदारांच्या सभेपुढें आणून दोनतृ-तीयांश भागीदारांचीं मतें मिळविलीं म्हणजे झालें. पूर्वी तर नुसत्या बहुमतानेंच काम होत होतें, परंतु आतां दोनतृतीयांश मतांची जरूर लागते. अशा रीतीनें झा-लेला ठराव बाकीच्या लोकांना निमूटपणें कबूल करावा लागतो व त्याचे परिणाम सोसावे लागतात. वास्तविक पाहिलें असतां ज्यावेळीं मंडळी नोंदली गेली त्यावेळीं जीं कामें स्पष्ट दाखल केलेलीं असतील त्यांहून निराळीं कामें त्या मंडळीला करितां येऊं नयेत. परंतु तीं केलीं जाऊन, उलट अशा जुलमाबद्दल कुरकूर करणारे लोक-च मूर्ख ठरतात. "तुम्ही विनाकारण लोकांच्या का-मांत अडथळा आणूं पाहतां" असें त्यांस दूषण दिलें जातें. अयोग्य रीतीनें प्राप्त झालेल्या मंडळीच्या अधि-काराविरुद्ध तक्रार करणें म्हणजे नीतिनियमांविरुद्ध कुरकूर करण्याइतकें विषम मानिलें जातें. ह्या ठिका-

णीं देखील कायदा व नीति ह्यांजमध्यें विरोध येतो व पूर्वी एका उदाहरणांत सांगितल्याप्रमाणें नीतीवर कायद्याचें वर्चस्व स्थापित होतें. पुष्कळ लोक झाले तरी त्यांनीं थोड्या लोकांवर कां होईना, त्यांच्या मर्जीविरुद्ध एकादी गोष्ट लादणें हा न्याय नव्हे. अनेक लोकांमध्यें जर कांहीं करार झाला असेल तर त्यांपैकीं पुष्कळांच्या मनांत आलें तरी तो मोडण्याचा अधिकार त्यांना नीतीच्या दृष्टीनें प्राप्त होत नाहीं. तथापि न्यायानें किंवा अन्यायानें मिळालेल्या अधिकाराचा लोकमतावर इतका परिणाम होतो कीं, अधिकाराचे बळावर केलेलें अनीतीचें आचरण योग्य मानिलें जातें व त्या अनीतीच्या आचरणाविरुद्ध कुरकूर करणाऱ्या लोकांचें वर्तन अयोग्य ठरतें !

अशा स्थितींत नीतिविषयक कल्पना व समजुती ह्यांची व्याख्या करावी तरी कशी ? सुसंबद्ध रीतीनें वरील सर्व गोष्टींची व्यवस्था लाविणें फार कठिण आहे. प्रथमतः, एवढावेळपर्यंत जो ऊहापोह झाला त्यांतील सारांश लक्ष्यांत आणूं.

फार प्राचीनकालापासून प्रस्तुत कालपर्यंत बहुतेक लोकांच्या मनांत योग्य वर्तन आणि अयोग्य वर्तन किंवा नीति आणि अनीति ह्या कल्पनांचा संबंध ईश्वराशीं पोंचलेला आढळतो. मनुष्याच्या वर्तनासाठीं ईश्वरानें कांहीं नियम करून दिले आहेत व ते त्यानें कोणत्या तरी साधनानें मनुष्यास कळविले आहेत असें त्यांस वाटतें. त्या नियमांप्रमाणें वागणें हें सद्वर्तन व त्यांविरुद्ध वागणें हें दुर्वर्तन. कोणत्याही आचरणाला

चांगलें किंवा वाईट म्हणावयाचें तें त्याच्या अंतःस्वरूपावरून म्हणजे परिणामांचा विचार करून न म्हणतां त्याच्या बाह्यस्वरूपावरून म्हणजे त्याविषयीं लोकांची जी समजूत झालेली असेल तिच्या धोरणानें म्हणावयाचें. अशा मंडळीच्या दृष्टीनें आज्ञाधारकपणा हाच काय तो सद्गुण असतो. कित्येक प्रसंगीं दुसऱ्याच्या शरीरास इजा करणारें किंवा त्याचा प्राणघात करणारें वर्तन निंद्य व दुसऱ्याच्या हिताचें असेल तें स्तुत्य मानिलें जातें व दुसऱ्या कांहीं प्रसंगीं ह्याच्या अगदीं उलट स्थिति असते. पहिल्या प्रकारास मित्रभावात्मकनीति आणि दुसऱ्यास शत्रुभावात्मकनीति अशीं नांवें पूर्वींच दिलीं आहेत. ज्या आचरणाचें पर्यवसान स्वतःच्या किंवा इतरांच्या सुखांत होत असेल तें चांगलें व दुःखांत होत असेल तें वाईट असें कित्येकांचें म्हणणें आहे. परंतु दुसऱ्या कित्येकांना ही कसोटी पसंत नाहीं. सुख हेंच ज्याचें पर्यवसान आहे असें वर्तन ह्या लोकांना निंद्य वाटतें. ह्यांच्या मताप्रमाणें बरेंवाईट ओळखण्याची शक्ति प्रत्येक मनुष्याचे अंगीं असतेच. ह्याशक्तीनें म्हणजे सदसद्विचारशक्तीनें बरेंवाईट ओळखिलें पाहिजे. ह्या लोकांच्या दृष्टीनें अंतःकरण जी गोष्ट चांगली म्हणेल ती चांगली व वाईट म्हणेल ती वाईट. ह्यापलीकडे नीति म्हणून नाहीं. परंतु सुखोत्पादक क्रिया चांगल्या व दुःखोत्पादक वाईट असें ज्यांचें म्हणणें आहे त्यांना अंतःकरणावर भिस्त ठेविणें पसंत नाहीं. बऱ्यावाईटाविषयीं लोकांच्या समजुती कशाही असोत, वर्तनाचा बरेवाईटपणा

ठरविणें तो त्याच्या परिणामाकडे लक्ष्य देऊन ठरविला पाहिजे असें ह्या मंडळीचें म्हणणें आहे. मनुष्याच्या प्राथमिकस्थितींत व सुधारणेच्या कांहीं पायऱ्या चढल्यानंतरही रूढ प्रघातांच्या अनुरोधानें प्रत्येकानें वागलेंच पाहिजे असा सार्वत्रिक समज आढळून येतो, मग ते रूढ प्रघात कोणत्याही प्रकारचे कसेही असोत. पुढें रूढींचा कायद्यांत अंतर्भाव होऊं लागला म्हणजे कायद्याचे अनुरोधानें वागणें हें प्रत्येकाचें कर्तव्य मानिलें जातें. मग ते कायदे त्यांच्या अंतःस्वरूपावरून पाहिलें असतां चांगले असोत किंवा वाईट असोत.

ह्यावरून असें दिसतें कीं, बरें-वाईट, योग्य-अयोग्य, कर्तव्य-अकर्तव्य, ह्यांविषयीं लोकांच्या कल्पना फार व्यापक आहेत व ह्यांच्या कांहीं विवक्षित भागाचाच लोक नीतींत अंतर्भाव करितात. निरनिराळ्या स्थळीं आणि निरनिराळ्या प्रसंगीं एकाच प्रकारच्या कल्पना आणि मनोविकार परस्परांशीं अगदीं विरुद्ध अशा क्रियांपासून उत्पन्न होतात. त्याचप्रमाणें नीति म्हणून मानल्या जाणाऱ्या गोष्टी व ज्यांचा नीतीशीं कांहीं संबंध नाहीं अशा गोष्टी ह्या दोहोंविषयींही एकाच प्रकारच्या कल्पना व मनोविकार आढळून येतात. तेव्हां आपणांला जर ह्याविषयींचा शास्त्रीयरीत्या विचार करणें असेल तर, लोक कशाला नीति म्हणतात ह्या गोष्टीकडे दुर्लक्ष्य करून, ज्याला लोक नीति म्हणून म्हणतात त्याचें वास्तविक स्वरूप काय असतें याची मीमांसा केली पाहिजे. एकदां नीतीचें स्वरूप समजलें म्हणजे अनेक कारणांनीं बनणाऱ्या लोकांच्या समजुती

एकीकडे ठेवून त्या स्वरूपावरूनच नीति ओळखण्यास बरें पडेल.

नीति म्हणून मानिल्या जाणाऱ्या कल्पना व समजुती ह्यांमध्यें एक साधारण धर्म आढळून येतो तो हा कीं, कोणी तरी नियामक व्यक्ति, व्यक्तिसमुदाय किंवा तत्त्व ह्यांचा त्यांना आधार पाहिजे. ह्या आधाराचें स्वरूप जरी निश्चित नाहीं, तरी कांहीं तरी आधार असल्यावांचून मनुष्याच्या विचारांना जोर येत नाहीं. अधिकृत पुरुष, संस्था किंवा तत्त्व ह्यांची आपणास आज्ञा आहे असा मनुष्याचे मनांत ज्ञानतः किंवा अज्ञानतः विश्वास असावा लागतो. कित्येक प्रसंगीं ईश्वरी अंश मानिलेल्या राजाची किंवा प्रत्यक्ष ईश्वराची आपणांस आज्ञा आहे असा लोकांचा समज असतो. इतर प्रसंगीं अमुक प्रकारचें वर्तन करण्याविषयीं पूर्वजांनीं आपणांस आज्ञा केली आहे किंवा आपणांसाठीं पूर्वजांनीं रूढप्रघात सुरू केले आहेत असें त्यांस वाटत असतें. कधींकधीं राज्यकर्त्यांच्या किंवा सेनानायकाच्या हुकुमांशीं संबंध असतो. केव्हांकेव्हां लोकमताची आज्ञा असते. क्वचित् प्रसंगीं उपयुक्ततेच्या तत्त्वाचें अनुमत असतें व अन्यप्रसंगीं सदसद्विचारबुद्धीची अनुज्ञा असते. सारांश, कोणत्या तरी स्वरूपानें अधिकाराचें पाठबळ पाहिजे.

अधिकाराच्या कल्पनेबरोबरच सामर्थ्याची कल्पनाही कमी-अधिक प्रमाणानें मनुष्याच्या मनांत जागृत असते. एकदां अधिकार कबूल केला म्हणजे अधिकृत व्यक्तींच्या किंवा तत्त्वाच्या आज्ञा पाळण्याची

जबाबदारी उत्पन्न होतेच. तथापि त्या आज्ञा पाळि-
ल्या नाहींत तर शिक्षा करण्याचें सामर्थ्य अधिकृत
व्यक्तींच्या किंवा तत्त्वाच्या अंगीं आहे अशी मनुष्या-
ची खात्री झाल्यावांचून तो कृति करण्यास प्रवृत्त होत
नाहीं. ईश्वराची किंवा ईश्वरी अंश मानिलेल्या राजा-
ची आज्ञा पाळिली नाहीं तर ईश्वराचा आपणावर कोप
होईल असें मनुष्यास भय असतें. सरकारचे कायदे
पाळिले नाहींत तर दंडाची किंवा कैदेची शिक्षा भो-
गावी लागेल ही भीति असते. पूर्वापार रूढींच्या वि-
रुद्ध वागलें तर लोकांपासून आपणास त्रास होईल अ-
सा धाक असतो व सदसद्विचारबुद्धीच्या उपदेशावि-
रुद्ध वागलें तर आपलेंच मन आपणास बोंचबोंचून खा-
ईल ही धास्ती असते. सारांश मनुष्याच्या मनांत क-
र्तव्यबुद्धि जरी जागृत असली तरी तें कर्तव्य आपल्या
हातून झालें नाहीं तर आपणास शिक्षा करणारी एक
शक्ति आहे हा विचार त्याचे मनांत आल्यावांचून तो
आचरणास प्रवृत्त होत नाहीं.

नीतिविषयक कल्पना व समजुती ह्यांचा आणखी
एक घटक किंबहुना सर्वांत महत्त्वाचा घटक म्हटला
म्हणजे सभोंवतालच्या लोकांचें मत होय. लोकापवा-
दाइतकें मनुष्याला दुसऱ्या कशाचेंही भय वाटत नाहीं.
मनुष्याच्या मनांत कोणतीही गोष्ट करावयाची आली
तर पहिल्यानें लोक आपणास काय म्हणतील हा प्रश्न
पुढें उभा राहतो व ह्या प्रश्नाचें उत्तर येईल त्याप्रमाणें
ती गोष्ट करण्यास तो प्रवृत्त होतो किंवा तीपासून नि-
वृत्त होतो. आपल्याबद्दल लोक काय म्हणतील हा

विचार करण्याची संवय लहानपणापासून मनुष्याला कशी लागते हें लहान मुलांचें वर्तन पाहिलें असतां लक्ष्यांत येईल. एकाद्या मुलावर जर कांहीं अपराध केल्याचा आळ आला तर त्याचें तोंड खाडूदिशीं उतरतें. आईबाप, आप्तमित्र हीं आपणास नांवें ठेवितील हा विचार त्याला फारच दुःखद होतो. वास्तविक अपराध हातून घडला असतां उत्पन्न होणाऱ्या लोकापवादामुळें जे मनोविकार उद्भूत होतात त्यांहून वरील प्रसंगीं उत्पन्न होणारे मनोविकार भिन्न नसतात. कारण आपण अपराध केला नसला तरी लोकांच्या दृष्टीनें आपण अपराधीच ठरणार असें त्यास वाटत असतें. अशा प्रसंगीं मोठ्या मनुष्याचीही तीच स्थिति होते. खरोखर अपराधी नसतांनाही जर एकाद्या मनुष्यावर अपराध शाबीद झाला व त्याला त्याबद्दल शिक्षा झाली, तर लोक आपणास खरोखरच अपराधी समजत असतील हा विचार त्याला अतिशय त्रास देतो व पुन्हां लोकांत तोंड दाखविण्यास त्याला लाज वाटते. पुष्कळ मनुष्यांना ईश्वराच्या भयापेक्षांही लोकापवादाचें भय फार वाटत असतें. एकादा मनुष्य जर अशा प्रसंगांत असला कीं प्रत्यक्ष पापाचरण केलें तर तें छपण्याचा संभव असून, तें केलें नसतां केल्याबद्दल आरोप येण्याचा संभव असला, तर बहुतकरून तो दुसऱ्या मार्गानें जाऊन आपणास लोकापवादास पात्र करून न घेतां पहिलाच मार्ग स्वीकारील. अंतःस्वरूपावरून पाहिलें असतां ज्या गोष्टी निंद्य ठरतात त्यांच्यासंबंधानें मात्र लोकापवादाचें इतकें महत्त्व आहे असें नाहीं; तर अं-

तःस्वरूपावरून पाहिलें असतां ज्या गोष्टींत बिलकुल वाईटपणा नाहीं किंवा उलट चांगुलपणाच आहे त्यांच्यासंबंधानें देखील जर लोकमत विरुद्ध असलें तर त्या करण्यास मनुष्य धजावत नाहीं व प्रसंगीं त्याच्या हातून तशी गोष्ट घडली किंवा घडल्याचा आरोप आला तर त्याला मरणापेक्षां मरण होऊन जातें. प्रत्येक समाजांत कित्येक सामाजिक रूढि अशा असतात कीं, त्यांविरुद्ध वागण्यांत विचारदृष्टीनें कांहींएक वाईटपणा नसतो. तथापि तशा वर्तनानें वाटणारी लाज व एखादी खरोखर वाईट गोष्ट केली असतां वाटणारी लाज ह्यांच्यामध्यें कांहींएक फरक नसतो. शेंकडा नव्वद लोकांना रूढिविरुद्ध वर्तन करण्यानें उत्पन्न होणाऱ्या लोकापवादाचें भय खरोखर वाईट गोष्टी केल्यानें उत्पन्न होणाऱ्या लोकापवादाच्या भयापेक्षां अधिक वाटतें.

सदरील विवेचनावरून असें लक्षांत येईल कीं अधिकार, सामर्थ्य आणि लोकापवादाचें भय ह्यांचें निरनिराळ्या प्रमाणांनीं मिश्रण होऊन उत्पन्न होणाऱ्या कल्पना व कर्तव्यबुद्धि ह्यांचा नीतींत अंतर्भाव केला पाहिजे. मग त्यांचा संबंध कोणत्याही प्रकारच्या वर्तनांशीं असो. परस्परांच्या विरुद्ध असे जरी वर्तनमार्ग असले तरी त्यांजबद्दल दोन ठिकाणच्या लोकांत जर अगदीं सारख्या कल्पना असतील व त्या वर्तनाकडे प्रवृत्ति करणारे मनोविकारही जर अगदीं सारखे असतील, तर आचरणमार्ग भिन्न असले तरी दोन्ही ठिकाणच्या लोकांची मानसिकस्थिति अगदीं सारखी असते, असें म्हटलें पाहिजे. उदाहरणानें ही गोष्ट अधिक स्पष्ट होईल.

आपणास ईश्वरप्राप्ति व्हावी अशा हेतूनें जर एका हिंदूनें देवालय बांधून त्यांत मूर्तीची स्थापना केली व परधर्मीयांच्या मूर्तीचा उच्छेद करून त्यांच्या देवालयांचा विध्वंस केला असतां ईश्वरप्राप्ति होते अशा पूर्ण समजुतीनें जर एका मुसलमानानें ती मूर्ति फोडून त्या देवालयाचा नाश केला तर परस्परांचे वर्तनमार्ग विरुद्ध झाले खरे, तथापि उभयतांच्या मनोवृत्ति अगदीं एकसारख्या आहेत. अधिकार, सामर्थ्य आणि लोकापवाद ह्यांच्या मिश्रणानें उत्पन्न होणाऱ्या कल्पना, मनोवृत्ति आणि समजुती ह्यांना नीति न म्हणतां प्रवर्तकनीति म्हटलें असतां बरें पडेल. कारण नीतीचें शुद्धस्वरूप अगदीं निराळें आहे व त्याचा विचार इतक्यांतच संक्षेपानें करावयाचा आहे. येथवर ज्या कल्पना, मनोवृत्ति व समजुती ह्यांचा विचार केला आहे त्या मनुष्याला आचरणाला प्रवृत्त करीत असतात म्हणून त्यांस 'प्रवर्तकनीति' हें नांव बरें दिसतें. लोकांच्या समजुतीप्रमाणें जी नीति तिला आपण 'रूढनीति' असें नांव देऊं. प्रवर्तकनीतींत रूढनीतीचा समावेश होतोच. रूढनीतीच्या बाहेर जो प्रवर्तक नीतीचा भाग राहतो त्यांत व रूढनीतींत फरक इतकाच कीं, रूढनीतींत अंतर्भाव होणाऱ्या गोष्टींच्या संबंधानें लोक 'नीति' ह्या शब्दाचा उपयोग करितात व प्रवर्तकनीतीच्या अवशिष्ट भागांतील गोष्टींच्या संबंधानें तो करीत नाहींत.

आतां शुद्धनीतीच्या संबंधानें थोडक्यांत विचार करूं. प्रवर्तकनीतीच्या संबंधानें विचार करितांना एक गोष्ट लक्षांत आली असेलच कीं, तींत वर्तनाच्या मुख्य अंगाचा म्हणजे अंतःस्वरूपाचा विचार न होतां केवळ बा-

ह्यांगाचाच विचार होऊन त्याचा बरेवाईटपणा ठरत असतो. म्हणजे अधिकृत पुरुषांची त्या संबंधानें आज्ञा कशी आहे, आज्ञेप्रमाणें वागलें नसतां शिक्षा करण्याचें सामर्थ्य त्यांच्यांत आहे किंवा नाहीं व लोकांचें त्यासंबंधानें मत कसें आहे हें पाहून वर्तनाची योग्यता जाणावयाची; मग तें वर्तन धार्मिक असो, सामाजिक असो किंवा राजकीय असो. मनुष्याच्या मनांतील नीतीचा स्वाभाविक अंकुर म्हटला म्हणजे सदसद्विवेक होय. ह्या विवेकाच्या दृष्टीनें ज्यावेळीं आपण कोणत्याही आचरणाचें परीक्षण करितों त्यावेळीं त्याला लोक चांगलें म्हणतील कीं वाईट म्हणतील, त्यापासून कर्त्याला शिक्षा होईल कीं बक्षीस मिळेल इत्यादि त्याच्या बाह्य अंगांकडे पाहत बसत नाहीं, तर त्याच्या अंतरंगावरून त्याची किंमत ठरवितों. म्हणजे त्या आचरणाचे प्रत्यक्ष परिणाम काय होतील हें पाहून त्याच्या बरेवाईटपणाचें निदान करितों. हें प्रत्यक्ष परिणामांचें ज्ञान कित्येकांना त्यांच्या विचारशक्तीनें अंशतः होतें; परंतु बहुतेकांना त्याची आपोआपच स्फूर्ति होते. अथवा तें त्यांना उपजतबुद्धीनें प्राप्त होतें असें म्हटलें तरी चालेल. नीतीच्या शुद्धस्वरूपाच्या विचारांत बाहेरून कोणीं सामर्थ्यवान् शास्त्यानें आपणांस कर्तव्यें लावून दिलीं आहेत म्हणून तीं केलीं पाहिजेत ह्या कल्पनेला बिलकुल स्थल नाहीं. त्याचप्रमाणें अमुक आचरणापासून किती सुख होईल किंवा किती दुःख होईल ह्या विचारांचेंही महत्त्व नसतें. मुख्य गोष्ट म्हटली म्हणजे सुखोत्पत्तीसाठीं किंवा दुःखाचा परिहार होण्यासाठीं को-

णत्या गोष्टींची जरूर आहे हें ठरविणें. ह्या गोष्टी ठरल्या म्हणजे कर्तव्य ठरलेंच. शुद्धनीतीच्या दृष्टीनें, अर्थात् सदसद्विवेकाच्या कसोटीनें, जें कर्तव्य ठरेल तें प्रवर्तकनीतीनें ठरलेल्या कर्तव्याशीं जुळेल किंवा कदाचित् त्याहून भिन्न असेल. परंतु कसेंही असलें तरी सदसद्विचार हाच खरा शास्ता आहे असा स्पष्ट किंवा अस्पष्ट विचार बहुतेकांच्या मनांत आल्यावांचून राहत नाहीं.

सदसद्विवेकामुळें उत्पन्न होणारे विचार व मनोविकार ह्यांचें जर मनुष्याचे मनांत प्राबल्य उत्पन्न झालें तर कर्तव्यबुद्धीला फारसें महत्त्व राहणार नाहीं. हल्लीं जें कर्तव्यबुद्धीला विशेष महत्त्व आहे तें शुद्धनीति व प्रवर्तकनीति ह्यांच्या झटापटींत प्रवर्तकनीतीचाच बहुतेक जय होत असतो म्हणून. जोंपर्यंत मनुष्याचे मनांत सदसद्विवेकाचें साम्राज्य स्थापित झालें नाहीं तोंपर्यंत मनुष्याची कर्तव्यबुद्धि नेहमीं जागृत राहिल्यानें बराच फायदा होईल. कारण, केव्हांकेव्हां प्रवर्तकनीतीच्या दृष्टीनें मनुष्याचें मन भलतीकडेच वळण्याचा संभव असल्यास ही बुद्धि त्यास योग्य मार्गाकडे वळवूं शकेल. किंवा योग्य मार्गाकडे वळविण्याचें सामर्थ्य तिच्या अंगांत नसलें तरी ती जागृत राहिल्यानें मनुष्याला कृतकर्माचा पश्चात्ताप होऊं शकेल व त्यामुळें पुन्हां त्याच्या हातून तसें वर्तन न घडण्याचा संभव आहे. परंतु एकदां सदसद्विवेकाचें साम्राज्य स्थापित झालें म्हणजे मनुष्य स्वभावतःच आवडीनें योग्य प्रकारचें वर्तन करूं शकेल व मग त्याला पश्चात्ताप करण्याचा कधींच प्रसंग ये-

णार नाहीं. कारण प्रत्येक वेळीं त्याचें आचरण सदसद्विवेकाच्या उपदेशाप्रमाणें असेल.

अनेक समाजांच्या नीतिविषयक कल्पनांचें व समजुतींचें परीक्षण करून त्यावरून सामान्य सिद्धांत काढणें हा ह्या पुस्तकाचा उद्देश आहे. तेव्हां ह्या पुस्तकांत प्रवर्तकनीतीचाच विचार आपणांस केला पाहिजे. कारण जगांतील बहुतेक लोकांच्या वर्तनांत सदसद्विवेकबुद्धीचा अंश बहुधा दिसून येत नाहीं. त्यांचें वर्तन प्रवर्तकनीतीवर अवलंबून असतें. ह्या पुस्तकांत जरी प्रवर्तकनीतीचाच विचार करणें आहे तरी तिच्या स्वरूपाची चांगली ओळख पटण्यासाठीं शुद्धनीतीच्या स्वरूपाचेंही दिग्दर्शन करणें इष्ट होतें. परंतु तें झाल्यानंतर आतां शुद्धनीति एका बाजूस ठेवून वर्तनाच्या अनेक विभागांविषयीं नानाप्रकारच्या लोकांचे विचार काय आहेत हें पाहून त्यावरून अनुमानें काढिलीं पाहिजेत.

ह्या कामाची सुरुवात करण्यापूर्वी एवढें सांगणें जरूर आहे कीं, ह्या दोन उपोद्घातरूपी प्रकरणांत ज्या कल्पनांचा उल्लेख झाला आहे त्यांची पुढील प्रकरणांत पुनरावृत्ति झालेली आढळेल. परंतु तीवांचून गत्यंतर नाहीं. कोणत्याही विषयाच्या सामान्यस्वरूपाची ओळख करून देतांना विशेष गोष्टींचा थोडाबहुत तरी उल्लेख करावाच लागतो. तथापि पुढील प्रकरणांतील कित्येक विषयांचें ह्या उपोद्घातांत केवळ दिग्दर्शन मात्र झालेलें आहे. प्रत्येक विषयाच्यासंबंधानें अनेक ठिकाणचा पुरावा एकत्र करून त्यावरून काय अनुमानें नि-

घतात हें अद्यापि पहावयाचें आहे. हा पुरावा देतांना जीं उदाहरणें द्यावयाचीं त्यांची पुनरावृत्ति होऊं नये ह्याविषयीं मात्र काळजी घेतली जाईल. मुख्य कल्पनांचा विस्तार करितांना जरी त्यांची पुनरावृत्ति झाली तरी तिजबद्दल खेद करण्याचें कारण नाहीं. कां तर, तसें झाल्यानें महत्त्वाच्या सिद्धांतांचा पुनःपुनः उल्लेख करण्यास संधि सांपडेल व वाचकांच्या मनावर त्यांचा चांगला ठसा उमटेल.

# प्रकरण ३

## मारहाण

मनुष्यें परस्परांवर दोन प्रकारचा जुलूम करूं शकतात; एक प्रत्यक्ष आणि दुसरा अप्रत्यक्ष. प्रत्यक्ष जुलूम करणें म्हणजे बलात्कारानें दुसऱ्याच्या शरीराला इजा करणें किंवा त्याचा प्राण घेणें; आणि अप्रत्यक्ष जुलूम करणें म्हणजे वळजबरीनें दुसऱ्याशीं अशा प्रकारचें वर्तन करणें कीं तेणेंकरून त्याच्या शरीराला इजा झाली नाहीं तरी त्याचें अन्यप्रकारें नुकसान व्हावें. ह्या जुलुमाच्या दोन प्रकारांना अनुक्रमें मारहाण आणि दरोडेखोरी अशीं नांवें दिलीं असतां हरकत नाहीं. ह्या दोनही प्रकारांचा परस्परांशीं निकट संबंध असल्यामुळें त्यांचें एकाच प्रकरणांत जुलूम या सदराखालीं विवेचन करितां आलें असतें, परंतु असे विभाग केले असतां सोईवार पडेल असें वाटल्यावरून त्यांचा निरनिराळा विचार केला आहे.

समजून उमजून घडलेल्या व दुसऱ्याच्या शरीराला भयंकर इजा करणाऱ्या कृतींना आपण 'मारहाण' शब्द लावूं. ही व्याख्या ज्यांना लागू पडते अशा बऱ्याच कृतींना ' मारहाण ' हा शब्द लाविणें कित्येकांना कदाचित् अप्रशस्त वाटेल, परंतु वरील व्याख्येंत दिलेल्या अर्थाचा दुसरा शब्द न आढळल्यामुळें ह्याच शब्दाचा उपयोग केला आहे. ज्याप्रसंगीं शत्रुत्वाचा किंवा भांडणाचा संबंध नसतो त्याप्रसंगीं घडून येणाऱ्या

कित्येक क्रिया अशा प्रकारच्या असण्याचा संभव आहे.

त्यांपैकीं विशेष महत्त्वाची म्हटली म्हणजे बालवध ही होय. प्राचीनकाळीं तर जगाच्या सर्व भागांत बालवधाची प्रवृत्ति होती. हल्लीं देखील पुष्कळ ठिकाणीं बालवध ही मनुष्याच्या नित्यव्यवहारांतली गोष्ट असून तिच्याबद्दल कोणास कांहीं वाटत नाहीं. कित्येक ठिकाणीं तर ह्या गोष्टीचा कर्तव्यांत समावेश होतो. कित्येक प्रसंगीं दूरदर्शीपणाच्या विचारांनींही ही बालवधाची चाल प्रचारांत येण्याचा संभव आहे. पूर्ण वाढ झालेल्या मनुष्यांना वांचविण्यासाठीं कधींकधीं बालवधाची अवश्यकता उत्पन्न होते. कारण, ज्या टोळींतील लोकांना नेहमीं पोटभर अन्न मिळण्याची मारामार पडत असेल त्या टोळींत लोकसंख्येची अधिक वाढ होऊं देणें म्हणजे सध्यां जिवंत असलेल्या मनुष्यांना उपाशीं मारणें होय. विवक्षित जातीच्या संरक्षणासाठीं केव्हांकेव्हां कन्यावधाची अवश्यकता उत्पन्न होण्याचा संभव आहे. स्त्रियांचा लढाईच्या व पारधीच्या कामीं उपयोग नसतो व त्यांची संख्या वाजवीहून अधिक झाली तर अन्नाच्या पुरवठ्यावर मात्र विनाकारण धाड येते. रागाच्या आवेशांत लहान मुलांच्या जीवास अपाय केल्याचीं पुष्कळ उदाहरणें रानटी व अर्धवट सुधारलेल्या लोकांतही घडून येतात व त्यांबद्दल कोणास कांहीं फारसें वाटत नाहीं. मनुष्याच्या प्राथमिक स्थितींत आईबापांनीं आपल्या मुलांचें काय पाहिजे तें करावें, व त्यांनीं कांहीं केलें तरी त्यांत कोणीं मन घालूं नये अशी स्थिति असते. बालवध आणखीही कांहीं

कारणांनीं घडून येतो. मनुष्यभक्षक राजे जिवंतपणीं किंवा मृतावस्थेंतही कोंवळ्या बाळांचे बळी घेतल्यावांचून तृप्त होत नाहींत. अशा प्रसंगीं अर्भकांचे बळी देणें हें मनुष्याचें कर्तव्य मानिलें जात असल्यामुळें ह्या वर्तनास प्रवर्तकनीतीच्या सदरांत घातलें असतां हरकत नाहीं.

आतां बालवधाकडून मनुष्यवधाकडे वळूं. जिवंतपणीं मनुष्यें पुरण्याच्या व जाळण्याच्या संबंधानें मागील प्रकरणांत उदाहरणें दिलींच आहेत. प्राचीन काळीं अनेक देशांत मोठमोठाले सरदार आणि राजे ह्यांच्या मरणाच्या समयीं अनेक मनुष्यांना त्यांच्या बरोबर पुरण्याची किंवा जाळण्याची चाल असे. असे लोक मेले म्हणजे बऱ्याच मनुष्यांची कत्तल उडे. बायकांना मारून त्यांची मृतपतीबरोबर परलोकास रवानगी करून द्यावी लागत असे. त्याचप्रमाणें परलोकीं चाकरी करण्यासाठीं चाकरमाणसेंही येथून मारून धन्याबरोबर पाठवावीं लागत व कधीं कधीं मित्रांवरही तसाच प्रसंग येई. असे प्रकार वर्तमानकाळींही आफ्रिकाखंडाच्या कित्येक प्रदेशांत घडून येत आहेत. अशाच समजुतींनीं आणखीही मनुष्यवधाचे कित्येक प्रकार घडत असतात. आफ्रिकाखंडांतील डहोमे येथील राजांची आपल्या मृतपूर्वजांस निरोप पाठविण्याची वहिवाट मोठी विलक्षण आहे. ज्या मनुष्यावर तें काम सोंपवावयाचें असेल त्याला तो निरोप सांगून त्याचा वध केला म्हणजे झालें. मग त्या मनुष्याचा आत्मा तो निरोप बिनचूक नेऊन पोंचवितो ! अशा प्रकारच्या मनुष्यवधालाही प्र-

वर्तकनीतीची अनुज्ञा असते; कारण पूर्वापार रूढींवरी-ल श्रद्धा व मृतांविषयीं पूज्यबुद्धि ह्यांमुळें मनुष्य अशा कृत्यांस प्रवृत्त होतो.

आतां धर्मविषयक समजुतींमुळें होणाऱ्या मनुष्यवधाचीं उदाहरणें घेऊं. प्राचीनकाळीं होमकुंडांत जिवंत मनुष्यांच्या आहुति देण्याची चाल पुष्कळ ठिकाणीं होती. फिनीशियन्, सिथियन्, ग्रीक, रोमन्, असीरियन्, हीब्र्यू इत्यादि लोकांत कित्येक प्रसंगीं ती अगदीं शिखरास जाऊन पोहोंचली होती असें दिसून येतें. प्राचीनकाळीं मेक्सिकोदेशांत देवांचे पुढें स्थंडिलांवर हजारों मनुष्यांचे बळी दिले जात असत व केव्हांकेव्हां देव बुभुक्षित झाले ह्या निमित्तानें लढायाही होत असत. प्राचीनकाळीं बुभुक्षित देवांच्या तृप्तीसाठीं हे मनुष्यवध होत असत. अलीकडल्या काळांत पतितांवर ईश्वराचा क्षोभ होऊं नये म्हणून क्याथोलिक व प्राटेस्टंट ह्या धर्मांच्या निःसीम ईश्वरभक्तांकडून मनुष्यवध घडले आहेत. आपल्या देशांतील ठग वगैरे कालीदेवीचे उपासकही देवीपुढें माणसांचे बळी देत असत. सध्यां अशा गोष्टी प्रसिद्धपणें होत नाहींत.

हे धर्मदृष्टीनें घडणारे मनुष्यवध त्या त्या लोकांच्या दृष्टीनें सत्कृत्यांतच गणिले जातात व त्यांना प्रवर्तकनीतीची संमति असते. कारण ईश्वरानें हें कर्तव्य आपल्या मागें लावून दिलें आहे असा लोकांचा समज असतो.

व्यक्तींमध्यें किंवा टोळ्यांमध्यें शत्रुत्वाचा भाव नसतांना घडून येणाऱ्या मनुष्यवधाविषयीं हा वेळपर्यंत वि-

चार झाला. आतां केवळ हौसेखातर होणाऱ्या मनुष्य-वधाचा विचार करूं.

फिजियन् लोकांत खून करणें हें मोठेपणाचें लक्षण समजलें जात असे. एकाच ठिकाणच्या लोकांविषयीं एकाद्याच मनुष्यानें जर अशी गोष्ट सांगितली तर तिच्यावर विश्वासही बसणार नाहीं. परंतु अनेक ठिकाणच्या लोकांविषयीं पुष्कळ शोधकांनीं माहिती दिलेली आहे ह्यामुळें संशय घेण्याला जागा नाहीं. लिव्हिंग्स्टन ह्यानें आफ्रिकेंतील सेआन् ( बुशमेन् ) लोकांच्या संबंधानें हकीकत दिली आहे ती अशीः—

" एक मनुष्य आपल्या तारुण्यांतील साहसाच्या गोष्टी सांगत शेकत बसला होता. सांगतां सांगतां एकदां पांच बुशमेन् मारल्याची हकीकत सांगूं लागला. बोलतां बोलतां दोन बोटें मोडून तो म्हणाला ' त्यांपैकीं दोघीजणी बायका होत्या, एक पुरुष होता व दोन मुलें होतीं. ' त्यावर मीं त्याला विचारिलें ' आपल्याच लोकांच्या बायकापोरांना मारण्याचें नीच कृत्य करून त्याची आणखी प्रतिष्ठा मिरविण्याची तुला लाज कशी वाटत नाहीं ? तूं देवापुढें गेलास म्हणजे तो तुला काय म्हणेल ? ' ह्यावर त्यानें उत्तर केलें ' तो म्हणेल कीं ह्यानें मोठें हुशारीचें काम केलें. ' देवाविषयीं जेव्हां मी बोलूं लागलों तेव्हां तो जरी बकेन लोकांच्या देवाचें नांव वारंवार घेत होता तरी त्याच्या एकंदर बोलण्यावरून मीं ताडिलें कीं हा आपल्या मुख्य सरदाराच्या संबंधानें बोलत आहे. "

वुइल्सन आणि फेल्किन ह्या दोन प्रवाशांनीं आ-

फ्रिकेंतल्या युगांडा देशांतील लोकांची स्थिति व त्यांच्या समजुती ह्यांविषयीं जें वर्णन दिलें आहे तें वरच्यापेक्षांही विलक्षण आहे. त्यापैकीं एक मासलेदार गोष्ट येथें लिहितों:—

"युगांडा देशच्या राजाचा एक हुजऱ्या होता, तो त्याच्याच हाताखालच्या सरदाराचा मुलगा होता. त्याला वारंवार राजाकडून मजकडे व मजकडून राजाकडे निरोप पोंचविण्याचें काम करावें लागत असे. एके दिवशीं सकाळीं तो मजकडे आला व 'मीं आतांच आपल्या बापाला मारिलें.' म्हणून मोठ्या आनंदानें मला सांगूं लागला. मीं त्याला तसें करण्याचें कारण विचारिलें तेव्हां तो म्हणाला 'मला ह्या चाकराच्या स्थितींत राहण्याचा अगदीं कंटाळा आला व लवकर सरदार व्हावें असें वाटूं लागलें म्हणून मीं ही गोष्ट राजाजवळ काढिली. तेव्हां त्यानें मला हा उपाय सांगितला. राजानें आपल्या हुजऱ्याला असलें कृत्य करण्याविषयीं मसलत दिली आणि हुजऱ्यानें तें मोठ्या आनंदानें मान्य केलें."

लुटालुटीवर निर्वाह करण्याचा ज्या लोकांचा नित्यक्रम असतो त्या लोकांत जुलूम करणें हें भूषणास्पद समजलें जातें व कोणाच्या वाटेस न जातां शांततेनें राहणें दूषणास्पद समजलें जातें हें अनेक उदाहरणें देऊन सिद्ध करितां येईल. येथें एक उतारा पुरे होईल.

" 'हरामी' म्हणून लुटारू किंवा दरोडेखोर अशा अर्थाचा एक शब्द आहे तो हेजाझी बेडुइन* लोकां-

---

* अरबस्थानांत हेजाझ नामक प्रांत आहे तेथें हे लोक राहतात. मक्का शहर ह्याच प्रांतांत आहे.

मध्यें प्रतिष्ठासूचक मानिला जातो. बिछान्यांत मरण येणें हें त्या लोकांमध्यें मोठेंच दुर्दैव मानिलें जातें. अशा रीतीनें मरणाऱ्या माणसाची आई विलाप करितांना असे उद्गार काढिते कीं, ' माझ्या मुलाचा कोणी गळा तरी कापला असता ! पण इतकें ह्याच्या नशिबीं कोठून येणार ?' आणि जवळच्या बायका मोठ्या गंभीर स्वरानें ' अल्लाच्याच इच्छेनें आंथरुणांत मरण्याचा हा दुःखकारक प्रसंग आला ' असें म्हणून त्या शोक करणाऱ्या आईचें सांत्वन करितात. "

मनुष्यवधाला किती महत्त्व दिलें जाणें शक्य आहे हें कुकी लोकांच्या समजुतींवरून चांगलें लक्ष्यांत येतें. हिंदुस्थानच्या ईशान्य दिशेस कुकी नांवाचे डोंगर आहेत त्यांचे आसपास हे लोक राहतात. त्यांचा समज असा आहे कीं, मनुष्याला स्वर्गी मिळणारें सुख त्यानें मारिलेल्या शत्रूंच्या संख्येवर अवलंबून असतें. ही समजूत पुढील उताऱ्यावरून व्यक्त होते:—

"जो मनुष्य सर्वांत अधिक शत्रु मारील त्याला अत्यंत श्रेष्ठ प्रतीचें स्वर्गसुख मिळेल व हे मारिलेले शत्रु स्वर्गांत त्याची गुलामांप्रमाणें चाकरी करीत राहतील."

आतां सांगितलेला मनुष्यवध त्या लोकांच्या समजुतीप्रमाणें देवाच्या संमतीनेंच होतो. कित्येक ठिकाणीं समाजाच्या संमतीनें मनुष्यवध होत असतो. पंजाबच्या वायव्य कोंपऱ्यावर डोंगरांत राहणारी एक पठाणांची जात आहे तींत ज्याच्या हातानें मनुष्य मारिला गेला नाहीं असा मनुष्य क्वचित् आढळतो. आपण किती मनुष्यें मारिलीं ही गोष्ट प्रत्येक मनुष्य अ-

भिमानानें नेहमीं ध्यानांत ठेवीत असतो. रानवट स्थितींत अनियंत्रितपणानें मनुष्य राहत असला म्हणजे त्याची स्थिति साहजिकच अशी होते हें अलीकडे घडून आलेल्या उदाहरणांवरून चांगलें व्यक्त होतें. क्यालिफोर्निया येथें सोन्याच्या प्राप्तीसाठीं गेलेले युरोपियनलोक निःशंकपणें आपापसांत खून करूं लागले, व किती खून केले ह्याचें स्मरण ठेविण्याकारितां प्रत्येकजण आपल्या पिस्तुलाच्या किंवा तरवारीच्या मुठीवर तितक्या रेघा कोरून ठेवीत असे.

आतां व्यक्तीव्यक्तींत घडून येणाऱ्या मनुष्यवधाचा विचार सोडून टोळ्यांटोळ्यांत किंवा राष्ट्रांराष्ट्रांत परस्परांच्या वैमनस्यामुळें होणाऱ्या मनुष्यवधाकडे वळूं. एका टोळीनें किंवा राष्ट्रानें दुसऱ्या टोळीवर किंवा राष्ट्रावर आपला कांहीं अन्याय केल्याचा खरा आरोप ठेवून युद्ध उपस्थित करावें व पाहिजे तशी मनुष्यांची कत्तल उडवावी हा प्रकार फार प्राचीनकाळापासून चालत आला आहे. अशा प्रकारच्या मनुष्यवधांत मोठा लौकिक आहे असें आजपर्यंत लोक मानीत आले आहेत. ह्या संबंधानें प्राचीन लोकांचे विचार कसे होते तें पाहूं.

प्राचीन हिंदुलोकांच्या देवांपैकीं इंद्र हा शत्रूंचा विध्वंस करणारा बलाढ्य योद्धा होता. ऋग्वेदांत अशा अर्थाचीं विशेषणें देऊन त्याची अनेक प्रसंगीं स्तुति केलेली आहे, आणि अग्नीला सुद्धां शहरांचा विध्वंस करणारा आणि जन्मतःच शत्रूचा घात करणारा असें म्हटलें आहे. देवांशीं प्रतिस्पर्धा करणाऱ्या ऋग्वेदांतील व

" कोणाचीही क्षमा न करणाऱ्या शस्त्राप्रमाणें मी आहें. मीं बंडखोर सरदारांचीं शरीरें सोललीं व त्यांच्या चर्माचें राजवाड्याच्या घुमटावर आच्छादान घातलें, आणि त्यांच्या बायकामुलांना होमकुंडांत जाळून टाकिलें. " दुसरा शाल्मनेसर ह्यानें आपल्या शत्रूंविषयीं असें लिहिलें आहे कीं:—

" लोंकर रंगवावी त्याप्रमाणें मीं त्यांच्या रक्तानें पर्वत रंगविले. " अशा प्रकारचे लेख कोरविण्याचा उद्देश उघड दिसतो कीं पुढील लोकांनीं आपले पराक्रम वाचून थक्क व्हावें. ह्यावरून सहजच लक्षांत येईल कीं, जीं कृत्यें आपणांस अमानुषपणाचीं व निर्दयपणाचीं वाटतात तीं त्यावेळीं त्यांस तशीं वाटत नसून उलट शूरपणाचीं, प्रतिष्ठा देणारीं व स्तुत्य वाटत असत. तसें न म्हणावें तर असीरियन् राजांनीं जाणूनबुजून आपली दुष्कीर्ति अजरामर करून घेतली असें म्हणावें लागेल. परंतु असें होणें मनुष्यस्वभावाविरुद्ध आहे.

ईजिप्शियन्, पर्शियन्, ग्रीक, मासिडोनियन् आणि रोमन् ह्या लोकांच्या इतिहासांतही क्रूरपणाचीं कृत्यें स्तुत्य मानिलीं जात ह्याविषयीं भरपूर पुरावा मिळण्यासारखा आहे. परंतु त्याजकडे दुर्लक्ष्य करून यूरोपाच्या उत्तर भागांतील लोकांमध्यें कोणत्या प्रकारच्या समजुती दृष्टीस पडत होत्या तें पाहूं. पूर्वी फ्रान्स देशाला गाल हें नांव होतें व तेथील लोकांनाही गाल म्हणत असत. हे लोक युद्धांत यशस्वी होऊन परत येतांना शत्रूंचीं शिरें घोड्याच्या खोगिराशीं टांगून घरीं आणीत असत, व तीं प्रसिद्ध ठिकाणीं खांबांवर

लटकावून देत किंवा संग्रहणीय वस्तु म्हणून पेट्यांतून बाळगून ठेवीत. सीझर ह्यानें लिहिलें आहेः—

"स्लेव्ही आणि सामान्यतः सर्व जर्मनलोक आपल्या संस्थानाच्या सीमेसभोंवतालचा बराच मुलूख ओसाड असतो ह्याबद्दल मोठा अभिमान बाळगितात."

नार्स लोकांची स्वर्गाविषयीं कल्पना अशी होती कीं त्याठिकाणीं सदासर्वकाल युद्धसंग्राम चाललेले असावयाचे. ह्या गोष्टीवरून त्या वेळच्या लोकस्थितीचें अनुमान करितां येतें. यूरोपाच्या इतिहासांत ज्या कालाला मध्ययुग* किंवा मध्यकाल म्हणतात त्या वेळीं तर शौर्यबलानें शत्रूंना जेरीस आणणें व त्यांना पाहिजे तसें लुटणें ह्यांतच काय तो पुरुषार्थ मानिला जात होता, ही गोष्ट अगदीं ढळढळीत दिसून येते. त्या वेळचा इतिहास म्हणजे केवळ राष्ट्रांराष्ट्रांच्या मारहाणीचा व दरोडेखोरीचा इतिहास असें म्हटलें तरी चालेल. यूरोपांतील सरदारघराण्यांत प्रत्येक घराण्याचें एकेक ब्रीद (माटो) असतें.

---

* यूरोपाच्या इतिहासांत ५ व्या शतकापासून १५ व्या शतकापर्यंतच्या कालाला मध्ययुग म्हणण्याचा प्रघात पडला आहे. ह्या कालाचें मुख्य लक्षण म्हटलें म्हणजे पारतंत्र्य हें होय. धार्मिक, सामाजिक, राजकीय व बुद्धिविषयक व्यवहारांत स्वातंत्र्य म्हणून कोठें नजरेस पडत नसे. धर्माच्या कामांत पोप म्हणेल ती पूर्व दिशा. सामाजिक व्यवहारांत कोणत्या तरी कारणानें ज्या रूढि पडून गेल्या असतील त्यांचें राज्य चालावयाचें. राजकीय व्यवहारांत तर फ्यूडल सरदार व राजे त्यांच्या करड्या अंमलापुढें लोकांस मानही वर करण्याची सोय नव्हती. विद्येच्या कामांत प्राचीन तत्त्ववेत्त्यांनीं जें लिहून ठेविलेलें असेल तें वेदवाक्य. जिकडे पहावें तिकडे जुलमाचें साम्राज्य, अशी एकंदर स्थिति होती.

ह्या ब्रीदाचा वाचक एकादा शब्द किंवा शब्दसमुदाय असतो. कधीं एक किंवा अनेक वाक्येंही असतात. मध्ययुगापासून बऱ्याच अलीकडल्या काळापर्यंत यूरोपांतील लोकांच्या समजुती कशा होत्या हें दाखविण्याला ह्या ब्रीदांइतकें सोपें दुसरें साधन नाहीं रोझलीनचा अर्ल ह्या घराण्याचें ब्रीद " लढा " हा शब्द आहे. हाकेचा व्यारन ह्याचें " मारा "; सेक्स्टनच्या अर्लचें " जिंकणें म्हणजे जगणें "; डाउनशायरच्या मार्किसचें " देवाच्या कृपेनें आणि तरवारीच्या बळानें मी जिंकीन "; क्यारिसफोर्टच्या अर्लचें "हा शत्रूचा हात आहे "; मेगालेच्या कौंटाचें " रक्तानें भरलेल्या हाताला यश मिळो "; अथोलेच्या ड्युकाचें " बाहेर पडा, संपत्ति मिळवा आणि कैदी पकडून आणा" व मिडल्टन् घराण्याच्या ब्रीदाचें स्पष्टीकरण एका कवितेंत केलें आहे, तिचें भाषांतर येणेंप्रमाणें:—

" तरवार, भाला आणि ढाल ह्यांनीं मला पृथ्वीवरील सर्व पदार्थांचें स्वामित्व दिलें आहे. ज्याला माझ्याबरोबर भाल्यानें युद्ध करण्याचें सामर्थ्य नसेल त्यानें मला शरण आलें पाहिजे व आपल्या जमिनी आणि द्राक्षवेलींचे ताफे माझ्या स्वाधीन केले पाहिजेत. कारण रणभीरु लोकांचें सर्वस्व माझें आहे. " हीं ब्रीदें त्या त्या वेळचें लोकमत व्यक्त करणारीं आहेत. त्यांच्या योगानें त्या त्या घराण्यांविषयीं लोकांमध्यें पूज्यबुद्धि व वचक उत्पन्न होत असत. त्याचप्रमाणें तीं अभिमानसूचक व प्रतिष्ठासूचक मानिलीं जात असत व अजूनही तीं तशीं मानिलीं जातात. ह्यावरून त्यांपासून व्यक्त हो-

णाऱ्या जुलमाला समाजाची संमति होती असें स्पष्ट दिसतें. आणि शूर योद्ध्याला सरदारपणाचे हक्क देतांना एक धर्मसंबंधी संस्कार करावा लागत असे ह्यावरून त्या सरदारांच्या पुढल्या जुलमी आयुष्यक्रमाला धर्माचेंही अनुमत मानिलें जात होतें हें उघड आहे. त्यावेळीं निष्कारण लढाई उत्पन्न करण्याला सुद्धां प्रवर्तकनीतीची संमति असे.

हल्लीं जरी बराच फेरबदल झाला आहे तरी पूर्वींच्या संस्काराचा परिणाम अगदीं नाहींसा झाला नाहीं. धर्मपुस्तकांत प्रतिपादिलेल्या नीतीवरील श्रद्धेच्या सूक्ष्म आच्छादनांतून पूर्वींच्या उग्रस्वरूपाची झांक वारंवार दृष्टिगोचर होते. देवालयांत ईश्वराच्या प्रार्थनेचें स्तोत्र म्हटल्यानें मनुष्याच्या वृत्ति जितक्या उचंबळित होतात त्याच्या शतपट वीरपुरुषांच्या पराक्रमांचे पोंवाडे ऐकिल्यानें होतात. वीरपुरुषांच्या पराक्रमांचे इतिहास व लढायांचीं वर्णनें ह्यांच्या वाचनाची लोकांस जितकी गोडी असते तितकी दुसऱ्या कोणत्याही प्रकारचे ग्रंथ वाचण्याची नसते. आलेक्झांडर, कार्ल, पीटर, फ्रेडरिक आणि नेपोलियन ह्यांनीं अनेक निर्दयपणाचीं कृत्यें केलीं असतांहीं त्यांच्या नांवापुढें 'धि ग्रेट' ही श्रेष्ठत्वसूचक पदवी जोडिली आहे. धर्मनीतीशीं विसंगत असे विचार जरी बहुतकरून पडद्याच्या आडून बाहेर पडत असतात तरी केव्हांकेव्हां त्यांचा स्पष्टपणें उल्लेख केलेलाही नजरेस पडतो. लार्ड वूल्सली सैन्यांतील शिपायांच्या संबंधानें म्हणतोः—

" त्यांचा नेहमीं असा विश्वास असला पाहिजे कीं,

सुदैवानें जें शिपाईगिरीचें काम आपणांस मिळालें आहे तें मिळण्याचें भाग्य फार थोड्या लोकांच्या वांट्यास येतें; इतर व्यवसाय करून शांतपणें आयुष्य घालविणाऱ्या लोकांचा तिरस्कार करण्यास त्यांस शिकविलें पाहिजे "

ज्या शिपाईगिरीच्या कामाला युरोपियन लोक एवढा मान देतात त्याचें वास्तविक स्वरूप तरी काय असतें? स्वदेशावर परचक्र आलें असतां किंवा देशांतल्या देशांत बंडाळी उपस्थित झाली असतां त्यांचें निवारण करणें एवढेंच त्या शिपायांचें कर्तव्य असतें काय? हल्लींच्या दिवसांत हें कर्तव्य बजाविण्याचे त्यांना कधींकधीं तरी प्रसंग येतात काय? ह्या प्रश्नांचें उत्तर उघडच 'नाहीं' असें द्यावें लागेल. तर मग पराक्रमी योद्धयांचा आणि अगदीं साध्या शिपायांचा देखील लोकांना जो एवढा अभिमान वाटतो तो कोणत्या कामगिरीबद्दल? एकाद्या राष्ट्राचें नष्ट झालेलें स्वातंत्र्य त्याला परत मिळवून देण्याकरितां काय? छे! छे! त्यांचीं अभिमान बाळगिण्यासारखीं कृत्यें फार वेगळींच आहेत. स्वतंत्र राष्ट्रांचें स्वातंत्र्य नष्ट करून त्यांस घशाखालीं उतरविण्याचे कामीं जें त्यांचें शौर्य दिसून येतें त्यांबद्दल त्यांची एवढी चोहोंकडे प्रशंसा चाललेली असते! बरें, ज्या राष्ट्रांशीं सामना केला जातो तीं तरी बरोबरीच्या नात्याचीं असतात काय? छे, ती गोष्ट बोलूं नका. तीं बरोबरीच्यांशीं होतां होईल तों प्रसंगच आणावयाचीं नाहींत. त्यांची जी तरवार चालते ती गायबापड्यांवर. वाघानें बकरीला गिळंकृत करण्यांत जें शौर्य दाखवावें

तेंच युरोपियन राष्ट्रें गरीब बिचाऱ्या लोकांचे देश का-
बीज करण्यांत दाखवितात! तथापि राज्यतृष्णेचें सा-
मर्थ्य फार मोठें आहे. तिच्यामुळें मनुष्याला लाज आ-
णणारीं नीचपणाचीं कृत्येंही थोरपणा पावतात व तीं
करणारांचें गौरव केलें जातें. हिंदूंच्या पौराणिक कथा
वाचतांना एकाद्या योद्धयानें स्त्रीचा पराभव केल्याचें
वर्णन आलें कीं असल्या लज्जास्पद गोष्टींचें कवीनें गौ-
रव केलेलें पाहून त्यांना आश्चर्य वाटतें. त्याचप्रमाणें
कार्नाक येथील देवळाच्या * भिंतीवरील चित्रें पाहून
त्यांना आश्चर्य वाटतें. ह्या चित्रांत ईजिप्तचा राजा ति-
सरा रामेसीस ह्याचें राक्षसासारखें चित्र काढिलें आहे
व तो लहानलहान सहा माणसांचे केश हातांत एकत्र
धरून तरवारीच्या एका घावाबरोबर त्या सर्वांचीं डोकीं उ-
डवीत आहे असें दर्शविलें आहे. हीं चित्रें रामेसीस
ह्यानें तयार करविलेलीं आहेत. अशा रीतीनें दुर्बलांवर
जय मिळविला असें दाखविण्यांत त्यास काय प्रतिष्ठा
वाटली असेल ती वाटो, असें म्हणून असल्या गोष्टींवि-
षयीं ते आपली तिरस्कारबुद्धि दाखवितात. परंतु दूर

* ईजिप्टदेशांत कार्नाक येथें ईजिप्शिअन्‌लोकांचें एक अति-
विस्तीर्ण देवालय आहे. त्यानें व्यापिलेली जागा ४२०००० चौ-
रस फूट आहे. ह्या देवालयांत एक प्रचंड दिवाणखाना आहे
त्याच्या इतकें भव्य दालन जगांत दुसरें कोठें नाहीं. त्याची
लांबी ३४२ फूट व रुंदी १७० फूट आहे. त्यांत नऊनऊ खां-
बांच्या १४ रांगा आहेत. त्यांतील प्रत्येक खांबाची उंची ४३
फूट व व्यास ९ फूट आहे आणि मधल्या दोन रांगा सहासहा
खांबांच्या आहेत त्यांतील प्रत्येक खांब ६२ फूट उंच असून
त्याचा व्यास १२ फूट आहे. ह्या देवालयाच्या भिंतींवर ईजि-
प्टच्या अनेक राजांचीं चित्रें रंगविलेलीं व खोदिलेलीं आहेत.

अंतरावर नेमकें निशाण मारितां यावें अशासाठीं कौशल्यानें केलेल्या बंदुका व तोफा घेऊन लढणाऱ्या व उत्कृष्ट रीतीची कवाईत शिकलेल्या लोकांनीं ओबडधोबड शस्त्रें वापरणाऱ्या अशिक्षित लोकांस जिंकणें म्हणजे मोठ्या मनुष्यानें लहान मुलास जिंकण्याप्रमाणें असतां, अशा कृत्यांचे वर्तमानपत्रांतून पोंवाडे गायिले जातात. आणि ज्या सरदारांच्या हातून हें अलौकिक कृत्य घडतें त्यांजवर पदव्यांचा आणि बक्षिसांचा वर्षाव केला जातो. असलें शिपाईगिरीचें काम मोठ्या लौकिकाचें! आणि त्याशीं तुलना केली असतां इतर व्यवसाय तुच्छ!

हल्लींच्या सुधारलेल्या राष्ट्रांच्या ह्या स्थितीवरून कित्येक गोष्टी निर्विवाद सिद्ध होतात. दुसऱ्यावर आपलें वर्चस्व स्थापित करण्याची मनुष्याची इच्छा अद्यापि बरीच प्रबल आहे व राष्ट्रांराष्ट्रांतील व्यवहारांत तिचें स्वरूप विशेष स्पष्ट रीतीनें दिसून येतें. सारासारविचार न करितां अधिकृत पुरुषांच्या आज्ञा पाळण्याची मनुष्याला जी संवय झाली आहे तीही अद्यापि कायम आहे. अधिकृत पुरुषांचा हुकूम सुटल्याबरोबर योग्य कारणांची अपेक्षा न करितां विनाकारण शत्रु म्हणून मानिलेल्या लोकांची कत्तल करण्याला त्यांना दिक्कत वाटत नाहीं. समाजाचें ह्या वर्तनाला अनुमत असतें व लोकमताचेंच प्रतिबिंब प्रत्येक व्यक्तीच्या मनांत पडलेलें असल्यामुळें प्रवर्तकनीतीच्या दृष्टीनें परकीय राष्ट्रांशीं अशा प्रकारचें वर्तन करणें हें स्तुत्य कृत्य मानिलें जातें.

वरील विवेचनांत जें शत्रुभावात्मकनीतीचें स्वरूप व्यक्त केलें आहे त्याचा अत्युग्रपणा रानटी लोकांत व वि-

शेषतः मनुष्यभक्षक रानटी लोकांत दिसून येतो. नंतर जसजसें मनुष्याचें पाऊल सुधारणेच्या मार्गांत पुढेंपुढें पडत जातें तसतसा ह्या स्वरूपाचा भयंकरपणा कमी होत जातो, व आपल्या टोळींतल्या लोकांसंबंधानें मित्रभावात्मकनीतीच्या कल्पनांचा उदय होऊं लागतो. मित्रनीतीच्या विकासाचाही परिणाम शत्रुनीतीवर घडतो व त्यामुळें सुधारणेच्या मध्यमावस्थेंतील लोकांत शत्रुनीतींचें स्वरूप थोडेंसें सौम्य होतें. हल्लींच्या सुधारलेल्या राष्ट्रांत जरी हें स्वरूप बरेंच सौम्य झालें आहे तरी त्याचा अजून मनुष्याच्या मनावर बराच अंमल आहे. कोणत्याही राष्ट्राच्या वैभवाचा व मोठेपणाचा विचार कर्तव्य असतां नवे नवे देश काबीज करण्याची त्याच्या अंगांत किती शक्ति आहे, म्हणजे परराष्ट्रांतील लोकांची कत्तल उडवून त्यांस लुटण्याचें सामर्थ्य किती आहे ह्या गोष्टींचा विचार केला जातो; व त्याबरोबरच त्या राष्ट्रांतील लोकांचे परस्परांशीं व्यवहार सुरळीतपणें चालून मनुष्याच्या तृष्णेला योग्य मर्यादेंत ठेविलें जातें कीं नाहीं ह्या गोष्टीचाही विचार केला जातो. थोडक्या शतकांच्या पूर्वीं पहिल्याच गोष्टीवरून राष्ट्राचें वैभव ठरविलें जात असे, परंतु अलीकडे दिवसेंदिवस पहिल्या गोष्टीकडे कमी लक्ष्य दिलें जाऊन दुसरीकडे अधिक दिलें जात आहे.

ज्या प्राचीन लोकांमध्यें सुधारणेचें पाऊल बरेंच पुढें पडलें होतें व ज्यांमध्यें अनेक कवि, ज्ञानी व तत्त्ववेत्ते निर्माण होऊन त्यांच्या विचारांनीं भरलेला ग्रंथसंग्रहही बऱ्याच स्वरूपास आला होता, त्या लोकांत शत्रुनीती-

चें महत्त्व कमी करणाऱ्या मित्रनीतीच्या विचारांचा उदय होऊं लागलेला स्पष्ट दिसून येतो. आतां कवींच्या व तत्त्वज्ञान्यांच्या विचारांवरून सामान्यलोकांच्या समजुतींचें मान समजणार नाहीं हें खरें आहे. शत्रूंना देखील क्षमा करावी असा उपदेश हजारों हरिदास कीर्तनाचे प्रसंगीं करीत असले तरी त्यावरून लोकस्थितीची जशी कल्पना करितां येणार नाहीं; किंवा ख्रिस्तीधर्मोपदेशकांच्या नीतिपर व्याख्यानांवरून जशी ख्रिस्तीलोकांच्या नीतिमत्तेची कल्पना करणें बरोबर होणार नाहीं, त्याचप्रमाणें पूर्वींच्या कित्येक व्यक्तींच्या विचारांवरून त्यावेळची लोकस्थिति समजणार नाहीं. तथापि पुष्कळ पिढ्या शांततेचा अनुभव मिळाल्यानंतर अनेक विचारी लोकांच्या मनांत परार्थाविषयीं विचार येऊं लागले व त्यांचा ते वारंवार उल्लेख करूं लागले ह्या गोष्टींवरून मनुष्याच्या समजुतींत कसकसा फरक पडत चालला हें लक्ष्यांत येतें. त्याचप्रमाणें केवलस्वार्थाच्या बुद्धीनें अस्तित्वांत आलेल्या भयंकर शत्रुनीतीतील कंटाळून कित्येक मनुष्यांचें मन कसें एकदम मागें परतलें व तोल न सांवरतां फारच दुसऱ्या बाजूकडे झुकलें हेंही फार उत्कृष्ट रीतीनें समजतें. विचारी लोकांना केवलस्वार्थाचा इतका तिटकारा आला कीं ते निःसीमपरार्थाकडे वळले व त्याचा उपदेश करूं लागले. महाभारतांत हे दोन्ही प्रकारचे विचार दिसून येतात. ह्या प्रकरणांत दिलेल्या पूर्वींच्या कित्येक उताऱ्यांत दर्शविल्याप्रमाणें पहिल्यापहिल्यानें शत्रुनीतीचें प्रोत्साहन करणारे विचार आढळून येतात, परंतु पुढें-

पुढें विचारांची दिशा अगदीं बदललेली दिसते. विनाकारण युद्धसंग्राम माजविणें हें अयोग्य, असें पुढील भागांत प्रतिपादन केलें आहे. जय मिळविण्याचें युद्ध हें अगदीं कनिष्ट प्रतीचें साधन असून राजानें जो राज्यविस्तार करावयाचा तो युद्धावांचून केला पाहिजे अशा प्रकारचीं विधानेंही आढळतात. मनुष्याच्या जुलमी स्वभावाविषयीं तर पुष्कळ ठिकाणीं नापसंती दर्शविली आहे. पुढील अर्थाचे श्लोक महाभारतांत आहेत.

"लोकांनीं ज्याप्रमाणें तुझ्याशीं वागावें असें तुला वाटतें त्याप्रमाणेंच तूं लोकांशीं वाग. ज्या प्रकारचें वर्तन शेजाऱ्यानें आपणाशीं करूं नये असें तुला वाटत असेल त्या प्रकारचें वर्तन तूं आपल्या शेजाऱ्याशीं करूं नको. इतर मनुष्यें आत्मवत् आहेत अशी कल्पना करून मनुष्यानें वर्तनाचे नियम ठरविले पाहिजेत."

इसवीसनापूर्वींच्या तिसऱ्या शतकांतल्या एका हिंदु नीतिशास्त्रज्ञानें पुढील अर्थाचें परमावधीचें विधान केलें आहे.

" ज्या सत्पुरुषाच्या मनांत आपल्या शत्रूविषयीं खरी उपकारबुद्धि वास करीत असेल तो त्याच्या हातून मरण पावण्याच्या प्रसंगींही त्याचें अनिष्ट चिंतणार नाहीं."*

---

* अगदीं अशाच अर्थाचें नव्हे, परंतु अशाच प्रकारचा विचार ज्यांत प्रदर्शित केला आहे असें एक पद्य शार्ङ्गधर नामक जुन्या संस्कृत सुभाषितसंग्रहांत आढळतें. तें रविगुप्त नामक कवीनें केलेलें असून बरेंच जुनें असावेंसें वाटतें. तें पद्य असें:—" सुजनो न याति विकृतिं परहितनिरतो विनाशकालेऽपि। छेदेपि चंद-

त्याचप्रमाणें प्राचीन पर्शियन् लोकांमध्येंही असे वि-
चार आढळून येतात. सादीच्या ग्रंथांत पुढील वाक्यें आहेत.

“ आपल्या शत्रूंवर देखील ममता करा. ”

“ मीं असें ऐकिलें आहे कीं ईश्वराचे खरे भक्त आ-
पल्या शत्रूंना देखील दुःख देत नाहींत. ”

चिनी लोकांमध्यें लाओ झी म्हणून एक तत्त्ववेत्ता
होऊन गेला त्याचा उपदेश येणेंप्रमाणें आहेः—

“ आपल्या राज्यांत शांतता राखणें हें राजाचें मु-
ख्य काम आहे. मनुष्यवधापासून ज्याला आनंद होतो
त्याच्या हातांत सत्ता देणें योग्य नाहीं. पुष्कळ लो-
कांच्या मरणाला जो कारण होतो त्याला त्याबद्दल रड-
ण्याचा प्रसंग आला पाहिजे. ”

कन्फ्यूशिअस म्हणतोः—“राज्यकारभारांत मनु-
ष्यवधाचें प्रयोजन नाहीं. जें चांगलें असेल त्याची तु-
म्हांला आवड असूंद्या व ती स्पष्टपणें लोकांना कळूं द्या,
म्हणजे लोक आपोआप चांगले होतील. ” मेन्शिअस
ह्याचें असें मत होतें कीं, मनुष्यवधाचा ज्याला कंटाळा
असेल अशा म[illegible] मनुष्य। [illegible]न साम्राज्य स्थापित हो-
णें शक्य आहे. सांवरतां फार [illegible]कांच्या संबंधानें तो
ष्ट रीतीनें समज.
म्हणतोः—

तिटकारा
“ एकाद्या प्रदेशाचे.. मालकांसाठीं जर दोन रा-
ष्ट्रांत युद्ध सुरू झालें तर इतक्या मनुष्यांची कत्तल उ-

---

नतरुः सुरभयति मुखं कुठारस्य ॥” ह्या आर्येच्या पूर्वार्धांत विना-
शकाल शत्रूकडूनच प्राप्त झालेला असावा असा स्पष्ट उल्लेख
नाहीं, परंतु उत्तरार्धांत जी उपमा घेतली आहे तींत शत्रुनाश
करीत असतांही त्यावर उपकार केलेले स्पष्ट आहेत.

इते कीं, मेलेल्या माणसांच्या प्रेतांनीं तो प्रदेश भरून जाऊं शकेल. त्याचप्रमाणें जर एकाद्या शहराविषयीं तंटा पडला तर तें शहर प्रेतांनीं भरून जाईल इतक्या माणसांची कत्तल उडते."

सदरील तत्त्ववेत्ते जरी फार प्राचीनकाळीं होऊन गेले, तरी त्यांचे हे विचार हल्लींच्या प्रौढी मिरविणाऱ्या पाश्चात्यांच्या विचारांपेक्षां श्रेष्ठ आहेत. गुलामांच्या व्यापारांत मनुष्याच्या दुष्टपणाची कमाल दिसून येते असें युरोपियनलोक म्हणत असतात परंतु हे तत्त्ववेत्ते जिवंत असते तर गरीब लोकांचे देश घशाखालीं उतरविण्याकरितां उपस्थित केलेल्या लढायांत मनुष्याच्या दुष्टपणाची कमाल दिसून येते असें त्यांनीं म्हटलें असतें.

'समाजशास्त्राचीं मूलतत्त्वें' ह्या पुस्तकांत अनेक उदाहरणें देऊन असें दाखविलें आहे कीं, जे लोक पर राष्ट्रांतील लोकांशीं तंटेबखेडे उत्पन्न करून त्यांचे वाटेस जात नाहींत ते आपापसांतही एकमेकांवर जुलूम करीत नाहींत. अशा लोकांत खुनाचे किंवा शरीराला दुखापत केल्याचे प्रसंग इतके क्वचित् घडून येतात कीं, हे प्रसंग नाहींसे करण्यासाठीं कायदे वगैरे करण्याची अवश्यकता नसते. त्या ठिकाणीं न दिलेलीं कांहीं उदाहरणें येथें घेऊं. सुमात्रा बेटांतील मूळचे राहिवासी लोक कधीं कोणाचे वाटेस न जाणारे असे आहेत. त्यांना मलायांतील लोकांनीं त्या बेटाच्या मध्यप्रदेशाकडे हांकून लाविलें आहे. त्यांचे संबंधानें मार्स्डेन लिहितोः— "ते लोक गरीब, सुखासमाधानानें राहणारे आणि सहनशील आहेत." हिमालयाच्या पायथ्याशीं अरण्यांत

राहणारे ठारू म्हणून लोक आहेत. त्यांचा प्रदेश डोंगराळ ठिकाणीं अगदीं एका बाजूस असल्यामुळें बाहेरच्या लोकांपासून त्यांना मुळींच त्रास झालेला नाहीं. ते लोकही नेहमीं शांततेनें राहणारे व सुस्वभावी आहेत. अमेरिकेंतील इंडियन लोकांत इरोकोई म्हणून लोक आहेत त्यांचें उदाहरण येथें उत्कृष्ट तऱ्हेनें लागू पडतें. त्यांच्या संबंधानें मार्गन म्हणतोः—

" इरोकोई लोकांनीं जी जूट केली होती तिचा मुख्य उद्देश शांतता राखणें हा होता व त्याबद्दल त्यांना मोठा अभिमान वाटत असे. इंडियनलोकांचा दिवसेंदिवस नाश होत जाण्याचें कारण एकसारख्या लढाया करीत राहण्याचा त्या लोकांचा स्वभाव होय, हें त्यांच्या लक्ष्यांत येऊन चुकलें होतें. हें कारण नाहींसें करण्यासाठीं त्यांचा सर्व यत्न होता. "

त्यांच्या शांततेच्या व्यवस्थेचा कसा परिणाम झाला त्याबद्दल ह्याच ग्रंथकारानें पुढील वाक्य लिहिलें आहे.

" भयंकर गुन्हे व साधारण अपराधही त्यांच्या व्यवस्थेमुळें इतके कमी झाले कीं इरोकोई लोकांना फौजदारी कायद्याची जरूरच लागली नाहीं. "

आपणाला ह्या ठिकाणीं मुख्य मुद्दा इतकाच घ्यावयाचा कीं, ज्या स्थितींत नेहमींच्या लढायांमुळें सर्वकाल अस्वस्थता असते व लोकांच्या अंगांत क्षात्रधर्माचें वारें शिरलेलें असतें त्या स्थितींत मारहाण करण्याची लोकांना संवयच होऊन जाते व तशा कृत्यांना समाजाचें व कधींकधीं धर्माचेंही अनुमत मिळतें. असें झालें म्हणजे स्वभावतःच तशा वर्तनाला प्रोत्साहन दे-

णाऱ्या समजुती बनत जातात. परंतु लोकस्थिति भिन्न असली म्हणजे निराळा परिणाम होतो. ज्या लोकांमध्यें नेहमीं शांतता असते त्यांना मारहाणीचीं कृत्यें अगदीं तिरस्करणीय वाटतात व त्यांचा निषेध करणाऱ्या समजुती लोकांमध्यें उत्पन्न होतात.

हीब्र्यू लोकांमध्यें हे दोन्ही प्रकार घडून आलेले दिसतात. परकीयांनीं पादाक्रान्त केल्यामुळें त्यांच्या आपापसांतील कलागती नाहींशा झाल्या, व पुढें युद्धें करून स्वराज्य स्थापित केल्यानंतरही शिपाईगिरीच्या बाण्याची फारशी अवश्यकता राहिली नाहीं. मग त्यांना जसजसा शांततेचा अनुभव मिळत गेला तसतसे त्यांचे सांग्रामिक कालांत उत्पन्न होणारे अत्यंत स्वार्थाचे विचार नाहींसे होत जाऊन स्वस्थतेच्या कालांतील परार्थाच्या विचारांचा उदय होऊं लागला. ह्या विचारांची उन्नति होतां होतां त्यांच्या लेव्हिटिकस नामक पुस्तकांत पुढील तत्त्वाचा उदय झालेला आढळतो:—"तूं स्वतःवर जितकी प्रीति करितोस तितकीच आपल्या शेजाऱ्यावर कर." हें वर्तनतत्त्व ख्रिस्तीधर्मानेंच प्रथम घालून दिलें असा पुष्कळांचा समज आहे, परंतु तें मूळचें यहुदीलोकांचें आहे. त्यावेळीं हा वर्तनाचा नियम स्वजातीयांपुरताच म्हणजे यहुदीलोकांपुरताच असावा असें दिसतें. पुढें ह्या कल्पनांचा अधिकाधिक विकास होत जाऊन येशूख्रिस्त व त्याचे शिष्य ह्यांनीं त्यांची परमावधि केली. ज्याप्रमाणें मित्राशीं वर्तन करावयाचें त्याचप्रमाणें शत्रूंशींही करावें व एका गालावर कोणीं चपराक मारिली असतां लागलाच दु-

सरा गाल त्याचेपुढें करावा असा उपदेश ते करूं लागले.

आतां ह्या सर्व उदाहरणांपासून काय निष्पन्न होतें तें पाहूं. विचार करून पाहिलें असतां हीं सर्व एका सामान्य सिद्धान्ताचीं विशेष स्वरूपें आहेत असें दिसून येईल. त्या सामान्य सिद्धांताचें दिग्दर्शन कित्येक ठिकाणीं केलेलें आहे परंतु आतां त्याचा स्पष्ट उल्लेख करणें जरूर आहे. तो करण्यापूर्वी इतकेंच सांगणें अवश्य वाटतें कीं, पुराव्यांत क्वचित् प्रसंगीं जरी थोडासा विसंगतपणा वाटला तरी त्याचा एकंदर झोंक कोणीकडे आहे व स्थूलमानानें त्यावरून कोणती गोष्ट सिद्ध होते हें पाहिलें पाहिजे. अशी दृष्टि ठेविली असतां पुढील सिद्धांताचें प्रतिबिंब वर दिलेल्या प्रत्येक उदाहरणांत कमी-अधिक प्रमाणानें दिसून येईल. तो सिद्धांत असा:—"टोळ्यांटोळ्यांतील व राष्ट्रांराष्ट्रांतील वैमनस्यें व युद्धें ह्यांचें अस्तित्व ज्या प्रमाणानें असेल त्या प्रमाणानें लोकांच्या मनावर शत्रुनीतीचें प्राबल्य राहील. अनेक टोळ्यांचा व राष्ट्रांचा परस्परांशीं संबंध आल्यामुळें जशी शत्रुनीति उत्पन्न होते तशीच एका समाजांतील लोकांचा परस्परांशीं संबंध आल्यामुळें मित्रनीति उत्पन्न होते. ह्या दोहोंचीं तत्त्वें परस्परांशीं अगदीं विरुद्ध असतात व त्यांचा परस्परांवर बराच परिणाम होत असतो. तथापि जोंपर्यंत शत्रुनीतीच्या विचारांचें मनुष्याच्या मनांत प्राबल्य असतें—व निदान आजपर्यंत तरी सुधारलेल्या राष्ट्रांतही तें बरेंच दिसून येतें.—तोंपर्यंत मित्रनीतीचे विचार मागें राहून मनुष्यें एकमेकांवर जुलूम करण्यास प्रवृत्त होतात."

प्रस्तुत प्रकरणाच्या आरंभींच मनुष्यवधाच्या ज्या अनेक प्रकारांचा विचार केला आहे (बालवध; मनुष्य-भक्षकपणामुळें होणारा मनुष्यवध; स्त्री, सेवक, मित्र वगैरे मनुष्यांचें सहगमन; आणि देवांसाठीं मनुष्ययज्ञ. ) ते सर्व प्रकार ज्या समाजांमध्यें लढाया व दंगेधोपे यांची विपुलता असते त्यांत आढळून येणारे आहेत. मनुष्यभक्षकपणांत ज्यांनीं पहिला नंबर मिळविला आहे त्या फिजियन् लोकांना नेहमीं आपला जीव मुठींत धरून असावें लागतें. त्यांच्या हाडीं खिळलेलें युद्धौत्सुक्य त्यांच्या स्वर्गाविषयींच्या समजुतीवरून व्यक्त होतें. त्यांच्या स्वर्गांत एकसारख्या लढाया चाललेल्या असतात. त्यांचे देवही मोठे युद्धप्रिय आहेत. " ते परस्परांशीं इतक्या निकरानें लढतात कीं, सरतेशेवटीं ते एकमेकांस मारितात व खाऊन टाकितात. " त्यांचीं नांवेंही असल्या गुणांचींच दर्शक आहेत. ' खून करणारा ', ' कत्तल उडविणारा ', ' शरीरें फाडणारा ' अशा अर्थाचीं त्यांचीं नांवें आहेत. त्यांचे मोठमोठे योद्धे मेल्यानंतर स्वर्गांत गेले म्हणजे " मीं पुष्कळ शहरांचा विध्वंस केला व लढाईंत अगणित लोक मारिले" अशी प्रौढी मिरवीत असतात. आणि एकही शत्रु ज्यांच्या हातून मरण पावला नसेल त्यांना जितकी म्हणून मानखंडना होण्यासारखी शिक्षा देतां येणें शक्य असेल तितकी दिली जाते. आफ्रिकेंतील सेआन् ( बुशमेन् ) लोकांना युद्धाचा वगैरे संबंध नसतांना माणसें मारण्यांत मोठें शतकृत्य केलें असें वाटत असतें. ते लोक नेहमीं सभोंवतालच्या मनुष्यांशीं व जनावरांशीं

मारहाण करीत असतात. त्याचप्रमाणें युद्धांत मरण न येतां जर दुसऱ्या कोणत्याही कारणानें आलें तर अत्यंत निंद्य असें समजणारे वेडुइन लोकही नेहमीं मारहाण करीत असतात. असलीं कांहीं कामें केल्याशिवाय त्यांच्या हातांची खुमखूम जिरत नाहीं. ज्यांच्या राजानें आपल्या हुजऱ्याला बापाचें डोकें उडवून त्याचें सरदारपण मिळविण्याविषयीं उपदेश केला—व त्यानें त्या उपदेशाप्रमाणें आचरणही केलें म्हणून पूर्वी सांगण्यांत आलेंच आहे—ते युगांडादेशांतील लोक संग्रामशीलतेविषयीं फार प्रसिद्ध आहेत. त्यांच्या सर्व सामाजिक व राजकीय व्यवहारांत हा त्यांचा गुण दृष्टिगोचर होत असतो.

शत्रुनीतीच्या उग्रस्वरूपाची ज्यांत परमावधि झालेली आहे अशीं हीं रानटी लोकांचीं उदाहरणें सोडून सुधारणेच्या मार्गांत थोडाबहुत प्रवेश केलेल्या लोकांकडे लक्ष्य दिलें असतां असें दिसून येतें कीं, त्या लोकांमध्यें परकी लोकांशीं क्रूरतेनें वर्तन करण्याचें मान जसजसें कमी झालें तसतसें आपआपसांतील जुलूमही कमी झाले. यूरोपांत मेरोव्हिंजियन कालांत* क्षात्रतेज

* तिसऱ्या-चवथ्या शतकाच्या सुमारास जर्मनी देशांतील फ्रांक लोक फ्रान्स, आस्ट्रिया वगैरे सभोंवतालच्या देशांत पसरूं लागले. त्यांत मर्विग्स नांवाच्या घराण्यांतील सरदारांच्या हुकुमांत राहणाऱ्या टोळींतील लोक शूर होते. त्यांनीं पांचव्या शतकांत फ्रान्सचा बराच भाग व्यापिला व मर्विग्स घराण्यांतील सरदारांनीं आपलें राज्य स्थापित केलें. त्यांच्या राज्याचा पुढें मोठा विस्तार झाला. त्या राजांना मेरोव्हिंजियन राजे असें म्हणत व त्यांच्या राज्याच्या आरंभापासून अखेरपर्यंतचा जो काल त्याला मेरोव्हिंजियन काल असें नांव पडलें आहे..

फारच चमकत होतें व त्यावेळीं लहान मोठ्याप्रमाणा-वर जिकडेतिकडे लढाया चालल्या होत्या. शहरांश-हरांत सुद्धां लढाया होत असत. त्या स्थितींत मनु-ष्याच्या जुलमी वर्तनाला ऊत आला होता. राजांनीं आपल्या राण्यांचे खून करावे, राजपुत्रांनीं लोभाविष्ट होऊन आपल्या बापांना परलोकीं पाठवावें. लहान रा-जपुत्रांनीं आपल्या हक्कांच्या आड येणाऱ्या मोठ्या भावांस मारावें व लोकांनीं राज्यकर्त्यांचेंच अनुकरण करून जि-कडेतिकडे कत्तल आणि मारहाण चालवावी असा प्र-कार चालला होता. पुढें शार्लमेन ह्याच्या कारकीर्दी-तही राज्यविस्ताराचें काम झपाट्यानें चाललें असतां कमी-अधिक क्रौर्याचीं कृत्यें पुष्कळ घडून आलीं. त्यानें एक दिवसांत चार हजार साक्सन् लोकांचीं डोकीं उ-डविलीं. आणि ज्यांनीं बाप्तिस्मा घेण्याचें नाकारिलें त्यांना देहान्त शिक्षा दिली. येशूख्रिस्ताच्या पुनरु-त्थानाच्या संबंधानें लेंट किंवा ईस्टर म्हणून एक सण ख्रिस्ती लोक पाळीत असतात. रोमनक्याथोलिक लोक ह्या सणाच्यासंबंधानें चाळीस दिवस उपोषण करितात. ह्या उपोषणाचा अर्थ इतकाच कीं, मांस, मत्स्य वगैरे प-दार्थ खावयाचे नाहींत. ज्या लोकांनीं त्या दिवसांत मांस खाल्लें त्यांचीही शार्लमेनानें तीच वाट लाविली. पुढें फ्यूडल सिस्टिमच्या* वेळीं राष्ट्रांराष्ट्रांत जशा लढाया होत

---

* मध्ययुगांत युरोपखंडांतील राज्यव्यवस्था फ्यूडल सि-स्टिमच्या अनुरोधानें चालली होती. राजा हा सर्व जमिनीचा मा-लक असून त्यानें ज्या लार्डांच्या ताब्यांत जमिनीचे निरनिराळे भाग दिलेले असतील त्यांनीं युद्धाचे वेळीं नियमित सैन्याची

तशाच सरदार लोक आपआपसांतही लढाया करीत. त्या वेळच्या इतिहासांत लहानमोठ्या चकमकी व घोर कृत्यें ह्यांवांचून दुसरें कांहीं आढळत नाहीं. सरदारलोकांनीं आपल्या हाताखालच्या शिपायांची किंवा गुलामांची कत्तल उडविणें ही अगदीं सामान्य गोष्ट समजली जात असे व तिच्याबद्दल कोणी कोणाला दोष

---

मदत केली व इतर प्रसंगीं ठरलेल्या कराराप्रमाणें वर्तन केलें तरच ते जमिनीचे भाग त्यांचे ताब्यांत रहावे, नाहींतर राजानें जप्त करावे अशी ह्या व्यवस्थेच्या संबंधानें मुख्य समजूत असे. एकदां जमिनी दिल्या म्हणजे वर सांगितल्याप्रमाणें कांहीं व्यत्यय आला नाहीं तर त्या वंशपरंपरेनें चालत. फ्यूडल लार्ड आपल्या जमिनींचे विभाग करून ते आपल्या अधिकारांत वांटून देत असत. ह्या लोकांना 'व्हासल' म्हणत. लार्डांचा राजाशीं जो संबंध असे तो व्हासलचा लार्डाशीं असे. फ्रान्सदेशांत फ्यूडल सिस्टिमला पहिल्यानें व्यवस्थित स्वरूप आलें. अकराव्या शतकांत वुइल्यम विजयी ह्यानें ज्यावेळीं इंग्लंडदेश जिंकिला, त्यावेळीं इंग्लंडांत फ्यूडल सिस्टिमचा प्रवेश करणें फारच सोपें गेलें. इंग्लंड देश बोलूनचालून वुइल्यमनें जिंकिला असल्यामुळें त्या सर्व देशावर त्याचीच सत्ता होती. त्यानें आपल्या सरदारांस जमिनी देऊन लार्ड केलें. आणि फ्रान्सांतली सर्व व्यवस्था इंग्लंडांत सुरू केली. हल्लीं जी सुधारलेली राज्यव्यवस्था सर्व यूरोपखंडभर दिसून येते ती फ्यूडल सिस्टिमपासूनच उत्क्रांत झाली आहे. फ्यूडल सिस्टिममुळें ज्यांच्या हातांत जमिनी गेल्या त्यांनाच पुढें प्रातिनिधिक व्यवस्थेंत मतें देण्याचा अधिकार मिळाला इंग्लंडांतील वडे लोकांची सभा ह्या फ्यूडल सिस्टिमचाच परिणाम होय. प्रातिनिधिक राज्यपद्धतीचा जसजसा शिरकाव होत गेला तसतशी मूळची फ्यूडल सिस्टिम मागें पडत चालली. व अखेरीस जमिनी ज्यांच्या त्यांजकडेच राहून चाकरीच्या बद्दल कराचे रूपानें पैसे घेण्याची सुरुवात झाली.

देत नसे. परंतु कालान्तरानें ही स्थिति बदलली व लहान-लहान राज्यें मोडून आणि सरदारांचें महात्म्य नाहींसें होऊन एकछत्री राज्यें स्थापन झालीं. राज्यव्यवस्थेंत सुधारणा होत गेल्यामुळें आपापसांतले कलह कमी झाले व औद्योगिक कलांकडे लोकांचें लक्ष्य लागून सहकार्यानें व श्रमविभागानें अंतःस्थिति सुधारली, आणि मनुष्यांचा बहुतेक काल उद्योगांत जाऊं लागला. ह्याचा परिणाम असा झाला कीं जुलमी वर्तनाचा लोकांना तिरस्कार वाटूं लागला व ज्या वर्तनांत इतरांविषयीं विचार केलेला दिसून येई त्या वर्तनाविषयीं लोकांत आवड उत्पन्न होऊं लागली. अलीकडल्या काळांतही युरोपियन राष्ट्रांमध्यें पुष्कळ युद्धें झालीं परंतु अलीकडच्या युद्धांत व पूर्वीच्या युद्धांत जमीनअस्मानाचें अंतर आहे. हल्लीं अंतर्व्यवस्था उत्तम असल्यामुळें शत्रुत्वानें वागणाऱ्या राष्ट्रांच्या सैन्यांमध्यें जरी लढाया झाल्या तरी इतर लोकांवर त्यांचा म्हणण्यासारखा परिणाम होत नाहीं. पूर्वीच्या सांग्रामिक कालांत युद्धें सुरू झाल्याबरोबर जिकडेतिकडे अंदाधुंदी होत असे व प्रत्येक मनुष्याला आत्मसंरक्षणासाठीं शिपाई बनावें लागत असल्यामुळें कोणाच्याही जिवाची एका क्षणाची देखील शाश्वती नसे. हल्लीं ती स्थिति अगदीं बदलल्यामुळें शत्रुनीतीच्या विचारांखालीं मित्रनीतीचे विचार अगदींच दडपून जात नाहींत. समाजशास्त्राच्या मूलतत्त्वांचें विवेचन करितांना त्या पुस्तकांत अशीं उदाहरणें दिलीं आहेत कीं, बरेच दिवस लोकांना शांततेचा अनुभव मिळाला म्हणजे त्यांच्या मनांवर मित्रनीतीच्या विचा-

रांचा पगडा बसावा व पुन्हां बंडाळी आणि दंगेधोपे ह्यांचें वास्तव्य सुरू झालें म्हणजे त्यांच्या विचारांत फरक पडत जाऊन शत्रुनीतीच्या विचारांचा पगडा बसावा, व अशीं त्यांचीं अनेक अंदोलनें व्हावीं. ह्या विचारांच्या फेरफाराबरोबर नीतिकल्पनांमध्येंही बदल होत होता हें सांगावयास नकोच.

## प्रकरण ४

## दरोडेखोरी

मारहाण करून दुसऱ्याच्या शरीराला इजा करणें किंवा त्याचा प्राण घेणें आणि त्याचें स्वातंत्र्य, श्रम अथवा मालमत्ता ह्यांचा अपहार करून त्याचें नुकसान करणें ह्या दोन गोष्टींचा बराच संबंध आहे व तो सहज लक्ष्यांत येण्यासारखा आहे. मागील प्रकरणांत जुलुमाच्या ज्या प्रकाराचें विवेचन केलें आहे त्याचें पर्यवसान नेहमीं रक्तस्रावांत होत असतें; परंतु ह्या प्रकरणांतील जुलुमाचा तसा शेवट होत नाहीं.

जुलुमाच्या ह्या प्रकाराची परमावधि म्हटली म्हणजे मनुष्याचें स्वातंत्र्य हरण करून त्याला कैद करून गुलाम करणें ही होय. वास्तविक अशा कृत्याला दरोडेखोरी म्हणणें म्हणजे ह्या शब्दाच्या अर्थाची थोडीबहुत ओढाताण करण्यासारखेंच आहे. तथापि थोडा विचार केला असतां असें दिसून येईल कीं, मनुष्याचें त्याच्या शरीरावरील स्वामित्व नाहींसें करून त्याचा उपयोग दुसऱ्यानें आपल्या हितासाठीं पाहिजे तसा करून घेणें ही पहिल्या नंबरची दरोडेखोरी होय असें म्हणण्यास हरकत नाहीं. सामान्य प्रकारच्या दरोडेखोरींत मनुष्यानें भूतकालीं आपल्या खुषीनें केलेल्या श्रमांचें फल त्याजपासून बळजबरीनें हिसकावून घेतलें जातें; परंतु ह्या विशेष प्रकारच्या दरोडेखोरींत भविष्यकालीं त्याजकडून जुलमानें जें काम करून घ्याव-

याचें असतें त्याचें फल त्याजकडून हिरावून घेतलें जातें; निदान अशा कृत्याला दरोडेखोरी हें नांव जरी योग्य नसलें तरी त्याचा 'जुलूम' ह्या सदरांत अंतर्भाव झाला पाहिजे व हा जुलुमाचा प्रकार जरी खुनाइतका भयंकर नाहीं तरी त्याच्या खालोखाल ह्याचें महत्त्व आहे.

मनुष्याच्या आद्यावस्थेंतील अंदाधुंदीच्या व लुटालुटीच्या काळापासून मनुष्यांना पकडून गुलाम करण्याची चाल अस्तित्वांत आहे व ती सांग्रामिक स्थितीचाच परिणाम होय ह्याबद्दल ह्या ठिकाणीं पुरावा देत बसण्याची जरूर नाहीं. टोळ्यांटोळ्यांमधील युद्धें जेथें सर्वकाल चालत असत तेथें एका टोळींतील लोकांनीं शत्रूंची दाणादाण उडविली तर, हातीं सांपडतील त्या लोकांना एक खाऊन तरी टाकावें किंवा बन्दिवान करून ठेवावे ह्यावांचून दुसरा इलाजच नव्हता. हल्लींप्रमाणें तह वगैरे होऊन केव्हां तरी लढाई संपण्याचा संभव असता तर शांतता झाल्यानंतर बन्दिवानांस परत आपल्या मुलुखांत पाठवितां आलें असतें. परंतु त्यावेळीं तसा कांहींच संभव नसे. त्यांना परत पाठविले तर ते उलट पुन्हां आपणांशीं लढण्यास येतील ह्या भीतीनें त्यांची कांहींतरी वाट लाविणें भाग पडे आणि कदाचित् तसा संभव असता तरी तशा स्थितींत इतका औदार्याचा विचार येणेंही शक्य नव्हतें. बन्दिवानांची कांहीं तरी वाट लावावयाची म्हणजे त्यांना फुकट तरी खाऊं घालावयाचें किंवा त्यांजकडून काम करून घेऊन त्यांस निर्वाहाचीं साधनें द्यावयाचीं. अर्थात् दुसरा मार्ग सुलभ होता व तो त्याहूनही सुलभ करण्याकरितां बन्दिवानांना विकून

टाकिण्याची वहिवाट सुरू झाली. पहिल्यापहिल्यानें लढायांत जे बन्दिवान सांपडत त्यांना गुलाम म्हणून विकण्याचा प्रघात पडला; परंतु पुढें जसजसा ह्या गुलामांच्या व्यापारांत फायदा दिसूं लागला तसतशा केवळ गुलाम पकडण्याच्याच उद्देशानेंही लढाया होऊं लागल्या. अनेक शतकेंपर्यंत पुष्कळ ठिकाणीं जमिनीची लागवड करण्याचें काम गुलामांच्या हातून होत होतें. गुलाम पकडून आणण्यासाठीं स्वाऱ्यांवर स्वाऱ्या कराव्या व जे लोक अडथळा करितील त्यांस कापून काढावें असा क्रम अनेक राष्ट्रांनीं चालविला होता. ह्या पहिल्या नंबरच्या दरोडेखोरीचें मुख्य कारण सतत चालणारीं युद्धें होत. त्यांच्या अभावीं ही चाल अस्तित्वांत येती ना.

ह्यासारखीच आणखी एका प्रकारची दरोडेखोरी आहे ती वर सांगितलेल्याही प्रकाराच्या आधींपासून अस्तित्वांत आली असावी. कारण, युद्धांत पराजित झालेल्या लोकांस पकडून गुलाम करण्याची चाल ज्या रानटी लोकांत नाहीं अशा कित्येक लोकांत ती आढळते. ही दरोडेखोरी बायका चोरून नेण्याच्या संबंधाची होय. युद्धांत जय मिळविल्यानंतर पहिलें काम शत्रूंच्या बायका हस्तगत करून घेण्याचें. मनुष्याच्या आद्यस्थितीपासून तों सुधारणेची बरीच मजल येईपर्यंत विजयी लोकांचें सर्वांत श्रेष्ठ बक्षीस म्हटलें म्हणजे शत्रूंच्या बायका. म्याक्लेनान नांवाच्या ग्रंथकारानें 'मनुष्याच्या प्राथमिक स्थितींतील विवाहाचे प्रकार' म्हणून पुस्तक लिहिलें आहे त्यावरून व ह्या विषयावरील इतर पुस्तकांवरून, चोरून किंवा बळजबरीनें बायका

नेऊन त्यांच्या खुषीविरुद्धही त्यांच्याशीं लग्न लाविण्याची चाल पुष्कळ लोकांत होती असें दिसतें. त्याच पुस्तकावरून असेंही दिसून येतें कीं टोळींतील लोकांची संख्या कायम ठेविण्यासाठीं कित्येक टोळ्यांतील लोकांना तसें करणें भागच पडे. आयत्या तयार झालेल्या बायका लढाईंत जिंकून किंवा चोरून आणिल्या म्हणजे लहानपणापासून मुलींची काळजी घेऊन त्यांना वाढवून मोठें करण्याची दगदग चुके. रानटी लोकांची गृहस्थिति मनांत आणिली म्हणजे त्यांजमध्यें मुलांची अनास्था होण्याचा किती संभव असतो व त्यामुळें लहान मुलांच्या मृत्यूंचें प्रमाण किती मोठें असूं शकेल हें सहज लक्ष्यांत येण्यासारखें आहे. जेथें ही चाल पिढ्यानूपिढ्या चालू राहिली तेथें तिला समाजाचें व नीतीचेंही अनुमत मिळालें. आह्मां ब्राम्हण लोकांत ज्याप्रमाणें एका गोत्रांतील स्त्रीपुरुषांनीं किंवा सपिण्डांनीं परस्परांशीं विवाह करण्याची सक्तमनाई आहे त्याप्रमाणेंच दुसऱ्या कित्येक लोकांत अशा प्रकारच्या चाली आहेत. त्यांचा उगम अत्यंत प्राचीनकालापासून अस्तित्वांत असलेल्या बायका चोरून नेण्याच्या प्रघातापासून असावा असा कित्येकांचा तर्क आहे. हा तर्क खरा असो किंवा खोटा असो, परंतु शत्रूंना जिंकिल्यानंतर त्यांच्या बायका पळवून नेणें ही अतिमूल्यवान् लूट असें विजयी लोक समजत असत हें निर्विवाद आहे. आणि पुष्कळ प्रसंगीं विजयी लोकांच्या हातून पुरुषांचा जरी शिरच्छेद केला जात असे तरी बायकांचें चांगल्या रीतीनें संरक्षण होत असे. कारण त्यांजपासून संतति

उत्पन्न व्हावी अशी जिंकणारांची इच्छा असे. आपल्या पौराणिक कथांतून बायका चोरून नेण्याच्या चालीविषयीं अनेक ठिकाणीं उल्लेख आहेत. प्राचीनकाळीं आपल्या लोकांत जे विवाहाचे आठ प्रकार होते त्यांत राक्षसविवाहाची गणना होती. राक्षसविवाह म्हणजे शुद्ध चोरून किंवा जबरीनें धरून आणिलेल्या स्त्रीशीं लग्न. अमेरिकेच्या पूर्वभागीं वेस्ट इंडीज नामक द्वीपसमूह आहे त्यांत क्यारिबी नांवाचें बेट आहे तेथील क्यारिब लोक ज्यावेळीं मनुष्यभक्षक होते त्यावेळीं त्यांजमध्यें तशीच चाल होती. हीब्र्यू लोकांच्या संबंधानें बायबलांतील जुन्या करारांत अशी हकीगत आढळते कीं, एका लढाईंत यशस्वी झाल्यानंतर मोझेस ह्यानें शत्रूकडील विवाहित स्त्रिया, पुरुष व मुलगे ह्यांची कत्तल करण्याचा हुकूम दिला, परंतु कुमारिकांना मात्र विजयी लोकांच्या उपभोगासाठीं राखून ठेविलें.

ह्या सर्व उदाहरणांवरून असें अनुमान निघतें कीं, ज्या समाजांची फारशी उन्नति झालेली नाहीं त्या समाजांतील लोकांच्या नीतिविषयक समजुती—प्रवर्तकनीतिविषयक समजुती असें म्हटलें असतां त्याहून बरें—ह्या प्रघाताच्या विरुद्ध नसतात. उलट त्याला उत्तेजन देणाऱ्या असण्याचा संभव विशेष. ईजिप्शियन् व असीरियन् लोकांमध्यें फार प्राचीन काळचीं भिंतींवर काढिलेलीं व दगडांवर खोदलेलीं चित्रें आढळतात, त्यांवरून त्यावेळीं बंदिवानांना कोणत्या प्रकारें वागवीत असत हें कळून येतें. ह्या चित्रांवरून केलेला तर्क त्या वेळच्या लेखांशींही जुळतो. त्यांच्या तसलीं चित्रें का-

दण्याच्या सामान्य प्रघातावरून तशा कृत्यांना त्या वेळीं समाजाची संमति असावी असें दिसतें. अशा समाजांत पुढें बंदिवानांना गुलाम करणें व त्यांच्या बायकांना उपभोगासाठीं ठेविणें अशा गोष्टींना संमति मिळणें बरेंच संभवनीय आहे. हीब्र्यू लोकांच्या ग्रंथांत ज्याप्रमाणें बंदिवानांना गुलाम करण्याच्या प्रघाताला कोठें दोष दिलेला आढळत नाहीं त्याप्रमाणेंच ग्रीक लोकांच्या ग्रंथांतूनही त्याचा तिरस्कारपूर्वक उल्लेख केलेला कोठें दिसून येत नाहीं. गुलामांच्या चालीप्रमाणेंच युद्धांत पकडून किंवा इतर रीतीनें बायका पळवून नेण्याच्या चालीसंबंधानें स्थिति होती. अशा रीतीनें हस्तगत झालेल्या स्त्रीला पत्नीस्थानापन्न करणें किंवा उपपत्नीदाखल ठेविणें हें दूषणास्पद समजलें जाण्याच्या ऐवजीं उलटें थोडेंबहुत भूषणास्पदच समजलें जात होतें. महाभारतांतील कित्येक स्थलांवरून प्राचीन आर्य लोकांमध्यें अशा कृत्यांना देवाचेंही अनुमत होतें असें समजलें जात असावें असा तर्क होतो. व हीब्र्यू लोकांमध्यें देवाचें अनुमत मानिलें जात नसलें तरी समाजाचें अनुमत होतें हें स्पष्ट आहे. बायबलाच्या जुन्या करारांत ‘ जजिस् ’ म्हणून एक पुस्तक आहे त्यांत हीब्र्यू लोकांच्या एका टोळींतील लोकांनीं आपणांसाठीं बायका कशा मिळविल्या त्याबद्दल हकीकत आहे. जाबेश गिलेड येथील पुरुष व विवाहित बायका ह्यांना ठार मारून तेथें चारशें कुमारिका सांपडल्या त्यांना बेंजामिनाच्या टोळींतील लोकांनीं आपल्या बायका केल्या. तथापि आणखी कांहीं लोक बायकांवांचून शिल्लक

राहिले त्यांनीं शिलो येथील स्त्रीपुरुषें एका सणाच्या दिवशीं नाचावयास जमलीं असतां त्यांच्यापासून त्यांच्या मुलींना जबरीनें नेलें. असल्या गोष्टी मोठ्या प्रमाणावर घडून येण्याला त्यांना समाजाचें अनुमत असावें लागतें.

दरोडेखोरीच्या ह्या विशेष प्रकारांचा विचार पुरा करण्यापूर्वी अलीकडील काळांत सुधारलेल्या लोकांमधून ते कसे समूळ नाहींसे झाले ह्याविषयीं थोडा उल्लेख केला पाहिजे. सांग्रामिक स्थितीचा जोर कमी होऊन जसजसें लोकांना स्वास्थ्य मिळूं लागलें व अनेक राष्ट्रांतील अंतर्व्यवस्था सुरळीत चालूं लागली तसतसें शत्रुनीतीच्या विचारांचें प्राबल्य कमी होत गेलें व मित्रनीतीच्या विचारांचा उदय होण्यास अवकाश मिळाला. पुढेंपुढें वरील प्रघातांचा लोकांना इतका तिटकारा वाटूं लागला आणि त्यांच्या विरुद्ध मनोवृत्ति व समजुती इतक्या प्रबल झाल्या कीं ते सर्वस्वी नाहींसे करण्याला फारशी पंचाईत पडली नाहीं.

युद्धांत यश संपादन करणें हें भूषणावह मानिलें गेल्यामुळें यशाच्या अनुषंगानें विजयी लोकांच्या हातून घडणाऱ्या अत्याचारांनाही चांगुलपण प्राप्त झालें. म्हणून पराजित झालेले शत्रु भक्ष्यस्थानीं पडले नाहींत तर त्यांस गुलाम करणें किंवा त्यांच्या बायका हिरावून घेणें ह्या गोष्टींप्रमाणेंच त्यांच्या वित्ताचा अपहार करणें ही गोष्ट देखील प्रतिष्ठादायकच मानिली जात होती. ह्या समजुतीचा स्वाभाविक परिणाम असा झाला कीं युद्धप्रसंगाशिवाय देखील शत्रूंवर दरोडे घालून

त्यांच्या मालमत्तेचें हरण करणें हें भूषणास्पद मानिलें जाऊं लागलें. रानटी स्थितींत अनोळखी मनुष्य म्हटला म्हणजे तो शत्रु मानिला जातो, मग तो स्वजातीय असो किंवा परजातीय असो. कारण त्या स्थितींत कोणाचाही अनुभव आल्याशिवाय त्याजवर कसलाही भरंवसा टाकण्याची सोय नसते. ह्यामुळें शत्रूंवर दरोडे घालण्यास जें अनुमत मिळालें त्याचा उपयोग अनोळखी मनुष्यांवर दरोडे घालण्याचे कामींही होऊं लागला. आपापसांत चोरी करणें व शत्रूंची किंवा परकी माणसांची चोरी करणें ह्या गोष्टी मात्र नेहमीं भिन्न मानिल्या जात होत्या व लोकांना पहिल्या प्रकारची चोरी वाईट असें वाटूं लागल्यानंतरही दुसऱ्या प्रकारची चोरी चांगली असें वाटत होतें. व अजूनही सुधारलेल्या लोकांच्या मनांतून देखील हे विचार साफ नाहींसे झाले नाहींत.

उत्तर अमेरिकेंतील इंडियन् लोकांत कोमांच म्हणून लोक आहेत त्यांजमध्यें कोणाही तरुण मनुष्याला शूर शिपायांत आपली गणना व्हावी असें वाटत असेल तर त्यानें कोठें तरी बहादुरी गाजविली पाहिजे; म्हणजे कोठें तरी दरोडा घालून पुष्कळशी लूट मिळवून आणिली पाहिजे. ह्या परीक्षेंत उतरल्यावांचून मनुष्य त्या पदवीला पात्र समजला जात नाहीं. त्या समाजांत पहिल्या नंबरच्या दरोडेखोरांना पहिलें स्थान मिळतें. पाटागोनिया देशांतील मनुष्य जर अनोळखी माणसाची चोरी करण्यांत पटाईत असेल तरच त्याच्या अंगीं बायकोचें पोट भरण्याचें सामर्थ्य आहे असें मानिलें

जातें व त्यानें लग्न करण्यास हरकत नाहीं असें लोकांस वाटतें. परंतु हा गुण मनुष्याच्या अंगांत नसेल तर तो मनुष्य निरुपयोगी समजला जातो. उत्तर आफ्रिकेंतील लोकांच्या संबंधानें लिव्हिंग्स्टन् म्हणतो:—

"इकडल्या कित्येक टोळ्यांतील लोकांना एकमेकांचीं गुरें चोरण्याची संवय आहे. हे लोक गुरांची चोरी आणि इतर प्रकारची चोरी ह्यांत नेहमीं फरक मानितात. त्यांच्या भाषेंत ह्या दोहोंना निरनिराळे शब्द आहेत. इतर प्रकारची चोरी करणें हें अनीतिकारक मानिलें जातें परंतु गुरांच्या चोरीचा तसा प्रकार नाहीं. त्यांची भाषा मला बरोबर येऊं लागण्यापूर्वीं तेथील एका सरदाराला मीं म्हटलें 'तुम्हीं त्या मनुष्यांचीं गुरें चोरिलीं.' त्यावर तो म्हणाला 'छे, छे, मीं तीं चोरिलीं नाहींत; मीं नुसतीं वळवून आणिलीं.' त्याच्या म्हणण्याचा भाव अशा रीतीनें गुरें आणणें ही चोरी नव्हे."

मोंगल लोकांत कालमक नांवाची जात आहे त्या जातींतील लोकांच्या संबंधानें पालास ह्यानें अशी माहिती दिली आहे कीं त्या लोकांना चोरीची आणि दरोडेखोरीची फार खोड आहे. परंतु आपल्या टोळींतील लोकांना मात्र ते उपद्रव देत नाहींत. तार्तार लोकांपैकीं किरघी लोकांच्या संबंधानें आट्किन्सन् तसेंच सांगतो. तो लिहितो:—

"किरघी लोकांमध्यें आपल्या टोळींतील माणसाचा घोडा किंवा उंट कोणीं चोरिल्यास त्याला तावडतोब शिक्षा होते. परंतु बाहेरच्या लोकांवर दरोडा घातला किंवा एकादें शहर लुटलें तर तें भूषणास्पद मानिलें जातें."

रानटी लोकांमध्यें सुद्धां जो ह्या दोन प्रकारच्या चोऱ्यांमध्यें भेद आढळतो त्यामुळेंच बहुधा कांहीं चमत्कारिक समजुती बनून कित्येक लुटारू टोळ्यांतील लोक पाहुणा घरांत असेल तोंपर्यंत त्याचे वाटेस जात नाहींत, परंतु तो घरांतून निघून गेला म्हणजे वाटेंत त्याला निःशंकपणें लुटतात. आपणांला अशा प्रकारचें वर्तन विसंगत वाटतें. परंतु वरच्यासारख्याच कांहीं कारणानें तें होत असलें पाहिजे. आट्किन्सन् लिहितोः—

"ज्यानें माझा पाहुणचार केला तो किरवी सरदार म्हणाला 'कोवाल्डोम् (हें दुसऱ्या एका किरवी सरदाराचें नांव होतें व त्याजकडे जाण्यास मी निघालों होतों) तुम्हांला तुम्ही त्याच्या घरीं असाल तोंपर्यंत त्रास देणार नाहीं; परंतु त्याचे लोक तुमच्या पाळतीवर असतील व तुम्ही वाट चालूं लागलेत म्हणजे ते तुम्हाला लुटतील.'"

लुटारू लोकांच्या टोळ्यांत चोरीला किती मान असतो हें तुर्क लोकांच्या उदाहरणावरून चांगलें लक्ष्यांत येण्यासारखें आहे. मर्व्ह येथील लोकांत अगदीं अलीकडल्या काळापर्यंत आपापसांत दरोडे घालणें हें देखील वाईट मानिलें जात नसे. मात्र ते दरोडे नांवाजण्यासारखे असावे लागत.

"टेकी लोकांमध्यें खून आणि दरोडेखोरी हीं प्रतिष्ठितपणें निर्वाह करण्याचीं साधनें समजलीं जातात. परंतु आश्चर्य करण्यासारखी गोष्ट ही कीं, बाजारांत विकावयास मांडिलेल्या पदार्थांपैकीं हळूच एकादा उचलणें हें त्या लोकांमध्यें तिरस्कार उत्पन्न करितें."

ही माहिती ओ डोनोव्हन ह्यानें दिली आहे. मर्व्ह येथील कौन्सिलांत ज्यावेळीं ओ डोनोव्हन ह्यानेंच कोणीं लुटालुटींच्या स्वाऱ्या करूं नयेत व दरोडे घालूं नयेत अशी आग्रहाची सूचना केली त्यावेळीं एका सभासदास फार राग आला व त्यानें जे उद्गार काढिले ते पुढें दिले आहेत.

"तो मुसलमान सभासद संतापाच्या व आश्चर्याच्या मुद्रेनें म्हणाला 'मी अल्लाच्या नांवानें तुम्हांस विचारितों कीं, हीं आमचीं निर्वाहाचीं साधनें जर बंद झालीं तर आम्हीं जगावें तरी कसें?'"

तुर्क लोकांच्या बहुतेक जातींमध्यें अशाच समजुती आहेत. पठाण लोकांमध्यें आईची अल्लाला नेहमीं अशी प्रार्थना असते कीं आपला मुलगा पटाईत दरोडेखोर निपजावा. शैनी ह्याच्या म्हणण्याप्रमाणें आफ्रिडी आया देखील अशाच प्रकारची प्रार्थना देवाजवळ करितात. तुर्क लोकांमध्यें नामांकित दरोडेखोरांची संतमालिकेंत गणना होते व त्यांच्या थडग्यांपुढें लोक देणीं देतात आणि प्रार्थना करितात. ह्या गोष्टींवरून त्यांच्या समजुतींबद्दल तर्क करितां येईल.

वर दिलेल्या बहुतेक उदाहरणांत टोळींतल्या लोकांमध्यें चोरी व टोळींच्या बाहेरच्या लोकांमधील चोरी ह्यांमध्यें भेद मानिला जातो; परंतु अशाही कित्येक जाति रानटी लोकांमध्यें आहेत कीं त्यांमध्यें ह्या दोन्ही अवश्यक व भूषणास्पद मानिल्या जातात. कुकी लोकांविषयीं डाल्टन म्हणतोः—

"भामटेगिरीच्या कसबाला त्या लोकांत जितका मान

मिळतो तितका दुसऱ्या कोणत्याही गुणाला किंवा दुर्गु-
णाला मिळत नाहीं. ”

त्याचप्रमाणें गिलमर लिहितोः—

“ मांगोलियांत नांवाजलेल्या चोरांची सभ्यलोकांत गणना होते. जोंपर्यंत ते आपलें काम शितापीनें करीत असतात व कधीं कोणाच्या तावडींत सांपडत नाहींत तोंपर्यंत त्यांना कोणताही कलंक लागत नाहीं. ”
एशियाखंडांतील अंगामि लोकांविषयीं पुढील हकीकत वाचण्यांत येतेः—

“ ते मोठे बिलंदर चोर आहेत. भामटेगिरींत त्यांना फार प्रतिष्ठा वाटते. कारण पूर्वींच्या स्पार्टन लोकांप्र-माणेंच चोरीविषयीं त्यांचें मत आहे. म्हणजे चोरी क-रीत असतां जर मनुष्य पकडला गेला तर मात्र ती चोरी अपमानास्पद व शिक्षेस योग्य अशी समजावयाची, परंतु शितापीनें केलेल्या चोरीची गोष्ट निराळी. ” अ-मेरिकेंतील चिनूक लोकांचें उदाहरणही असेंच आहे. शितापीची चोरी त्यांना प्रतिष्ठित वाटते परंतु अर्धवट चोरीचा ते तिरस्कार करितात व कधींकधीं तसली चो-री करणारांना ते शिक्षाही करितात. आफ्रिकेंतील ल-ढाऊ आणि क्रूर बागांडा लोकांमध्यें कोणत्याही अप-राधांत पकडलें जाणें हा गुन्हा समजला जातो. पालि-निशियांतील फिजियन् लोकांत

“ दुसऱ्याला समजल्यावांचून चोरी करितां येणें हा सद्गुण समजला जातो आणि अशा चोरीनें मिळविलेल्या पैशाशीं इतरांनीं संबंध ठेविणें हेंही निर्दोष समजलें जातें.”

ह्या उदाहरणांत शौर्य व चातुर्य ह्या गुणांनीं चोरीच्या कोणत्याही प्रकाराला चांगुलपण आलेलें दिसून येतें.

पूर्वींच्या लोकांविषयीं इतिहासावरून जो पुरावा मिळतो त्यावरून असें सिद्ध होतें कीं, जसजशीं भिन्न लोकांमधील वैमनस्यें व युद्धें कमी होत जातात व एकजातीयांमध्यें औद्योगिक व्यवहार सुरळीत चालूं लागतात तसतसा लोकांच्या नीतिविषयक समजुतींत फेरफार पडत जातो. ह्या फेरफाराचें स्वरूप मागील प्रकरणांत सांगितलेंच आहे.

ऋग्वेदांत देवांनीं केलेल्या चोऱ्यांविषयीं उल्लेख आहे.

मुषायद्विष्णुः पचतं सहीयान्विध्यद्वराहं तिरो अद्रिमस्ता.* । १. ६१. ७.

ह्या ऋचेंत विष्णूनें चोरी केल्याचें वर्णन आहे. तैत्तिरियसंहितेंत पुढील कथा आहे. त्वष्ट्रीच्या मुलाला इंद्रानें मारिलें होतें व त्या मुलासाठीं तिनें यज्ञ आरंभिला होता. त्या यज्ञांत इंद्राच्या अपराधाबद्दल त्याला त्याचा भाग देण्याचें नाकारल्यावरून इंद्रानें येऊन जबरदस्तीनें सोमरसाचें पान केलें. ह्यासंबंधानें पुढील अवतरण पहा.

---

* पचतं ह्या शब्दावरून कित्येक पाश्चिमात्य टीकाकार ह्या ऋचेच्या पूर्वभागाचा अर्थ विष्णूनें शिजलेलें अन्न ( यज्ञासाठीं तयार केलेलें ) चोरून नेलें असा करितात. आपले इकडील टीकाकार 'पचतम्' ह्याचा अर्थ 'परिपक्कं असुराणां धनम्' असा करितात. कांहीं घेतलें तरी मुष् धातूचा अर्थ चोरणें असाच आहे व चोरीबद्दलच ह्या ठिकाणीं पुरावा पाहिजे. शत्रूच्या धनाचें हरण करणें ही चोरी नव्हे असेंही म्हणतां येण्यासारखें आहे.

तं नोपाव्हयत पुत्रं मे वधिरिति। स यज्ञवेशसं कृत्वा प्रसह्य सोममपिबत्* ।

देवांच्या आचरणांत दिसून येणारें हें नीतितत्त्व मनुष्यांसाठीं घालून दिलेल्या नियमांतही स्पष्ट दिसत होतें.

क्षात्रधर्माविषयीं लिहितांना एका ठिकाणीं पुढील अर्थाचें वचन दिलें आहे.

" क्षत्रियांना दुसऱ्याच्या वित्ताची इच्छा करणें झाल्यास ती त्यांनीं आपल्या बाहुबलानें तृप्त करून घेतली पाहिजे. तिच्या तृप्तीसाठीं त्यांनीं याचना करणें कधींही योग्य होणार नाहीं. "

परंतु सर्वत्र शांतता झाल्यानंतर पुढील काळांत जे हिंदु ग्रंथकार उत्पन्न झाले त्यांनीं वरील तत्त्वाचा निषेध केला आहे व अगदीं विरुद्ध तत्त्वांचें प्रतिपादन केलें आहे.

आतां दुसऱ्या प्राचीन लोकांच्या इतिहासाकडे दुर्लक्ष्य करून यूरोपाच्या मध्यकालीन व अर्वाचीन इतिहासांतील कांहीं गोष्टींकडे लक्ष्य देऊं. डासेंट नांवाचा इतिहासकार नार्स लोकांविषयीं लिहितो:—

" सांगूनसंवरून उघडउघड रीतीनें दरोडे घालणें किंवा चांचेपणा करणें हीं कृत्यें त्या लोकांमध्यें भूषणाद समजलीं जात. "

प्राचीनकाळच्या जर्मनलोकांचीही तीच स्थिति होती. त्यांचें वर्णन करितांना सीझर म्हणतो:—

---

* त्यानें माझ्या मुलाचा वध केला आहे ह्यासाठीं तुम्ही त्याला बोलावूं नका. ( आपणांला बोलावींत नाहींत असें पाहून) त्यानें ( इंद्रानें ) यज्ञांत शिरून बलात्कारानें सोमरसाचें पान केलें.

" प्रत्येक संस्थानांतील लोक संस्थानाच्या सीमेबाहेर कोणीं दरोडे घातले असतां त्यांना दूषण देत नाहींत. एकादा चोरांचा नाईक जर मंडळींत उभा राहून म्हणाला ' मी तुमचा पुढारी होतों; आणि ज्यांना माझे मागून यावयाचें असेल त्यांनीं आपलीं नांवें सांगावीं ' तर ज्यांना तो मनुष्य आवडतो व त्याचें धाडस वाखाणणी करण्यासारखें वाटतें ते लागलेच उभे राहतात व त्याला मदत करण्याविषयीं वचन देतात; आणि असें करणाऱ्या मनुष्यांविषयीं एकंदर लोकमत फार चांगलें होतें. परंतु जे लोक त्याचे मागून जाण्यास तयार होत नाहींत ते विश्वासघातकी व टोळीच्या बाहेरचे समजले जातात आणि विश्वासाच्या गुप्त गोष्टी त्यांचे जवळ कोणी बोलत नाहीं. "

आपापसांतल्या किंवा राष्ट्रांराष्ट्रांतल्या सतत चालणाऱ्या लहानमोठ्या लढाया आणि लोकांमधील लहानमोठ्या चोऱ्या व दरोडेखोऱ्या ह्यांच्या परस्परांमधील संबंधाचा हजार–बाराशें वर्षांचा इतिहास क्रमवार पाहत जाणें फार त्रासाचें व कठिण काम होईल, ह्याकरितां यूरोपाच्या इतिहासांतून कांहीं निवडक प्रसंग घेऊन त्यावेळीं हा संबंध कसा होतो तें पाहूं. फ्रान्सदेशांत फ्यूडल सिस्टिम सुरू झाल्यानंतर जो काळ सुरू झाला त्यावेळच्या स्थितीविषयीं पाले म्हणतो:—

" आमचे प्राचीन ग्रंथकार अधाशीपणा, लोभ, कपट, खोटी शपथ घेणें, चोरी, लूट, दरोडेखोरी इत्यादि दुर्वर्तनाच्या प्रकारांचा तिरस्कारपूर्वक निषेध करितात. ह्याचप्रमाणें ज्यांना स्वतःच्या मताचें, नीतीचें किंवा

लोकमताचें भय बिलकुल वाटत नाहीं अशा मोकळ्या सोडलेल्या शिपायांच्या हातून घडणाऱ्या दुसऱ्या अत्याचारांचाही ते तिरस्कार करितात. ”

पण पुढें कशी स्थिति झाली ती पहा. इंग्लंड आणि फ्रान्स ह्यांच्या मध्यें लढाया सुरू झाल्या व त्या राहून राहून शंभर वर्षेंपर्यंत चालल्या होत्या. ह्या कारणावरून त्या युद्धाला ‘शतवार्षिक युद्ध’ असें म्हणण्याचा प्रघात पडला आहे. त्या कालांत दरोडेखोरी अगदीं साधारण गोष्ट होऊन गेली होती. सरदार लोक केवळ लुटीसाठीं लढायांस प्रवृत्त होत. जिकडेतिकडे लहानमोठ्या प्रमाणावर चोऱ्या आणि लुटालुटी चालल्या होत्या. असंख्य वाटमाऱ्ये व दरोडेखोर जिकडे ज्याला वाट सांपडली व धंदा चालला तिकडे पसरून गेलेले होतेच. परंतु त्यांशिवाय पाऊणशें वर्षांपूर्वींच्या आपल्या इकडील पेंढाऱ्यांच्या टोळ्यांप्रमाणें दरोडेखोरांच्या व्यवस्थित टोळ्या असत. त्यांनीं आपल्या संरक्षणासाठीं किल्ले बांधिले होते व त्यांत त्यांना निर्धास्तपणें राहतां येत असे. सभोंवतालच्या प्रदेशांत पाहिजे तितकी लूट करावी व ती किल्ल्यांत घेऊन जाऊन तेथें खुशाल चैनीनें रहावें, असा क्रम त्या दरोडेखोरांनीं आरंभिला होता. सांपडतील तीं बायकामुलें धरून आणावीं आणि मुलांना बारीकसारीक कामें करण्यास सांगून बायकांना अनीतीच्या मार्गास लावावें हे प्रकारही चाललेच होते. कोणाला कोठें प्रवास करावयाचा असल्यास एकाद्या दरोडेखोरांच्या टोळीला पुष्कळ पैसे देऊन तिच्या तर्फेनें कांहीं हत्यारबंद लोक

बरोबर घेतल्यावांचून बाहेर पडण्याची सोय नसे. जमिनीवर चाललेल्या ह्या प्रकारांना शोभण्यासारखे प्रकार समुद्रावरही चालले होते. मोठमोठ्या राज्यांतून आणि संस्थानांतूनच समुद्रावर चांचेपणा करण्यासाठीं गलबतें तयार करून पाठविलीं जात असें नाहीं, तर कांहीं शहरें व मोठमोठे श्रीमान् लोकही हा धंदा करण्याकरितां गलबतें पाठवीत असत, आणि जमिनीवरच्या दरोडेखोरांचें ज्याप्रमाणें किल्ले असत त्याचप्रमाणें समुद्रावर लुटालूट करणाऱ्या लोकांचीं ठिकठिकाणीं आश्रयस्थानें बांधिलेलीं असत. आतां जर्मनीकडे वळूं आणि तेथें जें तीस वर्षेंपर्यंत युद्ध चाललें होतें व ज्यामुळें त्याला 'त्रिंशद्वार्षिक युद्ध' असें नांव पडलें आहे त्या वेळीं कशी लोकस्थिति होती हें पाहूं. तेथेंही चोऱ्या आणि दरोडे सार्वत्रिक झाले होते. सैन्यांतले शिपाईच मुळीं दरोडेखोर बनून गेले होते. मग इतर लोक बनतील ह्यांत नवल नाहीं. त्यांचा लोकांना उघडपणें लुटण्याचा धंदा चाललाच होता, परंतु जेवढें हातास लागे तेवढ्यानें त्यांची तृप्ति होत नसे. ते माणसांचे नानाप्रकारें हाल करीत व कोठें कोणत्या प्रकारें द्रव्य लपवून ठेविलें आहे हें त्यांजकडून काढून घेत. शेतकऱ्यांना हत्यारबंद राहून नांगरणी व पेरणी करावी लागे. सैन्यांतील शिपाई ज्याप्रमाणें इतर गोरगरिबांना त्रास देत त्याचप्रमाणें वरचे अधिकारीही शिपायांपासून पैसा काढीत. अशा रीतीनें पुष्कळ सरदारांनीं अलोट द्रव्य मिळविलें. हा प्रकार येथेंच थांबला नाहीं. खुद्द राज्या-

धिकारी सुद्धां नाण्याच्या धातूंत अधिक हीण घालून लोकांना ठकवीत.

हा सर्व पुरावा कांहींसा गुंतागुंतीचा आहे खरा तरी अगदीं वरवर पाहणाऱ्यास सुद्धां दिसून येण्यासारखें आहे कीं, सर्व राष्ट्राला व्यापून टाकणारे युद्धप्रसंग आणि दरोडेखोरी ह्यांमध्यें पुष्कळ संबंध आहे. पूर्वीच्या स्थितींत व अलीकडल्या स्थितींत एक फार मोठा फरक पडला आहे. पूर्वी युद्धें सुरू झालीं म्हणजे सर्व देशभर अव्यवस्था माजे व कोणालाही आपल्या वित्ताची व जीविताची शाश्वती वाटत नसे. परंतु हल्लींचा प्रकार अगदीं निराळा आहे. अजून देखील अनेक वेळां युद्धप्रसंग येतात ही गोष्ट खरी आहे. तरी बहुतकरून लढणाऱ्या सैन्यांशिवाय इतर लोकांवर त्यांचा फारसा परिणाम घडत नाहीं, व जिकडेतिकडे चलबिचल न होतां सर्वत्र शांतता असते. ह्या प्रकरणांत दिलेल्या सर्व पुराव्यावरून असें अनुमान करितां येईल कीं जसजशी ह्या स्थितीकडे राष्ट्राची गति होत जाते तसतसा त्या राष्ट्रांतील लोकांचा अप्रामाणिकपणा कमी होत जातो व लोकांमध्यें प्रामाणिकपणाविषयीं आवड उत्पन्न होऊं लागते. हल्लींच्या सुधारलेल्या लोकांच्या समजुती व कायदे पाहिले असतां स्वदेशीयाला लुटणें हा जसा गुन्हा मानिला जातो त्याचप्रमाणें परदेशीयांना लुटणें हाही गुन्हाच मानिला जातो. आतां अजून देखील चोऱ्या होतात व नानाप्रकारचे लबाडीचे लपंडाव केले जातात हें कबूल केलें पाहिजे, तथापि पूर्वी ज्या प्रमाणावर हे प्रकार घडत असत त्या

प्रमाणावर हल्लीं ते घडत नाहींत व त्यांचें स्वरूपही तितकें भयंकर नाहीं हें निर्विवाद आहे. ज्या काळीं राजे लोक सावकारांकडून कर्ज काढीत आणि मागून त्यांना बुडवीत व व्यापारी लोक खोटें नाणें चालविण्याच्या बहादुरीबद्दल शेखी मिरवीत तो काल आणि हल्लींचा काल ह्यांमध्यें महदंतर पडलें आहे. त्या कालांत मनुष्याला स्वार्थावांचून दुसरें कांहीं दिसत नव्हतें. हल्लीं दुसऱ्या मनुष्यांनाही कांहीं हक्क आहेत व आपण ते त्यांचे राखिले पाहिजेत असें मनुष्याला वाटूं लागलें आहे. लोकांच्या हातून कसकसे कमी-अधिक गुन्हे घडत गेले ह्याविषयीं पाईक ह्यानें एक इतिहास लिहिला आहे. त्यावरून असें दिसून येतें कीं, इसवी सन १८१५ ह्या सालीं यूरोपांत ज्या युद्धाचा शेवट झाला तें युद्ध चाललें असतां लोकांच्या मालमत्तेचा नाश किंवा अपहार केल्याबद्दल घडून आलेले गुन्हे व अलीकडील काळांत घडून येणारे त्याच प्रकारचे गुन्हे ह्यांमध्यें पुष्कळच फरक आहे.

तथापि सांग्रामिक काल आणि चोरी व दरोडेखोरी ह्यांमधील संबंध स्पष्टपणें लक्ष्यांत येण्याला भांडखोर रानटी लोक आणि गरीब स्वभावाचे रानटी लोक ह्यांची तुलना केली पाहिजे. आरंभीं जे अनेक उतारे दिले आहेत त्यांत भांडखोर व नेहमीं लढाया करणाऱ्या लोकांमध्यें कशी स्थिति आढळते हें दर्शविलेंच आहे. आतां कोणाचे वाटेस न जाणाऱ्या कित्येक लोकांत कशी, स्थिति आढळते तें पाहूं.

हार्ट्सहार्न साहेबाच्या मतें रानांत राहणारे वेद्दा

लोक प्रामाणिक आहेत एवढेंच नव्हे तर त्यांना मनुष्यें अप्रामाणिक असतील असें वाटतच नाहीं. जो पदार्थ आपला नसेल तो घेण्याची मनुष्यास बुद्धि व्हावी तरी कशी हें त्यांना, मोठें गूढ वाटतें. एस्किमो लोकांना लढाई माहीतही नाहीं आणि अनेक प्रवाशांनीं दिलेल्या माहितीवरून ते लोक फारच प्रामाणिक आहेत असें समजतें. ज्याठिकाणीं ह्या लोकांचा युरोपियन लोकांशीं सहवास झालेला आहे त्याठिकाणीं मात्र त्यांच्या अंगचा चांगुलपणा बराच कमी झालेला आहे. अमेरिकेंतल्या इंडियनांपैकीं फ्यूजियन् लोकांविषयीं डार्विन साहेब लिहितातः—

"युरोपियन लोकांच्या गलबताशीं जर त्यांच्या बऱ्याच होड्या आलेल्या असल्या व एका होडीकडे कोणीं कांहीं पदार्थ फेंकिला असतां जर तो दुसऱ्या होडीच्या नजीक पडला, तर दुसऱ्या होडींतील मनुष्य तो पदार्थ उचलून पहिल्या होडींतील माणसांच्या स्वाधीन करितात."—

आणि स्नो साहेबाला त्यांच्याशीं व्यापार करण्याचे पुष्कळ प्रसंग आले त्यावेळीं त्यांचें वर्तन त्याला फारच सचोटीचें दिसून आलें. न्यूगिनीच्या दक्षिण किनाऱ्यावर राहणारे पाप्युअन् लोक आहेत ते एकमेकांपासून इतके अलग राहणारे आहेत कीं, युद्धाच्या प्रसंगींही त्यांच्यानें जूट होत नाहीं. ह्या लोकांच्या संबंधानें युरोपियन लोकांचा अनुभव देणारा एक ग्रंथकार लिहितोः—

"व्यापाराच्या संबंधानें देवघेवीच्या व्यवहारांत हे

लोक प्रामाणिकपणानें वागतात. निदान आपल्या लोकांत दिसून येतो त्यापेक्षां तरी ह्या लोकांचा प्रामाणिकपणा अधिक आहे. "

ह्याच लोकांच्या आणखी कांहीं जातींसंबंधानें काप्स लिहितो कीं डोरी येथील लोकांची

"योग्य आणि न्याय्य वर्तन करण्याकडे प्रवृत्ति आहे. आणि नीतीचीं तत्त्वें त्या लोकांमध्यें चांगलीं बाणलेलीं दिसतात. चोरी हा ह्या लोकांमध्यें मोठा गुन्हा समजला जातो व तो फारच क्वचित् घडून येतो."

लेटी येथील मूळच्या रहिवाशांच्या वर्तनाविषयीं कोल्फ ह्याचें तसेंच मत आहे. 'समाजशास्त्रांतील मूलतत्त्वां' त शांततेनें राहणाऱ्या लोकांच्या प्रामाणिकपणाबद्दल टोड, सांथाळ, लेप्का, बोडो, धीमल, कोल, चकमा आणि जाकुन इतक्या लोकांचीं उदाहरणें दिलीं आहेत. आणखी कांहीं उदाहरणें ह्या ठिकाणीं घेऊं. व्हेराक्रूझ येथील बेकर नामें एक वकील तेथील मूळच्या रहिवासी लोकांविषयीं लिहितोः—

"येथले इंडियन् लोक प्रामाणिक आहेत आणि चोरी करण्याला जरी उत्कृष्ट संधि असली तरी ती करण्याकडे सहसा त्यांची प्रवृत्ति होत नाहीं."

हे लोक आतां युरोपियन लोकांच्या अंमलाखालीं राहतात व त्यांना सैन्यांत नौकरी करण्याचा फार कंटाळा आहे. हिमालय पर्वताच्या पायथ्याशीं दलदलीचा आणि अरण्यांनीं व्यापिलेला एक लांबचलांब चिंचोळा प्रदेश आहे तेथील लोकांच्या संबंधानें नेस्फील्ड म्हणतोः—

"त्यांच्या प्रामाणिकपणाविषयीं शेंकडों गोष्टी ऐ-

कण्यांत येतात. अगदीं एकांतवासांत राहणाऱ्या ठारू लोकांचें वर्तन तरी फार प्रामाणिकपणाचें आहे."

इरोकोई लोकांच्या संबंधानें मार्गन लिहितोः-" अतिशय तिरस्कार करण्यास योग्य असा जो मनुष्यांमध्यें आढळून येणारा चोरीचा अपराध तो ह्या लोकांना फारसा माहीत देखील नाहीं." ह्या लोकांच्या संबंधानें आणखी एक गोष्ट ध्यानांत ठेविण्यासारखी आहे कीं, पुष्कळ जाती एकत्र जमून त्यांनीं एक जूट केली होती व त्या जुटीचा उद्देश त्या लोकांत शांतता राखण्याचा होता. ह्या त्यांच्या प्रयत्नांना चांगलें यशही आलें व पुष्कळ पिढ्या त्या लोकांनीं शांततेचा उपभोग घेतला.

# प्रकरण ५

## सूड घेण्याची बुद्धि

बुद्धिमान् प्राण्यांमध्यें जीवनार्थकलह सुरू होतोच. आणि जीवनार्थकलह असला कीं तेथें जुलूम आलाच. हिंस्र पशुपक्ष्यांचा जुलूम फारच भयंकर असतो. त्यांचें जीवन इतर प्राण्यांवर अवलंबून असल्यामुळें पुष्कळ गरीब प्राण्यांना जुलुमाचे पायीं प्राणास मुकावें लागतें. बलिष्ठ प्राणी आपापसांतही एक प्रकारचा जुलूम करीत असतात. भक्ष्यासाठीं त्यांच्यामध्यें स्पर्धा उत्पन्न झाली म्हणजे एकमेकांशीं लढण्याचा प्रसंग येतो. व ह्या जुलुमानें जरी प्राणनाश होत नाहीं तरी पुष्कळ प्रसंगीं प्राण्यांना मोठी इजा होते. प्रत्येक प्राणी भुकेनें व्याकुळ झाला म्हणजे जें भक्ष्य सांपडेल तें घ्यावयास तो पहात असतो व एकाच भक्ष्यासाठीं अनेक प्राणी यत्न करूं लागले म्हणजे तसा प्रसंग येतो. भक्ष्याच्या प्राप्तीसाठीं जसा प्राणी एकमेकांवर जुलूम करितात तसाच मादीच्या प्राप्तीसाठींही करितात. एका मादीच्या प्राप्तीविषयीं अनेक नरांना इच्छा झालीं कीं ते एकमेकांना जुलुमानें पिटाळून लाविण्याचा यत्न करितात. अशा प्रसंगींही त्यांजमध्यें मोठ्या झटापटी होऊन त्यांना वरीच इजा होते.

एका प्राण्यानें दुसऱ्यावर जुलूम केला म्हणजे दुसऱ्या प्राण्याला पहिल्यावर उलट जुलूम करण्याविषयीं बुद्धि होते; म्हणजे आपणावर झालेल्या जुलुमाचा प्रती-

कार करावा असें त्याला वाटतें. अशा रीतीनें ज्या दोन प्राण्यांचा संबंध येतो त्या दोघांजवळही लढण्याचीं साधनें असल्यास बहुधा ते त्यांचा उपयोग केल्याशिवाय राहणार नाहींत. विशेपतः ज्यावेळीं दोघांचेंही सामर्थ्य जवळजवळ सारखेंच असतें, म्हणजे ते दोघेही प्राणी एकाच जातीचे असतात, त्यावेळीं तर ते तसें केल्यावांचून राहणारच नाहींत. अशा प्राण्यांमध्येंच बहुतकरून चढाओढ फार लागते. आणि असें होणें स्वाभाविकच आहे. कारण एकाच जातीच्या प्राण्यांचें भक्ष्यही एकच असल्यामुळें त्यांचा एकमेकांशीं पुष्कळ संबंध येतो. आणि भक्ष्याचा पुरवठा बेताचा असला म्हणजे ज्या दुर्बल प्राण्यांचे अंगीं त्यांच्याच जातीच्या दुसऱ्या प्राण्यांनीं केलेल्या जुलमाचा प्रतीकार करण्याचें सामर्थ्य नसेल त्यांचा फार वेळपर्यंत निभाव लागण्याचा संभव नाहीं. कारण ज्याठिकाणीं हा दुर्बल प्राणी भक्ष्यार्थ जाईल त्याठिकाणीं भक्ष्य मिळण्यासाठीं त्या जातीचा दुसरा प्राणी आला म्हणजे ह्याच्या अंगीं प्रतीकाराचें सामर्थ्य नसल्यामुळें ह्याला ती जागा सोडून दुसरीकडे जावें लागेल आणि असें वारंवार घडून येऊं लागलें म्हणजे पोटभर अन्न न मिळाल्यामुळें ह्याला प्राणास मुकावें लागेल. जीवनार्थकलहाचे सपाट्यांत अशीच व्यवस्था नेहमीं होत असते, व ज्यांच्या अंगीं आपल्या जातीच्या इतर प्राण्यांशीं टक्कर देण्याचें सामर्थ्य असतें तेच टिकाव धरूं शकतात. हिंस्र प्राण्यांच्या त्यांच्या भक्ष्यस्थानीं पडणाऱ्या प्राण्यांशीं झटापटी व एकाच जातीच्या प्राण्यांमध्यें चढाओढीमुळें हो-

णाऱ्या झटापटी ह्या जीवसृष्टीच्या आरंभापासून अनिवार्य कारणांनीं सुरू झाल्या आहेत व हा कालपर्यंत सारख्या चालल्या आहेत.

झटापट म्हटली म्हणजे शारीरिक अपकारांची फार थोड्या वेळांत अनेक वेळां होणारी देवघेव होय. अपकार, प्रत्यपकार, प्रतिप्रत्यपकार असे एकामागून एक येऊन झटापट बनत असते. एका प्राण्यानें दुसऱ्याचा चावा घेतला कीं लागलाच दुसऱ्यानें पहिल्याचा घ्यावा व एकानें दुसऱ्याला ढुशी दिली तर लागलीच दुसऱ्यानें पहिल्याला द्यावी असा प्रकार चालतो. ही देवघेव बहुधा फार जलद एकसारखी चालते. परंतु नेहमींच तसें घडतें असें नाहीं. केव्हांकेव्हां ही अपराधांची फेड फार सावकाशीनें केली जाते आणि असें करण्यालाच सूड घेणें असें म्हणतात. कित्येक वेळां, मध्यें फारच थोडा वेळ जातो व असें झालें असतां पूर्वीचीच झटापट चालू आहे असें म्हणतां येईल. परंतु कधींकधीं दिवसांचे दिवस किंवा वर्षांचीं वर्षें मध्यें निघून जातात. अमुकच वेळ मध्यें गेल्यानंतर जी अपकारांची फेड केली जाते तिला 'सूड' म्हणावें असें निश्चयानें सांगतां येणार नाहीं. तथापि 'सूड' हें नांव मिळण्याला झटापटींत जितक्या अंतरानें ही देवघेव होत असते त्यापेक्षां पुष्कळच अधिक वेळ मध्यें जाणें जरूर असतें.

कोणीं कोणास दुखापत केली असतां ती लागलीच परत करण्याची किंवा तीबद्दल पाठीमागून सूड घेण्याची प्रवृत्ति प्राण्यांमध्यें स्वाभाविकरीतीनें उत्पन्न होते. आणि अशा प्रवृत्तीमुळें जुलूम करण्याच्या इच्छेलाही ब-

राच प्रतिबंध होतो. कारण आपण दुसऱ्यावर जुलूम केला तर त्याच्याकडून आपणास त्याचें प्रायश्चित्त तावडतोब किंवा कांहीं काळानें मिळेल अशी प्रत्येक प्राण्याला धास्ती असते.

मनुष्येतर प्राण्यांमध्यें जी स्थिति आढळते ती मनुष्यांमध्यें देखील त्यांच्या आद्यस्थितींत दिसून येते. त्यांच्यामध्यें परस्परांचा सूड उगविण्याची चाल पडते एवढेंच नव्हे, तर सूड घेणें हें मनुष्याचें कर्तव्यकर्म आहे असा समजही उत्पन्न होतो. आस्ट्रेलियनलोकांमध्यें ह्या संबंधानें काय समजूत आहे व तिचे परिणाम कसे होतात ह्याबद्दल सर जार्ज ग्रे ह्यानें अगदीं हुबेहुब चित्र उठविलें आहे.

"अतिनिकट संबंधाच्या मनुष्याच्या मरणाबद्दल सूड उगविणें हें तेथील लोकांचें अतिपवित्र व आद्यकर्तव्य समजलें जातें. आणि जोंपर्यंत हें कर्तव्य मनुष्याच्या हातून झालें नाहीं तोंपर्यंत वृद्ध स्त्रिया त्याला टोंचटोंचून खात असतात. तो विवाहित असला तर त्याच्या नायका देखील त्याला सोडून जातात. आणि अविवाहित असला तर एक देखील तरुणी त्याच्याशीं भाषण करावयाची नाहीं. त्याची आई एकसारखी अश्रु ढाळीत बसेल आणि असला कपाळकरंटा पोर आपल्या पोटीं न येता तर बरें असा विलाप करून ती अगदीं खिन्न होऊन जाईल. त्याचा बाप त्याचा धिक्कार करील आणि सगळीं माणसें त्याच्या तोंडावर त्याला काय पाहिजे तें वाईटवाईट बोलतील."

उत्तर अमेरिकेंतील लोकांपैकीं सायो लोकांचें उदाहरण

देण्यासारखें आहे. त्यांच्या संबंधानें बर्टन् म्हणतोः—

" ह्या लोकांची सूड घेण्याविषयींची बुद्धि फार विलक्षण आहे. ते जो द्वेष करितात तसला ह्या भूलोकीं सांपडणें कठिण आहे. त्याचा मासला यमपुरींतच आढळेल. त्यांना जर कोणीं कांहीं इजा केली आणि तो मनुष्य त्यांच्या तावडींतून निसटला, तर त्याच्या टोळींतला किंवा त्याच्या रंगाचा जो मनुष्य त्यांना आढळेल त्यावर ते आपला राग काढितात. "

दक्षिण अमेरिकेंतील एक उदाहरण स्कोंबर्ग साहेबांनीं दिलें आहे, तें असेंः—

" गयानादेशांतील एका मनुष्याला आपल्या नातलगावर कोणीं विषप्रयोग केल्याचा संशय आला. तेव्हां, हें दुष्टकृत्य करण्याबद्दल ज्याचा संशय आला होता त्याला व दुसऱ्या कांहीं माणसांना मारिल्यानंतर, एकदां त्यानें उद्गार काढिले ' अजून मीं पुरा सूड उगविला नाहीं. त्या दुष्ट कुटुंबांतलें एक मनुष्य अजून जिवंत आहे. ' "

फिजियन् लोकांच्या संबंधानें वुइल्यम्स ह्यानें दिलेलें वर्णन येणेंप्रमाणें आहेः—

" अगदीं मरणाचा समय येऊन ठेपला तरी देखील त्याला शत्रूचें विस्मरण होत नाहीं आणि त्या प्रसंगीं देखील तो त्याला क्षमा करीत नाहीं. मरतां मरतां तो आपल्या मुलांजवळ आपल्या शत्रूविषयीं सर्व सांगून ठेवितो. हें सांगण्यांत त्याचा हेतु असा असतो कीं त्याच्याविषयीं त्यांच्या मनांत पुरता द्वेष वाणावा व संधि सांपडेल तेव्हां त्यांनीं त्याला ठार करावें. कदाचित्

त्याचा एकादा मुलगाच त्याचा शत्रु असला तरी त्याच्याबद्दलही इतर मुलांजवळ सांगून ठेविण्यास तो कमी करीत नाहीं ! "

न्यू झीलंड येथील लोकांच्या संबंधानें टामसन् सांगतो कीं मेलेल्या आप्तावद्दल सूड न उगविणारा मनुष्य त्या लोकांमध्यें अत्यंत नीच समजला जातो. आतां एशियाखंडांतील कित्येक उदाहरणें घेऊं. कुकीलोकांच्या संबंधानें म्याक्ि म्हणतोः—

" सगळ्या रानटी लोकांप्रमाणें कुकीलोक मोठे वस्ताद सूड घेणारे आहेत. एका माणसाचें रक्त पडलें कीं त्याठिकाणीं दुसऱ्याचें पडलेंच पाहिजे. एकादा मनुष्य जर अपघातानें झाडावरून पडून मेला तर त्याचे सगळे नातलग त्या झाडाजवळ जमतात आणि त्याचे अगदीं बारीकबारीक धलपे करून टाकितात. "

आरब लोकांविषयीं असें वाचण्यांत येतें कीं:—

" रक्तस्रावाची गोष्ट आरब लोकांच्या मनांतून कधींही जावयाची नाहीं. अपराध्याचा पश्चात्ताप किंवा दीर्घकाल ह्यांचा त्यांच्या मनावर कांहींएक परिणाम व्हावयाचा नाहीं. सूड घेण्याची इच्छा बापाकडून मुलाकडे आणि मुलाकडून त्याच्या मुलाकडे अशी कांहीं पिढ्या वंशपरंपरेनें जात असते. "

आफ्रिकेच्या पूर्वभागीं राहणाऱ्या लोकांविषयीं बर्टन् लिहितोः—

" सूड उगविण्याची इच्छा हा ह्या लोकांमध्यें फार प्रबल मनोविकार आहे. अगदीं जवळच्या संबंधाच्या लोकांमध्यें हाडवैर उत्पन्न होऊन ज्या लढाया सुरू

होतातें त्या एकेक पिढी चालत असतात. त्यांच्या वर्तनाचा बराच भाग ह्या मनोविकारामुळें घडून येणाऱ्या क्रियांनीं व्यापिला आहे. ”

ह्या सर्व उदाहरणांत सूड घेणें हें स्पष्टपणें किंवा अस्पष्टपणें नीतीच्या दृष्टीनें कर्तव्य आहे असें मानिलें जातें.

सुधारलेल्या लोकांच्या प्राथमिक स्थितीचा विचार केला असतांही वरील समजुतीं विषयीं स्पष्ट पुरावा सांपडतो. डेनिंग ह्यानें ‘ प्राचीनकाळचें जपान ’ ह्या पुस्तकांत तेथील विद्याखात्यानें प्रसिद्ध केलेल्या मुसाहीच्या चरित्राचें भाषांतर दिलें आहे. त्यांत जिकडेतिकडे लढाया आणि खून ह्यांशिवाय कांहीं दिसत नाहीं. हिंदु लोकांच्या प्राचीन पुस्तकांतून तीच स्थिति आढळते. ही ऋग्वेदांतील ऋचा पहाः—

*अग्ने त्वचं यातुधानस्य भिन्द्धि हिंस्राशनिर्हरसा हंत्वेनं । प्र पर्वाणि जातवेदः शृणीहि क्रव्यात्क्रविष्णुर्विचिनोति वृक्णं ॥ १०. ८७. ५.

आणि लोकांनीं देवांवर ज्या गुणांचा आरोप केला ते गुण त्यांजमध्यें पूर्णपणें होते. ह्या त्यांच्या प्रार्थनेच्या ऋचा पहाः—

---

* हे अग्ने, तूं यातुधान राक्षसाची त्वचा विदारण कर; नंतर तुझें संहार करणारें वज्र त्याला ताप देणारें होत्सातें त्याचें हनन करो. (मग) त्या वध केलेल्या राक्षसाचें शरीरच सांध्यांचे ठिकाणीं तोडून त्याचीं पेरें कर. आणि ज्याच्या शरीराचे तुकडेतुकडे झाले आहेत अशा त्या यातुधान राक्षसाला मांसाची इच्छा करणारे लांडग्यासारखे प्राणी खाऊन टाकोत

इंद्रासोमा[*] तपतं रक्ष उब्जतं न्यर्पयतं वृषणा तमोवृधः ।
परा शृणीतमचितो न्योषतं हतं नुदेथां नि शिशीतमत्त्रिणः ॥
इंद्रासोमा समघशंसमभ्यघं तपुर्ययस्तु चरुरग्निवाँ इव ।
ब्रह्मद्विषे क्रव्यादे घोरचक्षसे द्वेषो धत्तमनवायं किमीदिने ॥
७. १०४. १,२.

महाभारतांतील भयंकर युद्धाच्या इतिहासांत सूड घेण्याची बुद्धि जिकडेतिकडे ओतप्रोत भरलेली दिसते. आणि तिची मजल कोठेंकोठें शत्रूच्या प्रेताचीही दुर्दशा करण्यापर्यंत गेली आहे. हीब्र्यू लोकांची स्थितिही आर्य लोकांच्या स्थितीहून भिन्न नव्हती. हिंदुलोकांनीं ज्याप्रमाणें आपल्या देवांना सूड उगविणारे बनविले आहेत त्याचप्रमाणें हीब्र्यू लोकांनींही आपल्या देवाला बनविला आहे. आमालेकाइट† लोकांचें नांव पृथ्वीवरून समूळ नाहींसें करून टाका म्हणून हीब्र्यू लोकांना जहोवानें (देवानें) आज्ञा केली होती. ती पुढें साल आणि साम्युएल ह्या दोघांनीं पुरी केली. ही पुरी

---

* अहो इंद्रसोमांनो, राक्षसांना ताप देऊन त्यांचा नाश करा. अहो इच्छिलेलें देणाऱ्या देवांनो, त्या अज्ञानानें भरलेल्या राक्षसांना खालीं फेंका त्यांना पळवून लावा. त्यांना दग्ध करा. त्यांना मारा आणि त्या खादाडांचा अगदीं नाईनाट करून टाका. अहो इंद्रसोमांनो, ह्या दुष्ट राक्षसावर दोघेही उठा. तो तुमच्या तेजानें तप्त होऊन अग्नींत टाकिलेल्या आहुतीप्रमाणें जळून जावो. तो ब्राह्मणांचा द्वेष करणारा, मांस खाणारा आणि उग्रस्वरूपी राक्षस सर्वकाल निरवयव राहील असें करा. ( त्याचा समूळ नाश करा ).

† हे लोक प्राचीनकाळीं पालेस्टाइन प्रांताचे आसपास राहत होते. त्यांबद्दल जुन्या करारांत पुष्कळ ठिकाणीं उल्लेख आहे. त्यांचा पुढें हीब्र्यू लोकांनीं समूळ उच्छेद करून टाकिला.

करितांना साल व साम्युएल ह्यांनीं एकूणएक आमालेकाइट लोकांना मारिलें एवढेंच नव्हे, तर त्यांचीं गुरेंढोरें सुद्धां मारून टाकिलीं. हा एक मासला सांगितला. अशीं दुसरीं पुष्कळ उदाहरणें आहेत. देवाच्या वर्तनांत दिसून येणारी सूड घेण्याची बुद्धि त्या लोकांच्या वर्तनांतही ढळढळीत दिसून येत होती. तिचा देवाशीं संबंध असल्यामुळें तिला एकप्रकारचें पवित्रपण आलें होतें. जो सूड बापाला उगवितां आला नाहीं तो उगविण्यासाठीं त्यानें मरतेवेळीं आपल्या मुलास सांगून ठेवावें असा प्रकार चालला होता. डेव्हिडानें मरतेवेळीं आपला मुलगा सालोमन ह्याला ईश्वराच्या इच्छेप्रमाणें वागण्याविषयीं उपदेश करून सरतेशेवटीं त्याला एक सूड उगविण्याचें काम करावयास सांगितलें. कोणी मनुष्य त्याला कांहीं वाईट बोलला होता व त्या अपराधाबद्दल त्यानें त्याला शपथपूर्वक क्षमाही केली होती. परंतु ती गोष्ट त्याच्या मनांत खुमखुमत होती. अखेरीस मरतांना त्यानें आपल्या मुलास सांगितलें:—" तें शुभ्र केशांनीं आच्छादिलेलें शरीर छेदून खालीं पाड आणि रक्ताचा प्रवाह वाहूं दे."

यूरोपांतील मध्यकालीन लोकांच्या कल्पना व समजुती ह्याही वरच्यापेक्षां फारशा भिन्न नव्हत्या. निरनिराळ्या वेळचीं निरनिराळ्या लोकांचीं उदाहरणें देऊन हें सिद्ध करीत बसण्याचें कारण नाहीं. इतिहासांतून राजकीय व इतर गोष्टींचे जे उल्लेख आढळतात त्यांवरून हें स्पष्ट होतें. हल्लींच्या रानटी लोकांप्रमाणेंच त्या लोकांमध्येंही सूड घेणें हें कर्तव्य समजलें जात हो-

तें. आणि केव्हांकेव्हां पुरुषांमध्यें हा मनोविकार कांहींसा दुर्बल झाला तर स्त्रिया पुढें होऊन ती वाण दूर करीत. मेरोव्हिंजियन् काळांत फ्रेडगांड् आणि ब्रूनेहाट नांवाच्या दोन स्त्रियांनीं गाजवून सोडिलें होतें. पुढील काळांत ठिकठिकाणच्या सरदारघराण्यांत एकसारखीं हाडवैरें माजून राहत आणि तीं पिढ्यांच्यापिढ्या चालत असत. हा प्रकार अनेक शतकेंपर्यंत सर्व यूरोपभर चालला होता. अगदीं ग्रांटमच्या काळापर्यंत हा मनुष्यस्वभाव जशाचा तसा कायम होता. त्यानें आपल्या मृत्युपत्रांत आपल्या पुतण्याला आपल्यातर्फे सूड उगविण्याची आज्ञा केली आहे. " माझ्या हातून झालें तर मी हें काम करीनच परंतु वृद्धापकाळामुळें माझ्या हातून तडीस गेलें नाहीं तर तें तुला केलें पाहिजे. " असा त्या मृत्युपत्रांतील मतलब होता. पूर्वींच्या काळांत सगळ्या यूरोपभर आढळून येणारी सूड घेण्याची बुद्धि अजूनही त्याच्या पूर्वप्रदेशांतून साफ नाहींशी झाली नाहीं.

अलीकडे पृथ्वीवरील सुधारलेल्या देशांत नेहमीं जिकडेतिकडे चकमकी झडत नसल्यामुळें पूर्वींच्या काळीं ह्या मनोविकाराच्या प्रबलतेचीं जशीं असंख्य उदाहरणें आढळत तशीं आतां आढळत नाहींत हें खरें. तरी शत्रुभावात्मकनीतीचा हा महत्त्वाचा घटक अजूनही मनुष्यांच्या मनावर आपलें वर्चस्व चालवीत आहे. मनुष्याची सूड उगविण्याची बुद्धि अजूनही पुष्कळ प्रसंगीं दिसून येते. यूरोपांत कोठेंनाकोठें तरी नेहमीं द्वंद्वयुद्धें होत आहेत व तीं ह्या मनोविकाराचाच परिणाम होत. आणि अशा युद्धास प्रवृत्त होणें हें अजून मनुष्याचें क-

र्तव्य समजलें जातें. ह्या उदाहरणावरून व्यक्तीच्या वर्तनांत दिसून येणाऱ्या ह्या मनोविकाराविषयीं कल्पना करितां येईल. आणि राष्ट्राचें वर्तन व्यक्तीच्या वर्तनाहून फारसें निराळें नसतें. राष्ट्रांच्या वर्तनांतील सूड घेण्याची बुद्धि पहावयाची असल्यास फ्रान्स देशाचें उदाहरण फार उत्तम आहे. जर्मन् लोकांनीं आपला पराभव केला त्याबद्दल त्यांची चांगली खोड मोडावी अशी फ्रेंच लोकांच्या मनांत फार दिवसांपासून प्रबल इच्छा आहे आणि ती नेहमीं स्पष्टरीतीनें व्यक्त होत असते. यूरोपांत फ्रान्साइतका स्वातंत्र्यप्रिय देश दुसरा नाहीं. स्वतंत्रतेकरितां तेथें पुष्कळ रक्तस्राव झाला आहे. ह्या देशांतील स्वतंत्रतादेवीचे भक्त आणि प्रातिनिधिक संस्थांचे अभिमानी लोक, शूर रशियन लोकांचे आणि त्यांना आपल्या जरबेखालीं ठेविणाऱ्या झाराचे पोंवाडे गात असतात. आणि हें सर्व कशाकरितां तर त्यांना जर्मन् लोकांशीं जो एकदा सामना करावयाचा आहे त्यांत रशियाकडून मदत व्हावी म्हणून. अशा प्रकारचें वर्तन लोकमतप्रवर्तकांकडून होत आहे व त्यांत लोकमताचें प्रतिबिंब उत्कृष्टरीतीनें दिसत आहे. आडपडदा न ठेवितां त्या लोकांच्या मनाच्या स्थितीचें वर्णन करणें झाल्यास तें एका लहानशा वाक्यांत करितां येईलः—"आह्मांला स्वातंत्र्य तर प्रिय आहेच, पण सूड घेणें त्याहूनही प्रिय आहे."

प्राचीन काळच्या लोकांतसुद्धां प्रस्तुत मनोविकाराच्या विरुद्ध विचार अगदींच आढळत नसत असें नाहीं. जसजशी अनेक समाजांची वाढ होत जाऊन त्यांना व्य-

वस्थित स्वरूप येऊं लागलें तसतसा मित्रनीतीच्या कल्पनांचा प्रादुर्भाव होऊं लागला व सूड घेणें वाईट असें लोकांना वाटूं लागलें. ही स्थिति दर्शविणारे उल्लेख प्राचीन ग्रंथांतून आढळतात. शांततेच्या कालाला सुरुवात झाल्यानंतर अशा प्रकारच्या विचारांची छाया दृष्टीस पडते. ह्यावरून लढायांची धुमश्चक्री कमी होण्यामुळें ते उत्पन्न होतात असें म्हणण्यास हरकत नाहीं.

हिंदुलोकांच्या ग्रंथांतून ह्याविषयीं पाहिजे तितकीं उदाहरणें आढळतात. हा मनुस्मृतींतील श्लोक पहाः—

*नारुंतुदः स्यादार्तोऽपि न परद्रोहकर्मधीः ।
यथास्यो द्विजते वाचा नालोक्यां तामुदीरयेत् ॥

अ० २, श्लो० १६१.

त्याच ग्रंथांत आणखी एका ठिकाणीं पुढें दिल्याप्रमाणें उपदेश केला आहे.

अतिवादांस्तितिक्षेत नावमन्येत कंचन ।
न चेमं देहमाश्रित्य वैरं कुर्वीत केनचित् ॥
क्रुद्ध्यंतं न प्रतिक्रुद्ध्येदाक्रुष्टः कुशलं वदेत् ।†

अ० ६ श्लो० ४७,४८.

---

* दुसऱ्यानें तुला पीडा दिली असली तरी तूं त्याचा मर्मभेद करूं नको. तूं दुसऱ्यावर अपकार करूं नको व तसा विचारही मनांत आणूं नको. जिनें दुसऱ्याला उद्वेग होईल अशी स्वर्गप्राप्तीला विरोध आणणारी वाणी तूं उच्चारूं नको.

† लोकांचीं दुर्भाषणें शांतपणें सहन करावीं; कोणाचा अवमान करूं नये; आणि हा देह प्राप्त झाला आहे ह्यासाठीं कोणाशीं वैर करूं नये. रागावलेल्या मनुष्यावर उलट रागावूं नये आणि कोणीं शिव्या दिल्या तरी त्याला आशीर्वादच द्यावा.

अशाच अर्थाचें पुढें दिलेलें वचन आहे. तें कुराल नामक ग्रंथांत आढळतें.

" शत्रूंवरदेखील अपकार न करणें हा सर्वांत श्रेष्ठ सद्गुण आहे. "

त्याचप्रमाणें पूर्वींच्या पर्शियन् लोकांत असे विचार आढळून येतात. त्यांच्या सातव्या शतकांतील एका ग्रंथकारानें पुढील अर्थाचा उतारा घेतला आहे:—

" मनुष्याचें शौर्य धीटपणांत आणि शरीरसामर्थ्यांतच असतें असें समजूं नको. जर तूं रागाचें शमन करून क्षमा केलीस तर तुझ्या वर्तनाची किंमत करितां येणार नाहीं. "

त्या काळानंतर लिहिलेल्या सादीच्या * ग्रंथांत पुढील उपदेश आहे:—

---

* सादी हा पर्शियन् लोकांमध्यें अतिविख्यात व लोकप्रिय कवि व तत्ववेत्ता होऊन गेला. तो तेराव्या शतकाच्या आरंभीं प्रसिद्धीस आला. तो मोठा वक्ताही होता व तो धर्मविषयांवर व्याख्यानें देत असे. त्यानें ज्ञानसंपादन करण्यासाठीं आपल्या आयुष्याचीं ३० वर्षे प्रवासांत घालविलीं. तो हिंदुस्थानांतही आला होता, त्यावेळीं एक चमत्कारिक गोष्ट घडून आली. सोमनाथाच्या देवालयांतील मूर्ति दररोज सूर्योदयाचे वेळीं सूर्याला नमस्कार करिते असें ऐकिल्यावरून तो तो चमत्कार पहावयास गेला. एक मनुष्य मूर्तीचे आड बसून दोरीनें मूर्तीचे हात वरखालीं करीत असे. सादीनें त्या मनुष्याला असें करीत असतांनाच पकडलें. आपली लबाडी बाहेर समजल्यामुळें त्या मनुष्याला फार राग आला व त्यानें सादीचा पाठलाग केला. तेव्हां सादीनें आपल्या बचावाकरितां त्याला एका विहीरींत लोटून दिलें. सादीचें वय मरणसमयीं १०७ वर्षांचें होतें. त्याचें अनुभवज्ञान फार विस्तृत होतें व तें त्याच्या ग्रंथांत दिसून येतें. गुलिस्तान हा त्याचाच ग्रंथ आहे.

" तुला कोणीं दुखविलें आहे काय? तूं तें दुःख सहन कर आणि दुसऱ्यांच्या पापांची क्षमा करून स्वतः पापापासून मुक्त हो. "

आणि चवदाव्या शतकांतील हफीझ नामक पर्शियन् कवीच्या ग्रंथांतील मत ह्याच्याही पलीकडलें आहेः—

" आपल्या शत्रूंवरही प्रीति कशी करावी हें त्या तेजस्वी सूर्यापासून शीक आणि जो हात तुला दुःख देतो तो तूं मोत्यांनीं भरून काढ. त्या पलीकडलया खडकाप्रमाणें सूड घेणाऱ्या अभिमानापासून तूं मुक्त रहा आणि जें मनगट येऊन तुझ्या कडणींत बसेल त्याला तूं रत्नांनीं सुशोभित कर. "

चिनी लोकांतील ग्रंथांतूनही अशा प्रकारचे उद्गार काढिलेले आढळतात. लाओ* झी म्हणतोः—

---

* लाओ झी हा चिनी तत्त्ववेत्ता अडीच हजार वर्षांपूर्वी होऊन गेला. ह्या नांवाचा अर्थ 'म्हातारा मुलगा' किंवा 'म्हातारा तत्त्ववेत्ता' असा आहे. पहिल्या अर्थामुळें ह्याविषयीं एक चमत्कारिक दंतकथा उत्पन्न झाली. तो ७२ वर्षेंपर्यंत आपल्या आईच्या पोटांत होता व जन्मतःच त्याचे केंस वृद्धपणामुळें पांढरे झाले होते अशी त्याच्या जन्मासंबंधानें आख्यायिका आहे. त्यावेळीं चिनांत चो नांवाचें राज्य होतें तेथील राजाच्या दरबारांत हा तत्त्ववेत्ता इतिहास लिहिण्याच्या कामावर होता. परंतु पुढें त्यानें तें काम सोडून वैराग्य धारण केलें. त्यानें एक नवीन धर्मपंथ स्थापित केला. त्या पंथाचे अनुयायी चीन देशांत अजूनही पुष्कळ आहेत. आपली जशी ब्रह्माची कल्पना आहे त्यासारखी कांहींशी त्याची 'टाओ' ची कल्पना होती. त्या कल्पनेवरून इंग्लिश लोकांनीं त्याच्या मताला टाविझम् व त्याच्या अनुयायांना टाविस्ट्स अशीं नावें दिलीं आहेत. टाओ ह्याचा अर्थ केव्हांकेव्हां सद्गुण किंवा मार्ग (स्वर्गाचा) असाही करितात. तो मोठा नीतिकार होता. त्यानें ज्या मताचें

" तुला कोणीं दुःख दिलें तर त्याच्या मोबदला तूं त्याला सुख दे. "

त्याचप्रमाणें मेन्शिअस* म्हणतो:—

" उदार मनाचा मनुष्य राग सांठवून ठेवीत नाहीं. किंवा आपल्या बांधवाचा सूड घेण्याची इच्छा मनांत धरीत नाहीं. तो त्याला ममतेनें व प्रीतीनें वागवितो." ह्या दोघांइतकें कन्फ्यूशिअस † ह्याचें मत निःसीमपरा-

---

प्रतिपादन केलें त्यांत धर्माचा बिलकुल संबंध नाहीं. त्याच्या नांवावर हल्लीं जो धर्म विकला जातो त्यांत अनेक धर्मांतील वेडगळ समजुती व आचार मिसळले आहेत. कित्येक चिनी ग्रंथकारांच्या मतें तो १५० वर्षांचा होऊन मेला व कित्येकांचे मतें त्यानें जो 'टाओ' चा अभ्यास केला होता त्यामुळें तो दोनशें वर्षें जगला.

*मेन्शिअस २२०० वर्षांपूर्वीं होऊन गेला. त्याची आई मोठी साध्वी होती. तिचें चारित्र दोन हजार वर्षांपूर्वींच्या एका चिनी ग्रंथकारानें लिहिलें आहे. त्या साध्वीचा मुलगाही तिच्या शिक्षणानें जसा व्हावा तसा झाला. त्याच्या वयाला चाळीस वर्षें होतपर्यंत तो कोणाला फारसा माहित नव्हता. मग त्याची कीर्ति चोहोंकडे पसरली. कन्फ्यूशिअस ह्यानें जो पंथ स्थापन केला होता तो त्यानें स्वीकारिला. त्या महात्म्याविषयीं त्याची फार पूज्यबुद्धि होती. त्याच्यासारखाच ह्यालाही शिष्य तयार करण्याचा मोठा नाद होता. त्यावेळीं चीनच्या राज्यव्यवस्थेंत अतिशय घोंटाळा झाला होता. मेन्शिअस ह्यानें राज्यांतील अव्यवस्था नाहींशी करण्याविषयीं पुष्कळ खटपट केली परंतु त्याला यश आलें नाहीं. शेवटीं त्यानें तो नाद सोडून दिला आणि मरणापूर्वींचीं वीस वर्षें शिष्यांशीं संभाषण करण्यांत व ग्रंथरचनेंत घालविलीं. मरतेवेळीं त्याचें वय ८५ वर्षांचें होतें. हा नीतिकार सगळ्या चिनी राष्ट्राला वंद्य आहे आणि पाश्चिमात्यांनाही त्याचे ग्रंथ फार प्रिय झाले आहेत.

† हा चीनदेशांतील महान् तत्त्ववेत्ता अडीच हजार वर्षांपूर्वीं होऊन गेला. ह्यानें कन्फ्यूशिअन् पंथ स्थापित केला. तो चि-

र्थीचें नाहीं. त्याच्या मतांत नेहमीं मध्यवर्तीपणा आढळतो.

" शिष्य म्हणतो:—' दुःखाच्या मोबदला सुख द्यावें असें जें एकमत आहे त्याबद्दल आपलें काय म्हणणें आहे ? ' गुरु म्हणतो:—' तसें केलें असतां सुखाच्या मोबदला काय द्याल ? ह्यासाठीं दुःखाची फेड न्यायानें करावी व सुखाची फेड सुखानें करावी. ' " हीब्र्यूलोकांमध्येंही सूड घेण्याला प्रारंभीं जी समाजाची व ईश्वराची संमति होती तिचें स्वरूप पुढें थोडें-

---

नांत फारच लोकप्रिय आहे. त्याची लोकप्रियता दर्शविणारें पुढील अर्थाचें चिनी भाषेंत एक पद्य आहे. "कन्फ्यूशिअसच्या अगोदर कोणी कन्फ्यूशिअस नव्हता व त्याच्या मागूनही कोणी कन्फ्यूशिअस् झाला नाहीं." कन्फ्यूशिअस ह्यानें ज्या मतांचें प्रतिपादन केलें त्यांना त्यानें दैवी महत्त्व दिलें नाहीं. तो ईश्वराचें अस्तित्व मानीत असे, पण त्याच्या ग्रंथांत ईश्वर आणि परलोक ह्यांचा फारसा उल्लेख नाहीं. त्याचे सर्व विचार इहलोक आणि मनुष्यजाति ह्यांजकडे लागलेले होते. त्याच्या विचारांत भक्तीचा अंकुर दिसत नाहीं. मनुष्यांनीं इहलोक आणि मनुष्यजाति ह्यांविषयीं विचार केला म्हणजे पुरे आहे असें त्याचें मत होतें. मेल्यानंतर मनुष्याचें काय होतें ह्याबद्दल कन्फ्यूशिअस कांहीं सांगत नाहीं. त्याला जेव्हां ह्याबद्दल कोणी प्रश्न विचारिला तेव्हां त्यानें उत्तर दिलें:—" जीविताचेंच जर आपणांस ज्ञान होत नाहीं तर मरणाचें कोठून होणार ? " त्याला सर्वज्ञतेचा ढोंल नसे. ज्या गोष्टींविषयीं मनुष्याला ज्ञान होण्यासारखें नाहीं त्यांकडे तो लक्ष्यच देत नसे. त्याच्या नीतिशास्त्रांत स्वर्गाची लालूच किंवा नरकाचें भय ह्यांचें नांव नाहीं. तो ७२ वर्षांचा होऊन मेला. मरतांना त्यानें ईश्वराची प्रार्थना केली नाहीं किंवा भीतीचेंही चिन्ह दर्शविलें नाहीं. ईश्वराच्या इच्छेनें आपण आपल्या पिढींतील लोकांची चाकरी केली आहे असा विचार मनांत येऊन त्याला समाधान झालें असेल पण त्यानें कोणत्याही प्रकारचें चिन्ह दर्शविलें नाहीं.

थोडें बदलत गेलें. ह्यामुळें विरुद्ध प्रकारच्या कल्पना व समजुती ठिकठिकाणीं नजरेस पडूं लागल्या. एक्लि-झिआस्टिकस नामक पुस्तकांत एका ठिकाणीं असें आ-ढळतें कीं आपल्या शत्रूचा सूड उगविण्यासाठीं ज्याला पाठीमागें मुलगे असतील तो बाप धन्य होय. आणि त्याच पुस्तकांत ' कोणीं दुःख दिलें असतां त्याच्या-वर डांव धरूं नये ' अशी स्पष्ट आज्ञा आहे. ख्रिस्ती-धर्म हें हीब्र्यू लोकांच्या धर्माचेंच उत्क्रान्तस्वरूप आहे. आणि वरील आज्ञेंत जें नीतीचें तत्त्व बीजरूपानें दृष्टी-स पडतें त्याचा पुढें ख्रिस्तीधर्मांत पुष्कळ विस्तार झा-लेला आढळतो.

जसजशी युद्धकालांतील धुमश्चक्री कमी होऊं लाग-ली व शांततेमुळें औद्योगिक व्यवसायांना उत्तेजन मि-ळून सहकार्याकडे लोकांची प्रवृत्ति होत चालली, तस-तशी मनुष्याची सूड घेण्याची बुद्धि कमी होऊन क्षमा करण्याची बुद्धि वाढत चालली, हें वरील उदाहरणां-वरून व्हावें तितकें स्पष्ट होत नाहीं. कारण कोणत्या-ही काळीं पृथ्वीवर असा एकही मनुष्यसमाज नव्हता व हल्लींही नाहीं कीं ज्यांत सांग्रामिक व्यवसाय व औद्यो-गिक व्यवसाय ह्यांपैकीं एकाचेंच अस्तित्व असून दुस-ऱ्याचें नांवही ऐकूं येऊं नये. प्रत्येक ठिकाणीं ह्या दोन प्रकारच्या व्यवसायांचें कोणत्या तरी प्रमाणानें मिश्रण झालेलें आढळतें. अशी स्थिति असल्यामुळें एकाच प्र-कारच्या व्यवसायांचे काय परिणाम होतात हें समज-ण्याला मार्ग नाहीं. तथापि प्राचीनकाळच्या लोकांब-द्दल वर जो पुरावा दिला आहे त्याला जोडून सुधार-

लेल्या लोकांच्या हल्लींच्या स्थितीबद्दल चार शब्द लिहिले पाहिजेत.

यूरोपांतील सर्व राष्ट्रांच्या इतिहासावरून एवढी गोष्ट सिद्ध होते कीं, ज्या वेळेस सांग्रामिक व्यवहारांना महत्त्व होतें त्या वेळेस सरदारघराण्यांतलीं पिढ्यान्‌पिढ्या चालणारीं हाडवैरें पुढल्या औद्योगिक काळांत समूळ नाहींशीं झालीं. हा जो फेरफार झाला त्यांत आणखी एक गोष्ट विशेष लक्ष्यांत ठेवण्याजोगी आहे. ती ही कीं, ज्या राष्ट्रांत औद्योगिक व्यवसायांकडे लोकांचें लक्ष्य लवकर लागलें व व्यापार वाढत चालला त्या राष्ट्रांत हा फेरफार अगोदर घडून आला. ह्या कामांत इंग्लंडानें सर्वांवर अघाडी मारिली.

सरदारघराण्यांतील लोकांचे खाजगी द्वेष कमी झाले त्याचप्रमाणें मधल्या व खालच्या वर्गांतील लोकांचीही परस्परांविषयीं द्वेषबुद्धि पुष्कळ कमी झाली. ह्या गोष्टींत देखील इंग्लंडच इतर राष्ट्रांहून पुढें आहे. इतर राष्ट्रांशीं तुलना केली असतां इंग्लंडचें सैन्य फार कमी आहे व इतर राष्ट्रांना युद्धाच्यासंबंधानें जितकी खुमखूम आहे तितकी इंग्लंडाला नाहीं. कोठें कांहीं चळवळ झाली कीं हीं युरोपियन राष्ट्रें गिधाडांप्रमाणें टपलेलीं असतात व कांहीं गिळंकृत करावयास सांपडेल कीं काय हें पाहत असतात. ह्या कामांत इंग्लंड जरी इतरांपेक्षां फारसें मागें नाहीं, तरी बाहेर गडबड चालली असतां तेथील लोकांत इतर राष्ट्रांतल्या लोकांप्रमाणें चळवळ होत नाहीं. ह्याचें कारण औद्योगिक व्यवसायांकडे त्यांचें फार लक्ष्य आहे. ह्याचा आणखी परिणाम असा दिसून येतो कीं, इतर

ठिकाणच्या लोकांपेक्षां इंग्लिश लोकांत खाजगी वैमनस्यें फार कमी असतात. कोणीं कोणाचा थोडासा अपमान केल्याबरोबर लागलेंच उभयतांनीं द्वंद्वयुद्धास प्रवृत्त व्हावें हा प्रकार इंग्लंडांतून नाहींसा झाला आहे, परंतु इतर देशांत तो अजून पुष्कळ चालू आहे. खाजगी द्वेषभावाच्यासंबंधानें पूर्वींच्या व हल्लींच्या काळांत इतका फरक झाला आहे कीं, सापासारखा डूक धरणाऱ्या मनुष्याचा लोक तिरस्कार करितात व क्षमा करणाऱ्या मनुष्याचें वर्तन पसंत करितात. पूर्वीं ह्याच्या अगदीं उलट स्थिति होती.

'क्षमा' हा गुण ख्रिस्ती धर्मामुळें मनुष्याच्या अंगीं उत्पन्न झाला आहे व इतर लोकांमध्यें तो सांपडावयाचा नाहीं असें ख्रिस्ती धर्माची थोरवी गाणाऱ्यांस वाटतें. इतर लोक प्राचीनकाळींही ह्या गुणाची किंमत ओळखूं लागले होते हें पूर्वींच्या उताऱ्यांवरून स्पष्ट होईलच. परंतु ह्या गुणाच्या उन्नतीशीं धर्माचा कांहींएक संबंध नाहीं हें दाखविण्याकरितां ज्यांमध्यें धर्माची उन्नति झालेली नाहीं अशा लोकांचें एक उदाहरण घेऊं. आपल्या देशांतल्या कांहीं डोंगरी लोकांविषयीं एक ग्रंथकार लिहितोः—

" ते विलक्षण प्रकारचे प्रामाणिक लोक आहेत. आणि चोरी केल्याचीं उदाहरणें त्या लोकांत फार क्वचित् घडून येतात. बहुतकरून ते आपापसांत भांडत नाहींत. क्षमा हा अप्रतिम गुण त्यांजमध्यें फार आढळून येतो. कोणीं कांहीं इजा केली असतां त्यांना तत्काल जरी राग आला, तरी कांहीं वेळ गेल्यानंतर

स प्रवृत्त होतो. अशा रीतीनें उभयतांमधील द्वेष एकसारखा वाढतच राहतो. व्यक्तीव्यक्तींत, घराण्यांघराण्यांत, आणि टोळ्यांटोळ्यांत जीं नेहमीं रणें माजून राहतात तीं अशामुळेंच. तीं बहुतकरून पिढ्यान्‌पिढ्या चालू राहतात.

परंतु असा प्रकार चालूं न देतां अपकार आणि प्रत्यपकार हे मोजण्याचें कांहीं तरी साधन उत्पन्न करून भांडणाऱ्या लोकांमधील वाद मिटवावा अशी कधींकधीं लोकांची प्रवृत्ति होत असते. म्हणजे असल्या प्रसंगीं न्यायाचा उपयोग करावा असें त्यांस वाटतें. ह्यासंबंधानें आपणांस काय कल्पना मिळतो तें पाहूं.

पुष्कळ रानटी लोकांमध्यें एकप्रकारची न्यायाच्या दृष्टीची समजूत आढळून येते व तीप्रमाणें त्यांचें वर्तनही घडतें. एका टोळींतील एका माणसानें जर दुसऱ्या टोळींतील एकाद्या माणसाचा खून केला किंवा प्रत्यक्ष खून केलेला नसला तरी तसा संशय असला तर दुसऱ्या टोळींतील मनुष्यांना पहिल्या टोळींतील कोणत्या तरी एका माणसाचा जीव घ्यावा असें वाटतें. म्हणजे ह्या टोळींतल्या एका माणसाच्या मोबदला त्या टोळींतलें एक माणूस मारिलें कीं 'न्याय' झाला असें त्यांना वाटतें. आस्ट्रेलियन लोकांचा आतां सांगितल्याप्रमाणें समज आहे. ही गोष्ट युद्धांत किंवा दंग्यांत मेलेल्या माणसांनाच लागू करावयाची असें नाहीं, तर रोगानें किंवा म्हातारपणामुळें मरण आलें तरी त्याला देखील लागू करावयाची. कारण अशा प्रकारें मरण येतें तें देखील शत्रूंनीं कांहीं कुयाडी केल्यामुळें येतें असा रानटी लोकांचा समज अ-

सतो. त्याच्या समजुतीप्रमाणें निरनिराळ्या टोळ्यांमधले हे हिशेब पुरे होत असते तर त्या टोळ्यांचा सप्पाच उडाला असता. कारण एका टोळींत जितकीं माणसें मरतील–मग तीं दंग्याधोप्यांत मरोत किंवा स्वाभाविक रीतीनें मरोत–तितकीं दुसरींतलीं मारिलीं पाहिजेत. परंतु ह्या त्यांच्या कल्पनेप्रमाणें त्यांना कधींच न्याय मिळत नाहीं. कांहीं टोळ्यांतले लोक हा मृत्यूच्यासंबंधाचा हिशेब तितका बारकाईनें न पाहतां ढोबळमानानें पाहतात. म्हणजे त्याची दुसऱ्या कशानें तरी भरपाई करून घेतात. सुमात्रा बेटांतील लोक एकमेकांची ह्यासंबंधानें कांहीं बाकी राहिली तर ती पैशानें फेडितात.

एका समाजांतील एक मनुष्य मारिला गेल्यानें त्याचें जें नुकसान होतें तें भरून घेण्यासाठीं ज्या समाजांतील मनुष्यानें हें कृत्य केलें असेल त्या समाजांतला कोणता तरी एक मनुष्य मारण्यांत जो एकप्रकारचा न्याय होत असतो त्यांत समाजाच्या दृष्टीनें जरी कांहीं नांव ठेविण्यासारखें नसतें तरी व्यक्तींच्या दृष्टीनें तो अन्याय असतो. कारण बहुतेक प्रसंगीं निरपराधी मनुष्यालाच शिक्षा भोगण्याची पाळी येते. निरनिराळ्या समाजांमध्यें जी ही न्यायाची कल्पना आढळून येते, तीच निरनिराळ्या कुटुंबांमध्येंही आढळते. प्राथमिक समाजघटनेंत प्रत्येक कुटुंब समाजाचा अति लहान घटक समजला जात असे आणि प्रत्येक कुटुंबांतील मनुष्यांना आपलें कुटुंब म्हणजे एक स्वतंत्र संस्थान असें वाटत असे. ह्या स्थितींत कुटुंबाकुटुंबांतील व्यवहारांत न्यायाची अवश्यकता

उत्पन्न होत असे. फिलिपैन बेटांतल्या लोकांत हल्लीं अशी स्थिति आढळून येते.

" ला इसाबेला प्रांतांतील निग्रीटो आणि इगोरोटी ह्या टोळ्यांतील लोक माणसांचा नेहमीं जमाखर्च बाळगितात. "

आणखी एक चमत्कारिक उदाहरण लूजोन बेटांतील क्वायंगेन लोकांचें आहे. प्रोफेसर ब्लूमेन्ट्रिट ह्यानें त्यांची विस्तारानें माहिती दिली आहे. तो लिहितोः—

" जीवासाठीं जीव घेणें ही अगदीं अनुल्लंघनीय धर्माज्ञा आहे असें क्वायंगेन लोकांना वाटतें. एका प्लीबियनानें* जर दुसऱ्या प्लीबियनाचा खून केला, तर त्या प्रकरणाचा निकाल थोडक्यांत होतो. खून करणाराचा किंवा त्याच्याच कुटुंबांतील दुसऱ्या एकाद्या प्लीबियनचा जीव घेतला म्हणजे झालें. परंतु जर एकादा मोठा मनुष्य किंवा सरदार एकाद्या प्लीबियनाच्या हातून मारिला गेला तर त्या खुनी प्लीबियनाचा जीव घेऊन भागत नाहीं. अशा अपराधाबद्दल ज्या मनुष्याचा जीव घ्यावयाचा तो तितक्याच योग्यतेचा मनुष्य असला पाहिजे. सरदाराचा खून झाला असेल तर त्याच्या मोबदला दुसऱ्या सरदाराचा जीव घेतला पाहिजे. कारण त्यांना असें वाटतें कीं, कुत्र्यापेक्षां ज्याच्या जीवाची अधिक किंमत नाहीं त्याचा जीव घेण्यांत मोबदला तो काय मिळाला? ह्यामुळें ज्या कुटुंबांतील सरदाराचा खून झाला असेल

---

* बडेलोकांपैकीं नव्हत असे मनुष्य किंवा खालच्या वर्गांतील लोक. रोमनलोकांमध्यें पूर्वी ह्या शब्दाचा उपयोग करीत असत.

त्या कुटुंबांतील माणसें खून करणाऱ्या माणसाचा संबंधी कोणी सरदार सांपडल्यास पाहत असतात. मुख्य खून करणारा मनुष्य तर अजीबात सुटून जातो. खुनी मनुष्याच्या संबंधी माणसांत जर त्यावेळीं कोणी सरदार नसला तर मारिलेल्या सरदाराच्या कुटुंबांतील माणसें शांतपणें वाट पाहत बसतात आणि ज्यावेळीं खुनी माणसाच्या कुटुंबांतील कोणी तरी मनुष्य त्या योग्यतेस चढतो त्यावेळीं तीं आपला सूड उगवून घेतात. मध्यंतरीं कितीही वर्षें गेलीं तरी ह्या न्यायाची अंमलबजावणी करण्यांत त्यांजकडून कसूर होत नाहीं. मारिलेल्या लोकांबद्दलचा हिशेब पुरा झाला कीं भांडणाऱ्या कुटुंबांचा किंवा टोळ्यांचा समेट होतो. असल्या भांडणांत ज्या माणसांचे जीव मोबदल्यादाखल घ्यावयाचे असतात त्यांचीं डोकीं उडवून तीं घरीं नेतात आणि त्या प्रसंगीं मोठा उत्सव करितात. हीं डोकीं मग घराच्या पुढल्या भागीं ठेवितात. "

ह्या लोकांना जितकें नुकसान झालें असेल तितकें अगदीं तंतोतंत भरून घेतलें पाहिजे असें वाटतें. सेमिटिक शाखेंतील लोकांत अशा प्रकारचीं पुष्कळ उदाहरणें आढळतात. बर्खार्ट लिहितोः—

" सगळ्या आरब लोकांत असा सार्वत्रिक समज आहे कीं, कोणी कोणाचा खून केला असतां मृताच्या नातलगांना खुनी मनुष्याकडे आपला एक माणूस लागू झाला असें वाटतें. आणि खून होतो त्यावेळीं मृताच्या ज्या नातलगांना सूड घेण्याचा हक्क पोहोंचतो त्यांच्या वंशजांकडेही तो परंपरेनें जात असतो. "

आणि निरनिराळ्या कुटुंबांत किंवा टोळ्यांत जीवास जीव घेण्याच्या संबंधानें हिशेब पुरा करून घेण्याविषयीं जो सर्वांचा कटाक्ष असतो त्याबद्दल बर्खार्ट म्हणतोः—

"मला असें वाटतें कीं दुसऱ्या कोणत्याही गोष्टीपेक्षां, कडक रीतीनें अमलांत येणाऱ्या न्यायाच्या ह्या पद्धतीमुळें, आरबस्थानांतील भांडखोर लोकांचा एक अति मोठा फायदा झाला आहे. तो फायदा हा कीं, त्यांनीं लढाया करकरून एकमेकांचा समूल उच्छेद केला नाहीं. रक्तस्राव झाला तर सूड घेण्याच्या संबंधानें एकमेकांना इतकी धास्ती असते कीं, मोठ्या निकराच्या झटापटी झाल्या तरी बहुधा मनुष्यवध होत नाहीं." सेमिटिक शाखेंतील लोकांमध्यें हल्लीं ज्या समजुती व रूढि आढळून येतात त्याच प्रकारच्या प्राचीनकाळच्या सेमिटिक लोकांमध्येंही होत्या असें मानण्याला बराच आधार आहे. बायबलांतील जुन्या करारांत हीब्र्यू लोकांचा जो वृत्तांत दिला आहे त्यांतील अनेक स्थळांवरून त्यावेळीं मारल्या गेलेल्या माणसांबद्दल निरनिराळीं कुटुंबें एकमेकांचा सूड उगवीत असत असें दिसतें. प्राचीनकाळच्या युरोपियनलोकांतही अशाच प्रकारच्या कल्पना व समजुती असल्यामुळें त्यांमध्येंही अशाच प्रकारचे प्रघात पडले होते. कुटुंबाचें किंवा कुटुंबसमुदायाचें नुकसान आणि त्या नुकसानाचा कमीअधिकपणा ह्या दोन्ही गोष्टी त्यांचे मनांत स्पष्टपणें वागत होत्या. जीवास जीव घेण्याचा प्रघात नाहींसा होऊन त्याचे ऐवजीं ज्यावेळीं पैशाचे रूपानें किंवा दुसऱ्या कांहीं प्रकारानें मोबदला घेण्याची वहिवाट सुरू

झाली, त्यावेळीं मृताचे कुटुंबाला किंवा समाजाला जो मोबदला द्यावयाचा त्याची किंमत मृताचे पदवीवरून किंवा योग्यतेवरून ठरत असे. ह्यावरून कुटुंबाचें किंवा समाजाचें जितकें नुकसान झालें असेल तितकें तंतोतत भरून घेण्याकडे लोकांचें किती लक्ष्य होतें हें स्पष्ट दिसतें.

कुटुंब हा समाजाचा अति लहान घटक समजावा आणि कुटुंबांतील कोणत्याही मनुष्यानें कांहीं अपराध केला तरी कुटुंबाला त्याबद्दल जबाबदार समजावें व एका मनुष्याचें नुकसान झालें तरी तें सगळ्या कुटुंबाचें नुकसान समजावें, ह्या कल्पनांचा उदय होऊन त्यांना व्यवस्थितस्वरूप येत असतांनाच व्यक्तिविषयक कल्पनांचेंही उत्क्रमण होत होतें. म्हणजे प्रत्येक मनुष्य निराळा घटक समजला जाऊन ज्या व्यक्तीनें अपराध केला असेल तिलाच त्याबद्दल जबाबदार धरणें आणि ज्या व्यक्तीचें नुकसान झालें असेल तिलाच तें भरून मिळणें, ह्या कल्पनाही कुटुंबाच्या कल्पनेबरोबरच उत्पन्न होऊन विकास पावत होत्या. कित्येक लोकांना त्यांचा स्पष्टपणें उमज पडला होता व कित्येकांना त्यांविषयीं अस्पष्ट बोध होत असे.

कित्येक प्राथमिक स्थितींतील लोकांना देखील ह्या कल्पना स्पष्टपणें कळूं लागल्या होत्या. गयाना देशांतल्या मूळच्या लोकांविषयीं इम् थर्न ह्यानें हकीकत दिली आहे, ती अशीः—

" ह्या लोकांमध्यें पोलीसखात्यासारखी कोणतीही सोय नसतांना त्यांचे परस्परांमधील नित्याचे व्यवहार

फारच सुरळीत रीतीनें चालतात. प्रत्येक मनुष्य इतरांच्या हक्कांसाठीं जपत असतो, आणि ही त्यांची चाल पुरातन काळापासून चालत आली असल्यामुळें तिच्याविषयीं त्यांची फार पूज्यबुद्धि आहे. अशा पुरातन प्रघातांविरुद्ध वागल्यानें उत्पन्न होणाऱ्या प्रतिकूल लोकमताला ते अतिशय भितात. एका इंडियनाच्या हातून जर दुसऱ्याला अत्यल्पही इजा घडली—मग ती बुद्धिपुरःसर केलेली असो किंवा चुकून झालेली असो—तर तिच्या मोबदला अपराध्यानें तितकीच इजा सहन केल्यावांचून त्याची सुटका होत नाहीं."

हीब्न्यू लोकांत देखील, ज्या मनुष्यानें दुसऱ्याला इजा दिली असेल त्या मनुष्यालाच तिच्या मोबदला इजा भोगावयास लाविलें पाहिजे, अशी वहिवाट होती असें जुन्या करारावरून दिसतें. "डोळ्यास डोळा, दांतास दांत, हातास हात आणि पायास पाय" असा जुन्या करारांतील ड्यूटरानमी नामक पुस्तकांत जो उल्लेख आहे तो व्यक्तीच्या संबंधाचा आहे. कोणीं कोणाचा डोळा फोडिल्यास अपराध्याचा डोळा फोडून दोन व्यक्तींमधील हिशेब पुरा करून टाकिला पाहिजे असा त्याचा भावार्थ दिसतो. कुटुंबाला जबाबदार धरून कुटुंबांमध्येंही असे व्यवहार होत असत. विशेषतः खुनांच्या संबंधानें तरी होत असत असें सांगण्यांत आलेंच आहे. तथापि व्यक्तीव्यक्तींतील व्यवहारांबद्दल जुन्या करारांत अधिक ठिकाणीं उल्लेख आहे.

ज्यावेळीं कुटुंबाच्या जबाबदारीची कल्पना प्रमुख असते त्यावेळींही व्यक्तीच्या जबाबदारीबद्दल थोडी

-बहुत कल्पना असतेच. परंतु कुटुंबाच्या जबाबदारीचें महत्त्व कमी होत चाललें म्हणजे व्यक्तीच्या जबाबदारीचें महत्त्व वाढत जातें. असें होण्याचें कारण समाजघटनेंतील फेरफार होय. कुटुंबाला घटक समजण्याऐवजीं व्यक्तीला घटक मानण्याकडे समाजाची प्रवृत्ति होऊं लागली म्हणजे जबाबदारीही कुटुंबावरून निघून व्यक्तीवर येते. कुटुंबेंच अस्तित्वांत नसलीं म्हणजे जबाबदार तरी कोणास धरावयाचें ? नवराबायको आणि त्यांचीं मुलें मिळून होणारें कुटुंब ह्या ठिकाणीं समजावयाचें नव्हे. पूर्वींचीं कुटुंबें म्हटलीं म्हणजे त्यांत शेंकडों माणसें असावयाचीं. एकेका कुटुंबांत पांचपंचवीस कर्ते व लढणारे पुरुष असावयाचे आणि सर्वांनीं कुटुंबाधिपतीच्या अधिकारांत रहावयाचें. पूर्वींच्या संग्रामयुगांत थोड्या माणसांच्या कुटुंबांचा निभावच लागण्यासारखा नव्हता. पुढें जसजसा शांततेचा काळ येऊं लागला तसतसें थोड्या माणसांनीं एकल राहणें शक्य झालें व मोठमोठालीं कुटुंबें नाहींशीं होऊन सर्व प्रकारची जबाबदारी व्यक्तीवरच येऊन बसली. अशा रीतीनें समाजाची उत्क्रान्ति होत असतां मनुष्यांच्या आपापसांतील व्यवहारांच्या पद्धतींचीही उत्क्रान्ति होऊन, व्यक्तीला जबाबदार न धरितां कुटुंबाला जबाबदार धरण्याच्या अन्यायाच्या पद्धतीपासून व्यक्तीला जबाबदार धरण्याची न्यायाची पद्धति उत्पन्न झाली. व्यक्तिघटित समाजव्यवस्थेंत अपराधी मनुष्यालाच त्याच्या अपराधाचे परिणाम भोगावे लागतात, इतरांस भोगावे लागत नाहींत.

हीब्र्यू लोकांच्या निरनिराळ्या काळीं लिहिलेल्या ग्रंथांतून जो विरोध आढळून येतो त्यावरून वरील अनुमानाला बळकटी येते. आरंभींच्या ग्रंथांतून देवाचें मनुष्यांशीं जें वर्तन दाखविलें आहे त्यांत ध्यानांत ठेविण्यासारखी गोष्ट ही आहे कीं, पापी मनुष्यांनाच शिक्षा करून देवाचें समाधान झालें नाहीं; तर पापी मनुष्यांच्या पापाबद्दल त्यानें त्यांच्या अनेक पिढ्यांच्या वंशजांना प्रायश्चित्त भोगावयास लाविलें आहे. परंतु नंतरच्या एका पुस्तकांत एक भविष्य आहे कीं, अमुक काळापासून ही स्थिति बदलेल. जुन्या करारांत जरमाया म्हणून एक पुस्तक आहे त्यांतून पुढील उतारा घेतला आहे.

"बापांनीं आंबट द्राक्षें खाल्लीं आणि मुलांचे दांत आंबले. परंतु ( पुढील काळांत ) प्रत्येक मनुष्य आपल्या कर्मांचीं मात्र फळें भोगील. जो मनुष्य आंबट द्राक्षें खाइल त्याचेच दांत आंबतील."

ज्या व्यक्तीनें अपराध केला असेल त्या व्यक्तीनेंच त्याचें प्रायश्चित्त भोगिलें पाहिजे ह्या न्यायाच्या तत्त्वाचा उदय युरोपियन लोकांत केव्हां आणि कसा झाला ह्याबद्दल संशय नाहीं. कौटुंबिक समाजघटना जसजशी मागें पडत चालली व व्यक्तिघटित समाजव्यवस्था पुढें येऊं लागली, तसतसें हें न्यायाचें तत्त्व अधिकाधिक उपयोगांत येऊं लागलें. आणि आतां कौटुंबिक स्थितींतील प्रघात त्या लोकांना इतके अपरिचित वाटतात कीं त्यांच्याशीं तशा प्रकारचा व्यवहार कोणी करूं लागल्यास त्यांस फारच आश्चर्य वाटतें. असे आश्चर्यकारक प्रकार हल्लींही केव्हांकेव्हां घडून येतात. चिनी लोकांमध्यें

कौटुंबिक समाजघटनेच्या वेळच्या कांहीं समजुती अजून आढळून येतात आणि कांहीं युरोपियन राष्ट्रांचा चीन देशाशीं संबंध असल्यामुळें कधींकधीं गमतीचे प्रकार घडतात. एकाद्या युरोपियन मनुष्याला चिनी लोकांनीं मारिलें तर ज्या राष्ट्रांतील मनुष्य मारला गेला असेल त्या राष्ट्राकडून खुनी मनुष्य ताब्यांत मिळण्याविषयीं मागणी होते. चिनी लोकांना असें वाटतें कीं, त्याच मनुष्यांशीं ह्यांना काय करावयाचें आहे? त्यांचा एक मनुष्य आह्मीं मारिला आहे त्याच्या मोबदला आह्मीं आपला एक मनुष्य त्यांना दिला म्हणजे झालें! व्यक्तिघटित समाजव्यवस्थेमुळें ज्यांची न्यायाची कल्पना बरीच उन्नत झाली आहे त्यांना बऱ्याच सुधारलेल्या चिनी लोकांचें हें तर्कशास्त्र फारच चमत्कारिक वाटल्यावांचून राहणार नाहीं.

मनुष्यसमाजाच्या उन्नतावस्थेंतील न्यायाच्या कल्पनेंत व्यक्तीचें आचरण आणि त्या व्यक्तीवर होणारा त्या आचरणाचा परिणाम ह्या दोहोंमध्यें मेळ ठेविणें ही महत्त्वाची गोष्ट असते. आणि मनुष्यसमाजाच्या आद्यावस्थेंतील न्यायाच्या कल्पनेंत शारीरिक किंवा इतर प्रकारच्या नुकसानाचा सारखेपणा ही गोष्ट महत्त्वाची असते. म्हणजे एका कृतीनें जितकें नुकसान झालें असेल तितकें दुसऱ्या कृतीनें भरून काढण्याकडे प्राथमिक स्थितींतील लोकांचें लक्ष्य असतें. ह्याहून निराळा प्रकार असणें संभवनीयच नाहीं. सांग्रामिक युगांत हस्तपादादि अवयवांचा नाश व प्राणघात ह्यांचे अनंत प्रसंग असल्यामुळें व्यक्तीकडे लक्ष्य दे-

तां येणें शक्य नसतें. व्यक्तिसमुदायांमध्यें मोठमोठ्या अपराधांबद्दल मात्र सारखेपणा राखितां येण्यासारखा असतो. तथापि प्राथमिक समाजांतील न्यायाच्या ह्या आद्यकल्पनेपासून न्यायाच्या उन्नतकल्पनेंतील एक घटक निघाला आहे; तो नुकसानाचा सारखेपणा हा होय.

सांग्रामिक कालांतही सारखेपणाच्या कल्पनेंत आणखी थोडीशी सुधारणा होण्याला सवड असते. आणि युद्धप्रसंगांत सुद्धां लढणाऱ्या व्यक्तींमध्यें सारखेपणा राखण्याच्या संबंधानें केव्हांकेव्हां कांहीं प्रघात रूढ होऊन जातात. प्राचीनकाळच्या हिंदुलोकांत युद्धाच्या संबंधाचे कांहीं नियम होते व ते मोडणारांची नाचक्की होत असे. ह्या नियमांचा रोंख लढणाऱ्या दोन योद्धयांमध्यें सारखेपणा राखण्याकडे असे. निजलेल्या शत्रूवर खरा क्षत्रिय कधींही हल्ला करीत नसे. अश्वत्थामा आपल्या बापाच्या मरणाबद्दल सूड घ्यावयासाठीं फिरत असतां त्याला आपल्या पित्याचा वध करणारा वीर निद्रिस्त आढळला. तेव्हां त्या स्थितींत त्याचा जीव न घेतां त्याला प्रथम उठवून नंतर त्याच्याशीं युद्ध करून त्यानें त्याचा प्राण घेतला. ह्यासंबंधानें महाभारतांत पुढील श्लोक आढळतो:—

तं शयानं महात्मानं विस्रब्धमकुतोभयम् ।
प्राबोधयत पादेन शयनस्थं महीपते ॥ *

सौप्तिकपर्व, अ० ८, श्लो० १६.

---

* हे धृतराष्ट्रा, मनांत कांहीं शंका न येतां निर्भयपणें शयनावर निजलेल्या महात्म्या धृष्टद्युम्नाला त्यानें (अश्वत्थाम्यानें) पायानें जागें केलें.

ह्या नियमाप्रमाणेंच रथावर बसणाऱ्या योद्ध्यानें पादचारी शत्रूशीं संग्राम करूं नये, सशस्त्र योद्ध्यांनीं निःशस्त्र शत्रूशीं करूं नये इत्यादि नियम होते. इतर देशांच्या इतिहासांत देखील लढणाऱ्या शत्रूंमध्यें, विशेषतः द्वंद्वयुद्ध करणाऱ्या वीरांमध्यें, सारखेपणा असावा अशाविषयीं लोकांच्या समजुती दर्शविणाऱ्या गोष्टी अनेक ठिकाणीं आढळतात. तथापि ह्या धर्मयुद्धाच्या समजुती व नियम बहुतकरून मनांतल्या मनांतच राहत आणि प्रत्येक योद्ध्याची इच्छा आपल्या शत्रूला अडचणींत गांठून त्यावर हल्ला करावा अशी असे.

फार प्राचीन काळापासून मनुष्याच्या व्यवहारांत आणि विशेषतः एका समाजांतील मनुष्यांच्या व्यवहारांत सारखेपणा ठेविण्याविषयींची कल्पना आढळून येते. एका मनुष्यानें दुसऱ्याला ज्याप्रमाणें वागविलें असेल त्याचप्रमाणें दुसऱ्यानें पहिल्याला वागविलें पाहिजे ह्या कल्पनेचें बीज त्यावेळीं देखील लोकांच्या डोक्यांत होतें, परंतु सांग्रामिक युगांतील समाजघटनेंत त्या बीजाचें पोषण होण्याचा संभव नव्हता. लढाई म्हटली म्हणजे ती केवळ शत्रूचें पारिपत्य करण्याकरितां असली तरी तींत अन्यायाच्या वर्तनाचें सप्रयोग शिक्षण मिळत असतें. शत्रूचा सूड उगवावयाचा असला तरी बहुतकरून ज्या व्यक्तींवर त्याचा परिणाम घडतो त्यांच्या हातून अपराध घडलेले नसतात. लढाईंत जो शत्रूचा मनुष्य पुढें सांपडेल त्यास जखमी करावें किंवा मारावें हा क्रम चालावयाचा. शत्रूंच्या माणसांशीं कां होईना, पण अशा प्रकारचें अन्यायाचें वर्तन नित्यशः हा-

तून वडत असलें म्हणजे आपल्या समाजांतील मनुष्यां-
शींही तसेंच वर्तन घडूं लागतें. ह्यामुळें एका समाजां-
तील मनुष्यांच्या व्यवहारांतही फारसा न्याय राहत
नाहीं. खुद्द लढणाऱ्या लोकांमध्येंही जुलमी व्यवस्थेनें
बंदोबस्त ठेविला जातो; औद्योगिक व्यवसाय करणारे
गुलाम आणि चाकरलोक हे जुलमाखालीं चिरडून जा-
तात; स्त्रियांना पूर्ण पारतंत्र्याची स्थिति प्राप्त होते; आ-
णि ह्या सर्व गोष्टींमुळें मनुष्यांची संग्रामशीलता कमी
झाल्यावांचून त्यांच्या व्यवहारांना यावा तितका सार-
खेपणा येत नाहीं. जगाच्या इतिहासाचें ज्यांनीं लक्ष्य-
पूर्वक अवलोकन केलें असेल त्यांना असा परिणाम स-
र्वत्र घडून आलेला दिसून आल्यावांचून राहणार नाहीं.

आतां उलट रीतीनें पुरावा पाहण्यासाठीं ज्या लो-
कांमध्यें पूर्ण शांतता आढळते त्यांच्या समजुती व री-
तिभाति ह्यांचा विचार करूं. गेल्याच्या मागल्या प्रक-
रणांत जुलमाविषयीं विचार करितांना जीं कित्येक लो-
कांचीं उदाहरणें दिलीं आहेत त्यांत, ज्या लोकांना टो-
ळीच्या बाहेरच्या लोकांवर जुलूम करण्याची संवय
असते ते टोळींतल्या टोळींतसुद्धां एकमेकांवर जुलूम क-
रितात व ज्यांना बाहेरच्या लोकांवर जुलूम करण्याची
संवय नसते ते टोळींतल्या टोळींत देखील आपापसांत
जुलूम करीत नाहींत, असें दाखविलें आहे. आणि जु-
लूम न करण्याचें कारण, अंशतः तरी न्यायाच्या दृष्टी-
नें इतरांचे जे हक्क असतात त्यांविषयीं थोडा बहुत वि-
चार त्यांचे मनांत येत असतो, हें असलें पाहिजे. त्या-
प्रमाणें नेहमीं शांततेंत राहणाऱ्या लोकांमध्यें पुष्कळ

प्रामाणिकपणा आढळून येतो हें दाखविण्यासाठीं मागील एका प्रकरणांत अनेक लोकांच्या प्रवासवृत्तांतून उतारे देण्यांत आले आहेत. हा त्या लोकांचा प्रामाणिकपणा विशेषंकरून त्यांच्या मनांत वागणाऱ्या न्यायबुद्धीचाच परिणाम असावा असें म्हणण्यास हरकत नाहीं. ह्या अप्रत्यक्ष पुराव्याला पुष्टीकरण आणण्याकरितां थोडासा ह्यापेक्षांही जवळचा पुरावा देतां येण्यासारखा आहे. हा पुरावा अशा लोकांमध्यें स्त्रियांना आणि मुलांना कोणत्या प्रकारची वागणूक मिळते तें पाहणें हा होय. 'समाजशास्त्राचीं मूलतत्त्वें' ह्या ग्रंथांत दोन्ही प्रकारच्या लोकांमधील स्त्रियांच्या स्थितींची तुलना केली आहे. रानटी किंवा अर्धवट सुधारणेच्या स्थितींत असणाऱ्या संग्रामशील लोकांमध्यें स्त्रियांची योग्यता फारच कमी मानिली जाते. व रानटी स्थितींत असणाऱ्या परंतु नेहमीं स्वास्थ्यानें राहणाऱ्या लोकांत स्त्रीजातीला बराच मान असतो असें तेथें दाखविण्यांत आलें आहे. त्या ठिकाणीं अनेक लोकांची विस्तारपूर्वक माहिती दिली आहे. ह्याठिकाणीं कांहीं उदाहरणांचा थोडक्यांत उल्लेख केला असतां पुरे होईल. मद्रास इलाख्यांत नीलगिरीजवळ राहणारे टोडलोक जरी अनेक गोष्टींच्या संबंधानें अगदीं प्राथमिक स्थितींत आहेत तरी त्यांच्या स्त्रियांना श्रमाचीं कामें करावीं लागत नाहींत. आणि पाणी किंवा लांकडें आणण्यासाठीं त्यांना घराच्या बाहेर देखील पडण्याचा प्रसंग येत नाहीं. बोडो आणि धिमाल लोकांच्या स्त्रियांना घरांतलीं कामें शिवाय करून दुसरें कोणत्याही प्रकारचें

काम करावें लागत नाहीं. बंगाल्यांत कोल नांवाचे मूळचे रहिवासी लोक आहेत ते अगदीं रानटी स्थितींत आहेत. त्या लोकांमध्यें विवाहित स्त्रीला जितका मान मिळणें जरूर आहे तितका दिला जातो. उद्योगशील, प्रामाणिक व गरीब स्वभावाच्या प्यूए्लास लोकांत कोणत्याही कुमारिकेचें तिच्या इच्छेवांचून लग्न करून दिलें जात नाहीं आणि सामान्यतः पुरुषांनीं आपणासाठीं बायका पसंत करावयाच्या ही जी विवाहाचे संबंधानें आढळून येणारी पद्धति तिच्या विरुद्ध क्रम ह्या लोकांत आढळतो. सर्व मनुष्यांचे हक्क सारखे असावे हें न्यायाच्या कल्पनेचें बीज आहे. आतां दिलेल्या उदाहरणांत पुरुषांचें स्त्रियांशीं वर्तन पाहिलें असतां स्त्रियांच्या हक्कांविषयींच्या कल्पनेचा पुरुषांच्या मनावर बराच परिणाम झालेला आहे असें दिसतें. पूर्वी न सांगितलेलें आणखी एक उदाहरण ह्या ठिकाणीं द्यावेंसें वाटतें. मानान्सा म्हणून अमेरिकेंत डोंगराळ प्रदेशांत राहणारे लोक आहेत. ते बमंग्वट आणि माकोलोलो ह्या भांडखोर व लढाऊ लोकांच्या त्रासाला कंटाळून डोंगरांतील खिंडींत जाऊन राहिले आहेत. त्या लोकांपैकीं एक मनुष्य होल्बसाहेबाजवळ म्हणाला "आह्मांला पशूंच्याही रक्ताची तहान नाहीं. तेव्हां माणसाच्या रक्तासाठीं आह्मी तान्हेलेले असण्याचा मुळींच संभव नाहीं—" ह्या वाक्यावरून त्या लोकांच्या निरुपद्रवी स्वभावाविषयीं खात्री होते. ह्या त्यांच्या स्वभावामुळें सभोंवतालच्या जोरदार व लढाऊ टोळ्यांतील लोक त्यांचा तिरस्कार करितात. तथापि होल्बसाहेब

त्यांचा प्रामाणिकपणा व विश्वासूपणा ह्या गुणांबद्दल साक्ष देतात. ते म्हणतातः—" त्यांचा नेहमींचा सभ्यपणा आणि सुस्वभाव ह्या गुणांबद्दलच त्यांना दोष दिला जातो, ह्याशिवाय दुसऱ्या कोणत्याही प्रकारचे आरोप त्यांजवर केले जातात असें दिसत नाहीं. " हेच साहेब त्या लोकांच्या संबंधानें आणखी लिहितातः— " ह्या लोकांच्या बायकांना वागविण्याच्या पद्धतींत आणि बेच्युआना किंवा मेटाबेल लोकांच्या पद्धतींत दिसून येणारा विरोध ह्या लोकांचें श्रेष्ठत्व स्थापित करणारा आहे. " अर्थात् हे लोक आपल्या बायकांना अधिक न्यायानें वागवितात. हें बायकांना वागविण्याच्या संबंधानें झालें. मुलांना वागविण्याच्या संबंधानेंही समाजशास्त्राच्या मूलतत्त्वांत उदाहरणें देऊन विस्तारानें विवेचन केलें आहे त्याचा सारांश मात्र येथें देतों. संग्रामशील लोकांत मुलांना इतक्या क्रूरपणाची वागणूक मिळते कीं, प्रसंगीं त्यांच्या जीवालाही अपाय होण्याचा संभव असतो. दुसरी एक गोष्ट त्यांच्या वर्तनांत दिसून येते, ती ही कीं, त्यांचें मुलांशीं व मुलींशीं वर्तन सारखें नसतें. मुलींपेक्षां मुलांना पुष्कळच चांगल्या प्रकारची वागणूक मिळते. नेहमीं शांततेनें राहणाऱ्या लोकांचें आपल्या मुलांशीं वर्तन ह्याहून अगदीं निराळें असतें. मुलगे आणि मुली ह्यांमध्यें ते तितका भेद करीत नाहींत आणि उभयतांनाही ममतेनें वागवितात.

जेथें नेहमीं शांतता असते तेथील लोकांमध्यें कमी अधिक प्रमाणानें न्यायबुद्धि आढळते असें जें वर सांग-

ण्यांत आलें त्याविषयीं आणखी खुलासा करणें जरूर आहे. न्यायबुद्धीची कल्पना आणि तिच्यामुळें उत्पन्न होणाऱ्या समजुती हे दोन्ही मिश्रमनोव्यापार आहेत आणि ज्यांच्या मनावर कोणत्याही प्रकारचा संस्कार झालेला नसेल अशा रानटी लोकांमध्यें त्या तितक्या स्पष्टरीतीनें दिसून येणें असंभवनीय आहे. तथापि परक्याची वस्तु घेणारीं माणसें जगांत असतील अशी कल्पनाही ज्यांना करवत नाहीं त्या रानांत राहणाऱ्या वेद्दा लोकांना न्यायाची जरी बिनचुक व्याख्या करितां आली नाहीं तरी त्याची बरीच स्पष्ट कल्पना त्यांच्या डोक्यांत असावी असें अनुमान करण्यास हरकत नाहीं. त्याचप्रमाणें औंध प्रांतांतल्या डोंगराळ प्रदेशांत राहणाऱ्या गरीब स्वभावाच्या टारू लोकांचें वर्तन मनांत आणिलें म्हणजे त्यांनाही न्यायाची बरीच कल्पना झालेली असावी असें वाटल्यावांचून राहणार नाहीं. कांहीं भयंकर संकटाचा प्रसंग आला म्हणजे हे लोक आपली चीजवस्त घेऊन निर्वेध ठिकाणीं दऱ्याखोऱ्यांत पळून जातात. परंतु जातांना घरभाड्याबद्दल जे पैसे देणें राहिले असतील ते एका चिंधींत बांधून ती चिंधी घराच्या दरवाजाच्या वरच्या बाजूला अडकावून ठेविण्याला ते कधींही विसरत नाहींत. न्यायाची कल्पना आणि तदुद्भूत समजुती ह्यांचा मनावर बराच परिणाम झाल्यावांचून मनुष्याला इतरांच्या हक्कांबद्दल तितकी काळजी वाटण्याचा संभव नाहीं. ह्यासाठीं ज्या लोकांमध्यें परस्परांच्या हक्काबद्दल बरीच काळजी घेतली जात असेल त्या लोकांमध्यें ह्या दोहोंचें बरेंच

वास्तव्य आहे असें अनुमान करणें चुकीचें होणार नाहीं. कोल लोकांमध्यें केवळ चोरीचा आळ आल्यामुळें देखील पुष्कळ लोक आत्महत्या करण्यास प्रवृत्त होतात. ब्रह्मदेशांतील डोंगराळ प्रदेशांत राहणारे लेटा लोकही अशाच क्षुल्लक कारणांनीं आत्मनाशास तयार होतात. हे लोक फारच सत्त्वशील आहेत. त्यांतल्या एकाद्या मनुष्यावर जर पुष्कळांनीं दोषारोप केला तर तो अगदीं एकांतस्थळीं निघून जातो आणि तेथें एक मोठा खड्डा खणून त्यांत आपणांस पुरून घेतो. मनोविकारांना अशी स्थिति प्राप्त होण्याला न्यायबुद्धि अंशतः तरी कारण असली पाहिजे. ह्या सर्व उदाहरणांतील लोकांना न्यायाची बरीच कल्पना झालेली आहे परंतु त्यांच्या मनावर कांहीं संस्कार झालेला नसल्यामुळें त्यांना त्या कल्पनेला व्यवस्थित स्वरूप देतां येत नाहीं. ज्या लोकांत बरीच सुधारणा होऊन ग्रंथरचना होण्यापर्यंत मजल गेलेली असते त्या लोकांच्या कल्पनांना व्यवस्थित स्वरूप आलेलें असतें. न्यायाची कल्पना कसकशी बनत गेली ह्याविषयीं निश्चयात्मक पुरावा ह्या लोकांच्या इतिहासांतून मिळण्यासारखा आहे.

प्राचीनकाळच्या सुधारलेल्या लोकांची समाजघटना व परस्परांमधील व्यवहाराच्या पद्धति सांग्रामिक युगाला अनुसरून होती. त्या अर्थात् त्यांमध्यें निरनिराळ्या दर्जाच्या मनुष्यांचे निरनिराळे हक्क मानिले जात असून ते जुलमानें अमलांत आणिले जात असत. त्या सर्व लोकांना न्याय आणि परोपकार ह्यांमधील स्पष्ट भेद समजला नव्हता. चिनी, पर्शियन्, प्राचीन हिंदु, ईजिप्शियन् आणि

हीब्र्यू ह्या लोकांच्या पुस्तकांतून न्यायाच्या कल्पनेंत औदार्य आणि माणुसकी ह्यांचें मिश्रण आहे. "दुसऱ्यांनीं तुझ्याशीं ज्याप्रमाणें वागावें असें तूं इच्छितोस त्याप्रमाणें तूं दुसऱ्याशीं वाग" हें जरी ख्रिस्ती धर्माचें वर्तनतत्त्व आहे असें मानिलें जातें, तरी ख्रिस्ती शकापूर्वी अस्तित्वांत असणाऱ्या अनेक लोकांच्या ग्रंथांतून त्याचा निरनिराळ्या स्वरूपांनीं उल्लेख केलेला आहे, असें पूर्वीं सांगण्यांत आलेंच आहे. ह्या तत्त्वाचें परीक्षण केल्यास त्यांत न्याय, औदार्य आणि माणुसकी ह्यांचें मिश्रण आढळेल. न्यायाच्या दृष्टीनें एका मनुष्यानें दुसऱ्याशीं कसें वागलें पाहिजे व दयेच्या दृष्टीनें कसें वागलें पाहिजे हा भेद त्या वर्तनतत्त्वांत दाखविलेला नाहीं. आणि प्रत्येक मनुष्याचे इतरांपासून मिळावयाचे जे हक्क आहेत त्यांचा स्पष्ट किंवा मुग्ध रीतीनेंही मुळींच उल्लेख केलेला नाहीं. न्यायाची वास्तविक कल्पना म्हटली म्हणजे तींत परविषयक आणि आत्मविषयक अशा दोन्ही विचारांचें मिश्रण आहे. न्यायानें प्रत्येक मनुष्य इतरांसाठीं कांहीं गोष्टी करण्यास बांधलेला आहे व इतर मनुष्येंही त्याच्यासाठीं कांहीं गोष्टी करण्यास बांधलेलीं आहेत. सांग्रामिक व्यवहार हें ज्या समाजाच्या घटनेचें मुख्य धोरण आहे व ज्यांतील लोकांचे औद्योगिक व्यवहार सक्तीच्या उपायांनीं चालविले जातात त्या समाजांत व्यक्तीच्या हक्कांविषयीं कल्पना उत्पन्न होऊन तिचा स्पष्ट उल्लेख होणें संभवनीय नाहीं. न्यायाच्या दृष्टीनें प्रत्येक व्यक्तीला जितकें स्वातंत्र्य मिळणें जरूर आहे तितकें जर अशा समाजांतील लोकांना मिळालें त-

र सर्व समाज विस्कळित होऊन जाईल व त्याचे अवयव निर्जीव होऊन जातील. जुलमी राज्यव्यवस्थेंत औदार्याच्या कल्पनेचा विकास होण्याला व तदनुरूप आचरण घडण्याला पुष्कळ सवड असते. परंतु न्यायाच्या कल्पनेला मात्र फार थोडा अवकाश मिळतो. जसजसा बाहेरच्या समाजांशीं सांग्रामिक संबंध कमी होत जातो व समाजांतील मनुष्यांचे औद्योगिक व्यवहार सक्तीच्या उपायांनीं न चालतां आपखुषीच्या करारावर चालूं लागतात तसतसा न्यायबुद्धीचा विकास होण्याला अवकाश मिळूं लागतो.

# प्रकरण ७

## औदार्य

वर्तनाच्या ज्या प्रकारांची सामान्यतः औदार्यांत गणना केली जाते त्यांचें व्यवस्थितरीतीनें वर्गीकरण करणें बरेंच कठिण आहे. ह्याचें कारण ज्या बऱ्याच गोष्टी औदार्याच्या समजल्या जातात त्यांचे प्रवर्तकमनोविकार औदार्यापासून उत्पन्न झालेले नसतात, व वास्तविक औदार्य हा मनोधर्म मिश्र असून त्याच्या घटकांमधील प्रमाणही बदलणारें आहे.

औदार्य ह्या मनोधर्माचे दोन घटकावयव आहेत. त्यांपैकीं एक फारच जुनाट आहे व दुसरा त्या मानानें अलीकडला आहे. पहिला घटक अपत्यप्रीति होय. अपत्यप्रेमाविषयीं उपजतबुद्धि बहुतेक प्राण्यांत आढळून येते व तीमुळें ते आपल्या अपत्यांच्या हितासाठीं स्वतःला पाहिजे तितका त्रास करून घेण्याला तयार होतात. आपल्या अपत्यांविषयीं औदार्य व इतरांविषयीं अत्यंत उदासीनता ह्या दोहोंचें एकत्र वास्तव्य पुष्कळ प्राण्यांत आढळून येतें. ह्याचें उत्कृष्ट उदाहरण मांसाहारी प्राण्यांत आढळतें. वनस्पतींवर उपजीविका करणाऱ्या प्राण्यांमध्येंही इतरांविषयीं औदासीन्यच असतें, परंतु तें तितक्या थराला गेलेलें नसतें. औदार्याचा दुसरा व अलीकडला घटक म्हटला म्हणजे सहृदयपणा हा होय. इतरांच्या मनोवृत्तींचीं प्रतिबिंबें आपल्या मनावर पडून त्यांच्या मनाच्या स्थितीप्रमाणें जी क्षणैक आपल्या

मनाची स्थिति होते तिला सहृदयपणा म्हणतात. हा सहृदयपणा समाज करून राहणाऱ्या वरिष्ठ प्रतीच्या मनुष्येतर प्राण्यांतही कांहीं अंशानें दिसून येतो. कुत्रा, घोडा, हत्ती वगैरे प्राण्यांत ह्या गुणाची बरीच उत्क्रान्ति झालेली आहे. तथापि मनुष्यप्राण्यांत–विशेषतः उन्नतावस्थेंतील मनुष्यप्राण्यांत–हा गुण फार आढळतो व त्याचें स्वरूप अनेक प्रकारांनीं दृष्टिगोचर होतें. औदार्याचा पहिला व जुना घटक व्यक्तिविषयक असून मनाचा कोतेपणा दाखविणारा आहे; आणि दुसरा व नवा घटक व्यक्तिविषयक नसून मनाच्या थोरपणाचा व्यंजक आहे. दोन्ही घटक कोट्यवधि वर्षांच्या पूर्वींचे असून, त्यांतल्यात्यांत तुलना करून पाहिली असतां दुसरा पहिल्याच्या मागून उत्पन्न झालेला आहे इतकेंच.

मनुष्यांतील औदार्याची कल्पना ह्या दोन गुणांच्या मिश्रणानें बनली आहे. दीनावस्थेंतील प्राण्यांविषयीं प्रीति उत्पन्न होणें हें अपत्यप्रेमाचें बीज आहे. आणि मनुष्यांमधलें वरिष्ठ प्रतीचें अपत्यप्रेम म्हटलें म्हणजे त्यांत सहृदयपणाचाही अंश थोडाबहुत असतोच. आईबापांना मुलांच्या सुखदुःखानें सुखदुःख होतें. मनुष्यांतील अपत्यप्रेमांत जसा थोडासा सहृदयपणाचा अंश असतो, तसा त्यांच्या सहृदयपणांतही अपत्यप्रेमाचा थोडा अंश असतो. कारण दीनावस्थेंतील प्राण्यांविषयीं प्रीति हा जो अपत्यप्रेमाचा उत्तेजक मनोविकार तोच सहृदयपणालाही कारणीभूत होतो. एका मनुष्यानें दुसऱ्याशीं औदार्याचें वर्तन केलें असतां, तसें वर्तन करणाराच्या मनांत बहुधा स्पष्ट किंवा अस्पष्ट रीतीनें दुसऱ्या

मनुष्याच्या दीनावस्थेविषयीं विचार येऊन तो दयेस पात्र आहे अशी त्याची समजूत होते. दया आणि अपत्यप्रीति ह्या दोन गुणांमध्यें पुष्कळ साम्य आहे. कारण, आपल्या स्थितीशीं तुलना करून पाहिलें असतां, जो मनुष्य विपत्तींत, दुःखांत, किंवा संकटांत असेल त्याबद्दलच दया उत्पन्न होत असते.

असें ह्या मनोधर्माचें स्वरूप भानगडीचें असल्यामुळें निरनिराळ्या स्थितींतील लोकांमध्यें तें निरनिराळ्या प्रकारांनीं दृष्टोत्पत्तीस येतें, आणि ह्यामुळें घोंटाळा होऊन जातो. पुरावा भानगडीचा आणि गुंतागुंतीचा असला म्हणजे त्यावरून निश्चयात्मक अनुमानें काढणेंही अवघड जातें हें सांगावयास नकोच.

प्रस्तुत विषयाला आरंभ करण्यापूर्वी न्याय आणि औदार्य ह्यांच्या कल्पनांची थोडीशी तुलना केली असतां विषयाची समजूत विशेष स्पष्ट रीतीनें होईल. औदार्याच्या वास्तविक कल्पनेचें अत्युन्नत स्वरूप घेतलें तरी तें न्यायाच्या कल्पनेइतकें संकीर्ण नाहीं. आणि म्हणूनच मनुष्यस्वभावाच्या उत्क्रांतींत औदार्याच्या कल्पनेचा प्रथम उदय होतो व तिच्या पाठीमागून न्यायाची कल्पना उद्भूत होते. इतरांच्या सुखदुःखाचें काल्पनिक चित्र आपल्या मनांत उठविल्यानें औदार्याची कल्पना उत्पन्न होत असते, आणि कोणाच्याही सुखदुःखाची कल्पना वारंवार मनांत येऊन सहृदयपणाचे मनोविकार फार प्रबळ झाले म्हणजे औदार्याचीं कृत्यें करण्यास मनुष्य प्रवृत्त होतो. परंतु न्यायाच्या कल्पनेंत फारच घोंटाळा आहे. तींत केवळ सु-

खदुःखांचाच विचार करून भागत नाहीं; तर दुःख कमी करण्यासाठीं किंवा सुख वाढविण्यासाठीं कोणत्या गोष्टींची अवश्यकता आहे हेंही पाहिलें पाहिजे. ह्यावरून असें स्पष्ट दिसून येईल कीं औदार्याच्या कल्पनेला ज्या मनोव्यापारांची अवश्यकता लागते त्यांना न्यायाच्या इमारतीचा पाया म्हटलें तरी चालेल. वास्तविक सर्व पाया पुरा करण्यास आणखी कांहीं मनोव्यापारांची जरूर आहे. औदार्याच्या कल्पनेंत इतरांच्या सुखदुःखांविषयीं विचार करणें हा मुख्य भाग असतो व स्वतःच्या सुखदुःखांचा विचार करणें हा गौण भाग असतो; कारण, केवळ तुलना करितांना काय त्यांच्याविषयीं विचार होतो तो. परंतु न्यायाच्या कल्पनेंत स्वतःच्याही सुखदुःखांचा विचार प्राधान्येंकरून करावा लागतो. हा पाया पुरा झाल्यानंतर बऱ्याच गुंतागुंतीच्या मनोव्यापारांनीं न्यायाची इमारत पुरी व्हावयाची असते.

औदार्यांत स्वतःच्या व इतरांच्या सुखदुःखांची जी तुलना होत असते ती फारच स्थूलदृष्टीची असते. कारण, दया उत्पन्न होण्याला दोघांच्या स्थितींत बरेंच अंतर असावें लागतें व तें अगदीं सामान्यबुद्धीच्या मनुष्याच्याही लक्ष्यांत येण्यासारखें असतें. परंतु न्यायाचे वेळीं जी सुखदुःखांची तुलना करावयाची असते ती अगदीं सूक्ष्मरीतीनें झाली पाहिजे. व हें काम करण्यास तीव्रबुद्धीची अपेक्षा असते. हें तुलनेच्या संबंधानें झालें. ह्याशिवाय कार्यकारणभावाचें फार विस्तृत ज्ञान उपयोगांत आणावें लागतें तें निराळेंच.

औदार्य आणि न्याय ह्यांच्यामधील संबंध बरोबर

लक्ष्यांत आला म्हणजे मनुष्याची उत्क्रान्ति होत असतां औदार्याची कल्पना प्रथम उत्पन्न होऊन तिचेमागून न्यायाची कल्पना कां उत्पन्न होते ह्या गोष्टीचा उत्कृष्टरीतीनें उलगडा होतो. पाया आधीं झाल्याशिवाय वरची इमारत उठवितां यावयाची नाहीं. औदार्य आणि न्याय हाच अनुक्रम स्वाभाविक आहे हें आणखी एका गोष्टीवरूनही चांगलें सिद्ध होतें. मंदबुद्धीच्या पुष्कळ लोकांना विशेष प्रकारच्या आत्मयज्ञाचे म्हणजे परहितासाठीं केलेल्या स्वतःच्या नुकसानाचे काय परिणाम होतील हें बरोबर न समजल्यामुळें त्यांची औदार्याकडे प्रवृत्ति होते. अर्थात् त्यांचें औदार्य अदूरदर्शीपणाचें असतें. न्यायाच्या कल्पनेला वर्तनाचे परिणाम बरोबर रीतीनें समजले पाहिजेत. परंतु औदार्याच्या कल्पनेला त्यांचें अज्ञान असलें तरी चालतें किंवा त्यामुळेंच तें कधींकधीं उत्पन्न होतें.

आतां हा उपोद्घात पुरा करून मुख्य विषयाकडे वळूं. प्रथमतः, सहृदयपणामुळें उत्पन्न होणाऱ्या मनोविकारांव्यातिरिक्त अन्य मनोविकारांनीं बनलेल्या खोट्या औदार्याचा विचार करूं. इतर कोणत्याही मनोविकारांशीं संयुक्त न झालेली दुसऱ्याच्या कल्याणाची इच्छा फारच दुर्मिळ आहे. बहुतकरून ह्या इच्छेशीं दुसऱ्या कांहीं हेतूंचें मिश्रण झालेलें असतें. ह्या हेतूंमध्यें विशेषकरून कीर्तीची इच्छा प्रमुखत्वानें असते. दिसण्यांत औदार्याचीं परंतु वास्तविक तशीं नव्हत अशा कृत्यांपैकीं अगदीं खालच्या प्रतीचीं जीं असतात त्यांत इतरांच्या कल्याणाच्या इच्छेचा अंश फारच

थोडा असून, किंवा मुळींच नसून, इतर हेतूंचेंच प्राबल्य असतें.

ज्यांमध्यें सुधारणेचा फारसा प्रवेश झाला नाहीं अशा व अगदीं रानटी लोकांत पाहुण्यांचें आदरातिथ्य करण्याचे कामीं अनेक ठिकाणीं जो दिखाऊपणा दिसून येतो तो वर सांगितलेल्या खोट्या औदार्याचाच व्यंजक आहे. बेडुइन लोक पाहिजे तसे लुटालूट करणारे व खर्चिक असून विलक्षण प्रकारचें आदरातिथ्य करणारे आहेत. त्यांच्या संबंधानें पालग्रेव्ह म्हणतोः—

"त्याच्याजवळ पाहुण्याला द्यावयासारखें फारच थोडें असतें, परंतु त्या थोड्याबद्दल देखील तो बराच मोबदला मिळण्याची आशा करीत असतो. कारण रात्रीचा पाहुणा सकाळीं वाट चालूं लागून थोडासा दूर गेला म्हणजे त्याला लुटण्याचा त्याचा संकेत असतो." त्याच प्रमाणें किरघी लोकांविषयीं आट्‌किन्सन् सांगतो कीं, त्यांचे सरदारलोक जोंपर्यंत पाहुणे घरीं असतात तोंपर्यंत त्यांचे वाटेस जात नाहींत; परंतु ते घरांतून निघून आपली वाट चालूं लागले म्हणजे आपल्या हाताखालचे लोक पाठवून त्यांस लुटतात. पूर्व आफ्रिकेंत देखील युरोरी येथील सरदार जोंपर्यंत पाहुणे त्यांच्या गांवांत असतील तोंपर्यंत त्यांचें उत्कृष्टप्रकारें आदरातिथ्य करितात, परंतु त्या गांवांतून बाहेर पडतांक्षणींच ते त्यांना लुटतात. फिजियन् लोकांच्या वर्तनांत तर ह्याहूनही आश्चर्य करण्यासारखा विसंगतपणा दिसून येतो. त्यांजबद्दल पुढील माहिती मिळते.

"एकाद्या चाकूसाठीं किंवा सुरीसाठीं देखील फि-

जियन् मनुष्य आपले घरीं येणाऱ्या किंवा घरांतून बाहेर जाणाऱ्या पाहुण्याचा खून करण्यास मागेंपुढें पाहणार नाहीं. परंतु तो पाहुणा घरापासून कांहीं विवक्षित अंतराच्या पलीकडे असला पाहिजे. एकदां तो फाटकाच्या आंत आला म्हणजे परत बाहेर जाईपर्यंत तोच मनुष्य त्याच्या रक्षणासाठीं आपला जीवही धोक्यांत घालण्यास तयार होतो."
खरें औदार्य आणि ह्या लोकांमध्यें आढळून येणारे आदरातिथ्याचे प्रकार ह्यांचा किती संबंध आहे तो उघडच दिसत आहे. ज्या युरोपियन लोकांना पुष्कळ दिवस फिजियन् लोकांचा सहवास घडला आहे त्यांनीं देखील ही चाल उचलली आहे असें जाकसन् म्हणतो.

न सुधारलेल्या बऱ्याच लोकांमध्यें ह्यापेक्षां कमी घातकपणाचे आदरातिथ्याचे प्रकार आढळून येतात. रूढीमुळें ते लोकांच्या अंगवळणीं पडून गेलेले आहेत. ह्या रूढी कशा उत्पन्न झाल्या असाव्या हें समजणें मात्र कठिण आहे.

"पाहुण्यांचा आदरसत्कार करणें हें जपानांतल्या आयनो लोकांतील प्रत्येक मनुष्य आपलें कर्तव्य समजतो. माझा जसा त्यांनीं आदरसत्कार केला तसाच ते सर्व पाहुण्यांचा करितात. ते आपलया सामर्थ्याप्रमाणें उत्तम उत्तम पदार्थ पाहुण्यांना देतात, त्यांना मानाचे ठिकाणीं बसवितात आणि देणग्या देऊन संतुष्ट करितात, व ते तेथून जावयास निघाले म्हणजे वाटेसाठीं त्यांना फराळाचें सामानही देतात."
आस्ट्रेलियन लोकांच्या संबंधानें असें वाचण्यांत येतें

कीं, जोंपर्यंत पाहुण्यांचें आपल्या येथें वास्तव्य असेल तोंपर्यंत त्यांना कोणत्याही प्रकारचा त्रास न होऊं देण्यासाठीं फार जपलें पाहिजे असा त्यांमध्यें आदरसत्काराच्या संबंधानें साधारण नियम आहे. दक्षिण पासिफिक महासागरांतील बेटांतल्या सामोअन् लोकांच्या आदरातिथ्याच्या प्रकारासंबंधानें जाकसन् लिहितो कीं, ते लोक पाहुण्यांना फारच चांगल्या रीतीनें वागवितात व प्रत्येक गोष्टींत जें चांगलें असेल तें पाहुण्याला देतात. लिचेन्स्टीन् ह्याच्या म्हणण्याप्रमाणें काफर लोक पाहुणचार करणारे आहेत. बुइंटरबाटम् ह्यानें असें लिहिलें आहे कीं, आफ्रिकन् लोकांशीं बराच सहवास घडलेल्या प्रत्येक प्रवाशाला त्यांची आदरातिथ्याविषयीं उत्सुकता दिसून आली आहे. उत्तर अमेरिकेंत राहणाऱ्या मूळच्या लोकांविषयीं मार्गन म्हणतो:—

"इंडियन् लोकांमध्यें आढळून येणारी एक सर्वसाधारण गोष्ट म्हटली म्हणजे त्यांची पाहुणचाराविषयीं तत्परता होय. इरोकोई लोकांमध्यें ही इच्छा जितकी सर्वसामान्य आढळते तितकी दुसऱ्या कोणत्याही लोकांत आढळत नसेल."

त्याचप्रमाणें न्यू झीलंड येथील लोकांच्या संबंधानें अंगस् सांगतो कीं, ते लोक परकीय माणसांचें फार चांगलें आदरातिथ्य करितात.

खोट्या औदार्याच्या वर्तनांत कीर्तीची इच्छा किती प्रबल असते हें न्यू झीलंड येथील लोकांच्या उदाहरणावरून चांगलें लक्ष्यांत येईल. त्यासंबंधानें टामसन् लिहितो कीं, त्या लोकांत खर्चिकपणाची फार वाखा-

णणी केली जाते आणि मेजवान्यांचे वगैरे प्रसंगीं आपण फार औदार्यानें वागलों असें लोकांनीं म्हणावें ही त्यांना फार इच्छा असते. त्याच ग्रंथकारानें त्या लोकांच्या संबंधानें आणखी एका स्थळीं असें लिहिलें आहे कीं, पैसा जमवून तो न उधळणें हें त्या लोकांत लज्जास्पद समजलें जातें. सेंट आगस्टाइन् बेटांतील लोकांच्या वर्तनांत एक विशेष दिसून येतो तोही अशाच प्रकारच्या एका इच्छेमुळें उत्पन्न झालेला आहे. ह्या लोकांमध्यें मृताच्या संबंधानें एक मोठी चमत्कारिक समजूत आहे. मेलेल्या मनुष्यांचा न्याय होऊन जीं मनुष्यें पुण्यवान् ठरतील त्यांस सुखाची व जीं पापी ठरतील त्यांस दुःखाची प्राप्ति होईल असेंच इतर लोकांप्रमाणें त्यांनाही वाटतें. परंतु त्यांच्या पापपुण्याच्या कल्पना मात्र विलक्षण आहेत. ज्या मनुष्याची मित्रमंडळी त्याच्या मरणानंतर त्याच्यासाठीं एक भपकेदार मेजवानी देईल तो मनुष्य मोठा पुण्यवान् व ज्याचे चिक्कू मित्र मुळींच मेजवानी देणार नाहींत तो महापापी. आपल्या देशांतील अनेक जातींच्या लोकांमध्यें उत्तरक्रियेसाठीं व लग्नकार्यांत अतोनात पैसा खरचण्याच्या ज्या चाली आहेत त्याही अशाच प्रकारच्या इच्छेमुळें उत्पन्न झालेल्या असून खोट्या औदार्याच्या व्यंजक आहेत. आपली लोकांत कीर्ति व्हावी ह्या अत्युत्कट इच्छेमुळें कधींकधीं अशा प्रसंगीं लोक इतका खर्च करितात कीं, त्याचे परिणाम त्यांचे कुटुंबांस अनेक वर्षेंपर्यंत भोगावे लागतात. असल्या रूढींचे ह्यापेक्षांही भयंकर परिणाम होतात. लग्नांतील भयंकर खर्चा-

च्या भीतीनें कित्येक लोक कन्यावधासही प्रवृत्त होतात.

नकली औदार्य उत्पन्न करणारे वर जे मनोविकार सांगितले त्यांसारखाच आणखी एक मनोविकार दूर-दूरच्या प्रदेशांत वसाहत करणाऱ्या लोकांमध्यें आढळून येतो. ह्या लोकांना पूर्वीची हजारों लोकांशीं दळणवळण ठेविण्याची संवय असल्यामुळें त्यांस त्या निर्जन प्रदेशांतील एकांतवास अगदीं दुःसह होतो. त्या स्थितींत जर कोणी परकी मनुष्य त्यांच्या घरीं आलें तर त्यांना विलक्षण प्रकारचा आनंद होतो. कारण अनेक मनुष्यांच्या सहवासांत राहण्याची जी अत्युत्कट इच्छा सुधारलेल्या मनुष्यांत स्वाभाविकरीतीनें उत्पन्न झालेली असते तिची थोडीशी तरी तृप्ति करून घेण्याची त्यांना सवड मिळते. ह्यामुळें प्रवासी व पारध करणाऱ्या लोकांचा ते उत्कृष्टरीतीनें आदरमान करितात एवढेंच नव्हे, तर मोठ्या आग्रहानें ते त्यांना पुष्कळ दिवसपर्यंत ठेवून घेतात.

ह्यावरून उघड दिसतें कीं, ज्या मनोविकारांनीं पाहुण्यांचा आदरसत्कार करण्याची व मित्रांना मेजवान्या देण्याची प्रवृत्ति होते ते मनोविकार प्रवर्तकनीतीच्या समजुतींमुळें उत्पन्न झालेले असतात. त्यांमध्यें नीतीच्या शुद्धस्वरूपाचा अंश फारच थोडा असतो किंवा मुळींच नसतो असें म्हटलें तरी चालेल.

तथापि अगदीं रानटी स्थितींत असणाऱ्याही पुष्कळ लोकांमध्यें खऱ्या औदार्याचीं अनेक उदाहरणें आढळून येतात. व कधींकधीं तर ह्या लोकांचें औदार्य सुधारलेल्या लोकांना लाजविणारें असतें.

सेआन् ( बुशमेन् ) लोकांविषयीं बर्चेल सांगतोः- "ते एकमेकांचें आदरातिथ्य करण्यांत फारच काळजी घेतात व त्यांचें परस्परांशीं वर्तन उदारबुद्धीनें भरलेलें असतें. कधींकधीं तर ह्या लोकांमध्यें हे गुण अगदीं शिखरास जाऊन पोहोंचलेले आढळून येतात." त्याचप्रमाणें हाटेंटाट लोकांच्या संबंधानें तो म्हणतो कीं, ते आपल्या टोळींतील लोकांचें तर आदरातिथ्य करितातच, परंतु इतर टोळ्यांतील लोकांशींही ते औदार्यानें वागतात व त्यांचा योग्य आदरमान ठेवितात. कोल्बेनसाहेबाचें त्यांच्याविषयीं फारच उत्कृष्ट मत झालेलें आहे. तो म्हणतोः—

"औदार्य आणि आदरातिथ्य ह्या गुणांच्या संबंधानें हाटेंटाट लोक बहुतकरून पृथ्वीवरील सर्व राष्ट्रांवर सरशी करणारे आहेत."

पूर्व आफ्रिकेंतील लोकांसंबंधानें लिव्हिंग्स्टन् म्हणतोः-

"युरोपियन लोकांशीं ज्यांना फारसा सहवास घडला नाहीं असे मध्यप्रांतांत राहणाऱ्या बहुतेक टोळ्यांतील लोक इतक्या सभ्यपणानें व इतकें मनापासून पाहुण्यांना अन्न वगैरे देतात कीं, त्याचा स्वीकार करण्याला त्यांना फार आनंद होतो" लोआंगो येथील लोकांसंबंधानें पुढें जो उतारा घेतला आहे त्यावरून जरी त्यांच्या उदारपणाच्या आचरणांत लोकांकडून वाहवा करून घेण्याची इच्छा बरीच प्रबल दिसते, तरी त्यांत खऱ्या औदार्याचेंही बरेंच मिश्रण आहे अशाविषयीं त्या उताऱ्यांतच पुरावा सांपडेल.

"जें त्यांच्याजवळ थोडेंसें असेल त्यांतला वांटा

खरोखर दीनावस्थेंत असणाऱ्या लोकांना देण्याला ते नेहमीं तयार असतात. एकादे दिवशीं जर त्यांना जनावरांची किंवा माशांची पुष्कळ शिकार सांपडली किंवा कांहीं दुर्मिळ वस्तूचा लाभ झाला, तर ते लागलेच आपल्या मित्रांकडे व शेजाऱ्यांकडे धांवत धांवत जाऊन त्यांना सर्व हकीकत सांगतात व त्यांचा वांटा त्यांच्या स्वाधीन करितात. ते प्रसंगीं स्वतः अडचण सोशितील पण अशा प्रकारें मित्रत्वाचें प्रदर्शन करण्याच्या कामांत थोडीदेखील हयगय करणार नाहींत. युरोपियन लोकांना ते 'मिटलेल्या मुठीचे' असें म्हणतात. कारण मोबदला मिळाल्यावांचून ते कधीं कोणाला कांहीं द्यावयाचे नाहींत."

ह्या लोकांहून कांहीं कमी सुधारलेल्या व कांहीं अधिक सुधारलेल्या अशा दुसऱ्याही लोकांत असें वर्तन आढळतें. आस्ट्रेलियांतील मूळच्या रहिवासी लोकांविषयीं असें वाचण्यांत येतें कीं, ज्या लोकांना चांगली शिकार मिळते ते नेहमीं एक शब्दही न बोलतां आपल्या टोळींतील ज्या लोकांना मुळींच शिकार सांपडली नसेल त्यांना आपल्या अन्नाचा वांटा देतात. व्हांकोव्हर ह्यानें सांडविच् बेटांतील लोकांविषयीं जी माहिती दिली आहे तीवरून असें दिसतें कीं, युरोपियन लोकांनीं अतिशय वाईट रीतीनें वागविल्यामुळें त्यांची नीति बिघडण्यापूर्वीं त्या लोकांचें परकी लोकांशीं वर्तन इतर न सुधारलेल्या बहुतेक लोकांप्रमाणेंच औदार्याचें असे. तो म्हणतोः—

" अशिक्षित आणि बहुतकरून रानटी लोकांत मोडल्या जाणाऱ्या हावाई येथील लोकांनीं आमचा जो

पाहुणचार केला तसा मला वाटतें युरोपांतील अत्यंत सुधारलेल्या राष्ट्रांतही कोणाचा झाला नसेल. "

गयाना येथील मूळच्या रहिवासी लोकांच्या संबंधानें ब्रेट् लिहितोः—

"ह्या लोकांचें आपल्या मुलांवर विलक्षण प्रेम असतें. ते सर्वांशीं सभ्यपणानें व उदारमनानें वागतात. आणि त्यांचें परस्परांशीं वर्तन तर इतक्या अमर्याद औदार्याचें असतें कीं त्यांजमध्यें तो एक दोषच आहे असें म्हटलें तरी चालेल. "

आणखी एक एशियाखंडांतील लोकांचें उदाहरण घेऊं. वागल् साहेब टिबेटांत असतांना तेथील लामाच्या* नातलगांकडे जाऊन राहिला होता. त्यांनीं त्याला फार ममतेनें वागविलें. जातांना तो त्यांनाः कांहीं जिनसा नजर करूं लागला परंतु ते त्यांचा स्वीकार करीतना. त्याची विनंति अमान्य करितांना ते म्हणालेः—

" आपण फार दूरच्या देशांतून येथें आलां आहां ह्यासाठीं आपलें येथील वास्तव्य जितकें सुखकर होईल तितकें करणें आमचें काम आहे. तेव्हां आपण आह्मांला नजराणे कां द्यावे ह्याला कांहीं कारण नाहीं. "

पाहुण्यांचा आदरसत्कार करून आपलें औदार्य प्रकट करण्याचा जो मार्ग आहे त्याहून निराळ्या प्रकारांनींही पुष्कळ सुधारलेल्या लोकांचें औदार्य दिसून येतें. आणि ह्या औदार्याच्या प्रकारांत स्वार्थाच्या अ-

---

* टिबेटांतील राजाला लामा म्हणतात. तेथील लोकांचा धर्माध्यक्षही तोच असतो. धर्माच्या बाबतींत चीन व जपान येथील बौद्ध लोकांवरही त्याचा अधिकार चालतो.

नेक हेतूंचेंही फार थोडें मिश्रण असतें. अगदीं खालच्या प्रतीच्या आस्ट्रेलियन् लोकांमध्यें अशा औदार्याचीं पुष्कळ उदाहरणें आढळतात. आयरसाहेबांना पाण्याची जागा दाखविण्याला ते लोक नेहमीं तत्पर असत. व बोलाविल्यावांचून ते आपण होऊन त्यांच्या माणसांस विहीर खणण्यास मदत करीत. ह्या कामीं त्यांनीं दाखविलेलें औदार्य फारच प्रशंसनीय आहे. कारण त्या लोकांनाच पुरण्यासारखें पाणी तेथें नाहीं. अशा स्थितींत पाणी लागण्यासारख्या जागा परकी लोकांस दाखविणें व तेथें विहीर खणण्यासाठीं त्यांस मदत करणें ही साधारण गोष्ट नव्हे. स्टर्ट सांगतो कीं एकदां शत्रूच्या टोळींतील कांहीं लोक प्रवाशांवर हल्ला करीत असतां एका आस्ट्रेलियन् मनुष्यानें आपल्या जीवाची पर्वा न करितां मध्यें पडून त्यांचें रक्षण केलें. त्यांच्या शेजारीं राहणाऱ्या दुसऱ्या कांहीं लोकांमध्येंही तीच स्थिति आढळते. टास्मानिया बेटांत तेथील लोकांनीं धामधुमीच्या प्रसंगीं उदारबुद्धीनें गोऱ्या लोकांचे जीव वांचविल्याचीं अनेक उदाहरणें घडून आलीं आहेत. अनेक प्रसंगीं त्यांच्या बायका पुरुषांना कळू न देतां हळूच बाहेर जात आणि ‘ तुमच्यावर अमुक वेळीं हल्ला होणार आहे ’ अशी गोऱ्या लोकांस सूचना देत. टोंगा बेटांतील लोकांच्या मनाचा उदारपणा आणखी एका प्रकारचा आहे. त्यांच्यासंबंधानें मारिनर लिहितोः—

“ त्यांच्या हातून जे मोठाले शौर्याचे पराक्रम घडले असतील त्यांजबद्दल अतिशय हर्षित होऊन ते

कधीं प्रतिष्ठा मिरवीत नाहींत, पण आपल्या शत्रूची वाखाणणी करण्याची मात्र प्रत्येक संधि ते साधीत असतात. एकाद्या मनुष्याला जरी आपला प्रतिपक्षी अगदीं भितरा आहे असा पक्का अनुभव आला असला तरी तो त्याची कधीं कोठें निर्भत्सना करणार नाहीं. उलट त्याची बाजू संभाळून घेण्यासाठींच आपल्या हातून होण्यासारखा असेल तितका प्रयत्न करील. त्याला वेळच चांगली लागली नाहीं, तो त्यावेळीं थकलेलाच होता, त्याची शरीरप्रकृति चांगली नव्हती, किंवा जागा खडवडीत होती वगैरे कांहीं तरी सबब सांगून तो आपल्या प्रतिपक्ष्याची बाजू राखील."

ह्या आणि ह्यांसारख्याच दुसऱ्या पुष्कळ गोष्टींवरून असें स्पष्ट दिसून येईल कीं, न सुधारलेल्या लोकांना जें 'रानटी' हें विशेषण नेहमीं लाविण्यांत येतें तें बरोबर नसून त्यामुळें पुष्कळांचा गैरसमज होण्याचा संभव आहे. हें विशेषण त्या लोकांपेक्षां आपणांला सुधारलेले म्हणविणाऱ्या लोकांपैकीं पुष्कळांना फार चांगलें शोभेल.

हावेळपर्यंत झालेल्या ऊहापोहावरून लक्ष्यांत आलेंच असेल कीं, जे लोक अद्यापि प्राथमिक स्थितींतून बाहेर पडले नाहींत त्यांमध्येंसुद्धां औदार्याचे दोन्ही प्रकार बरेच आढळून येतात. पहिल्या प्रकारांत रूढीच्या कडक बंधनांमुळें खऱ्या किंवा खोट्या औदार्याचीं कामें करण्याकडे प्रवृत्ति होत असते व दुसऱ्या प्रकारांत अंतःकरणाच्या कळवळयामुळें तशीं कामें करावींशीं वाटतात. प्राथमिक स्थितींतील लोकांत दे-

खील जर ह्या विचारांची इतकी उन्नति झालेली आढळते, तर सुधारणेच्या मार्गांत ज्यांचें बरेंच पुढें पाऊल पडलें होतें अशा कित्येक प्राचीन काळच्या लोकांच्या ग्रंथांत उदारपणाच्या वर्तनाची प्रशंसा करणारे किंवा तसें वर्तन करण्याविषयीं आज्ञा किंवा उपदेश करणारे लेख आढळले तरी त्यांत आश्चर्य करण्यासारखें कांहीं नाहीं. हिंदुलोकांच्या प्राचीन ग्रंथांतून असे पुष्कळ उल्लेख आढळतात. ऋग्वेदांतून घेतलेल्या पुढील ऋचेंत औदार्याचें जें महात्म्य सांगितलें आहे तें स्वार्थमूलक हेतूंनीं सांगितलें आहे हें स्पष्ट आहे.

[1]उच्चा दिवि दक्षिणावन्तो अस्थुर्ये अश्वदाः सह ते सूर्येण।
हिरण्यदा अमृतत्वं भजंते वासोदाः सोम प्र तिरंत आयुः॥
१०. १०७. २.

त्याचप्रमाणें पुढील ऋचांत ब्राह्मणांना दान करणें हें किती पुण्यप्रद आहे तें सांगितलें आहे.

[2]दक्षिणावान्प्रथमो हूत एति दक्षिणावान्ग्रामणीरग्रमेति ।
तमेव मन्ये नृपतिं जनानां यः प्रथमो दक्षिणामाविवाय॥
१०. १०७. ५.

---

१. दक्षिणा देणाऱ्या लोकांना स्वर्गांत उच्चस्थळीं रहावयास मिळतें; अश्वदान करणाऱ्या लोकांस सूर्यलोकीं स्थल मिळतें; सुवर्णदान करणाऱ्या लोकांस अमरत्व प्राप्त होतें; व वस्त्रदान करणाऱ्या लोकांस सोमलोकाची प्राप्ति होते. आणि हे सर्व दीर्घायुषी होतात.

२. ऋषींनीं बोलाविल्याबरोबर जो यजमान दक्षिणा हातांत घेऊन सर्वत्र जातो ( दक्षिणा देऊन सर्वांना तृप्त करितो ) तोच सर्वांत श्रेष्ठ. दक्षिणा देणारा यजमानच नरांचा पालनकर्ता असें मला ( सूक्तकर्त्या आंगिरस ऋषीला ) वाटतें.

न[1] भोजा मम्रुर्न न्यर्थमीयुर्न रिष्यन्ति न व्यथंते ह भोजाः ।
इदं यद्विश्वं भुवनं स्वश्चैतत्सर्वं दक्षिणैभ्यो ददाति ॥

१०. १०७. ८.

मनुस्मृतींतही अभ्यागतांचा सत्कार करण्याविषयीं ठिकठिकाणीं वचनें आहेत. हे पुढील श्लोक पहा.

अप्रणोद्योतिथिः सायं सूर्योढो गृहमेधिना[2] ।
काले प्राप्तस्त्वकाले वा नास्यानश्नन्गृहे वसन् ॥

अ० ३, श्लो० १०५.

संप्राप्ताय[3] त्वतिथये प्रदद्यादासनोदके ।
अन्नंचैव यथाशक्ति सत्कृत्यविधिपूर्वकम् ॥

अ० ३, श्लो० ९९.

न[4] वै स्वयं तदश्नीयादतिथिं यन्नभोजयेत् ।
धन्यं यशस्यमायुष्यं स्वर्ग्यं वातिथिपूजनम् ॥

अ० ३, श्लो० १०६.

---

१. अन्नदानानें तृप्त करणारे किंवा धनादिदानानें लोकांचें पोषण करणारे दाते अमरत्व पावतात; ते निकृष्टस्थितीस जात नाहींत; त्यांना कोणी पीडा देत नाहीं व कसलेंही दुःख सहन करावें लागत नाहीं. दक्षिणा ही इहलोक व परलोक दात्यांच्या स्वाधीन करिते ( त्यांच्या औदार्यामुळें ते त्यांचेच होतात ).

२. गृहस्थाश्रमी पुरुषानें सूर्यास्तानंतर प्राप्त झालेल्या अतिथीला परत दवडूं नये. तो कालीं येवो किंवा अकालीं येवो (घरांतील जेवणें होण्याच्या अगोदर येवो किंवा नंतर येवो ) तो यजमानाच्या घरीं उपोषित राहतां कामा नये.

३. अतिथि प्राप्त झाला असतां त्याला बैठक देऊन, पाणी प्यावयास द्यावें व त्याचा विधिपूर्वक सत्कार करून त्याला यथाशक्ति भोजनही द्यावें.

४. दधिदुग्धघृतादि उत्कृष्ट पदार्थ अतिथीला दिल्यावांचून त्यांचें यजमानानें सेवन करूं नये. अतिथीचें पूजन केल्यानें धन, यश, आयुष्य आणि स्वर्ग ह्यांची प्राप्ति होते.

आसनाशनशय्याभिरद्भिर्मूलफलेन वा ।
नास्य कश्चिद्वसेद्गेहे शक्तितोऽनर्चितोऽतिथिः ॥

अ० ४, श्लो० २९.

विद्यातपःसमृद्धेषु हुतं विप्रमुखाग्निषु ।
निस्तारयति दुर्गाच्च महतश्चैवकिल्बिषात् ॥

अ० ३, श्लो० ९८.

आपस्तंबधर्मसूत्रांत ह्यासंबंधानें पुढील उल्लेख आहे.

तस्य पूजायां शांतिः स्वर्गश्च । तमभिमुखोभ्यागम्य यथावयः समेत्य तस्यासनमाहारयेच्छक्तिविषयेणास्यपादौ प्रक्षालयेत्तस्योदकमाहरयेत्तर्पयेद्रसैर्भक्ष्यैरावसथंदद्यादुपरि शय्यामुपस्तरणमुपदानं ।

पर्शियन् लोकांच्या ग्रंथांतही वरील नमुन्याचे विचार पुष्कळ ठिकाणीं आढळतात. षायस्त म्हणून त्यांचा ग्रंथ आहे त्यांत असें लिहिलें आहे कीं, मनुष्याच्या हातून जो धर्म होतो त्यांतून त्याच्या आत्म्याला परलोकीं वस्त्रप्रावरण मिळतें. गुलिस्तान म्हणून जो त्यांचा ग्रंथ आहे त्यांत संन्यासवृत्तीचा निषेध करणारे परंतु

---

१. यथाशक्ति आसन, भोजन, शय्या, उदक, मूल, फल इत्यादिकांच्या दानानें सत्कारित झाल्यावांचून घरांत अतिथि राहूं नये.

२. विद्या आणि तप ह्यांच्या तेजानें दीप्त अशीं जीं ब्राह्मणांचीं मुखें तेच अग्नि होत. त्या अग्नींत आहुति टाकिली असतां संकटांचें निवारण होतें व घोरपापांचें क्षालन होतें.

३. त्याची ( अतिथीची ) पूजा केली असतां शांति व स्वर्ग प्राप्त होतात. वयाप्रमाणें त्याला सामोरें जावें, मग त्याचेबरोबर परत येऊन त्याला आसन द्यावें, त्याचे पाय रगडून धुवावे, नंतर त्याला उदक अर्पण करावें व खाद्यपेयांनीं तृप्त करावें, आणि विश्रांतिसाठीं स्थल देऊन त्याला शय्या व तत्संबंधी उपकरणें द्यावीं.

औदार्याच्या वर्तनाची प्रशंसा करणारे असे बरेच लोक आढळतात.

"जो मनुष्य स्वोपभोगाच्या आणि दानाच्या कामीं वित्ताचा उपयोग करितो तो उपोषण करून वित्ताचा संचय करणाऱ्या धार्मिक मनुष्यापेक्षां चांगला. लोकांकडून वाहवा मिळवून घेण्यासाठीं जो सुखोपभोगाचा त्याग करितो तो खरें सुख सोडून भलत्याच सुखाच्या नादीं लागतो."

त्याच ग्रंथांत उदारपणाचें वर्तन करण्याबद्दल स्पष्ट आज्ञा आढळते. परंतु ती लोकांना ग्राह्य होण्यासाठीं थोडीशी आत्महिताचीही आशा दाखविली आहे.

"दुसऱ्याचें कल्याण कर आणि तसें केल्याबद्दल बडबड करूं नको, म्हणजे तुझ्या मायाळूपणाच्या वर्तनाचा मोबदला तुला मिळाल्याशिवाय खचित राहणार नाहीं."

आतां चीनदेशाकडे वळूं व तेथील प्राचीन ग्रंथांत काय सांपडतें तें पाहूं. कन्फ्यूशिअस ह्याच्या ग्रंथांत औदार्याचीं कृत्यें करण्याबद्दल ठिकठिकाणीं स्पष्ट आज्ञा आहेत. आणि त्यांत विशेष हा कीं लोकांनीं तसें करावें ह्यासाठीं स्वार्थसाधनाची लालूच दाखविलेली नाहीं. पुढील उताऱ्यांवरून हें दिसून येईल.

"खऱ्या थोरमनाच्या पुरुषाचें लक्षण हें आहे कीं, तो स्वतःच्या सुस्थितीसाठीं यत्न करीत असतां,इतरांना सुस्थिति मिळावी ह्यासाठींही तो झटत असतो. व स्वतःच्या फायद्याची इच्छा करीत असतां इतरांच्या फायद्यासाठींही त्याचे यत्न चाललेले असतात."

" गुरु म्हणालाः—' चोच्या राजाप्रमाणें एकाद्या-च्या अंगांत जरी विलक्षण सामर्थ्य असलें तरी जर तो गर्विष्ठ आणि कद्रू असेल तर त्याच्या इतर गुणांकडे लक्ष्य देण्याचें बिलकुल कारण नाहीं.' "

" कन्फ्यूशिअस ह्याच्या मित्रांपैकीं जर कोणी मरण पावला व त्याचा प्रेतसंस्कार वगैरे करण्यासारखे त्याचे कोणी आप्तमित्र नसले तर तो (कन्फ्यूशिअस) म्हणत असेः–' मी त्याला मूठमाती देईन. ' "

ह्या लोकांच्या पवित्रग्रंथांप्रमाणें हीब्र्यू लोकांच्या पवित्रग्रंथांतही उदारपणाचीं कृत्यें करण्याबद्दल उपदेश व आज्ञा सांपडतात. व वर दिलेल्या उदाहरणांप्रमाणेंच ह्या ठिकाणींही कित्येक प्रसंगीं इहलोकींच्या किंवा परलोकींच्या सुखप्राप्तीचें मधाचें बोट लाविलेलें असतें व कित्येक प्रसंगीं नसतें. आतां ह्या लोकांच्या ग्रंथांतलीं उदाहरणें देत बसण्याची जरूर नाहीं. तीं वर दिलेल्या उदाहरणांच्याच मासल्याचीं असणार. तथापि प्राचीनकाळच्या लोकांचा विचार पुरा करण्यापूर्वी एवढेंच सांगणें अवश्य आहे कीं, ह्या प्रकरणाचे आरंभीं, प्रवासी लोकांनीं लिहिलेल्या वर्णनांतून जे उतारे घेतले आहेत त्यांवरून जसा अर्वाचीनकाळच्या प्राथमिक स्थितींतील लोकांच्या स्वभावांविषयीं व लोकस्थितीविषयीं स्पष्ट बोध होतो तसा हिंदु, पारसी, चिनी व हीब्र्यू ह्या लोकांच्या प्राचीन ग्रंथांतील वर जे उतारे घेतले आहेत त्यांवरून त्या लोकांच्या स्वभावांविषयीं बोध होत नाहीं. कारण हे उतारे ज्यांच्या ग्रंथांतून घेतले आहेत ते कवि, साधु व ज्ञाते लोक अपवादभूत

होत असें म्हणण्यास हरकत नाहीं. आणि जिकडेति-
कडे स्वार्थाची अतिशय प्रवृत्ति झाल्यामुळें विचारी लो-
कांना स्वार्थाचा वीट येऊन ज्या प्रतिक्रियेस सुरुवात झाली
तीमुळें परार्थाची प्रशंसा करणारे अतिशयोक्तीचे लेख
ग्रंथांतून चमकूं लागले असावे. तें कसेंही असो, पण
त्या वेळेस तसले लेख लिहिणें शक्य झालें व ते लोकां-
स आवडून हावेळपर्यंत ते शिल्लक राहिले ही गोष्ट दे-
खील थोड्या महत्त्वाची नाहीं व तीवरून त्यावेळच्या
स्थितीविषयीं थोडीबहुत अटकळ करितां येते.

युरोपियन लोकांमध्यें ह्या गुणाची कसकशी उन्नति
होत गेली व तत्संबंधी रूढि कसकशा पडत गेल्या,
आणि सुधारणापंथाच्या निरनिराळ्या पायऱ्यांवरून जा-
त असतां त्यांत कसकसे फेरफार होत गेले ह्यासंबंधानें
निश्चितपणें फारसें कांहीं सांगतां येत नाहीं. हल्लींच्या प्रा-
थमिक स्थितींतील लोकांमध्यें औदार्याला उत्तेजन दे-
णाऱ्या ज्या प्रकारच्या मनोवृत्ति व समजुती आढळ-
तात तशा यूरोपांतील प्राचीनकाळच्या लोकांमध्येंही
होत्या असा पुरावा मिळतो. प्राचीनकाळच्या जर्मन्
लोकांविषयीं टासिटस म्हणतोः—

"मेजवान्या व आदरातिथ्य ह्यांचे कामीं हे लोक
जितके खर्चिकपणानें वागतात तितके दुसरे कोणतेही
लोक वागत नसतील. त्यांच्या घरीं कोणी मनुष्य आ-
ला असतां त्याला परत दवडणें हा अधर्म समजतात."
औदार्याच्या संबंधानें प्राचीन जर्मन् लोकांचे विचार
व प्रघात अशा प्रकारचे होते खरे, परंतु त्यांच्या अंगीं
सहृदयपणा कसा तो मुळींच नव्हता हें पूर्वीं सांगण्यांत

आलेंच आहे. ह्यावरून एवढेंच समजावयाचें कीं हें त्यांचें औदार्याचें वर्तन अंतःकरणाच्या कळवळ्यापासून नसून रूढीच्या अनुल्लंघनीय बंधनामुळें होत असे.

यूरोपाच्या इतिहासांत ज्या काळाला मध्ययुग असें म्हणतात त्यावेळीं व तेव्हांपासून बऱ्याच अलीकडल्या काळापर्यंत ह्या विचारांत फारसा फरक झालेला नाहीं. प्रतिष्ठेसाठीं किंवा स्वार्थाच्या इतर क्षुद्र हेतूंसाठीं होणारें औदार्य कांहींसें कमी होऊन ईश्वराच्या प्रसादाचा लाभ करून घेण्यासाठीं औदार्याच्या कामांकडे लोकांची अधिक प्रवृत्ति होऊं लागली. बायबलांतील एका वाक्यांत असल्या औदार्याच्या हेतूचें उत्कृष्टरीतीनें वर्णन केलेलें आहे.

"जो दीनांवर दया करितो तो आपलें भांडवल देवाजवळ व्याजीं लावितो" आणि असल्या व्यापाराला हें कूळ ठळक असल्यामुळें भांडवल ठकण्याची भीति नसून त्यावर व्याजही चांगलें फायदेशीर पडेल अशी अशा असते. गरिबांना भिक्षा घालणें हें एक मुक्ति मिळविण्याचें साधन आहे हें आरंभापासून ख्रिस्ती धर्माचें तत्त्व समजलें जातें आणि ख्रिस्ती धर्माचा व लोकांचा पुष्कळ शतकेंपर्यंत इतिहास पाहिला असतां गरिबांना धर्म करण्यांत दुसरा कोणताही हेतु दिसून येत नव्हता. ज्याप्रमाणें आपल्या हातून घडलेल्या पापकर्माच्या दोषांपासून मुक्त होण्याकरितां पुष्कळ लोक देवळें बांधीत व ईश्वराचा कोप शमविण्यासाठीं गुलामांना स्वातंत्र्य देत; त्याचप्रमाणें नरकवास चुकावा व स्वर्गसुखाची प्राप्ति व्हावी ह्या हेतूनें श्रीमंत लोक गरीबांना धर्म करीत.

ह्या पारलौकिक हेतूंशिवाय बहुतेक औदार्याच्या कृत्यांत लौकिक मिळविण्याची इच्छा असतेच. तिचा वारंवार उल्लेख करण्याचें कारण नाहीं. लेकी नामक प्रख्यात इतिहासकारानें गरीबांना जो दानधर्म होत असे त्यासंबंधानें एके ठिकाणीं पुढील उल्लेख केला आहे:—

"लोक गरीबांना जे पैसे देत ते केवळ आपणांला पारलौकिक सुखाचा लाभ व्हावा एवढ्याच उद्देशानें देत. विपत्तींत पडलेल्या दीनांचें कल्याण व्हावें ही इच्छा त्यांच्या स्वप्नींही नसे."

त्या वेळच्या ज्या समजुतींमुळें लोकांकडून दानधर्म घडत असे त्या समजुती खऱ्या औदार्याच्या कल्पनेपासून किती भिन्न होत्या हें सर टामस ब्रौनी ह्यानें यत्किंचित्‌ही न कचरतां आपल्याच मताच्या घमेंडींत जें विधान केलें आहे त्यावरून चांगलें लक्ष्यांत येईल. लेकीनें आपल्या ग्रंथांत ह्याबद्दल उतारा घेतला आहे. ब्रौनी म्हणतो:—

"मी आपल्या बांधवांना जो धर्म करितों तो त्यांच्या क्षुधेचें शमन व्हावें ह्या हेतूनें करीत नाहीं; तर ईश्वराची आज्ञा पाळावी व त्याची इच्छा तृप्त करावी ह्या हेतूनें करितों."

तथापि अलीकडल्या काळांत खऱ्या औदार्याच्या विचारांचा बराच प्रसार होत आहे व हे शुद्धनीतीचे विचार हा वेळपर्यंत सांगितलेल्या प्रवर्तकनीतीच्या विचारांहून भिन्न आहेत. अजून देखील केवळ पारमार्थिक हिताच्या लाभासाठीं म्हणजे एका विशेष प्रकारच्या स्वार्थासाठींच परोपकार करण्याकडे पुष्कळ लोकांची

प्रवृत्ति होत आहे; व " आह्मी जो परोपकार करितों तो गरीबांचें कल्याण व्हावें व मनुष्यजातीचें पाऊल पुढें पडावें ह्यासाठीं करीत नसून केवळ ईश्वराची मर्जी संपादन करण्याकरितां करितों" असें म्हणण्याला न लाजणारे सर टामस ब्रौनीप्रमाणें लक्षावधि लोक अजून आढळतात हें सर्व खरें आहे. तथापि, मुख्यत्वेंकरून दीनांची केविलवाणी स्थिति पाहून अंतःकरण कळवळल्यामुळें परोपकारास प्रवृत्त होणारे लोकही अलीकडे पुष्कळ दृष्टीस पडतात, व कांहीं थोडे लोक तर केवळ भूतदयेमुळेंच परोपकाराला प्रवृत्त होतात. व्यक्तीच्या खाजगी वर्तनांत तर अनेक प्रसंगीं खरें औदार्य दिसून येतेंच, परंतु अलीकडल्या काळांतील मनुष्यजातीच्या उन्नतीचें स्वरूप विशेषरीतीनें व्यक्त करणारी गोष्ट म्हटली म्हणजे राष्ट्रांच्या हातूनही खऱ्या औदार्याचें वर्तन कधींकधीं घडत असतें ही होय. ह्याचें उत्कृष्ट उदाहरण इंग्लंडदेश होय. आपल्या राज्यांतील गुलामांचा व्यापार बंद करण्यासाठीं व हजारों गुलामांना दास्यांतून सोडविण्यासाठीं इंग्लंडाच्या तिजोरींतून वीस कोटि रुपये खर्च झाले आहेत.

मनुष्याच्या मनांत सहृदयपणाचे विचार अधिकाधिक येऊं लागल्यामुळें खऱ्या औदार्याची कल्पना उद्भूत होऊन तिचा प्रसार होऊं लागला, आणि जिकडेतिकडे स्वास्थ्य होऊन मनुष्याचे व्यवहार सुरळीतपणें आणि स्नेहभावानें होऊं लागल्यामुळें सहृदयपणाच्या विचारांची वाढ होण्यास अवकाश मिळाला, हें सांगण्याची फारशी अवश्यकता नाहीं.

प्रस्तुत विषयाचें विवेचन करण्यापूर्वीच चालू प्रकरणाच्या आरंभीं जीं कारणें दिलीं आहेत त्यांमुळें वर दिलेल्या खोट्या व खऱ्या औदार्याच्या भिन्न स्वरूपांच्या अनेक उदाहरणांवरून निश्चयात्मक अनुमानें काढणें हें सोपें काम नाहीं. आणि ह्या मनोधर्माच्या संकीर्ण स्वरूपामुळें व त्याचे घटकावयव आणि त्यांमधलें प्रमाण हीं वारंवार बदलणारीं असल्यामुळें उत्पन्न होणारी अडचण असून, शिवाय मनुष्यस्वभावांत आणि विशेषतः प्राथमिक स्थितींतील मनुष्यांच्या स्वभावांत जे अनेक विसंगतपणाचे प्रकार आढळून येतात त्यांमुळें तर हें काम अधिकच बिकट झालें आहे. मनुष्यांच्या मनांत समतोलपणा नसला म्हणजे निरानिराळ्या प्रसंगीं त्यांच्या हातून घडणारीं कृत्यें परस्परांशीं अगदीं विरुद्ध असतात. त्यांजमध्यें विचाराचा अंश कमी असून क्षुब्ध मनोविकारांच्या उकळीसरसें त्यांच्या हातून वर्तन होत असतें. अंगस् सांगतो कीं न्यू झीलंडांतील लोकांमध्यें बालवधाचा प्रघात बऱ्याच जारीनें चालू आहे. तथापि त्याच्याच म्हणण्याप्रमाणें मातापितरांचें मुलांवर इतकें प्रेम असतें कीं तीं त्यांना जणुं काय दैवतेंच वाटतात. त्याच लोकांच्या संबंधानें कुक लिहितो कीं, ते आपल्या शत्रूंस अतिशय निर्दयपणें वागवितात आणि टामसन्च्या असें पाहण्यांत आलें कीं, ते आपल्या गुलामांना फार ममतेनें वागवितात. नीग्रो लोकांच्या जातींमध्यें अशा प्रकारचीं दुसरीं उदाहरणें आढळतात. आफ्रिकेंत भूमध्यवृत्ताजवळ जे प्रदेश आहेत तेथील लोकांमध्यें विश्वासघातकीपणा जरी फार

आहे तरी प्रेमळ स्नेह देखील त्या लोकांत पुष्कळ आढळतो असें रीड ह्यानें दिलेल्या माहितीवरून समजतें. आफ्रिकेच्या पूर्वेकडील प्रदेशांतील लोकांविषयीं बर्टन् लिहितो:—

"बाल्यावस्था संपून मुलगा वयांत आला म्हणजे बापलेक हिंस्र श्वापदांचें अनुकरण करून परस्परांचे कट्टे हाडवैरी बनतात. तथापि त्या लोकांना परस्परांशीं दळणवळण ठेविणें फार आवडतें, आणि कोणाचा एकादा आप्त एकाएकीं मरण पावला असतां त्याचें चित्त अस्वस्थ होऊन त्याला वेडही लागावें अशीं उदाहरणें केव्हांकेव्हां घडून येतात."

मनुष्याच्या मनांत उन्नत मनोविकारांचें प्रावल्य असलें म्हणजे ते अवनत मनोविकारांना दाबांत ठेवितात; परंतु त्यांच्या अभावीं, तारू जसें सुकाणूं नसलें म्हणजे वाऱ्याच्या झोंकाबरोबर एकदां ह्या दिशेला तर दुसऱ्यानें त्या दिशेला झुकत असतें, त्याचप्रमाणें मनुष्याच्या हातून एकदां एका प्रकारचें व दुसऱ्यानें दुसऱ्या प्रकारचें आचरण घडतें. ज्याक्षणीं जें मनांत येईल त्याक्षणीं त्याप्रमाणें आचरण घडावयाचें. ह्यासाठीं सामान्य अनुमानें काढण्याचा प्रयत्न करणें झाल्यास, विचारशक्तीचा कृत्रिम परिणाम ज्यांच्या मनावर झालेला आहे अशा मध्यमावस्थेंतील लोकांचा विचार न करितां परस्परविरोधि गुणांचा ज्यांमध्यें कळस झाला आहे अशा प्राथमिक लोकांची तुलना करून पाहिल्यानें कांहीं निष्पन्न झालें तर होण्याचा संभव आहे.

ज्यांमध्यें क्रूरपणाची अगदीं कमाल झालेली आहे

असे रानटीलोक म्हटले म्हणजे मनुष्यभक्षक फिजि-यन् होत. त्यांच्या संबंधानें हावेळपर्यंत पुष्कळ ठि-काणीं उतारे घेतलेले आहेत. ते मनुष्यभक्षक देवांची पूजा करणारे असून त्यांच्या सन्मानदर्शक पदव्या म्ह-टल्या म्हणजे " अमुक प्रांत उद्ध्वस्त करणारा, " 'अ-मुक बेटांतील लोकांचा संहार करणारा, ' अशा मास-ल्याच्या असावयाच्या. त्यांनीं केलेल्या निर्दयपणाच्या कृत्यांसंबंधानें लिहितांना वुइल्सन् म्हणतोः—' तीं येथें लिहून ठेविण्याचें सुद्धां मला धैर्य होत नाहीं. ' ह्या लोकांबद्दल अनेकांनीं अनेक प्रकारची माहिती दिली आहे, परंतु दिखाऊपणाच्या हेतूनें केलेल्या औदार्या-च्या कृत्यांशिवाय दुसऱ्या कोणत्याही प्रकारचें औदा-र्याचें आचरण ह्या लोकांत दिसून आल्याबद्दल कोणीं कोठें उल्लेख केलेला नाहीं. उत्तर अमेरिकेंतील लुटालूट करणाऱ्या तांबड्या इंडियनलोकांत डकोट म्हणून जे लोक आहेत ते निवडून काढण्यासारखे आहेत. दुस-ऱ्यावर जुलूम करण्याची इच्छा आणि सूड घेण्याची बुद्धि हे गुण सार्वकालिक युद्धांमुळें त्यांच्या अंगीं पू-र्णपणें भिनून गेले आहेत. हे लोक लढाईंत सांपडले-ल्या कैद्यांना आणि विशेषेंकरून म्हाताऱ्या कैद्यांना आपल्या बायकांच्या स्वाधीन करितात आणि त्या आ-पल्या करमणुकीसाठीं त्यांचे नानाप्रकारचे हाल करि-तात. ह्या लोकांचें वर्णन करितांना औदार्याच्या संबं-धानें जर कोठें उल्लेख केलेला असला तर, तो ह्या लो-कांच्या अंगीं त्या गुणाचा अगदीं अभाव आहे हें सां-गण्याकरितांच असावयाचा. बर्टन् म्हणतो कीं, डकोट

लोक अगदींच अनुदार असून अधिक मोबदला मिळ-
ण्याची आशा असल्यावांचून ते कधीं कोणाला कांहीं
द्यावयाचे नाहींत. आसाम व हिंदुस्थान ह्यांच्या सीमे-
वर राहणारे **नाग** म्हणून लोक आहेत त्यांची तीच
स्थिति आहे. एका गांवांतील लोकांनीं दुसऱ्या गांवां-
तील लोकांशीं भांडत असावें व एका जातींतील लोकां-
नीं दुसऱ्या जातींतील लोकांशीं भांडत असावें हा त्यां-
चा क्रम नेहमीं चाललेला असतो. आपापसांतील भांड-
णें देखील ते अगदीं शिखरास पोंचविल्यावांचून रहा-
वयाचे नाहींत. ते बिलंदर चोर आणि खून करणारे
असल्यामुळें त्यांना सर्व लोक भीत असतात. शत्रु मेले
तरी त्यांच्या प्रेतांना छिन्नभिन्न केल्यावांचून त्यांचें स-
माधान होत नाहीं. ह्या लोकांविषयीं बटलर लिहितोः—

"मनाचा थोरपणा ह्या गुणाचा ह्या लोकांमध्यें ले-
शही आढळावयाचा नाहीं. आणि एकादा कवडीमोल
पदार्थ असला तरी त्याबद्दल मोबदला मिळाल्यावांचून
तो त्यांचे हातून कोणास मिळावयाचा नाहीं."

आतां ज्या लोकांचा विचार केला त्यांच्या उलट
ज्या लोकांची स्थिति आहे त्यांचा विचार करूं ला-
गलें तर मात्र समाधानकारक पुरावा मिळत नाहीं. का-
रण ज्यांमध्यें दंगेधोपे नसून नेहमीं शांतता असते त्या
लोकांमध्यें आढळून येणारें औदार्य बहुतकरून पाहु-
ण्यांचा आदरसत्कार करण्याच्यासंबंधाचें असतें, व तें
कोणत्या हेतूनें घडून येत असावें ह्याबद्दल शंका घे-
ण्याला बरीच जागा असते. सर्वस्वीं नसलीं तर अंशतः
तरी रूढीचीं अनुल्लंघ्य बंधनें व आपलें वैभव लोकांना

दाखविण्याची इच्छा, हीं त्यांच्या औदार्याचीं कारणें असावीं अशी शंका येणें साहजिक आहे. तथापि शांततेमुळें त्यांच्या सहृदयपणाला अवकाश मिळून थोड्या-बहुत अंशांनीं खरें औदार्य त्यांमध्यें उत्पन्न होणें हेंही संभवनीय आहे. स्टीन नांवाचे लोक एका डोंगराळ प्रदेशांत जाऊन राहिले आहेत व तेथें वारंवार तापाच्या सांथी येत असल्यामुळें त्या लोकांना कोणाकडून त्रास न मिळतां शांतपणें आपले व्यवहार करितां येतात. त्यांना कोलकोन हा 'पाहुण्यांचा परामर्ष घेणारे लोक' असें विशेपण देतो. तो म्हणतोः—"खिस्ती आनामाइट लोकांना कंटाळलेल्या मनाला ह्या डोंगराळ प्रदेशांतील सुस्वभावी हीदन (खिस्ती नव्हत असे) लोकांना पाहून मोठा आनंद होतो." ह्या लोकांच्या संबंधानें तोच आणखी म्हणतोः—"त्या लोकांकडून पाहुण्यांचें आगतस्वागत झाल्यावांचून रहावयाचें नाहीं. पाहुणा आल्याबरोबर त्याच्या मेजवानीसाठीं पुष्ट केलेलें डुकर मारिलें जातें व उल्हासकारी मद्याचा प्याला तयार केला जातो." त्याचप्रमाणें अगोदर लिहिलेल्या एका पुस्तकांत दुसऱ्या एका ठिकाणच्या मूळच्या रहिवाशांबद्दल कोलकोन ह्यानें उल्लेख केला आहे. हे लोक डोंगराळ प्रदेशांत अवघड ठिकाणीं राहणारे असून दुर्बल लोकांना जिंकीत व लुटीत फिरणाऱ्या तार्तार लोकांनीं वेष्टिले गेल्यामुळें जणुं काय लहानलहान बेटांतच राहिल्याप्रमाणें त्यांची स्थिति झाली आहे. त्याच्या म्हणण्याप्रमाणें ह्या लोकांचे राहण्यासंवरण्याचे प्रकार आनंददायक असून ते मायाळू व दुसऱ्यांचा

आदरमान ठेविणारे आहेत. त्यानें आपल्या पुस्तकांत तेथें राहणाऱ्या एका फ्रेंच मिशनरी गृहस्थाचें ह्या शांत स्वभावाच्या लोकांविषयीं मत दिलें आहे. तो मिशनरी म्हणतोः—“ हे लोक साधे, आदरशील आणि प्रामाणिक आहेत. ” मलाया द्वीपकल्पांत राहणारे रानटी लोक आणि त्यांजवर राज्य करणारे मलायन् लोक ह्यांमध्यें आबे फेव्हर ह्यानें अशाच प्रकारचा विरोध दाखविला आहे. राजकर्त्या मलायन् लोकांचें वर्णन करितांना तो लिहितो कीं, संग्रामशील लोकांमध्यें आढळणारे मुख्य दोष जे खोटें बोलणें, फसविणें आणि लुटालूट करणें ते त्यांमध्यें इतके पूर्णपणें भरलेले आहेत कीं, त्यांजवर कसलाही विश्वास टाकण्याची सोय नाहीं. आणि पाहुण्यांचा आदरसत्कार करण्याची गोष्ट एकीकडेच राहिली, परंतु प्रवाशांना लुबाडण्याचा हरएक प्रयत्न केल्याशिवाय ते रहावयाचे नाहींत. आतां तेथील मूळच्या रहिवाशांसंबंधानें तोच ग्रंथकार काय लिहितो तें पहा. जिंकणाऱ्या लोकांच्या त्रासाला कंटाळून ते किल्ल्याप्रमाणें सुरक्षित अशा मध्यप्रांतांत पळून गेले आणि तेथें ते प्राथमिक स्थितींतच अजून आहेत. हातघाईस आल्यावांचून ते सामोपचारानें आपसांतील तंटेभांडणें मिटवितात. ते कधीं कोणाचे वाटेस जाणारे नाहींत, आणि साधारणमानानें ते मायाळू, सुस्वभावी, कृतज्ञ आणि परोपकारी असे असून थोरमनाचे आणि उदार आहेत. दोहोंमधील विरोधाचें त्यानें थोडक्यांत वर्णन केलें आहे. तो म्हणतोः—“मलायन् लोकांच्या वर्तनांत बहुतकरून क्षुद्रबुद्धि आणि दुष्ट मनोविकार व समजु-

ती दिसून येतात; परंतु जाकुनलोक स्वभावतःच अभिमानी व उदार आहेत. " उभयतांचें अशा प्रकारें वर्णन केल्यानंतर तो प्रश्न विचारितोः–" अशा प्रकारचा विलक्षण फरक पडण्याला काय वरें कारण असावें ?" मग ह्या प्रश्नाचें उत्तर देण्याचा प्रयत्न करितांना मलायन् लोकांच्या लुटारूपणाच्या व निर्दयपणाच्या कृत्यांविषयीं व किल्ल्यासारख्या सुरक्षित स्थळीं रहावयास मिळाल्यामुळें जाकुनलोकांना जो शांततेचा अनुभव मिळाला त्याविषयीं विस्तारपूर्वक लिहून हीं त्या त्या लोकांमध्यें उत्पन्न झालेल्या गुणांचीं कारणें असावीं असें त्यानें ध्वनित केलें आहे. सरतेशेवटीं साध्या आणि शांत स्वभावाच्या अराफूर लोकांचें उदाहरण घेऊन हें प्रकरण पुरें करूं.त्यांच्या संबंधानें विक् नामक फ्रेंच वकील म्हणतोः–" आपल्या गरीब ग्रामस्थांचें कर्ज फेडण्यासाठीं त्यांना पैसे देऊन लोकांकडून आपणांस श्रीमंत म्हणवून घ्यावें ही कायती त्यांची महत्त्वाकांक्षा असते व ती क्षम्य आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. ह्याचा परिणाम असा होतो कीं, त्यांच्या संपत्तीचा उपयोग एकसारखा ह्या कामाकडेच होत असतो. "

## प्रकरण ८

### माणुसकी.

औदार्य आणि माणुसकी हे मनोधर्म वस्तुतः भिन्न नसून, श्रेष्ठप्रतीची माणुसकी म्हणजेच औदार्य असें म्हटलें तरी चालेल. तथापि केवळ विषयविवेचनाच्या सोईकरितां ह्या ठिकाणीं निरनिराळ्या रीतीनें त्यांचा विचार केला आहे. कनवाळूपणा, दया, माया इत्यादि ज्या गुणांचा माणुसकींत अंतर्भाव होतो तेच कांहीं अंशांनीं औदार्याकडेही प्रवृत्ति करणारे आहेत हें मनांत आणिलें म्हणजे औदार्य आणि माणुसकी ह्यांचा किती निकटसंबंध आहे हें दिसून येईल. मात्र स्वार्थाच्या क्षुद्र हेतूमुळें औदार्याकडे जितकी प्रवृत्ति होते तितकी माणुसकीकडे होण्याचा संभव नाहीं. हे परार्थविषयक मनोधर्म आहेत व सहृदयपणा हाच त्यांचा साधारणजनक आहे. ह्यामुळें औदार्याचा मनुष्यस्वभावाच्या इतर घटकावयवांशीं जो संबंध दिसून आला व निरनिराळ्या सामाजिक स्थितींत औदार्याचें जें स्वरूप दृष्टीस पडलें तोच संबंध आणि तेंच स्वरूप माणुसकीच्या संबंधानेंही दृष्टीस पडावें अशी कल्पना करणें साहजिक आहे व ती चुकीची नाहीं असें पुढील विवेचनावरून दिसून येईल.

इतरांच्या सुखदुःखाचें कल्पनेनें जें आपण आपल्यामनांत प्रतिबिंब उठवितों तें जसें औदार्याच्या तसेंच माणुसकीच्याही उन्नत विचारांना कारणीभूत होत असतें, व त्या उभयतांमध्येंही प्रथमावस्थेपासून तों अत्युन्नता-

वस्थेपर्यंत अपत्यप्रेमाचा अंश असतोच. अपत्यप्रेमाविषयीं मागील प्रकरणांत थोडासा उल्लेख केलाच आहे. त्याचे कार्यकारणरूप दोन घटक आहेत. एक आपल्या स्थितीशीं तुलना करून पाहिलें असतां दुसऱ्याची अति दुर्बलावस्था मनांत आल्यानें उत्तेजित होणारे मनोविकार व दुसरा, त्या मनोविकारांच्या प्रोत्साहनानें दीनावस्थेतील प्राण्यांस मदत केल्यामुळें होणारा आनंदाचा अनुभव. अशा मिश्रणानें उत्पन्न झालेल्या ह्या मनोधर्माच्या संकीर्ण स्वरूपामुळें औदार्याचा विचार करितांना सामान्यसिद्धांत काढण्यास ज्या प्रकारची अडचण आली त्याच प्रकारची अडचण माणुसकीच्या संबंधानेंही येणार आहे.

औदार्याचा विचार करितांना सांगितल्याप्रमाणें येथें आणखी एक अडचण आहे व ती आतां सांगितलेल्या अडचणीचाच परिणाम आहे असें म्हटलें असतां चालेल. अनेक प्रकारच्या सामाजिक स्थितींतील लोकांमध्यें व विशेषतः प्राथमिक स्थितींतील लोकांमध्यें अगदीं परस्परविरुद्ध असे मनोविकार आढळून येतात. उदाहरणार्थ बुशमेन् घेऊं. त्यांच्या मनाचा कठोरपणा पुढील उताऱ्यांवरून दिसून येईल. मोफाट म्हणतोः—

"हे लोक आपल्या मुलांचा वध करितात व ह्या कृत्याबद्दल त्यांना केव्हांही पश्चात्ताप होत नाहीं."

लिचेन्स्टीन् म्हणतोः—

"दुसऱ्या कोणत्याही रानटी लोकांमध्यें निर्दयपणाची इतकी कमाल झालेली नसेल."

इतक्या कठोर हृदयाच्या मनुष्यांमध्यें कांहीं कोमलप-

णा असेल अशी कल्पनाही होत नाहीं. परंतु अनुभव ह्याच्या उलट आहे. मोफाट अजारी असतांना त्यांनीं त्याची काळजीपूर्वक जी शुश्रूषा केली तीबद्दल लिहितांना तो म्हणतोः–"आह्मी अगदीं परकी असतांना आमच्याशीं त्या लोकांनीं जें सहृदयपणाचें वर्तन केलें त्यानें आमच्या मनोवृत्ति उचंबळित झाल्या." आतां हाटेंटाट लोकांचें उदाहरण घेऊं. त्यांच्या सहृदयपणाचें वर्णन करितांना बर्चेल आणि कोल्बेन ह्या दोघांचीही एकवाक्यता आहे. कोल्बेन म्हणतो कीं "ते लोक स्नेहभावानें वागणारे, उदार आणि परोपकारी आहेत. तथापि कोल्बेन ह्यानेंच त्यांच्या कठोरपणाविषयीं पुरावा दिला आहे व स्पार्मन ह्यानें त्याचें दृढीकरण केलें आहे. ते म्हणतातः—"हे लोक अनेक प्रसंगीं आपल्या मुलांना जिवंतपणींच पुरतात व वृद्ध मनुष्यांना एकान्तांत मरण्यासाठीं सोडून देऊन आपण पाहिजे तिकडे जातात." आस्ट्रेलियन् लोकांत अशीच स्थिति आढळून येते. वृद्धापकालीं आप्तांचा त्याग करून त्यांस अन्नावांचून मरायास लाविणें व कधींकधीं आपल्या मुलांचा वध करणें हे अमानुष प्रकार त्या लोकांत चाललेले असून, त्यांजबद्दल असें वाचण्यांत येतें कीं ते आपल्या मुलांचे लाड करणारे व बहुत प्रसंगीं प्रवाशांच्या उपयोगीं पडणारे लोक आहेत. बोर्निओ बेटांतील लोकांच्या वर्तनांत दिसून येणारा विरोध तर ह्याहूनही चमत्कारिक आहे.तेथील डायक लोकांच्या संबंधानें वायल् म्हणतोः–"ह्या लोकांनीं एकादें खेडें हस्तगत केलें म्हणजे एका हातानें कोंवळें मूल उराशीं धरणारा

व दुसऱ्या हातानें त्याच्याच बापाचें रक्तबंबाळ झालेलें शिर गच्च धरून ठेविणारा डायक धांवत जातांना दृष्टीस पडण्याचे पुष्कळ प्रसंग येतात."

अशा स्थितींत निरनिराळ्या मनुष्यजाति आणि त्यांच्या निरनिराळ्या सामाजिकस्थिति ह्यांचा प्रस्तुत मनोधर्मांशीं जो संबंध असणार ह्याबद्दल काढिलेलीं सामान्य अनुमानें निश्चयात्मक असण्याचा संभव नाहीं हें सांगावयास नको.

प्रथमतः, ज्या लोकांत सहृदयपणाचा अगदीं अभाव आहे त्यांचीं उदाहरणें घेऊं. ह्या अभावाचें स्वरूप दोन प्रकारचें असण्याचा संभव आहे. दुसऱ्यांच्या दुःखांविषयीं उदासीन असणें हा एक प्रकार, व त्यांच्या दुःखांपासून आपणाला आनंद व करमणूक करून घेणें हा दुसरा प्रकार. कारेन् लोकांविषयीं मेसन म्हणतोः—

" एक बाई एका गलिच्छ झोंपडींत मरणोन्मुख होऊन पडली होती व मी एकटाच तिच्याजवळ असून तिची चाकरी करीत बसलों होतों. तिचीं मुलें व नातवंडें तेथेंच दूर होतीं. त्यांनीं येऊन आपल्या वृद्ध व मरणोन्मुख झालेल्या आईला व आजीला मदत करावी म्हणून त्यांचें मन वळविण्याविषयीं मीं हरप्रयत्न केले पण त्यांचा कांहीं उपयोग झाला नाहीं." हंड्यूरास येथील लोकांमधला सहृदयपणाचा अभाव हेरेरानें विवाहित स्त्रीपुरुषांचें एक उदाहरण घेऊन दाखविला आहे. नवरा अजारी पडून मरणाची मार्गप्रतीक्षा करीत असला तर बायको त्याच्या अन्नासाठीं कोंबडी मारणार नाहीं. कारण तिचें म्हणणें कीं,—"नवरा तर मरणारच;

मग आणखी कोंबडी मारून नवरा व कोंबडी ह्या दोघांस कशासाठीं मुकावें ? " नीग्रो लोकांच्या अनेक जातींमध्येंही अशा प्रकारचीं उदाहरणें घडून येतात. लोआंडो येथील नीग्रो लोकांविषयीं लिहितांना मांटीरो म्हणतोः—

" येथील नीग्रोलोकांचा निर्दयपणाकडे कल नाहीं ( आपण होऊन ते कोणाला निर्दयपणानें वागवीत नाहींत. ) परंतु कनवाळूपणा, दया, माया इत्यादि मनोधर्मांची त्यांस बिलकुल ओळख नाहीं. "

कशी ती पहाः—

" दुःखामुळें किंवा कोणीं हाल केल्यामुळें विंव्हळणारा मनुष्य किंवा प्राणी पाहून त्यांना मोठी करमणूक होते व आनंदाचें अगदीं भरतें येतें. "

डंकन आणि बर्टन ह्या दोघांचें डहोमे येथील लोकांविषयीं एकमत आहे. ते म्हणतातः—" कुटुंबांतील मनुष्यांच्या संबंधानें सुद्धां ह्या लोकांत सहृदयपणा किंवा कृतज्ञता ह्यांचा अत्यंत अभाव आहे. व अपत्यप्रेमाच्या संबंधानें पाहिलें असतां त्यांचा नंबर पशूंच्याही खालीं लाविला पाहिजे. " आशांटी लोकांच्या अंगीं तर हा सहृदयपणाचा अभाव इतका आहे कीं तो त्यांचें वर्तनतत्त्व होऊन बसला आहे व त्यावर प्रवर्तकनीतीचें शिक्कामोर्तब पडलें आहे. त्यांच्या भाषेत दोन म्हणी आहेत त्यांचें तात्पर्य येणेंप्रमाणें आहेः—

" जर दुसरा मनुष्य दुःख भोगीत असेल तर लांकडाच्या ओंड्याला दुःख होत आहे असें समजून तुम्ही चाला. "

"लोकांच्या विपत्तीशीं तुला कांहीं करावयाचें नाहीं. तूं दुसऱ्याच्या दुःखासाठीं आपणाला त्रास करून घेऊं नको."

आतां ह्या अप्रत्यक्ष निर्दयपणाकडून प्रत्यक्ष निर्दयपणाकडे वळूं. दक्षिण अमेरिकेंतील डमारा लोकांमध्यें दोहोंचींही उदाहरणें आढळतात. त्यांजबद्दल बेन्स म्हणतोः—

"वृद्धापकाळामुळें परावलंबी झालेल्या माणसांस निराश्रित सोडून देण्याची चाल अनेक रानटी लोकांच्या टोळ्यांत असलेली पुष्कळांना माहीत आहे; परंतु अजारी पडलेल्या मुलीच्या झोंपडीवर आच्छादन घालण्यासाठीं चार भारे गवत काढण्याचें आईनें नाकारावें हें मात्र अविश्वसनीय वाटण्याचा संभव आहे." ह्याच लोकांच्या संबंधानें गाल्टन् म्हणतोः—

"अजारी मनुष्याला त्याचे आप्तमित्र त्याच्या उबाऱ्याच्या खोलींतून ओढून काढून बाहेर थंडीवाऱ्यांत आणून टाकितात व त्याचा लवकर प्राण जाण्यासाठीं त्यांच्यानें करवेल तितका यत्न करितात."

डहोमे येथील लोकांच्या अप्रत्यक्ष निर्दयपणाचें एक उदाहरण वर दिलेंच आहे, त्याच्या जोडीला आतांच्या सारखीं प्रत्यक्ष निर्दयपणाचीं उदाहरणें देण्यासारखीं आहेत. त्या लोकांमध्यें वर्षांतून एकदां एक विशेष समारंभ होत असतो, त्यावेळीं पुष्कळ लोकांची कत्तल उडते. असें करण्याचा हेतु मेलेल्या राजांना परलोकीं नवीन चाकरांचा पुरवठा करावा हा असतो. आणखी एका कारणानें हे लोक माणसांची कत्तल उडवीत असतात.

त्यांत परलोकाचा संबंध नसून इहलोकींच्या वैभवाचाच संबंध आहे. मनुष्याच्या नरोट्यांनीं आपलीं घरें सुशोभित करणें त्यांना फार आवडतें, आणि ह्या शोभादायक पदार्थांचा मुबलक पुरवठा व्हावा ह्या हेतूनें ते मुद्दाम लढायाही उपस्थित करितात. अशाच प्रकारच्या स्वभावाच्या लोकांचें एक उदाहरण होल्ब ह्यानें दिलें आहे. दक्षिण आफ्रिकेंत मरुत्सि म्हणून लोक आहेत त्यांच्या संबंधानें तो लिहितोः—" ह्या लोकांच्या अंगचा एक मोठा दोष म्हटला म्हणजे त्यांचा अमानुष क्रूरपणा होय. " आणखी एक उदाहरण लार्ड वूलसली ह्यानें दिलें आहे. तो म्हणतोः—

" रक्तस्राव झालेला पाहणें व कोणत्याही कारणानें मनुष्याच्या शरीराला होणाऱ्या दुःखाचें लक्ष्यपूर्वक अवलोकन करणें ह्या गोष्टींपासून पश्चिम आफ्रिकेंतील नीग्रोलोकांना अलौकिक आनंद होतो. "

आतां सांगितलेल्या प्रत्यक्ष निर्दयपणाच्या उदाहरणांप्रमाणेंच उत्तर अमेरिकेंतील लुटालूट व जुलूम करीत फिरणाऱ्या टोळ्यांमध्यें कांहीं उदाहरणें आढळून येतात. स्वतः निर्दयपणानें वागतां यावें व लोकांनीं क्रूरपणानें वागविलें असतां तें सहन करितां यावें ह्यासाठीं लहानपणापासूनच ते आपल्या मुलांना त्या प्रकारची तालीम देत असतात. केवळ शिक्षणाच्या हेतूनें मुलांना ते नानाप्रकारचीं शारीरिक दुःखें देतात व शत्रूंचा सूड उगविण्यासाठीं ते त्यांना अनेक प्रकारें छळितात. अमेरिकेंत प्रेअरी नांवाचीं जीं विस्तीर्ण मैदानें आहेत त्यांत राहणाऱ्या इंडियन लोकांना " स्त्रियांच्या पोटीं

उत्पन्न झालेले लांडगे " असें म्हणण्याची चाल पडली आहे. ते म्हाताऱ्या पुरुषांना किंवा बायकांना धरून आणून त्यांचे हाल करण्यासाठीं आपल्या बायकांच्या हवालीं करितात मग त्यांच्या बायकांना ती मोठी करमणूकच होते. ही सर्व हकीकत देणारा बर्टन्साहेब यूटा म्हणून लोक आहेत त्यांच्या संबंधानें म्हणतोः— " त्यांच्या अल्पबुद्धिसामर्थ्याप्रमाणें त्यांना जितकें क्रूर होतां आलें तितके क्रूर ते झाले आहेत. " दुसऱ्या एका आधारावरून असें समजतें कीं, कोमांच लोकांच्या बायकांची क्रूरपणाच्या कामांत पुरुषांवरही ताण आहे. कैद करून आणिलेल्या मनुष्यांपैकीं पुरुषांचे हाल करण्यांत त्यांना फार आनंद वाटतो.

' रानटी ' ह्या शब्दाचा वास्तविक अर्थ रानांत राहणारा असा आहे. जनावरांच्या संबंधानें ह्या शब्दाचा उपयोग वारंवार होत असतो. रानांतलीं जनावरें क्रूर असल्यामुळें 'रानटी' शब्दानें क्रूरपणाचीही कल्पना येऊं लागली. मनुष्याला हा शब्द लाविला असतां त्याचा अर्थ वास्तविक रानांत राहणारा, म्हणजे प्राथमिक स्थितींतला, अर्थात् अशिक्षित इतकाच असला पाहिजे. परंतु प्रवासी लोकांच्या दृष्टीस पडलेल्या तशा कित्येक लोकांत क्रूरपणा, विश्वासघात इत्यादि दुर्गुण आढळल्यामुळें व प्रवासवर्णनाच्या पुस्तकांतून त्यांचा वारंवार उल्लेख झाल्यामुळें हे दुर्गुणही रानटीपणाचे वाचक आहेत. ' रानटी ' हें विशेषण जनावरांना लाविलें असतां जसा त्यापासून क्रूरपणाचा उद्बोध होतो त्याप्रमाणेंच तें मनुष्यांना लाविलें असतांही क्रूरपणा व इ-

तर कित्येक दुष्ट गुणांचा उद्बोध होऊं लागला. ' रानटी लोक ' हे शब्द ऐकिले किंवा वाचले असतां ते दुष्ट, क्रूर, नीच असावे असें वाटतें. आणि सुधारलेले लोक व रानटीलोक ह्यांजमधील भेद दर्शविणारे हेच दुर्गुण आहेत असा पुष्कळांचा समज आहे. परंतु वास्तविक स्थिति अगदीं भिन्न आहे. अनेक प्रसंगीं रानटी लोकांकडून झालेलीं क्रूरपणाचीं कृत्यें, त्यांना सुधारलेल्या लोकांनीं विनाकारण दिलेल्या त्रासानें ते संतापून गेल्यामुळें घडून आलेलीं आहेत. तथापि तीं सर्व धरिलीं तरी सुधारलेल्या मानिल्या जाणाऱ्या लोकांच्या हातून आजपर्यंत जितकीं क्रूरपणाचीं कृत्यें घडलीं आहेत तितकीं प्राथमिक स्थितींतील लोकांच्या हातून घडलेलीं नाहींत.

एशियाखंडांतील सुधारलेल्या प्राचीन राष्ट्रांतील लोकांच्या हातून जीं असंख्य क्रूरकर्में घडलीं आहेत त्यांचा येथें विस्तार करावयास नको. मागल्या एका प्रकरणांत सांगितलेलीं असीरियन् राजांचीं दुष्कृत्यें मासल्याकरितां मनांत आणिलीं म्हणजे पुरत. होमरकवीनें ज्यांचें एवढें स्तोत्र गायिलें आहे व त्यामुळें ज्यांची युरोपियन लोक एवढी वाखाणणी करितात त्या ग्रीक योद्ध्यांच्याही क्रूरकर्मांचें वर्णन करावयास न लागतां ग्रोट ह्यानें त्यावेळच्या ग्रीक लोकांविषयीं आपल्या इतिहासांत जें मत प्रदर्शित केलें आहे तेवढेंच देतों. इतिहासांतील पुरावे देऊन ग्रोट ह्यानें त्या लोकांना लबाड, चोर आणि खुनी असें म्हटलें आहे. त्याचप्रमाणें स्पार्टन लोकांच्या क्रौर्याचें व होमेरिक काळानं-

तरच्या ग्रीक लोकांच्या कठोरपणाचें वृत्त एकीकडे ठेवून एकदम रोमन लोकांकडे वळूं. त्यांच्या पराक्रमाला भुलून पुष्कळ लोकांनीं त्यांच्या सुधारणेचे पोंवाडे गायिले आहेत. परंतु त्यांच्या सुधारणेशीं क्रूरपणाचें पुष्कळच मिश्रण झाल्यामुळें ती सुधारणा सगळ्या यूरोपाला पुष्कळ शतकेंपर्यंत भोंवली. एकसारख्या वीस पिढ्या लढाया चालल्यामुळें लुटालूट, मारामारी, अंदाधुंदी ह्यांनीं मनुष्यांचे स्वभाव इतके कठोर बनले कीं, त्यांची बरोबरी करणारी रानटी लोकांची एकही जात माहीत नाहीं. उत्तर अमेरिकेंतले इंडियनलोक बंदिवानांना क्रूरपणानें वागवून त्यांचे हाल करितात ही गोष्ट खरी आहे, परंतु त्यांनीं कधीं आपल्या गुलामांचे हाल केल्याचें ऐकिवांत नाहीं. फिजियन् लोकांनींही पादाक्रांत केलेले पुष्कळ लोक असत व फिजियन् लोक मनुष्यभक्षक पडल्यामुळें त्यांचा ते मेजवान्यांचे कामीं उपयोग करीत; परंतु एका गुलामानें आपल्या धन्याचा खून केल्याबरोबर त्याच्या जातीच्या शेंकडों गुलामांना देहान्त प्रायश्चित्त देत बसण्याचें अमानुष कृत्य त्यांनीं कधीं केलें नाहीं. आणि लढाईंत जिंकलेल्या लोकांपैकीं जे जिवंत हातीं सांपडतील त्यांना दास्यांत ठेविण्याचा जरी अशिक्षित लोकांमध्यें बराच प्रघात आहे; तरी त्यांचे मेंढरांसारखे कळप करावे, त्यांजकडून जनावरांसारखें काम करून घ्यावें व मनुष्यपणाचे कोणतेही हक्क त्यांस देऊं नयेत असें वर्तन त्यांच्या हातून कधीं घडत नाहीं; किंवा ते आपली रक्तस्रावाची इच्छा तृप्त करण्याकरितां सार्वजनिक मैदानांत त्यांजमध्यें द्वंद्वयुद्धें लावून देऊन

आपण तो तमाशा पहातही बसत नाहींत. रोमन लोकांना द्वंद्वयुद्धें व कुस्त्या पाहण्याची इतकी चटक लागली होती कीं ही इच्छा तृप्त करणें हें क्षुधाशमनार्थ अन्नखाण्याइतकें स्वाभाविक आहे असें त्यांस वाटूं लागलें होतें. 'रानटी' ह्या शब्दाच्या वास्तविक अर्थाकडे लक्ष्य न देतां त्या शब्दानें हल्लीं जो बोध होतो त्या अर्थानें त्याचा उपयोग करावयाचा म्हटला तर असें म्हणण्यास हरकत नाहीं कीं, फिजियन् लोक एका बाजूला ठेविले असतां बाकीचे सर्व रानटी लोक रोमच्या रानटी लोकांपुढें अगदीं फिक्के पडतात.

धर्माभिमान किंवा देशाभिमान ह्यामुळें उत्पन्न होणाऱ्या दुराग्रहानें ज्यांची दृष्टि अंध झालेली नसेल त्या ख्रिस्ती लोकांना सुद्धां स्पष्ट दिसेल कीं, यूरोपांतील ख्रिस्ती राष्ट्रांच्या इतिहासांत सुद्धां बहुतेक प्रसंगीं असाच प्रकार आहे. भिन्नभिन्न राष्टांच्या परस्परांशीं लढाया व एका राष्ट्रांतील लोकांचीं आपसांतील भांडणें ह्यांमुळें मनुष्यस्वभावांत जो क्ररपणा उत्पन्न झाला होता त्याच्या पुढें ज्या लोकांना रानटी समजण्याचा प्रघात पडला आहे त्यांचा क्रूरपणा कांहींच नव्हे. अर्धवट सुधारलेल्या लोकांमध्यें अमानुष क्रूरपणाची परमावधि झालेली होती खरी; उदाहरणार्थ मेक्सिको देशांतील व मध्य अमेरिकेंतील लोक भाजलेल्या बटाट्याप्रमाणें आपल्या शत्रूंचीं शरीरें सोलीत व त्यांच्या धडधडणाऱ्या उरांचें विदारण करीत. परंतु यूरोपांतील क्रौर्याची जरी येथपर्यंत मजल गेलेली नसली तरी 'तूं आपल्यावर जितकी प्रीति करितोस तितकीच दुसऱ्या-

वर कर ' हें ज्यांचें रहस्य आहे अशा ख्रिस्ती धर्माचे आह्मी अनुयायी आहों असें मोठ्या दिमाखानें मिरवीत असतां शरीराला दीर्घकालपर्यंत नानाप्रकारचीं दुःखें देतां यावीं ह्या उद्देशानें नवीन यंत्रें निर्माण करण्यासाठीं युरोपियन लोकांनीं बुद्धिकौशल्य व हस्तकौशल्य खर्च केलें आहे.* धर्मभ्रष्टांचें, आपल्या जादूनें लोकांस

---

*राक नांवाचें मनुष्याला यातना देण्याचें एक यंत्र होतें त्यांत मनुष्याला जमिनीवर उताणा निजवून त्याचे हातपाय त्या यंत्रांतील दोन सोंटग्यांना बांधावयाचे असत. हातपाय बांधून झाल्यावर तीं सोंटगीं एकमेकांपासन दूर ओढिलीं जात व त्या मनुष्याचें शरीर ताणिलें जाऊन त्याला वेदना होत. आरोपीकडून कांहीं अपराध कबूल करून घ्यावयाचा असे तेव्हां ही क्रिया चाललेली असतांना त्याला प्रश्न विचारिले जात. हें सर्व सरकारी अधिकाऱ्यांच्या देखरेखीखालीं होत असे व त्याला कायद्याची संमति असे. सरकारी अधिकाऱ्यांना पाहिजे असतील त्या प्रकारचीं उत्तरें आरोपीकडून मिळतपर्यंत यंत्रांतलें सोंटगें हळूहळू दूर करण्याचें काम चालत असे. आणि अनेक प्रसंगीं अशा रीतीनें छळ सोसणाऱ्या माणसांचीं हाडेंही सांध्यांपासून निखळत. यूरोपांतील बहुतेक देशांत अशा प्रकारें आरोपींचा छळ करण्याची किंवा आरोप शाबीद झाला असतां अशा रीतीनें शिक्षा देण्याची चाल होती व तिला कायद्याचें अनुमत होतें. इंग्लंडांत मात्र कायद्याचें अनुमत नव्हतें तरी त्या यंत्राचा अनेक प्रसंगीं राज्यकर्त्या लोकांकडून उपयोग होत असे. सहाव्या हेन्रीच्या कारकीर्दींत त्याचा इंग्लंडांत प्रवेश झाला व तें पहिल्या चार्ल्सराजाच्या वेळेपर्यंत उपयोगांत येत होतें.

आरोपींना छळण्याचा आणखी एक प्रकार होता. त्याला जमिनीवर उताणें निजवावयाचें व त्याच्या अंगावर पुष्कळ वजनाचें लोखंड ठेवावयाचें. मग त्याला एक दिवस घाणेरडी भाकरी व दुसऱ्या दिवशीं घाणेरडें पाणी असें देऊन कबूल येईपर्यंत किंवा मरेपर्यंत तसाच ठेवावयाचा.

त्रास देणाऱ्या जखिणींचें ( बायांचें ) व राजद्रोह किंवा राष्ट्रद्रोह करणाऱ्या लोकांचें नुसतें देहान्त प्रायश्चित्त दिल्यानें पूर्ण पारिपत्य होत नाहीं असें त्यांस वाटलें असावें; व दीर्घकाल वेदना देण्यासाठीं नवीन युक्त्या काढण्याचे कामीं त्यांनीं आपल्या बुद्धीचा, शक्तीचा व काळाचा व्यय केला असावा. आरोपींनीं गुन्हे कबूल केले नाहींत तर त्यांजकडून ते कबूल करविण्याच्या कामींही ह्या यंत्रांचा फार उपयोग होत असे. सध्यां यूरोपांतल्या बहुतेक राष्ट्रांतील लोकांना खरमरीत राज्यव्यवस्थेमुळें सर्व प्रकारचे व्यवहार शांतपणें करण्याची संवय झाली आहे व त्यांजमध्यें क्रूरपणाचे फारसे प्रकार आढळून येत नाहींत, परंतु जेथें त्यांच्या मनावर बाहेरचा दाब फारसा नसतो तेथें त्यांचें मूळचें स्वरूप अजूनही बाहेर पडतें. युरोपियन लोकांच्या चोहोंकडे ज्या वसाहती पसरलेल्या आहेत तेथें त्यांचें वर्तन अगदीं निराळें असतें. आपापसांत त्यांचें कांहीं फारसें चालत नाहीं. कारण ते एकमेकांचा समाचार घेण्यास समर्थ असतात. पण नेटिव्हांशीं प्रसंग आला म्हणजे मग मात्र त्यांच्या इच्छेला आवरणारें कांहीं नसतें. आस्ट्रेलियांत वसाहत करणाऱ्या लोकांनीं तेथल्या नेटिव्हांना अत्यंत क्रूरपणानें वागविलें आहे. केव्हांकेव्हां युरोपियन लोकांच्या जुलमाला त्रासून नेटिव्हांनीं जिवावर उदार होऊन परत त्यांची खोड जिरविण्याचा यत्न केला म्हणजे त्यांना मात्र रानटी म्हणावयाचें. आपल्या देशांत ब्रिटिशसरकारचें वरीच दाद घेणारें राज्य असतांही इंग्लिश लोक, विशेषतः सरकारी काम-

गार, कसे वागतात व गाडीवाल्यांना आणि चाकरमाणसांना घोड्याच्या चाबकाखालीं मारण्याचे व भलत्याच ठिकाणीं लाथ किंवा गोळी लागून मरण्याचे किती प्रसंग येतात ते मनांत आणिले म्हणजे ज्याठिकाणीं कसलाच दाब नसेल त्याठिकाणीं असल्या लोकांच्या हातून कोणत्या प्रकारचें वर्तन होईल ह्याची कल्पना करणें फारसें कठिण नाहीं.

कित्येक जातींच्या अशिक्षित लोकांत सहृदयपणा व त्यापासून उत्पन्न होणारे मनोधर्म अगदीं आढळून येत नाहींत; परंतु दुसऱ्या कित्येक जातींचे लोक बुद्धीच्या व शिक्षणाच्या संबंधानें जरी सुधारलेल्या लोकांच्या बरेच मागें असले तरी माणुसकीच्या संबंधानें ते त्यांची बरोबरी करूं शकतात व कित्येक तर सुधारलेल्या लोकांनाही लाज आणितात. ह्या संबंधाचा पुरावा प्रवासवर्णनाच्या पुस्तकांतून पाहिजे तितका मिळण्यासारखा आहे. परंतु येथें फारसा विस्तार करीत न बसतां व ग्रंथकारांचीं नांवें न देतां कित्येक ठिकाणच्या लोकांची विषयाला अनुसरून माहिती देतों.

वेद्दा हे लोक सामान्यतः सौम्य स्वभावाचे आणि मायाळू आहेत. त्या लोकांच्या विधवांचें पोषण समाजाकडून होत असतें. न्यू हेब्रिडीझ द्वीपसमूहांत टाना नांवाचें बेट आहे तेथील लोकांमध्यें अजारी मनुष्यांची शुश्रूषा त्यांच्या अंतकालापर्यंत मायाळूपणानें केली जाते. न्यू गिनी येथील पाप्युअन लोकांच्या कित्येक टोळ्यांनीं युरोपियनलोक अगदीं हातांत सांपडले असतां त्यांशीं मोठ्या थोरपणाचें वर्तन केलें आहे. डायक

लोकांच्या अंगीं इतकी माणुसकी आहे कीं, ती पाहून सुधारलेल्या लोकांस लाज वाटावी. सुधारलेल्या लोकांच्या वर्तनांत जी माणुसकी दिसून येते तीपेक्षां मालागासी लोकांच्या वर्तनांत अधिक दिसून येते. एस्किमो लोकांचें परस्परांशीं वर्तन पाहिलें असतां त्यांच्याइतके मायाळू लोक जगांत दुसरे नाहींत अशी खात्री होईल. इरोकोई लोकांमध्यें पोरक्या पोरांवर ममता करणें, सर्वांशीं सभ्यपणानें व मानमरातब ठेवून वागणें व सर्व मनुष्यें भावंडांप्रमाणें आहेत असें मानणें ह्या गोष्टी अत्यवश्यक समजल्या जातात. युरोपियन लोकांशीं दळणवळण सुरू होण्यापूर्वीं अमेरिकन इंडियनांमधील चिपेवा लोक परस्परांशीं परोपकारबुद्धीनें वागत असत व त्यांच्या विधवा आणि पोरकीं मुलें ह्यांना दारिद्र्यांत व विपत्तींत दिवस काढावे लागत नसत. आराकानियन् लोकांमध्यें भीक मागणारे मनुष्य आढळावयाचे नाहींत. कितीही गरीब मनुष्य असले व त्यांना आपलें पोट भरण्याचें सामर्थ्य नसलें तरी त्यांना अंगभर वस्त्र असतेंच. जिंकिलेल्या लोकांशीं ते उदारपणाचें व माणुसकीचें वर्तन करितात. आफ्रिकेंतल्या मांडिंगो लोकांविषयीं एक प्रवासी म्हणतोः—" ह्या गरीब हीदन ( ख्रिस्ती नव्हत असे ) लोकांनीं माझ्या विपत्तींत मजविषयीं जो कळवळा दाखविला व माझी चांगली काळजी घेऊन मजकडून कोणत्याही प्रकारचा मोबदला मिळविण्याची इच्छा न करितां मजवर जे उपकार केले ते माझ्या स्मरणांतून कधींही जावयाचे नाहींत. " आणि लुआन येथील लोकांच्या मायाळूप-

णाविषयीं बोलत असतां कोल्फ म्हणतोः—" एकोप्यानें वागणें, समाधानानें राहणें, दुसऱ्याच्या कामांत विनाकारण ढवळाढवळ न करणें, एकमेकांना हातभार लाविण्यासाठीं तत्पर असणें, कुटुंबांत शांतता ठेवून सुखानें नांदणें, सर्वांशीं माणुसकीनें वागणें आणि अभ्यागतांचें आगतस्वागत करणें, हे गुण ह्या लोकांमध्यें जितके मला आढळले त्यांहून अधिक दुसऱ्या कोणत्याही लोकांमध्यें आढळले नाहींत. "
ह्या प्रकरणाच्या आरंभीं मोफाट ह्यानें केलेलें बेआन् लोकांच्या स्वभावाचें जें वर्णन दिलें आहे त्यांत व दुसऱ्याही कांहीं उदाहरणांत जरी मायाळूपणा व क्रूरपणा ह्यांचें मिश्रण आढळतें तरी आतां दिलेल्या कित्येक उदाहरणांत, विशेषतः वेद्दा, एस्किमो आणि लुआन येथील लोक ह्यांमध्यें अशा प्रकारचें मिश्रण आढळून येत नाहीं.

एशियाखंडांतील लोकांच्या फार प्राचीनकाळच्या ग्रंथांत सहृदयपणा व मनाचा कोमलपणा ह्यांचे द्योतक विचार असंख्य ठिकाणीं आढळून येतात व दयेचीं कृत्यें करण्याविषयीं आज्ञा किंवा उपदेश केलेलाही अनेक स्थलीं दिसून येतो. कवि आणि ज्ञातेलोक ह्यांच्या डोक्यांतून निघालेले ते विचार आहेत व प्रत्यक्षवस्तुस्थितींत त्यांचा फारच थोडा अंश दिसून येत असला पाहिजे. तथापि कांहीं अंशांनीं त्यांचें महत्त्व कबूल केलें पाहिजे. गडबडीचा काळ जाऊन एकेठिकाणीं व्यवस्थित रीतीनें राहण्याची लोकांना संवय झाल्यानंतर ह्या विचारांचा उदय झाला असला पाहिजे. हिंदुलोकांच्या प्राचीनग्रंथांपैकीं महाभारतांत पुढील श्लोक आढळतोः—

*अद्रोहः सर्वभूतेषु कर्मणा मनसा गिरा ।
अनुग्रहश्च दानंच सतां धर्मः सनातनः ॥
वनपर्व, अ० २९७, श्लो० ३९.

वरील श्लोक सावित्र्याख्यानांत आहे. सावित्रीचा भर्ता सत्यवान् ह्याला घेऊन यमराजाची स्वारी चालली असतां ती त्याचे मागोमाग गेली व पुढें त्या दोघांचें संभाषण झालें हा कथाभाग सर्वांस माहीत आहेच. आपल्या भर्त्याचा जीव यमानें परत द्यावा ह्यासाठीं त्याच्या मनांत दयेचा पाझर उत्पन्न करण्याकरितां तिनें मोठें हृदयद्रावक भाषण केलें. त्या भाषणाच्या ओघांत यमास उद्देशून तिनें थोरपुरुषांचें वर्तन कसें असावें तें सांगितलें आहे. पर्शियन् लोकांचें पवित्रपुस्तक झेंद आवेस्ता ह्यांत दयाशीलपणाचें वर्तन करण्याविषयीं धर्माज्ञा दिल्या आहेत त्यांचा उद्भव कांहीं अंशांनीं तरी पुनर्जन्मावर त्यांचा विश्वास असल्यामुळें झाला असावा. प्राण्यांवर दया करण्याविषयीं जो त्यांचा आग्रह आहे तो त्यामुळेंच असावा. कारण, मनुष्य मेल्यानंतर कोणत्या तरी प्राण्याच्या जन्मास जातें. तेव्हां आई, बाप, भाऊ, बहिणी इत्यादि आपल्या प्रीतींतल्या माणसांपैकीं जीं मेलेलीं असतील तीं कोणत्या प्राण्यांच्या जन्मास गेलीं असतील त्याचा कांहीं नियम नसतो. करितां सर्व प्राण्यांवरच दया केली असतां, त्यांना आपल्या हातून त्रास पोंचण्याचा संभव नाहीं. अशा समजुतींनीं त्यांना कदा-

* कोणालाही दुष्कृतानें, दुर्विचारानें, किंवा दुर्भाषणानें न दुखविणें आणि सर्वांवर दया व उपकार करणें हें सत्पुरुषाचें सार्वकालिक कर्तव्य आहे.

चित् भूतदयेची अधिक अवश्यकता वाटली असेल. तथापि त्यांच्या गुलिस्तान नामक ग्रंथांत जे वर्तनाचे स्पष्ट नियम दिले आहेत ते त्या कारणामुळें उत्पन्न झालेले नाहींत. पुढील अवतरण गुलिस्तानांतलें आहे.

"दुर्बल शेतकऱ्यावर दया करा. गरीब आणि निराश्रित प्रजेला सत्तेच्या जोरावर चिरडून टाकणें हा गुन्हा आहे. दुसऱ्यांच्या दुःखांविषयीं जर तूं उदासीन राहशील तर तुला मनुष्य हें नांव देणें योग्य होणार नाहीं." ईजिप्शियन् लोकांमध्यें सुद्धां गरीबांना दानधर्म करणें अवश्यकर्तव्य समजलें जात असे. बर्च आणि इंकर म्हणतात कीं, "बुभुक्षिताला अन्न देणें, तृषितांची तहान भागविणें, उघड्याला वस्त्रानें आच्छादित करणें आणि निराश्रितांस आश्रय देणें" ह्या गोष्टी धर्मानें व शिष्टाचारानें त्यांच्या पाठीमागें लावून दिलेल्या होत्या. आणि त्यांच्या थडग्यांतून जे हस्तलेख सांपडतात त्यांत देखील न्याय आणि परोपकार ह्यांनीं भरलेलीं चरित्रें आढळतात. विधवा आणि निराश्रित ह्यांचें रक्षण करणें, दुष्काळाचे प्रसंगीं लोकांची काळजी घेणें इत्यादि गोष्टींचा त्यांत अनेक ठिकाणीं उल्लेख आहे. पुरातन काळांतील चिनी लोकांच्या ग्रंथांतही भूतदया व तिच्यापासून उत्पन्न होणारे अनेक सद्गुण पुष्कळ वाखाणिले आहेत. लेगे ह्यानें 'चिनी लोकांचे धर्म' म्हणून जें पुस्तक लिहिलें आहे त्यावरून असें दिसतें कीं, लाओझी ह्याला देहान्तशिक्षा देण्याची चाल आवडत नव्हती व तिजविषयीं त्यानें तिरस्कारपूर्वक लिहिलें आहे. राष्ट्रांराष्ट्रांतील वाद मिटविण्यासाठीं युद्धाचा उपयोग क-

रण्याच्या चालीबद्दल देखील तो खेद प्रदर्शित करितो. कन्फ्यूशिअस ह्याचेही अशाच प्रकारचे विचार आहेत. तो म्हणतोः—" दुसऱ्याचें बरें करण्याची इच्छा हें माणुसकीचें मुख्य लक्षण आहे." दुसऱ्याच्या दुःखानें दुःखी होण्याचा स्वभाव मनुष्याला अत्यवश्यक आहे असें प्रतिपादन करीत असतां मेन्शिअस म्हणतोः— " थोर मनाच्या पुरुषांचें हृदय मनुष्यांसाठींचसें काय, पण मनुष्येतर प्राण्यांसाठींही कळवळून जातें." हा प्राचीनकाळच्या लोकांच्या पवित्रग्रंथांतील पुरावा पूर्ण करण्यासाठीं हीब्र्यू लोकांच्या धर्मपुस्तकांत कोणत्या प्रकारचे विचार आढळतात तेंही पाहिलें पाहिजे. त्यांच्या फार जुन्या ग्रंथांत जरी ह्या संबंधानें फारसा उल्लेख केलेला नाहीं तरी नंतरच्या ग्रंथांत मनुष्यांनाचसें काय, परंतु जनावरांनाही ममतेनें वागवून त्यांजवर दया करण्याविषयीं आज्ञा व उपदेश आढळतात. युरोपियन लोकांनीं ज्यावेळीं ख्रिस्तीधर्माचें ग्रहण केलें त्यावेळीं हीब्र्यू लोकांचे हे विचार व येशू ख्रिस्ताचे त्यांहूनही उन्नत विचार ह्यांचेंही अर्थात् ग्रहण केलेंच. परंतु अनेक शतकेंपर्यंत त्यांच्या वर्तनावर ह्या विचारांचा थोडा देखील परिणाम घडला नाहीं.

अनेक कारणांनीं उत्पन्न होणारें कार्य असून त्या कारणांचें परस्परांशीं प्रमाण बदलणारें असलें व त्यांत आणखी पुरावाही गुंतागुंतीचा असला म्हणजे निश्चयात्मक सामान्य अनुमानें काढणें कठिणच असतें. तशीं अनुमानें निघण्याचा थोडाबहुत संभव असेल तर त्यांसाठीं मागील प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें अगदीं कडे-

लोटीचीं उदाहरणें घेऊनच त्यांची परस्परांशीं तुलना केली पाहिजे.

ज्या कारेन् लोकांचें उदाहरण पूर्वी घेतलें आहे व ज्यांना सहृदयपणाचा गंधही नाहीं म्हणून सांगण्यांत आलें आहे त्यांविषयीं एक ग्रंथकार म्हणतो कीं, ह्या लोकांच्या प्रत्येक टोळीचें दुसऱ्या प्रत्येक टोळीशीं वैर असतें आणि त्यांमध्यें बहुतकरून सदोदित लढाया चाललेल्या असतात. आफ्रिडी म्हणून तांबड्या इंडियन लोकांची आणखी एक जात आहे तींतही हाच प्रकार आहे. ह्या लोकांचा भांडखोरपणा इतका विलक्षण आहे कीं, कोणा आफ्रिडी मनुष्याचे जर दहा नातलग असले तर त्यांपैकीं नवांशीं ह्याचा उभा दावा असावयाचा. कोमल विचारांचा किंवा मनोविकारांचा त्यांच्या मनाला कधीं स्पर्शही होत नाहीं. त्यांच्याबद्दल म्याक् ग्रेगर म्हणतोः—" निर्दयपणानें लपूनछपून दरोडे घालणें व मनुष्य बेसावध असतां विश्वासघातानें त्याचा खून करणें ह्या गोष्टी त्यांना आयुष्याला खमंगपणा आणणाऱ्या वाटतात." डहोमे येथील लोकांचें उदाहरण वर घेतलें आहे व मनाचा कोमलपणा दर्शविणारे गुण त्यांजमध्यें मुळींच नाहींत—फार काय, पण आपल्या पोटच्या पोरांबद्दलही त्यांजला दया उत्पन्न होत नाहीं—असें सांगण्यांत आलें आहे. त्यांची सांग्रामिक व्यवसायांची आवड दर्शविणारी एक अलौकिक गोष्ट त्यांजमध्यें दिसून येते. पुरुषांच्यानें लढाईचें सर्व काम निभत नाहीं म्हणून कीं काय, त्यांच्या सैन्यांत स्त्रियांच्या पलटणी ठेविल्या आहेत. उत्तर अमेरिकेंतील इंडियन

लोकांपैकीं रानटी स्थितींतील अगदीं शेवटच्या पायरी-वरचे लोक म्हटले म्हणजे डकोट व कोमांच हे होत. कैदी लोकांचे हाल करण्यांत त्यांचा निर्दयपणा दिसून येतो. बारीकसारीक दंगेधोपे व मोठमोठ्या लढाया ह्यांचा तेथें नेहमीं सुकाळ असतो.

आतां, ज्या लोकांना युद्धाचा अगदीं कंटाळा असतो व जे नेहमीं परस्परांशीं गुण्यागोविंदानें राहत असतात त्यांची स्थिति पाहूं. ज्या लोकांमध्यें ही स्थिति अगदीं शिखरास जाऊन पोहोंचली आहे असे लोक म्हटले म्हणजे एस्किमो, लुआन्चे रहिवासी व वेद्दा हे होत. नेहमीं सांग्रामिक व्यवसायांत गुंतून राहिल्यानें मनुष्यस्वभावांत जो कठोरपणा उत्पन्न होऊन वृद्धि पावत असतो तो ह्यांच्या अंगीं मुळींच नसल्यामुळें सहृदयपणाच्या गुणांचा विकास होण्यास पुष्कळ अवकाश सांपडतो आणि त्याचा परिणाम मायाळूपणाच्या व परोपकाराच्या वर्तनांत दृष्टीस पडतो. आतां सांगितलेल्या तीन लोकांविषयीं पूर्वीं जी माहिती दिली आहे तीवरून ही गोष्ट स्पष्ट ध्यानांत येईल.

कृतज्ञता आणि माणुसकी ह्या दोघी बहिणीबहिणी आहेत असें म्हटलें तरी चालेल. कारण ह्या दोहोंचीही उत्पत्ति सहृदयपणापासूनच आहे. ह्या प्रकरणांत माणुसकीसंबंधानें जो विचार झाला तोच बहुतांशीं कृतज्ञतेलाही लागू पडणारा आहे. तेव्हां कृतज्ञतेचा निराळा विचार करण्याची अवश्यकता नाहीं. येथेंच ह्या गुणाचें अस्तित्व व अभाव दर्शविणारीं दोन उदाहरणें दिलीं म्हणजे पुरतील. लढाया आणि दंगेधोपे ह्यांवांचून ज्यां-

ना चैन पडावयाचें नाहीं त्या फिजियन् लोकांविषयीं वुइल्यम्स म्हणतो कीं, कृतघ्नता हा दोष त्यांमध्यें ओतप्रोत भरलेला आहे. त्याचा त्या लोकांबद्दल स्वतःचा अनुभव पुढील अवतरणांत दिला आहे:—

"एकाद्या अजारी मनुष्यावर मेहेरबानी करून जर मीं त्याला औषध दिलें तर तेवढ्याबद्दल माझे उपकार मानणें एकीकडे राहून, मीं त्याच्या खाण्यापिण्याचीही व्यवस्था केली पाहिजे असें त्याला वाटे. बरें, त्याला अन्नपाणी दिलें तर तेवढ्यानें तरी कुठें त्याची तृप्ति होणार ? तें मिळाल्याबरोबर आपला वस्त्रप्रावरणावरही हक्क लागू झाला असें त्याच्या मनांत येई, व त्याची प्राप्ति झाल्यानंतर आपणाला जरूर लागेल तो पदार्थ ह्यानें पुरवावा अशी तो इच्छा करूं लागे. आणि जेव्हां मी त्याची असली इच्छा तृप्त करण्याचें नाकारीं तेव्हां तो मला यथेच्छ शिव्यांची पुष्पांजलि देई." आतां ह्याच्या उलट उदाहरण घेऊं. फिजियन् लोकांना सांग्रामिक व्यवसायांची जितकी आवड आहे तितकाच वेद्दा लोकांना तिरस्कार आहे. आर्थर्टन् ह्यानें त्या लोकांचें वर्णन दिलें आहे त्यांत तो म्हणतो:—"त्यांना थोडी मदत केली किंवा त्यांजविषयीं थोडी काळजी दर्शविली तरी तीबद्दल देखील ते लोक फार कृतज्ञ असतात." बेनेट् ह्यानें त्यांतल्या कित्येक लोकांस बक्षिसें दिलीं होतीं व कित्येकांच्या तो उपयोगीं पडला होता. ते त्याचे उपकार फेडण्याबद्दल एक चमत्कारिक उदाहरण घडून आलें. तो म्हणतो:—

"सुमारें सहा फूट लांबीचे दोन हत्तीचे सुळे एके

दिवशीं सकाळीं अकल्पित आमच्या ओटीवर येऊन पडले. ज्यांवर माझे उपकार घडले होते त्यांपैकीं कांहीं मनुष्यांनीं हे रात्रीं येथें आणून टाकिले असावे हें मीं ताडिलें. परंतु ज्यांनीं एवढा मनाचा थोरपणा दाखविला ते गृहस्थ कोण, हें मला अखेरपर्यंत समजलें नाहीं. त्यामुळें त्यांचे आभार प्रदर्शित करण्याला किंवा त्यांना मोबदला देण्याला मला संधि मिळाली नाहीं. अगदीं प्राथमिक स्थितींतल्या वेड्या लोकांपासूनही सुधारलेल्या लोकांनीं शिकण्यासारखा हा किती उत्कृष्ट धडा आहे?" कोणालाही कळूं न देतां आपणावर घडलेल्या उपकाराहूनही अधिक मोबदला पोंचविण्याचा हा गुण तर त्यांच्यापासून शिकण्यासारखा आहेच, पण ह्या लोकांचें आचरण मनांत आणून ह्याहूनही महत्त्वाची एक गोष्ट सुधारलेल्या लोकांनीं नेहमीं ध्यानांत बाळगिली पाहिजे. ती ही कीं, मोठ्या दिमाखानें आपल्या धर्माचें श्रेष्ठत्व मिरविणाऱ्या व रात्रंदिवस धर्मतत्त्वांचें व नीतितत्त्वांचें पारायण करणाऱ्या लोकांतही जे श्रेष्ठ प्रतीचे सद्गुण आढळत नाहींत ते कधींकधीं अगदीं अशिक्षित लोकांमध्येंही आढळून येतात.

# प्रकरण ९

## यथार्थवादित्व

शंभर नंबरी सत्य फारच दुर्मिळ आहे. जे लोक सत्यवादी म्हणून मानिले जातात त्यांच्या तोंडूनही असत्यभापण निघण्याचे प्रसंग प्रत्यहीं येतात. कोणतीही पाहिलेली किंवा ऐकिलेली गोष्ट सांगावयाची असतां तिला तिखटमीठ लागल्यावांचून राहत नाहीं. मनुष्याच्या मनाचा ज्याप्रमाणें कल असेल त्याप्रमाणें तो पाहिलेल्या किंवा ऐकिलेल्या गोष्टींत अधिक-उणें करून सांगत असतो. हा दोष मनुष्याच्या हाडीं इतका खिळून गेला आहे कीं, तो आपल्या हातून घडत आहे ह्याचेंही त्यास भान नसतें. अतिशयोक्तीचा दोष बहुतेक सार्वत्रिक आहे. अतिशय, फार, पुष्कळ इत्यादि शब्दांचा लोक बोलण्यांत व लिहिण्यांत पाहिजे तितका उपयोग करीत असतात. परंतु बहुतेक प्रसंगीं त्यांचें प्रयोजन नसतें. हा प्रकार अयथार्थवादित्वाचाच द्योतक आहे. केव्हांकेव्हां तर असत्यभापणाचा मोठा तिटकारा दाखविणाऱ्या लोकांतच हा दोष विशेष आढळून येतो. सत्यप्रियतेवर आवेशयुक्त भापण करणाऱ्या वक्त्याच्या भापणांतच अयथार्थवादित्वाचे पाहिजे तितके मासले दाखवितां येतील. पदार्थांचें व मनुष्यांचें वर्णन करितांना ज्या ठिकाणीं साध्या शब्दांचा उपयोग करणें रास्त होईल त्या ठिकाणीं भापणाला चटकदारपणा आणण्यासाठीं तो जोरदार शब्दांचा उपयोग केल्यावांचून राह-

णार नाहीं. असें झाल्यानें वस्तुस्थितीचें हुबेहुब प्रतिबिंब श्रोत्यांचे मनांत उठत नाहीं. मूळ जरी खरें असतें तरी तें वाजवीपेक्षां फाजील नटविलें गेल्यामुळें अगदीं निराळेंच दिसतें. ह्या ठिकाणीं चित्राची उपमा दिली असतां असें म्हणतां येईल कीं, चित्रांत अवयवांची ठेवण बरोबर असते, परंतु रंगाच्या कामांत घसरतें. म्हणजे ते असावे त्याच्या दुप्पट किंवा तिप्पट खुलवून दाखविलेले असतात.

वस्तुस्थितीचें अयथार्थनिरूपण करण्याचे जे असंख्य प्रकार आहेत त्या सर्वांचा आपणांस ह्या प्रकरणांत विचार करावयाचा नाहीं. वर सांगितलेली चित्राची उपमा घेतली असतां, ज्यांत फक्त रंग मात्र अधिक-उणे खुलवून दिलेले असतील त्या प्रकारांचा विचार न करितां ज्यांत अवयवांची ठेवणही यथायोग्य दाखविली नसेल त्या प्रकारांचा मात्र विचार करावयाचा आहे. अर्थात् वस्तुस्थितीला वेडें-वांकडें स्वरूप देण्याचाच जेथें यत्न असेल त्या गोष्टीकडे लक्ष्य न देतां तिचा विपरीत भास करून देण्याचा यत्न असल्यास त्याचा मात्र येथें विचार केला जाईल; किंवा अगदीं सोप्या शब्दांनीं सांगावयाचें झाल्यास, धडधडीत खोटें बोलण्याचे संबंधानें अनेक प्रकारच्या लोकांत काय स्थिति आढळते हें ह्या प्रकरणांत पहावयाचें आहे. आणि मुख्यत्वेंकरून कोणत्या तरी स्वार्थाच्या हेतूनें जेथें खोटें बोलण्याकडे प्रवृत्ति होते अशा उदाहरणांचाच आपण विचार करूं. केव्हांकेव्हां शत्रूला शिक्षा देवविण्यासाठीं खोटी साक्ष देण्यास मनुष्य प्रवृत्त होत असतो; कधींकधीं कांहीं

व्यावहारिक फायद्यासाठीं तो खोटें बोलत असतो; कांहीं प्रसंगीं आपणाला मिळणारी शिक्षा किंवा आपणावर येणारें संकट टाळण्यासाठीं त्याला खोटें बोलावेंसें वाटतें; व अन्यप्रसंगीं लोकांना खूष करून त्यांची मर्जी संपादन करण्याकरितां मनुष्य असत्यभाषणाचा उपयोग करीत असतो.

आतां, सत्यभाषण व असत्यभाषण ह्यांचीं निरनिराळ्या स्थितींतील लोकांत कशीं काय उदाहरणें आढळतात तें पाहूं. आपणांस बहुधा असत्यभाषणाचाच विचार करावा लागेल; कारण सत्यभाषण जगांत फार दुर्मिळ आहे. आणि निष्कामसत्यप्रीति तर बहुधा सांपडणेंच कठिण.

पारधीवर निर्वाह करणारे किंवा भक्ष्यासाठीं रानोमाळ भटकत फिरणारे आणि सभोंवतालच्या लोकांशीं वैरभावानें वागणारे असे जे प्रथमावस्थेंतील लोक पृथ्वीच्या अनेक भागांवर राहणारे आहेत त्यांची खोटें बोलण्याच्या स्वभावाबद्दल बहुतेक प्रवाशांनीं निंदा केलेली आढळते. त्याचप्रमाणें जुलमी राजांनीं बाहुबलानें लोकांस जिंकून जेथें मोठीं राज्यें स्थापन केलीं आहेत तेथील लोकांमध्यें सुद्धां ह्या दुर्गुणाचा अंमल बराच आढळतो असें अनेक प्रवाशांनीं दिलेल्या माहितीवरून दिसून येतें.

डकोट लोकांविषयीं बर्टन् म्हणतोः—" इतर लोकांप्रमाणेंच इंडियन लोकही कधीं खरें बोलावयाचे नाहींत. " मिप्मीलोकांविषयीं ग्रिफिथ् लिहितोः—" खरेखोटेपणाविषयीं हे लोक इतके बेफिकीर असतात कीं,

त्यांच्या शब्दांवर भरंवसा ठेविण्याची सोय नसते." किरघीलोकांविषयीं अशाच प्रकारचे उद्गार कांहीं प्रवाशांनीं काढिले आहेत. मध्य एशियांतील लोक कोरडा पाहिल्यावांचून खरें बोलावयाचे नाहींत. त्यांना जुलमाचाच अंमल पाहिजे.

वन्यस्थितींतून बाहेर पडून एकाठिकाणीं स्थाईकपणें राहणाऱ्या लोकांचा विचार करितांना पहिल्यानें फिजियन् लोक डोळ्यांपुढें येतात. बुइल्यम्स म्हणतोः—

" फिजियन् लोकांची खोटें बोलण्याकडे इतकी प्रवृत्ति आहे कीं, आपली ती खोडी घालविण्याची किंवा निदान आपणांला तशी खोडी नाहीं असें लोकांना दाखविण्याची देखील इच्छा त्या लोकांत दिसून येत नाहीं. खोटें बोलण्याचे कामांत कौशल्यसंपादन करण्यालाही तेथें त्या प्रकारचें शिक्षण मिळण्याची पुष्कळ सवड असते. सरदारलोकांचे एकमेकांच्या नाशासाठीं जे गुप्त बेत चाललेले असतात त्या कामीं खोटें बोलण्यांत वाकबगार असणाऱ्या लोकांचा फार उपयोग होतो. आणीबाणीच्या वेळीं न घाबरतां चटदिशीं प्रसंगाला शोभेल असें उत्तर देऊन वेळ मारून नेणाऱ्या लोकांना अशा सरदारांकडून चांगला आश्रय मिळतो. ह्या लोकांच्या खोटें बोलण्याच्या स्वभावाविषयीं इतकी प्रसिद्धि आहे कीं, असत्यभाषणाला 'फिजियन् सत्य' असें म्हणण्याचा प्रघात पडला आहे."

खोटें बोलण्याच्या संबंधानें युगांडा येथील लोकांची स्थितिही फिजियन् लोकांप्रमाणेंच आहे.

"बहुतेक रानटी लोकांप्रमाणेंच ह्या लोकांतही सत्या-

ला फारच थोडा मान आहे; आणि असत्य भाषण करणें अयोग्य आहे असें त्यांना वाटत नाहीं. उलट, पटाईत खोटें बोलणारा मनुष्य असेल तर त्याची वाखाणणीच केली जाते. "
मध्य अमेरिकेंतील सुधारणेच्या मध्यमावस्थेंत असणाऱ्या प्राचीनकाळच्या लोकांची अशीच स्थिति होती. एकछत्री जुलुमी राज्यव्यवस्थेखालीं राहणाऱ्या कित्येक लोकांविषयीं डी लाएट म्हणतोः—" बहुतेक इंडियन लोकांप्रमाणेंच तेही खोटें बोलणारे होते. " आणि ह्या पूर्वजांचा थोडाबहुत तरी अंश ज्यांमध्यें उतरण्याचा संभव आहे त्या तेथल्या हल्लींच्या लोकांबद्दल डनलोप् म्हणतोः—

" खोटें बोलणें हा दुर्गुण आहे हें कबूल करणारा मध्य अमेरिकेंतील एकही मनुष्य माझ्या पाहण्यांत आला नाहीं. कोणीं कोणास फसविलें म्हणजे त्यानें मोठी बहादुरी केली असें त्या लोकांस वाटतें. कितीही नीचपणाचें कपट असलें व त्याचे परिणाम कितीही भयंकर असले तरी ' काय तरी शिताफी ही ! ' ह्याहून निराळ्या तऱ्हेचे उद्गार त्यांच्या तोंडून निघत नाहींत. "
फिलिपाईन् बेटांसंबंधानें फोरमन् ह्यानें लिहिलेलें एक स्वतंत्र पुस्तक आहे त्यांत त्यानें तेथील लोकांविषयीं अशाच प्रकारची हकीकत दिली आहे. तो म्हणतोः—
" खोटें बोलणें हें पाप आहे असें तेथील लोकांना वाटतें से दिसत नाहीं. तो एक आपला वेडावांकडा खरा, पण निर्दोष मार्ग आहे असें त्यांना वाटतें. "

पुरातन काळापासून बरेच सुधारलेले असे जे लोक

आहेत त्यांच्या प्राचीन ग्रंथांतून असा पुरावा आढळतो कीं, प्राथमिक स्थितींत त्या लोकांना सत्याची फारशी चाड नव्हती. व प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष रीतीनें असत्याचीच प्रशंसा होत असे. जुलमाविषयीं विचार करितांना प्राचीन हिंदु लोकांच्या ग्रंथांतील जे उतारे दिले आहेत त्यांत आपला उत्कर्ष साधण्यासाठीं लबाडी व जुलूम ह्यांचा उपयोग करण्याला पूर्ण मोकळीक दिली आहे. किंवा मोकळीक दिली आहे असें म्हणण्यापेक्षां, उत्तेजन दिलें आहे असें म्हणणें अधिक योग्य होईल. कोणत्याही लोकांच्या अंगचे कोणत्याही काळचे गुण त्या त्या काळच्या देवादिकांच्या ज्या गोष्टी असतात त्यांत पूर्णपणें प्रतिबिंबित झालेले दिसतात. हिंदुलोकांच्या देवादिकांच्या गोष्टींत खुद्द देवांच्या हातून लबाडीचे प्रकार किती घडलेले आहेत ते पाहिले म्हणजे त्यावरून प्राथमिक स्थितींतील हिंदुलोकांची कल्पना होईल. हीब्र्यू लोकांची देखील तशीच स्थिति होती ह्याविषयीं बायबलांत पाहिजे तितका पुरावा आहे. शेजाऱ्याचें नुकसान करण्यासाठीं खोटी साक्ष देणें एवढी गोष्ट वजा करून बाकीच्या खोटें बोलण्याबद्दल हीब्र्यू लोकांना तिटकारा होता असें दिसून येत नाहीं. आणि कित्येकांच्या म्हणण्याप्रमाणें खरोखरींच जर हे लोक सत्यवादी असते तर सामान्य सिद्धान्ताला अपवादक असें हें हीब्र्यू लोकांचें एकच उदाहरण झालें असतें. खोटें बोलण्याबद्दल त्या लोकांना तिटकारा नसे हें सिद्ध करण्याला फार लांब जावयास नको. त्यांच्या देवाचेंच आचरण पहा म्हणजे झालें. देवाच्या म-

नांत एहाब ह्याचा नाश करावयाचा होता ह्यासाठीं त्यानें आपल्या एका दूताला खोटें बोलावयास सांगून भविष्यवाद्यांना फसविलें होतें*. बायबलांतील जुन्या करारांत दुसऱ्या एका ठिकाणीं पुढील वाक्यें देवाच्या तोंडांत घातलीं आहेत.

" भविष्यवादी जर भविष्य सांगतांना चुकला असला तर मींच त्याला चुकविला ( असें समजा )आणि मीच त्याला इस्त्राईल लोकांमधून शोधून काढीन आणि त्याचा नाश करीन. "*

ज्या लोकांनीं आपल्या देवाचें चित्र अशा प्रकारें रेखिलें त्यांच्या स्वभावाची कल्पना सहज होण्यासारखी आहे. त्यांना सत्याची फारशी चाड असण्याचा संभव नाहीं. आणि हें बायबलांतूनच उदाहरणें घेऊन सिद्ध करितां येईल. ऐझाक ह्यानें रेबेका ही आपली बायको असून बहीण आहे असें खोटेंच सांगितलें परंतु त्याला कांहीं पारिपत्य न होतां उलट त्या वर्षी त्याच्या शेताला पुष्कळच पीक आलें आणि देवानें त्याला आशीर्वाद दिला.* अर्थात् त्याचें वर्तन देवाला पसंत झालें. आणखी रेबेकाच्या सांगण्यावरून जेकब ह्यानें आपल्या बापाला कांहीं खोटें समजावून देऊन एसाला फसविलें.* ह्या लबाडीचा कोठेंही तिरस्कार केलेला नसून उलट देवाला ती आवडली अशाविषयीं मात्र अप्रत्यक्ष पुरावा आढळतो. कारण देवानें लागलाच ' तुझी धनधान्यसमृद्धि होईल ' असा त्याला आशीर्वाद दिला.

* ह्या सर्व हीब्र्यू लोकांच्या पौराणिक कथा आहेत व त्या बायबलाच्या जुन्या करारांत दिल्या आहेत.

त्याचप्रमाणें जरमाया ह्यानें एकदां राजाच्या सूचनेव-रून खोटें भाषण केलें होतें.* ही पुरातन कालांतल्या हीब्र्यू लोकांची गोष्ट झाली. नंतरच्या हीब्र्यू लोकांना थोडी थोडी सत्याची गोडी लागत चालली होती ही गोष्ट कबूल केली पाहिजे. भविष्यवादी म्हणून जे त्यांचे ग्रंथकार झाले त्यांच्या ग्रंथांत व नव्या कराराच्या कांहीं भागांत असत्यभाषणाचा निषेध केला आहे. एकंदर पुराव्याकडे लक्ष्य दिलें असतां असें अनुमान काढितां येईल कीं, हीब्र्यू लोकांच्या समाजाला जसजसें स्थैर्य येत चाललें तसतसें त्यांमधील असत्यपणाचें वर्तन कमी होऊं लागलें.

प्राचीन ग्रीक लोकांमध्येंही फारसें सत्याचरण आढळेल अशी कल्पना करण्याचें कारण नाहीं. त्यांच्या इलियड नामक ग्रंथांत देवांच्या अनेक कृतींचें वर्णन दिलें आहे. त्यांत देव मनुष्यांना तर फसवितातच, पण आपापसांतसुद्धां एकमेकांना फसविण्याचा यत्न करितात असें दाखविलें आहे. सरदारलोकांना पाहिजे त्या प्रकारचें असत्य भाषण करण्याला कोणत्याही प्रकारची दिक्कत वाटत होती असें दिसत नाहीं. पालास आथीन हिचें युलिसीज† ह्यावर प्रेम बसलें, आणि तें बसण्या-

---

* मागील पृष्ठावरील टीप पहा.

† युलिसीज हा ग्रीक लोकांच्या पौराणिक कथांतील एक योद्धा आहे. त्याचें ग्रीक भाषेंतील नांव ओडिसिअस असें आहे, परंतु इंग्लिश ग्रंथांत तो युलिसीज ह्या नांवानें प्रसिद्ध आहे. होमर कवीनें ओडिसी म्हणून जें ग्रीक भाषेंत काव्य लिहिलें आहे त्या काव्याचा नायक युलिसीज हा आहे. ग्रीस देशाच्या जवळ आयूथेका नांवाचें एक खडकाळ बेट आहे तेथला तो रा-

ला कारण काय तर तो फार लुच्चा होता हें. *महाफी ह्यानें होमरच्या काळांतील ग्रीक लोकांना कपटी आणि असत्यवादी असें म्हटलें आहे.† नंतरच्या का-

---

जा होता. त्याच्या लबाडीचें एक गमतीचें उदाहरण आहे. इलियड काव्यांत वर्णिलेली 'ट्रायची लढाई' जेव्हां सुरू झाली, तेव्हां युलिसीज ह्यालाही आपलें सैन्य घेऊन हजर होण्याविषयीं हुकूम झाला. त्यावेळीं त्याच्या मनांत जावयाचें नव्हतें म्हणून त्यानें वेड्याचें सोंग घेतलें व नानाप्रकारचे वेडेचार करूं लागला. एकदां तो आपल्या गाडीला एक घोडा आणि एक बैल अशीं दोन जनावरें जुंपूनच बाहेर पडला. परंतु ही त्याची लुच्चेगिरी लवकरच उपाध्यास आली. त्याचें एक मूल होतें त्यावर त्याची अतिशय प्रीति होती. त्या मुलाशीं त्याचें वर्तन वेड्या माणसासारखें असत नाहीं हें पालामीडीज ह्याच्या लक्ष्यांत आलें व त्याचें सर्व ढोंग बाहेर पडल्यामुळें त्याला लढाईस जावें लागलें. पालामीडीज ह्याचा मात्र पुढें त्यानें पुरता सूड उगविला व त्याला यमलोकास पाठविलें.

*महाफी हा डब्लिनच्या ट्रिनिटी कालेजांत प्रोफेसर आहे. त्यानें ग्रीसच्या प्राचीन सामाजिक इतिहासावर एक पुस्तक लिहिलें आहे.

† विशेष प्रकारच्या शिक्षणानें मनुष्याच्या मनावर जे ग्रह होत असतात त्यांचे परिणाम कधींकधीं फार आश्चर्यकारक दिसून येतात. ग्रीक लोकांच्या स्वभावांत इतके दोष असतां व त्यांचीं कृत्यें इतकीं क्रूरपणाचीं असतां त्यांचा लहानपणापासून परिचय झाल्यामुळें त्यांचें उग्र स्वरूप अगदीं सौम्य होऊन एकदां जी ग्रीक लोक व त्यांचे ग्रंथ ह्यांविषयीं मनांत आवड उत्पन्न होते ती आजन्म कायम राहते अशीं पुष्कळ उदाहरणें घडून येतात. ग्रोट ह्यानें ग्रीक लोकांच्या इतिहासावर विपुल माहितीनें भरलेला एक प्रचंड ग्रंथ लिहिला आहे. त्या ग्रंथासाठीं मिळविलेल्या सर्व माहितीवरून त्याचें असें मत झालें कीं, त्यांच्या रीतीभातींत देखील क्रूरपणाचें प्रतिबिंब पडलें आहे. खोटेपणाच्या संबंधानें तर बोलायासच नको. देवांपासून तों

ल्यांतसुद्धां म्हणण्यासारखा फेरफार झाला नव्हता. क्रीटन लोकांना 'नेहमीं खोटें बोलणारे' असें विशेषण दिलेलें आढळतें तें इतर ग्रीक लोकांशीं तुलना करून पाहिलें असतां त्या लोकांच्या अंगीं कदाचित् खोटें बोलण्याचा दोष अधिक असल्यामुळें असेल; पण इतर ग्री-

---

चाकरीस ठेविलेल्या गुलामांपर्यंत झाडून सारे खोटें बोलण्याचे कामांत पटाईत. त्यांचा धर्म म्हणजे दुष्ट समजुतींचें माहेरघर. अशी वास्तविक स्थिति असतां ग्रीक लोकांचा इतिहास आणि त्यांचा ग्रंथसंग्रह ह्यांजबद्दल किती लोकांची वाजवीपेक्षां फाजील पूज्यबुद्धि झालेली आढळते ? इंग्लंडचे माजी प्रधान ग्लाडस्टनसाहेब ह्यांना तर ग्रीक लोकांचा इतिहास म्हणजे कांहीं परब्रह्म वाटतें. ज्याला आपल्या आयुष्याचा उत्तम प्रकारें उपयोग करून घेणें असेल त्यानें ग्रीसच्या इतिहासाचें अध्ययन करणें हें त्याच्या इष्टहेतूस उत्कृष्ट साधन आहे असें त्यांस वाटतें. सन १८९१ सालीं ग्लाडस्टनसाहेबांनीं ईटन येथें एक भाषण केलें होतें तें लंडन टाइम्समध्यें दिलेलें होतें. त्यांत ते म्हणतात:—" आयुष्यांतील अत्यंत महत्त्वाचीं कामें उत्कृष्ट प्रकारें करितां येतील अशा प्रकारचा मनावर संस्कार करणें हा जर शिक्षणाचा हेतु असेल तर प्राचीन विद्यांचें आणि विशेषेंकरून ग्रीक विद्येचें अध्ययन करणें यासारखा दुसरा उपाय नाहीं. " बाकीच्या शंका एका बाजूस ठेविल्या तरी ह्या ग्लाडस्टनसाहेबांच्या मतावर एक मात्र गमतीची शंका उत्पन्न होते. व तिचें कसें समाधान करावें हें समजत नाहीं. ग्लाडस्टनसाहेबांनीं राजकारणाच्या कामांत बहुतेक जन्म घालविला आहे. आरंभीं ते राजपक्षाचे कैवारी होते व नंतर प्रजापक्षाचे कैवारी होऊन अखेरीस तर सर्वांत पुढें गेलेला जो राडिकल पक्ष त्याचे अभिमानी झाले होते. आतां शंका इतकीच कीं, ग्रीक विद्येचें अध्ययन करून आक्सफोर्ड युनिव्हर्सिटींतून बाहेर पडल्याबरोबर विद्येचा संस्कार ताजा असतां जे त्यांचे राष्ट्रविषयक विचार होते ते ग्रीक विद्येमुळें उत्पन्न झालेले समजावयाचे, किंवा ती विद्या पुष्कळ वर्षें मुरल्यानंतर पाठीमागून जो विचारांत फरक झाला तो ह्या विद्येचा परिणाम समजावयाचा ?

क लोकांमध्येंही तो पाहिजे तितका होता व ह्यासाठीं क्रीटन लोकांनाच हें विशेषण देऊन त्यांना इतरांपासून निराळे दाखविण्याची जरूर नव्हती. आटिक* काळांतील ग्रीक लोकांचें महाफीनें जें वर्णन केलें आहे त्यांत विश्वासघात आणि आत्महितासाठीं लुच्चेगिरी हे त्यांचे ठळक दोष त्यानें दाखविले आहेत. तो म्हणतोः—"एकाद्या ग्रीक मनुष्यानें आपलें वचन राखिलें तर डरायस† ह्याला ती एक ध्यानांत ठेविण्यासारखी गोष्ट आहे असें वाटे.

सार्वकालिक युद्धं आणि सत्याची बेपर्वा ह्यांमध्यें जो संबंध दिसून येतो त्याबद्दल यूरोपाच्या इतिहासांत पाहिजे तितका पुरावा आढळतो. ज्याला 'रक्ताचें युग' असें म्हणण्याचा प्रघात पडला आहे त्या मेरोव्हिंजियन् काळांत पवित्र मानलेल्या पदार्थांवर हात ठेवून जरी राजे शपथा घेत असत, तरी त्या लागल्याच मोडण्याला त्यांना कांहीं वाटत नसे. स्लेव्हियन लिहितोः—"फ्रांकी‡ मनुष्यानें जर आपली शपथ मोडिली तर त्यांत आ-

---

* हा काल इसवी सनाच्या पूर्वीं चारपांचशें वर्षांच्या सुमारानें आहे.

† इराणांत डरायस नांवाचे तीन राजे होऊन गेले. पहिल्या डरायसानें व त्यानंतरच्या कांहीं राजांनीं ग्रीस देशावर स्वाऱ्या करून ग्रीक लोकांना पुष्कळ त्रास दिला होता, तो सूड उगविण्यासाठीं आलेक्झांडर धि ग्रेट ह्यानें इराणावर स्वाऱ्या करून तिसऱ्या डरायसाचा पराभव केला. ग्रीक व पार्शियन् लोक ह्यांचें परस्परांशीं वरेंच दळणवळण असल्यामुळें त्यांना एकमेकांच्या स्वभावांची माहिती होती.

‡ फ्रांक लोक हे मूळचे जर्मनींत राहणारे. पुढें ते आसपास

श्चर्य करण्यासारखें कांहीं नाहीं. कारण शपथेवर खोटें बोलणें हा केवळ एक भाषणाचा प्रकार आहे असें त्याला वाटतें. हा एक गुन्ह्याचा प्रकार आहे असें वाटत नाहीं." क्यारोलिंजियन* काळांत सतत दोनशें वर्षेंपर्यंत आरब, सारासेन[1], आक्विटेनियन[2], साक्सन[3] लाँबर्ड[4] स्लाव्हे[5], अव्हार[6] आणि जर्मन् ह्या लोकांशीं लढाया

---

चोहोंकडे पसरले आणि त्यांनीं एक बलाढ्य राज्य स्थापन केलें. फ्रान्स देशांत त्यांनीं आपलें मुख्य ठाणें स्थापिलें. फ्रान्स ह्या नांवाची उत्पत्ति फ्रांक ह्या नांवापासूनच आहे. शार्लमेन हा फ्रांक लोकांचा मोठा बलाढ्य राजा झाला. त्याच्या मरणानंतर लवकरच त्यांचें राज्य लयास गेलें.

* क्यारोलिंग घराण्याचे राजे फ्रान्सांत झाले. हे फ्रांक लोकांपैकींच होते. मेरोव्हिंजियन काळानंतर क्यारोलिंजियन काळास सुरुवात झाली. दहाव्या शतकांत ह्या घराण्याच्या हातांतून राज्य गेलें.

१. मध्ययुगांत मुसलमानांना ख्रिस्ती लोक सारासेन म्हणत असत. सारासेन लोकांनीं यूरोपावर स्वाऱ्या करून पुष्कळ ठिकाणीं आपलें स्वामित्व स्थापन केलें होतें.

२. हे फ्रान्स देशांत राहणारे आडदांड लोक होते.

३. इंग्लंडांतील पूर्वीचे लोक.

४. हे इतालीदेशांत लाँबर्डी नांवाचा प्रांत आहे तेथले लोक.

५. ह्या लोकांच्या मूळ ठिकाणाविषयीं बराच संशय आहे. कित्येकांचे मतें हे लोक जर्मनीचा कांहीं भाग व रशिया ह्या ठिकाणीं मूळचे राहणारे, व कित्येकांचे मतें ते एशियाखंडांतून आले. हल्लींचे रशियन लोक स्लाव्ह लोकांचेच वंशज आहेत. स्लाव्ह लोकही एकदां फार प्रबल झाले होते व सगळ्या यूरोपभर पसरले होते.

६. हे एशिया खंडांतील थ्यूरेनियन् ( तुराणी ) शाखेचे लोक होते. त्यांनींही यूरोपावर हल्ले केले. शार्लमेन राजानें त्यांचा पुरता मोड केला.

चालल्यानंतर फ्यूडल काळाला सुरवात झाली. ह्या काळाविषयीं मार्टिन् म्हणतोः—

" दहाव्या शतकाला 'कपटाचें आणि विश्वासघाताचें युग' असें नांव दिलें असतां हरकत नाहीं. फ्यूडल काळाच्या आरंभासारखा काळ आमच्या इतिहासांत दुसरा नाहीं. त्या काळांत नीतिविचारांनीं मनुष्याला अगदीं सोडूनच दिलें होतें."

मग इंग्लिश लोकांच्या आपसांतल्या भांडणामुळें त्यांजवर फ्रेंच लोकांचें राज्य स्थापित झाल्यानंतरही कपट आणि विश्वासघात ह्या दुर्गुणांचें प्राबल्य तसेंच कायम होतें. सरदारलोकांचें वर्तन लबाडीचें, राजद्रोहाचें आणि आपस्वार्थीपणाचें असे. आणि त्यावेळीं जीविताचा किंवा वित्ताचा केव्हां नाश होईल ह्याचा कांहीं नियम नसे. मध्ययुगांत चोहोंकडे जें असत्याचरण माजलें होतें तें सर्वकाळ चालणाऱ्या दंग्याधोप्यांमुळें व लढायांमुळें उत्पन्न झालेलें नसून निराळ्याच कारणांनीं उत्पन्न झालें असावें असें मत लेकीनें आपल्या इतिहासांत प्रदर्शित केलें आहे. तथापि येथें जें अनुमान काढिलें आहे त्याचें पुष्टीकरण करणारें एक वाक्य त्याच्या ग्रंथांत आढळतें. आणि त्या वाक्याचें महत्त्व विशेष मानिलें पाहिजे. कारण जें मत त्याला ग्राह्य नव्हतें त्या मताच्या बाजूचा त्याजकडूनच पुरावा मिळत आहे. तो म्हणतोः—
"ज्या ठिकाणच्या लोकांना औद्योगिक व्यवसायाचें वळण लागलेलें असतें त्या ठिकाणीं सद्गुणांच्या मालिकेंत सत्याला जितकें प्रमुखस्थान मिळतें तितकें ज्या

ठिकाणीं ह्या व्यवसायांचा फारसा प्रवेश झालेला नसतो त्या ठिकाणीं मिळत नाहीं."

हल्लींच्या काळांत सुद्धां पूर्वेकडील व पश्चिमेकडील युरोपियन राष्ट्रांची तुलना केली असतां त्यांमध्यें जो विरोध दिसून येतो तो कोणाच्याही लक्ष्यांत आल्यावांचून राहणार नाहीं. पश्चिमेकडील राष्ट्रांना औद्योगिक व्यवसायांची जितकी गोडी आहे तितकी पूर्वेकडील राष्ट्रांना नाहीं. आणि ह्याचा परिणाम पश्चिमेकडील राष्ट्रांना जितकी सत्याची चाड आहे तितकी पूर्वेकडील राष्ट्रांना नाहीं असा झाला आहे.

तथापि विचाराअंतीं असें दिसून येईल कीं, सांग्रामिक व्यवसाय व असत्य, आणि औद्योगिक व्यवसाय व सत्य, ह्यांमध्यें जो संबंध दिसून येतो तो प्रत्यक्षरीतीनें उत्पन्न झालेला नव्हे. रक्तपाताची इच्छा आणि असत्यभाषण ह्यांचा साक्षात् संबंध कांहींएक नाहीं. त्याचप्रमाणें मनाची कोमलता आणि सत्य यांचाही कांहीं संबंध नाहीं. धांगडधिंग्यानें जर असत्याकडे प्रवृत्ति होत असेल व शांततेच्या व्यवसायांनीं सत्याकडे होत असेल, तर हीं कार्यें अगदीं अप्रत्यक्षरीतीनें घडून येत असलीं पाहिजेत. आणखी कित्येक उदाहरणें घेऊन नंतर ह्या कार्यकारणभावाचा संबंध कोणत्या प्रकारचा आहे हा विचार केला असतां समजण्यास ठीक पडेल.

लढाऊ लोकांच्या स्वाऱ्यांना कंटाळून अडचणीच्या दऱ्याखोऱ्यांत किंवा रोगकारक हवेच्या प्रदेशांत जाऊन राहिलेल्या लोकांचीं उदाहरणें इतर सद्गुणांचा विचार करितांना दिलीं आहेत, त्याप्रमाणें सत्याच्या संबं-

धानेंही देतां येतील. असल्या ठिकाणीं बाहेरच्या लोकांच्या त्रासापासून मुक्त असल्यामुळें, व लढाईच्या कामाचा स्वाभाविकच तिटकारा असल्यामुळें ज्यांना गैरसोईच्या जागीं पळून जाण्याची बुद्धि झाली त्यांचे आपआपसांतले व्यवहारही गडबडीचे नसल्यामुळें त्यांमध्यें नेहमीं शांतता असते. तापाचें दुखणें कोई लोकांच्या नेहमीं पाठीशीं लागलेलें असतें. आणि तापाच्या सांथींत सांपडण्याच्या भीतीमुळेंच शेजारपाजारचे लोक त्यांना त्रास द्यावयाला जात नाहींत. त्यांच्यासंबंधानें मारिस् साहेब म्हणतो:—

" खरें बोलण्याचे संबंधानें ह्या लोकांची प्रसिद्धि आहे. आणि ह्या गोष्टींत, सुपीक मैदानांत राहणाऱ्या सुधारलेल्या व सुशिक्षित लोकांनीं ह्या डोंगरी लोकांचा कित्ता घेण्यासारखा आहे. "

शार्ट ह्यानें ' दक्षिण हिंदुस्थानांतील डोंगराच्या रांगा' म्हणून एक पुस्तक लिहिलें आहे त्यांत तो म्हणतो:—

" सोवरा लोकांच्या वर्तनांतील एक मनाला आनंद देणारा भाग म्हटला म्हणजे त्यांचें सत्यभाषण होय. खोटें बोलणें त्यांना मुळींच माहीत नाहीं, व बनावट गोष्टी तयार करण्याला जी अक्कल लागते ती येण्यापुरती त्यांची अजून सुधारणा झाली नाहीं. "

ह्या ठिकाणीं जातां जातां इतकें सांगितलें पाहिजे कीं, दुसरेही कित्येक हिंदुस्थानवासी इंग्लिश लोक अशिक्षित हिंदुलोकांच्या जातींमध्यें जो सत्यभाषणाचा सद्गुण आढळून येतो तो केवळ त्यांच्या बुद्धीच्या कमतरतेमुळें उत्पन्न झाला आहे असें प्रतिपादन करीत अ-

सतात. परंतु असल्या प्रतिपादनानें ज्या सुधारलेल्या लोकांचा कैवार घेऊन त्यांचा बोज राखावयास ते पाहतात त्यांच्या दुर्गुणांचें समर्थन होणें अशक्य आहे. लहान मुलांना देखील लबाड्या सांगतां येतात आणि कुत्र्यासारख्या कित्येक मुक्या जनावरांना जरी बोलतां येत नसलें तरी देखील असत्याचरण करण्याची त्यांना अक्कल असते. ही गोष्ट मनांत आणिली म्हणजे आतां सांगितलेल्या डोंगरी हिंदुलोकांचें किंवा अशाच दुसऱ्या लोकांचें सत्याचरण त्यांच्या मूर्खपणानें उत्पन्न झालें आहे असें म्हणणाऱ्या लोकांनीं एक जाणूनबुजून दुष्टपणानें तसें म्हटलें असलें पाहिजे किंवा त्यांचें इतकें अज्ञान तरी असलें पाहिजे. 'मध्य हिंदुस्थानांतील डोंगरी प्रदेश' नांवाच्या पुस्तकांत फोर्सिथ् लिहितोः—

"येथील मूळच्या रहिवासी लोकांत खरेपणा फार आढळून येतो. कोणाचें कर्जवाम घेतलें असतां तें नाहीं म्हणणें किंवा एकादा गुन्हा त्यांचे हातून घडला असतां तो नाकबूल करणें असलें खोटेंपणाचें वर्तन त्यांच्या हातून सहसा घडत नाहीं."

रामोशी लोकांविषयीं लिहितांना सिंक्लेअर म्हणतोः—

"सुधारणेच्या शिखरास पोंचलेल्या लोकांइतकी लबाडी सांगण्याची अक्कल ह्या लोकांत आहे. ह्या गोष्टींत खऱ्या डोंगरी लोकांहून व परवारी म्हणून लोक आहेत त्यांहून हे अगदीं भिन्न आहेत. परवारी लोकांविषयीं एकदां एका ब्राह्मणानें उद्गार काढिलेः—'कुणबी लोकांनीं जर एकाद्या गोष्टीविषयीं वचन दिलें असलें तर तें ते पाळतील, पण महार लोक (परवारी) इ-

तके वेडगळ आहेत कीं, कांहीं कारण नसलें तरी जें काय खरें असेल तें ते एकदम सांगून टाकतील. " हें त्या ब्राह्मणानें जें आपलें मत प्रदर्शित केलें आहे त्यावरून साध्या व सत्याचरणी अशिक्षित लोकांना शेजारचे सुधारलेले शिक्षित लोक कसे बिघडवीत असतात हें लक्ष्यांत येण्यासारखें आहे. पुढील दोन उताऱ्यांवरून ही गोष्ट आणखी स्पष्ट होईल. दुसऱ्या एका डोंगरी लोकांविषयीं लिहितांना शेरविल् म्हणतोः—

" सांथाळ लोकांना खरें बोलणें पवित्र वाटतें व ह्या गोष्टींत त्यांचे खोटें बोलणारे शेजारी जे बंगाली लोक त्यांनीं ह्यांचा कित्ता गिरविण्यासारखा आहे. " त्याच लोकाच्या संबंधानें म्यान् म्हणतो.

"शेजारच्या लोकांच्या सहवासाचे दुष्परिणाम त्यांजवर होत आहेत आणि मला मोठी धास्ती वाटते कीं, सांथाळ लोकांच्या सत्याचरणाविषयीं जी प्रसिद्धि आहे ती लवकरच नाहींशी होण्याचा संभव आहे. "

खरें बोलण्याविषयीं ज्यांची प्रसिद्धि आहे अशा हिंदुस्थानांतील डोंगराळ प्रदेशांत राहणाऱ्या लोकांच्या पुष्कळ जाति आहेत. त्यांपैकीं बोडो, धिमाल, कर्नाटकांतील मूळचे लोक, टोड आणि कोल किंवा हो ह्यांच्यासंबंधानें 'समाजशास्त्राचीं मूलतत्त्वें' ह्या ग्रंथांत माहिती दिली आहे. ह्या ठिकाणीं पुलियन लोकांचें आणखी एक उदाहरण घेऊं. त्यांच्या आश्रयस्थानासभोंवतीं पर्वत, रानें, दलदली व समुद्र ह्यांचें वेष्टण आहे. ह्या लोकांच्या संबंधानें ओपर्ट लिहितोः—" त्यांच्या अंगीं खरें बोलणें आणि आपलें वचन पाळणें हे अलौ-

किक गुण आहेत. त्यांचें हिंदुलोकांच्या वर्णव्यवस्थेंतील अगदीं वरच्या पायरीवरील लोकांनीं सुद्धां अनुकरण करण्यासारखें आहे. " त्याचप्रमाणें जवळच्या सीलोन बेटांतही अशा प्रकारचे लोक आहेत. तेथील रानांत राहणारे वेद्दा लोक सत्यवादी आणि प्रामाणिक असल्याविषयीं प्रसिद्धि आहे. पृथ्वीच्या इतर भागांतही अशा प्रकारचे लोक आढळतात. एशियाखंडांतल्या उत्तरेकडील प्रदेशांत राहणाऱ्या कित्येक लोकांत शेजारच्या लोकांवर चाल करून जाण्यासाठीं किंवा कोणी लोक आपणांवर हल्ला करावयास आले असतां त्यांपासून आपलें संरक्षण करण्यासाठीं कोणत्याही प्रकारची व्यवस्था नसते. अर्थात् ते लोक लढाईच्या कामाला अगदीं निरुपयोगी आहेत. त्यांबद्दल वाचण्यांत येतें कीं, "ओटिआक आणि सामोइडी लोकांच्या अंगीं प्रामाणिकपणा आणि सत्य हे गुण वाखाणणी करण्यासारखे आहेत, हें त्यांना भूषणावह आहे. "

हावेळपर्यंत जो पुरावा दिला तो आपणांला जें अनुमान निघेल असें वाटतें त्याला साधकच आहे. परंतु बाधक पुरावाही कांहीं असल्यास पाहिला पाहिजे. ज्यांमध्यें थोडीबहुत तरी लढायांची धामधूम कधींकधीं चालू असते अशा लोकांच्याही कांहीं जाति खरें बोलणाऱ्या आहेत. आणि कित्येकांना तर युद्धाच्या कामाची हौस असूनही त्यांमध्यें खरें बोलण्याचा गुण आढळून येतो. हाटेंटाट लोक जरी जात्या गरीब, शांत आणि भित्र्या स्वभावाचे आहेत तरी त्यांजमध्यें निरनिराळ्या प्रदेशांच्या स्वामित्वाबद्दल वारंवार लढाया उप-

स्थित होत असतात. असें असून त्या लोकांच्या सत्याचरणाबद्दल बार्लो व कोल्बेन हे दोघेही साक्ष देतात. कोल्बेन म्हणतोः—

" हाटेंटाट मनुष्याच्या तोंडून निघालेलें वाक्य म्हणजे पवित्रवाक्य समजावें. ह्या जगांत मनुष्याच्या हातून जे अपराध घडणें शक्य आहे त्यांत दिलेलें वचन मोडणें ह्याच्या इतका नीच अपराध दुसरा नाहीं असें ह्या लोकांचें मत आहे. "

इरोकोई लोकांच्या संबंधानें लिहितांना मार्गन् म्हणतोः " इंडियन लोकांच्या स्वभावांत सत्यप्रीति हा गुण प्रमुखत्वानें दिसून येतो. " तथापि इरोकोई लोक सांग्रामिक व्यवसायांपासून अगदीं अलिप्त होते असें नाहीं. त्यांनीं अनेक जातींमिळून जी एक जूट केली होती तिचा उद्देश शांतता राखण्याचा होता हें खरें; व जीं लहानलहान संस्थानें एकत्र झालीं होतीं त्या सर्वांच्या अंतर्व्यवस्थेंत शांतता होती हेंही खरें; तथापि हीं संयुक्त संस्थानें शेजारच्या लोकांबरोबर लढाया चालवीत होतीं. पाटागोनियांतील लोक आपापसांत हवे तितके लढत असतात व त्यांजवर जुलूम करणाऱ्या स्पानियर्ड लोकांबरोबरही ते टक्कर देत असतात. हे लोक लढाईच्या कामांत इतकें लक्ष्य घालणारे असतांही त्यांना सत्याची चाड फार आहे. स्नो म्हणतोः—" ह्या लोकांत खोटं बोलणें तिरस्कारास्पद मानिलें जातें." खोंड लोकांच्या टोळ्यांत जमिनीसंबंधानें आपापसांत भयंकर युद्धें होतात व पाहिजे तितका रक्तपात होतो. तथापि 'खरें बोलणें हें देवांनीं मनुष्यांच्या पाठीमागें ला-

वून दिलेलें अत्यंत पवित्र कर्तव्य आहे' अशी त्यांची समजूत आहे. महाराष्ट्रदेशाच्या डोंगराळ प्रदेशांत राहणारे कोळी लोक शूर, साधे आणि खरें बोलणारे आहेत; पण ते मोठे लुटारू आणि निर्दयपणाचीं कृत्यें करणारे आहेत.

ह्यावरून असें दिसून येईल कीं, ज्यांना शांततेची आवड आहे अशा लोकांत ज्याप्रमाणें खरें बोलण्याचा गुण आढळून येतो त्याचप्रमाणें तो युद्धाची थोडीबहुत आवड असणाऱ्या कित्येक लोकांतही दिसून येतो. अशा स्थितींत सामान्य अनुमान कसें काढावयाचें? तें निघण्याला ह्या दोन्ही प्रकारच्या लोकांत आढळून येणारा कांहीं विशेष गुण असला पाहिजे. वर दोन्ही प्रकारच्या ज्या लोकांचीं उदाहरणें दिलीं आहेत त्यांविषयीं आणखी माहिती मिळविली असतां असें आढळून येईल कीं, त्या सर्वांमध्यें एक गोष्ट साधारण आहे. त्या सर्व लोकांना जुलमी राज्यव्यवस्था सहन करण्याची संवय नाहीं. 'समाजशास्त्राच्या मूलतत्त्वां'त पहिल्या प्रकारच्या सत्यप्रिय लोकांची ही स्थिति आहे असें दाखविलें आहे. ह्याठिकाणीं दुसऱ्या प्रकारच्या सत्यप्रिय लोकांची ह्या संबंधानें काय स्थिति आहे हें पाहूं. हॉटेंटाट लोकांची राज्य करण्याची पद्धति सुधारलेल्या लोकांच्या वळणावर आहे. सर्व राजकारणाचें काम एका मंडळीवर सोंपविलेलें असून मुख्य अधिकाऱ्यांच्या हातांत फारच थोडी सत्ता असते व मंडळीचें कामही बहुमतानें चालतें. इरोकोई लोकांच्या राज्यव्यवस्थेचें काम पन्नास प्रतिनिधींच्या मंडळीवर सोंपवि-

ळेलें असे. आणि हे प्रतिनिधि निवडण्याचें काम निर-
निराळ्या जातींतील लोकांनीं नेमिलेल्या मुखत्यारांकडे
असे. ह्या मुखत्यारांना काढून टाकण्याचा अधिकार
त्या त्या जातींतील लोकांकडे होता. त्यांच्या लष्करी
खात्याची व्यवस्था सरदारलोकांकडे असे. हे सरदा-
र त्यांच्या अंगच्या विशेष गुणांसाठीं पसंत केलेले अ-
सत, व लढाईचें वगैरे सर्व काम त्यांनीं आपल्या ज-
बाबदारीवर खासगीरीतीनें करावें अशी व्यवस्था अ-
से. पाटागोनियन् लोकांची राज्यव्यवस्था अगदीं दुर्बल
होती. सरदारांच्या तंत्रानें असणारे लोक नाखुष झाले
तर त्यांना सोडून जात. खोंड लोकांच्या समाज-
व्यवस्थेविषयीं लिहितांना म्याकफर्सन् म्हणतोः—" सर्व
मनुष्यांच्या सारखेपणाच्या तत्त्वावर त्यांची समाजघट-
ना झालेली आहे. अधिकाराच्या बळावर चालणाऱ्या
जुलुमी व्यवस्थेला तेथें बिलकुल अवकाश मिळत नसून,
समाजाला वळण लाविण्याचें काम त्यांच्या स्वाभाविक
पुढाऱ्यांकडे आहे व तें जुलुमानें केलें न जातां नित्या-
चरणाच्या उदाहरणानें व वजनानें केलें जातें.

अनेक प्रवासी लोकांनीं दिलेल्या माहितीवरून असें
दिसून येतें कीं, जेथें जुलुमी राज्यव्यवस्था आढळून ये-
ते तेथील लोकांची खोटें बोलण्याकडे प्रवृत्ति फार अ-
सते; परंतु जुलुमी राज्यव्यवस्था नसली तर लोकांचा
सत्यभाषणाकडे कल असतो.

झर्झीस आणि पिझारो ह्यांनीं पेरू देशाचा शोध
लागला त्यासंबंधानें जे लेख प्रसिद्ध केले आहेत ते पा-
हिले असतां स्पष्ट दिसून येईल कीं, तेथील इंडियन लो-

कांचा खोटें बोलण्याचा स्वभाव त्यांना जी जुलुमी वागणूक मिळत होती तीमुळें उत्पन्न झालेला होता. त्याचप्रमाणें मेक्सिको येथील लोकांविषयीं फ्रान्सिस्कन प्रवासी आपला अभिप्राय देतात कीं:-" ते लोक लबाड आहेत, पण जे त्यांना चांगल्या रीतीनें वागवितात त्यांच्याजवळ ते मोकळ्या मनानें खरें सांगतात " भयामुळें मनुष्याची खोटें बोलण्याकडे प्रवृत्ति होत असते हें लिव्हिंग्स्टन् ह्याच्या चांगलें अनुभवास आलें. आफ्रिकेच्या पूर्वेकडील प्रदेशांतल्या लोकांच्या खोटें बोलण्याच्या प्रवृत्तीविषयीं बोलत असतां तो म्हणतोः-

" दास्यांत नसणाऱ्या लोकांमध्यें देखील जरी दोष बराच आहे तरी गुलामांमध्यें तो फारच असून त्यापासून मनस्वी त्रास होतो. त्यांच्या भाषेंत कोणी कांहीं बोलला तर त्याचा मतलब आपल्या गुलामाला विचारण्याची सोय नसते. कारण त्याजकडून खरें कधीं बाहेर पडावयाचें नाहीं. आपला धनी जेणेंकरून खुष होईल असें कांहीं तरी तो सांगेल. "

ह्यावरच टीका करीत असतांना तो म्हणतोः-" दुर्बल आणि जुलमानें ग्रस्त झालेल्या लोकांना असत्य हा एक मोठा आधार असतो. "

जुलमी राज्यव्यवस्थेचें अस्तित्व किंवा अभाव आणि मनुष्याचें खोटेपणाचें किंवा खरेपणाचें वर्तन ह्यांमध्यें जो संबंध वर दाखविण्यांत आला आहे त्याच्या सत्यतेबद्दल खात्री होण्यास सुधारलेल्या लोकांकडे किंचित् दृष्टि फेंकिल्यास पुरें होईल. युरोपियन लोकांत अत्यंत जुलमी राज्यव्यवस्था म्हटली म्हणजे रशियाची. झारापासून तों ल-

हानशा शिपायापर्यंत सर्वांना कडकडीत अंमल गाजविण्याची इच्छा. आणि ह्या लोकांची खोटें बोलण्याची तर कमाल आहे हें सर्वप्रसिद्ध आहे. ईजिप्शियन् लोकांना जुलुमी अधिकाऱ्यांच्या जुलुमी अंमलाची दीर्घकालपर्यंत संवय झाल्यामुळें त्यांच्या अंगीं लबाडी इतकी भिनून गेली आहे कीं, खुबीदाररीतीनें लबाडी सांगणारा मनुष्य तो गुणच समजून त्याविषयीं प्रतिष्ठा मिरवीत असतो, व एकाद्या कामांत कोणाला अपयश आलें तर अमुक मनुष्याला फसविलें नाहीं किंवा तमुक गोष्टींत लबाडी बरोबर साधली नाहीं म्हणून असें झालें अशी नेहमीं टीका होत असते. ह्यानंतर हिंदुलोकांचें उदाहरण घेण्यासारखें आहे. आरंभीं हिंदुलोकांचींच अव्यवस्थित राज्यें होतीं. त्यानंतर मुसलमानी अंमलास सुरुवात झाली. ह्या काळांत पाहिजे त्या प्रकारचे जुलूम सहन करण्याची लोकांस संवय झाली. मुसलमानांचें राज्य नष्ट होतें तों ख्रिस्ती राष्ट्रांच्या अंमलाखालीं हिंदुस्थानवासी लोकांस रहावें लागलें. हा अंमलही मुसलमानी अंमलापेक्षां फारसा कमी जुलुमी नाहीं. त्यावेळच्या जुलुमाचा प्रकार निराळा व हल्लींचा निराळा इतकाच कायतो फरक. हे लोक इतके खोटें बोलणारे आहेत कीं, न्यायाच्या कोर्टांत शपथेवर घेतलेल्या साक्षी देखील अगदीं अविश्वसनीय असतात व त्यांना खोटेपणा कबूल करण्याचीही लाज वाटत नाहीं.* कधीं-

---

* आह्मां हिंदुलोकांवर **स्पेन्सर**साहेबांनीं जो आरोप केला आहे त्यांत थोडीशी अतिशयोक्ति असेल, परंतु त्यांतील मूळ खरें आहे हें प्रांजल मनुष्यास कबूल केलें पाहिजे. पाश्चात्य

कधीं राज्यकर्त्यांच्या अंगचा खोटें बोलण्याचा स्वभाव त्यांच्या सहवासानें त्यांच्या अंमलाखालीं राहणाऱ्या लोकांचें वर्तन एक घाव आणि दोन तुकडे अशा प्रकारचें सरळमार्गाचें असतें, परंतु आह्मी नेहमीं हळूच आडवाटेनें लपूनछपून जाण्याचा प्रयत्न करीत असतों. आमच्या लोकांमध्येंही कांहीं धीटपणानें खरें बोलणारे लोक आढळतील व पाश्चात्यांमध्यें लबाड आढळतील. परंतु राष्ट्रांचा स्वभाव पहावयाचा म्हणजे लोकांच्या स्वभावांच्या सरासरीचें मान पाहिलें पाहिजे. आणि तें वर सांगितल्याप्रमाणेंच आहे. दुर्बलता, भित्रेपणा आणि लवाडी ह्यांची सांगड आहे. आमचा दुबळेपणा सिद्ध करण्यास, अनेक शतकेंपर्यंत आह्मीं आपणांवर परकीयांचा अंमल चालूं दिला आहे, ह्यापेक्षां निराळें प्रमाण देण्याची गरज नाहीं. मध्यंतरीं मराठे व ब्राह्मण लोकांनीं तरवार हातांत घेऊन कांहीं वर्षेंपर्यंत आपलें शौर्य गाजविलें हें खरें. परंतु त्या मुदतींत झालेले बहुतेक परिणाम इंग्रजी अंमलांत नष्ट झाले. मुसलमानांचें राज्य कितीही जुलुमी असलें तरी त्यावेळीं आमच्या अंगांत जो तकवा होता तो इंग्लिश सरकारानें आह्मांस अगदीं निःशस्त्र करून टाकिल्यामुळें थोड्या वर्षांतच नाहींसा झाला. दुबळेपणा आला कीं भित्रेपणा पाठीस लागलाच. आणि शौर्यानें आपलें रक्षण करण्याचें सामर्थ्य अंगीं नसलें म्हणजे लवाडीच्या उपायांच्या योजनेस मनुष्य लागतो. आमचा भित्रेपणा आणि लवाडी हीं आमच्या सर्व प्रकारच्या व्यवहारांत दिसून येतात. राजकीय गोष्टींत आह्मांला फारसें मन घालण्याला क्षेत्रच नाहीं; पण जें थोडेंसें आहे त्यांत देखील आमचा भित्रेपणा दिसून येतो. वर्तमानपत्रांना जें स्वातंत्र्य मिळालें आहे त्याचा योग्य उपभोग घेणारे फारच थोडे वर्तमानपत्रकार आढळतात. राष्ट्रीयसभेच्या संबंधानें दोन वर्षांपूर्वीं जी एक गोष्ट घडून आली तीवरून आमच्या लोकांचा भित्रेपणा चांगला व्यक्त होतो. ह्यूमसाहेब कसें झालें तरी इंग्लंडचें पाणी प्यालेला. त्यानें जेव्हां इकडील लोकस्थितीसंबंधानें एक खरमरीत व भयसूचक सर्क्युलर काढिलें त्यावेळीं राष्ट्रीयसभेच्या हिंदु पुढाऱ्यांची अगदीं पांचांवर धारण बसली. आतां राष्ट्रीयसभेवर गदा येते कीं काय असें त्यांना भय सुटलें; बहुतेक लोक आपले कान पाखडून आप-

कसकशा वाढत गेल्या हें पाहण्यानें गंमत वाटण्यासारखी आहे." फ्रान्सदेशांत हल्लींही राज्यकारस्थानाच्या कामांत लवाड्या केल्या जातात पण त्या पूर्वींइतक्या भयंकर नसतात. इंग्लिश लोकांचीही स्थिति निराळी नाहीं. ज्यावेळीं राजाच्या सत्तेला फारसा आळा पडला नव्हता त्यावेळीं प्रत्येक पक्षाचे पुढारी लोक निःशंकपणें विश्वासघाताचें वर्तन करीत होते. व इलिझाबेथ राणीच्या कारकीर्दींत तर ह्या गोष्टीची कमाल झाली होती. पुढें जसजशी राजसत्ता आकुंचित होत गेली तसतसा राजकारणी पुरुषांच्या वर्तनांतील खोटेपणा कमी होऊं लागला.

ह्या सर्व गोष्टींवरून इतकें लक्ष्यांत येईल कीं, युद्धाची चळवळ आणि असत्य, व शांतता आणि सत्य, ह्यांजमध्यें जो संबंध सांगण्यांत आला तो युद्धाच्या अंगीं असत्य उत्पन्न करण्याचा किंवा शांततेच्या अंगीं सत्य उत्पन्न करण्याचा स्वाभाविक गुण असल्यामुळें अस्तित्वांत आलेला नव्हे. तसा संबंध उत्पन्न होण्याचें कारण इतकेंच कीं, ज्या लोकांत नेहमीं युद्धाची चळवळ चाललेली असते त्यांच्या समाजघटनेंत जुलमी व्यवस्थेला पुष्कळ अवकाश मिळतो व जेथें त्या चळवळीचा अभाव असतो तेथील लोकांच्या समाजघटनेंत जुलुमाचा शिरकाव तितका होत नाहीं. पहिल्या प्रकारच्या स्थीतींत प्रवर्तकनीतीच्या दृष्टीनें खोटें बोलणें

आहे व ती दूर करणें हें थोड्याशा व्यक्तींच्या हातून थोड्याशा काळांत होणारें काम नव्हे. तथापि अगदींच निराश न होतां ज्यांच्या अंगीं सामर्थ्य असेल त्यांनीं त्या यत्नास लागलें पाहिजे.

फारसें किंवा मुळींच तिरस्कारास्पद मानिलें जात नाहीं. म्हणजे तसें वर्तन करणाऱ्या मनुष्याचा लोकांना तिटकारा येत नाहीं. परंतु दुसऱ्या प्रकारच्या स्थितींत प्रवर्तकनीतीच्या व शुद्धनीतीच्याही दृष्टीनें असत्याचरण तिरस्कारास्पद मानिलें जातें.

# प्रकरण १०

## आज्ञाधारकपणा

दोन प्रकारच्या वर्तनांचा आज्ञाधारकपणांत समावेश होतो. ह्या दोन प्रकारांची अवश्यकता ज्या कारणांनीं उत्पन्न होते तीं अगदीं भिन्न आहेत. एक नित्य असून मनुष्यस्वभावाशीं खिळलेलें आहे व दुसरें परिस्थितीप्रमाणें वारंवार बदलणारें असून तें मनुष्यस्वभावाशीं तितकें चिकटलेलें नाहीं. आईबापांच्या आज्ञा पाळणें व राष्ट्राचे कायदे पाळणें हीं आतां सांगितलेलीं दोन प्रकारचीं वर्तनें होत. ज्याप्रमाणें दोहोंचाही एकाच नांवाखालीं समावेश होतो, त्याप्रमाणें दोहोंमिळून एकच सद्गुण मानिला जातो. बहुतेकांचा साधारण समज असा आहे कीं, पहिल्या प्रकारचा आज्ञाधारकपणा जितका प्रशंसनीय आहे तितकाच दुसऱ्या प्रकारचाही आहे.

ह्या दोहोंविषयीं विचार करितांना एक गोष्ट नेहमीं लक्ष्यांत बाळगिली पाहिजे ती ही कीं, मुलांनीं आईबापांची आज्ञा पाळण्याची अवश्यकता एकंदर जीवसृष्टींत जी व्यवस्था दिसून येते तिच्या अनुरोधानें उत्पन्न झाली आहे. कोणत्याही काळीं व कोणत्याही स्थितींत आईबापांची आज्ञा मुलांनीं पाळणें इष्ट आहे. तशी गोष्ट प्रजेनें सरकारचा हुकूम पाळण्याच्या संबंधानें नाहीं. एका विशेष मार्गानें मनुष्याची सुधारणा झाली असल्यामुळें ही अवश्यकता उत्पन्न झाली आहे व ती

तितकी निकडीची नसून कांहीं विशेष स्थितींत मात्र ती इष्ट आहे.

कौटुंबिक समाजघटनेंत आज्ञाधारकपणाच्या दोन्ही प्रकारांचा उगम एकच असतो हें खरें, पण कौटुंबिक समाजघटना सार्वत्रिक नाहीं. सर हेन्री मेन ह्याचें मत ती सार्वत्रिक असावी असें आहे, पण तें चुकीचें आहे. प्राथमिक स्थितींतील मोठाल्या कुटुंबांची व्यवस्था कुटुंबनायकांच्या तंत्रानें चालत असे व त्या कुटुंबनायकाला महत्पिता ( पेट्रिआर्क ) असें नांव दिलें आहे. त्या वेळचें एकेक कुटुंब म्हणजे एकेक लहानसा समाजच असे. ह्या अल्पसमाजांत किंवा महत्कुटुंबांत पुष्कळ लहानलहान कुटुंबें असत. लहान कुटुंबाच्या मुख्याला पिता ( पेटर ) अशी संज्ञा आहे. समाजाचा विस्तार ज्या क्रमानें झालेला आढळतो त्याच क्रमानें आज्ञाधारकपणाच्या कल्पनेचाही विस्तार होत गेला आहे. अल्पवयस्क मुलांनीं आईबापांच्या आज्ञा पाळाव्या ह्या आज्ञाधारकपणाच्या मूळस्वरूपांत थोडा बदल होऊन वयस्क मनुष्येंही अल्पकुटुंबनायकाच्या म्हणजे पित्याच्या आज्ञा पाळूं लागतात, व त्याच स्वरूपाचा आणखी थोडासा विस्तार होऊन महत्कुटुंबांतील सर्व मनुष्यें महत्पित्याच्या आज्ञा पाळूं लागतात. पुढें सोईसाठीं अनेक महत्कुटुंबें किंवा अल्पसमाज एकत्र राहूं लागतात आणि अशा रीतीनें महत्समाज किंवा राष्ट्र बनतें. ह्या राष्ट्राची व्यवस्था राष्ट्राधिपतीकडे जाते आणि त्याची आज्ञा सर्वांस पाळावी लागते. बऱ्याच समाजांची अशा रीतीनें उत्क्रान्ति होत गेली असेल,

परंतु हल्लींच्या सुधारलेल्या समाजांत हा पूर्वीचा संबंध नष्ट होऊन गेलेला आहे; आणि आज्ञाधारकपणाच्या दोन प्रकारांतही आतां कांहीं संबंध राहिला नाहीं. तथापि दोहोंविषयीं समजुती सारख्याच असल्यामुळें त्यांचे उत्तेजक मनोविकारही सारखेच असतात व दोहोंमध्यें फेरबदलही बहुतकरून एकदमच होतो.

आतां प्रत्यक्ष उदाहरणें घेऊन चोहोंकडे काय स्थिति आढळते हें पाहतांना, प्रथमतः, मुलांनीं आईबापांच्या आज्ञेंत राहण्याच्या संबंधानें वस्तुस्थिति कशी आहे तें पाहूं; व नंतर प्रजेनें सरकारच्या आज्ञेंत राहण्याच्या गोष्टीकडे लक्ष्य देऊं.

मनुष्याच्या प्रथमावस्थेंत समाजाधिपति नसल्यामुळें राजा आणि प्रजा हा संबंधच उत्पन्न होत नाहीं. अनेक कुटुंबें शेजारींशेजारीं राहणारीं असलीं तरी तीं स्वतंत्र रीतीनें राहत असतात. अशा स्थितींत दुसऱ्या प्रकारच्या आज्ञाधारकपणाला अस्तित्वच नसतें. आणि पहिल्या प्रकारच्या आज्ञाधारकपणाचेंही क्षेत्र इतकें आकुंचित असतें कीं, मनुष्याचें कुटुंब बहुतेक मनुष्येतर प्राण्यांच्या कुटुंबांसारखेंच असतें. म्हणजे एकपक्षीं आईबापांचें कर्तव्य बरेंच मर्यादित असल्यामुळें त्यांजवरची जबाबदारी लवकरच नाहींशी होते, व अन्यपक्षीं मुलेंही लवकर करतीं संवरतीं होऊन आईबापांवर अवलंबून न राहतां स्वतंत्रपणें आपला निर्वाह करूं लागतात.

अमेरिकेंतल्या मूळच्या लोकांत अशीं उदाहरणें आढळून येतात. आरोकेनियन् लोक आपल्या मुलग्यांना

कधीं शिक्षा करीत नाहींत. त्यांना मारणें हें ते नीचपणाचें काम समजतात, व त्यामुळें मनुष्य भितरा होऊन शूर शिपायाच्या कामाला अयोग्य होतो असें त्यांना वाटतें. अरावक लोकांमध्येंही मुलांना फार सौम्य रीतीनें वागविलें जातें. परंतु हें त्यांचें वर्तन अपत्यप्रेमामुळें असावें. मुलापासून बापाला कितीही त्रास झाला किंवा त्याचा त्यानें अपमान केला तरी तें तो मुकाट्यानें सोसतो, पण मुलाला शिक्षा करण्याचें त्याच्या मनांत येत नाहीं. डकोट लोकांच्या मुलांसंबंधानें पुढील हकीकत वाचण्यांत येतेः—

"दहा किंवा बारा वर्षांचा मुलगा झाला म्हणजे त्याला घरच्या वडील माणसांच्या दाबांतून मुक्त व्हावेंसें वाटतें, आणि प्रसंगीं बापावर हात चालविण्यासही तो मागेंपुढें पाहत नाहीं. मुलाच्या हातचा मार खाणाऱ्या बापालाही तें कौतुकच वाटतें व तो लागलाच ज्या भागावर मार बसला असेल तो भाग चोळीत चोळीत आपल्या शेजाऱ्याकडे जातो आणि आपल्या मुलाच्या पराक्रमाचें वर्णन करून असल्या प्रतापी मुलाला जन्म दिल्याबद्दल आपणाला धन्य मानून घेतो." प्राचीन महाद्वीपांत देखील असलीं उदाहरणें आढळून येतात. पूर्व आफ्रिकेंतील लोकांविषयीं बर्टन म्हणतोः— "मुलगा वयांत आला म्हणजे रानटी जनावरांप्रमाणें बाप व लेक हे एकमेकांचे शत्रु बनतात." त्याचप्रमाणें बेडुइन् लोकांच्या स्वभावाविषयीं लिहितांना व आईबाप आणि मुलें ह्यांजमध्यें नेहमीं चालणाऱ्या भांडणांवर टीका करितांना बर्खार्ट सांगतो कीं, बापाचें मुलांना

शिक्षणच तशा प्रकारचें असतें, त्यांना सभ्यपणाची रीति शिकविण्याऐवजीं जीं परकीं मनुष्यें आपल्या घराकडे येतील त्यांना धोंडे मारून किंवा त्यांशीं धिंगामस्ती करून त्यांस हांकून द्यावें असें आईबाप मुलांना शिकवीत असतात. तोच ग्रंथकार आणखी एका ठिकाणीं म्हणतो:—

"मुलगा जरासा मोठा होऊन त्याला ताकद वाटूं लागली व स्वतःकरितां निराळें घर वगैरे करून त्याची सर्व जबाबदारी संभाळण्याचें सामर्थ्य त्याच्या अंगीं आलें कीं तो लागलाच बापाच्या ताबेदारींतून बाहेर निसटतो. मग तो कोणाचाही उपदेश किंवा हुकूम मानावयाचा नाहीं. नेहमीं आपल्याच तंत्रानें चालावयाचा. आईबापांचा आज्ञाभंग करण्याची प्रवृत्ति ज्या ठिकाणीं आढळून येते त्याच ठिकाणीं कधींकधीं आईबापांचे वृद्धापकालीं हाल करून त्यांस निर्दयपणानें वागविण्याची प्रवृत्तिही दिसून येते. चिपवा येथील लोकांत मनुष्य वृद्ध झाला म्हणजे त्याची हेळसांड करितात व त्याचा वाटेल तसा अपमान करितात. आणि कामश्चाटकांतील लोक तर आईबापांचें त्यांना ओझें वाटूं लागलें म्हणजे त्यांना मुळीं मारूनच टाकितात; व विशेष गोष्ट ही कीं तसें करणें पुत्रधर्माविरुद्ध आहे असें त्यांना वाटत नाहीं.

बापांपेक्षां आयांची हेळसांड फार होते. कोणत्याही समाजांत बायका पुरुषांहून बऱ्याच खालच्या पायरीच्या समजल्या जातात; व प्राथमिक स्थितींत तर बायकांची योग्यता चाकरांच्या किंवा गुलामांच्या यो-

ग्यतेहून अधिक मानिली जात नाहीं. ह्या त्यांच्या दा-
स्यामुळें त्यांविषयीं तिरस्कार उत्पन्न होतो. डकोट लो-
कांमध्यें मुलगा आईकडून आपलें सगळें काम करवून
घेतो व तसें करण्याविषयीं बापाकडून त्याला शिक्षणच
मिळतें. फिजियन् लोकांमध्यें लहान मुलांना पहिल्याप्र-
थम आईला मार देण्याचा धडा शिकविला जातो. आणि
ह्या कामांत जर का त्याच्याकडून हयगय झाली तर
आपला मुलगा पुढें भितरा निपजेल असें बापाला भय
सुटतें. हाटेंटाट लोकांत मुलगा मोठा होऊन त्याची प्रौढ
मनुष्यांत गणना होऊं लागली म्हणजे "त्यानें वाटेल
तेव्हां आपल्या आईचा अपमान केला तरी त्याबद्दल
त्याला कोणी दोष देणार नाहीं. त्यानें पाहिजे तर के-
वळ आपल्या करमणुकीसाठीं तिला मार देखील द्यावा,
पण त्याबद्दल त्याला कोणी एक चकारशब्दसुद्धां वि-
चारावयाचा नाहीं. असलीं कृत्यें धीटपणाचीं व शौर्याचीं
लक्षणें समजलीं जातात व त्यामुळें मनुष्याची किंमत
कमी न होतां उलटी वाढते." झूलू लोकांच्या मुलां-
संबंधानें टामसन् लिहितोः—

"ह्या ठिकाणीं मोठ्या खेदाची गोष्ट ही आहे कीं,
झूलू लोकांचे मुलगे मोठे होण्यापूर्वींच त्यांना कायद्यानें
एक भयंकर अधिकार मिळतो. त्यांच्या आयांनीं जर
का त्यांना मारण्याचा यत्न केला तर तत्क्षणीं त्यांनीं
त्यांचे खून केले तरी कायद्याची परवानगी असते."
आणि कारेन् लोकांविषयीं मेसन म्हणतोः—

"कित्येक वेळां असें घडून येतें कीं, आई मुलांना
वारंवार लागण्यासारखें बोलून त्रास देते. मग त्यांतला

एकादा मुलगा संतापून म्हणतोः—' माझी आई अतिशय वडबड करिते; ती मरेपर्यंत मला सुख व्हावयाचें नाहीं. पांच रुपयांपेक्षां तिची किंमत अधिक आली नाहीं तरी पतकरली, पण मी तिला विकून टाकीन. ' इतकें म्हणून तो स्वस्थ वसत नाहीं, लागलाच तिला विकून टाकितो. "

वरील उदाहरणांत दिसून येणारा निर्दयपणा दोन गोष्टींमुळें उत्पन्न झालेला आहे. एक, मुलांमधील आज्ञाधारकतेचा अभाव व दुसरी, कनिष्ठ प्रकारची सामाजिक स्थिति. तथापि हा संबंध प्राथमिक स्थितींतील सर्व समाजांत आढळून येणारा नाहीं. एस्किमो लोकांविषयीं पूर्वीं सांगण्यांत आलेंच आहे कीं, आईबापांची मुलांवर ममता फार असते व मुलांकडूनही सहसा आईबापांच्या आज्ञेविरुद्ध वर्तन होत नाहीं. असें असल्यामुळें मुलांना शारीरिक शिक्षा करण्याचे प्रसंगही कधीं येत नाहींत. ह्यावरून असें दिसतें कीं, अगदीं कनिष्ठ प्रकारच्या सामाजिक स्थितींत मुलांमध्यें पिताज्ञा पालनाचा गुण असणें किंवा नसणें ह्या दोन्ही गोष्टी संभवनीय आहेत. परंतु ज्या लोकांना युद्धाच्या चळवळींची संवय असून त्यांच्या मुलांमध्यें आज्ञाधारकपणाचा अभाव असेल त्या लोकांमध्यें उन्नत प्रकारच्या समाजघटनेला जें अन्योन्याकर्षण लागत असतें तें उत्पन्न होण्याचा संभव नाहीं.

अनेक स्थितींतील समाजांत ह्याच्या उलट संबंध दिसून येतो त्यावरून अप्रत्यक्षरीतीनें ह्या गोष्टीची सिद्धता होते.

सेमिटिक शाखेंतील भटकत फिरणाऱ्या लोकांचीं वर उदाहरणें दिलीं आहेत. त्यांतील लोकांची त्याच शाखेंतील प्रथमतः भटकत फिरणाऱ्या परंतु पुढें व्यवस्थित समाज करून राहूं लागल्यामुळें राष्ट्रत्व पावलेल्या लोकांशीं तुलना केली असतां त्यांमध्यें स्पष्ट विरोध दिसून येतो. पहिल्या लोकांच्या मुलांमध्यें आज्ञाधारकपणाचा बहुतेक अभाव असतो, परंतु दुसऱ्या लोकांच्या मुलांमध्यें हा गुण बऱ्याच अंशानें दिसून येतो. हीब्र्यू लोकांमध्यें कुटुंबनायकाला देहान्तशिक्षेपर्यंत शिक्षा देण्याचा अधिकार होता. त्यांचें जें आज्ञादशक आहे त्यांत 'ईश्वराची आज्ञा पाळावी' ह्याच्या खालींच 'आईबापांचा सन्मान राखावा' ही आज्ञा आहे. लेव्हिटिकस नामक पुस्तकांत देवाची निंदा केली असतां जसें शिक्षेचें भय घातलें आहे तशीच आईबापांना शिव्या देण्याबद्दलही शिक्षेची भीति दाखविली आहे. ड्यूटरानमी नामक पुस्तकांत स्पष्ट म्हटलें आहे कीं, आईबापांवर उठणाऱ्या मुलाचा भर रस्त्यांत धोंडे मारून जीव घ्यावा. असीरियन् लोक सेमिटिक शाखेच्याच एका भागापासून उत्पन्न झाले असून, त्यांजमध्यें जुलमी समाजव्यवस्था उद्भूत झाली होती. त्यांबद्दल वाचण्यांत येतें कीं:—

"कुटुंबांत बापाची सत्ता अनियंत्रित असे. मुलांनीं जर बापाला टाकून दिलें तर तीं गुलाम म्हणून विकलीं जात व आईला टाकून दिलें तर तीं बंडखोर समजलीं जात." हिंदु लोकांमध्यें वार्षिक श्राद्धपक्ष करून पितरांना पिंड देण्याची व नेहमीं पितृतर्पण करण्याची जी चाल आहे तीवरून त्यांची पितृभक्ति व्यक्त होते. प्राचीन-

कालीं जिवंतपणींही विलक्षण पितृभक्ति दाखविली जात असे. रामाचें वनवासास जाणें हें पितृभक्तीचें उत्कृष्ट उदाहरण आहे. कठोपनिषदांत पितृभक्तीसंबंधानें पुढील कथा दिली आहे:—

उशन् ह वै वाजश्रवसः सर्ववेदसं ददौ । तस्य ह नचिकेतानाम पुत्र आस । तं ह कुमारं सन्तं दक्षिणासु नीयमानासु श्रद्धाऽऽविवेश सोमन्यत ।

पीतोदका जग्धतृणा दुग्धदोहा निरिंद्रियाः ।
अनन्दा नाम ते लोकास्तान् सगच्छति ता ददत् ॥

सहोवाच पितरं तत कस्मै मां दास्यसीति । द्वितीयं तृतीयं । तं होवाच मृत्यवे त्वा ददामीति ।

वहूनामेमि प्रथमो वहूनामेमि मध्यमः ।
किंस्विद्यमस्यकर्तव्यं यन्मयाद्य करिष्यति ॥
अनुपश्य यथा पूर्वे प्रतिपश्य तथा परे ।
सस्यमिव मर्त्यः पच्यते सस्यमिवाजायते पुनः ॥

अध्याय १.*

---

* स्वर्गप्राप्तीच्या उद्देशानें वाजश्रवसानें यज्ञाचे प्रसंगीं आपलें सर्वस्व दान केलें. त्याला नचिकेतस् नांवाचा एक पुत्र होता. ऋषिगण दक्षिणा घेऊन जात असतां ऋषिपुत्राचे मनांत श्रद्धेनें संचार केला. तो अल्पवयस्कच होता, तथापि त्याच्या मनांत विचार आला कीं 'प्रजाजननास असमर्थ अशा गाईंचें दान करणाराला उत्तम लोकाची प्राप्ति होत नाहीं.' तेव्हां (पित्यानें सर्वस्व दान केलें आहे ही गोष्ट मनांत आणून) तो पित्याला म्हणाला:—"माझें कोणाला दान करणार?" पित्याकडून कांहीं उत्तर येत नाहीं असें पाहून तोच प्रश्न त्यानें दुसऱ्यानें व तिसऱ्यानें विचारिला. तेव्हां पिता (रागानें) त्याला म्हणाला 'मी तुला मृत्यूच्या स्वाधीन करितों.' (ज्याअर्थी सर्वस्व दान करण्याचा बापानें संकल्प केला आहे त्याअर्थी त्यानें माझें-

हीच गोष्ट तैत्तिरिय ब्राह्मणांत किंचित् निराळ्या स्वरूपानें दिली आहे.

चिनी लोकांत देखील पितृभक्ति कमी नाहीं. ऐतिहासिक कालाच्या आरंभापासून तों आतांपर्यंत ती एकसारखी दिसून येते. त्या लोकांमध्यें पितरांची पूजा करण्याची चाल आहे आणि पितरांना यथाकालीं अन्नवस्त्रादि दिलें असतां तें त्यांना पोंचतें अशी त्यांची समजूत आहे. ही स्वर्गस्थ पितरांची गोष्ट झाली. आईबा-

---

ही कोणाला तरी दान केलें पाहिजे असें मनांत आणून मुलानें प्रश्न विचारिला होता व कोणा तरी ऋषींचे स्वाधीन आपणाला तो करील असें त्याला वाटत होतें.परंतु बापाच्या मनांत पूर्वी ही कल्पना आलीच नव्हती त्यामुळें मुलानें प्रश्न केल्याबरोबर तो गोंधळला व पुनःपुनः तोच प्रश्न ऐकून त्रासून त्यानें रागासरसें उत्तर दिलें. बापाच्या तोंडून पडलेला शब्द खरा केला पाहिजे असें मनांत आणून ) तो म्हणाला ' ह्यापुढें जे मृत्युपंथास जावयाचे आहेत त्यांचे आधीं मी जातों व आतां जे त्या पंथानें जात आहेत त्यांचे बरोबर मी जातों. यमाला माझ्याविषयीं जें कर्तव्य असेल तें तो करील.' नंतर(बाप शोकाविष्ट झाला असें पाहून त्याचें सांत्वन करण्यासाठीं ) तो म्हणतोः–" पूर्वी जे लोक होऊन गेले त्यांचा परिणाम काय झाला तो पहा व पुढें येणारे जे लोक आहेत त्यांचा परिणाम काय होईल त्याचा विचार कर. धान्याप्रमाणें मनुष्य पक्क ( म्हातारा ) होतो व पुन्हां जन्मास येतो. "

नंतर नचिकेतम् यमाचे घरीं गेला व तेथें त्याजवर यमराजाची मर्जी प्रसन्न होऊन त्यानें त्याला तीन वर मागण्यास सांगितलें वगैरे बरीच कथा आहे

' पीतोदका ..' ह्या श्लोकाचा संबंध बरोबर जुळत नाहीं. बहुधा पित्यानें ज्या गाईचें दान केलें होतें त्या बहुतेक निरुपयोगी झालेल्या असल्यामुळें पित्याला उत्तम गति प्राप्त होणार नाहीं असें त्याला वाटलें असावें व आपलें दान करवून घेऊन त्याला सद्गति प्राप्त करून द्यावी असा विचार त्याच्या मनांत आला असावा.

पांच्या जिवंतपणींही मुलें त्यांच्या अगदीं अर्ध्या वचनांत असतात. कन्फ्यूशिअस म्हणतोः–"पितृभक्ति आणि ज्येष्ठभ्रात्राज्ञापालन हीं सर्व चांगुलपणाच्या कृत्यांचा उगम नव्हत काय ?" चिनी लोकांची एक फार जुनी म्हण आहे कीं "शंभर सद्गुणांत पितृभक्ति हा सर्वोत्कृष्ट सद्गुण होय." ईजिप्शियन् लोकांतही असाच प्रकार आढळून येत होता. ह्या प्रचंड समाजाची परंपरा फारच प्राचीन काळापर्यंत नेऊन पोंचवितां येते. टाहोटेप म्हणून जो त्यांचा मोठा नीतिकार होऊन गेला त्याच्या मताप्रमाणें नीतीचें सर्व सार आज्ञाधारकपणांत आहे आणि आज्ञाधारकपणाच्या अनेक प्रकारांचा उगम पित्राज्ञापालनांत आहे. त्याचप्रमाणें ज्या लोकांच्या लहानलहान टोळ्या एकत्र जमून पहिल्यानें एक छोटेखानी राष्ट्र बनलें व जे पुढें सगळ्या यूरोपखंडावर व एशिया आणि आफ्रिका ह्या खंडांच्याही कांहीं भागांवर पसरले त्या लोकांमध्येंही आज्ञाधारकपणा कमी नव्हता. ह्या लोकांचा उदय होऊं लागला तेव्हांपासून पुढें पुष्कळ काळपर्यंत मुलगे बापाच्या पूर्णपणें ताब्यांत असत. चिनी लोकांपेक्षांही ह्या रोमन लोकांमध्यें मुलांवर बापाचा ताबा अधिक असे. कारण जरी चिनी लोकांमध्यें प्राचीन काळापासून प्रस्तुत काळापर्यंत आईबापांना बालवधाचा हक्क आहे आणि त्यांना आपलीं मुलें चाकर किंवा गुलाम म्हणून विकतां देखील येतात; आणि ह्याचा साहजिक परिणाम जरी प्रौढ मुलांनाही आपल्या आईबापांच्या परवानगीवांचून कांहींएक करितां येऊं नये व त्यांनीं आपल्या पराक्रमानें कांहीं मालमत्ता के-

ली असतां तिजवर आईबापांचा हक्क चालावा, असा झाला आहे; तरी रोमन लोकांप्रमाणें चिनी लोकांमध्यें प्रौढ मुलांचेंही जीवित आईबापांच्या हातांत असलेलें कोठें वाचण्यांत येत नाहीं. आईबापांच्या हातांत इतकी भयंकर सत्ता असल्यावर मुलांनींही त्यांच्या अगदीं कह्यांत वागावें हें साहजिकच आहे. राज्यकर्त्या रोमन लोकांच्या ह्या स्थितीचा परिणाम सगळ्या यूरोपखंडावर झाला. रोमन कालानंतरच्या यूरोपाच्या इतिहासांत बापाचा मुलांवरील अधिकार आणि मुलांचा आज्ञाधारकपणा हीं जरी पुन्हां तितक्या पायरीला जाऊन पोंचलीं नाहींत तरी अगदीं अलीकडल्या काळापर्यंत पितापुत्रांच्या वर्तनांत पूर्वीच्या संबंधाची झांक दिसून येत होती.

ह्या अनेक उदाहरणांवरून असें दिसून येईल कीं, जे लोक विस्कळितपणें न राहतां दिवसेंदिवस एकवटत चालले व ज्यांना सामाजिक उन्नतीमुळें हळूहळू राष्ट्रत्व येत चाललें त्या लोकांमध्यें पित्राज्ञापालनाचा गुण वसत होता व तो अखेरपर्यंत जरी तितका कायम राहिला नसला तरी आरंभीं त्याचें मान बरेंच मोठें होतें.

राजाज्ञापालनाचा गुण मनुष्यांमध्यें कमी अधिक प्रमाणानें उत्पन्न होणें हें बहुधा सभोंवतालच्या प्रतिकूल किंवा अनुकूल स्थितीवर अवलंबून असतें. लोकांच्या वसतिस्थानाचें स्वाभाविकस्वरूप जर अशा प्रकारचें असलें कीं तेथें मोठ्या प्रमाणावर जुलूम चालवितांच येऊं नये, तर त्या ठिकाणीं मोठमोठे समाज करून राहण्याकडे मनुष्यांची प्रवृत्ति होत नाहीं. नापीक ज-

मिनीच्या विस्तीर्ण मैदानांत राहणाऱ्या लोकांची अशी स्थिति असते. ते विस्कळितपणें राहून भक्ष्यासाठीं चोहोंकडे फिरत असतात. फार झालें तर लहानलहान टोळ्या करून फिरतात, परंतु ह्याच्या पलीकडे त्यांची मजल जात नाहीं. त्याचप्रमाणें डोंगरांच्या उंच रांगांमुळें जेथें शेजारच्या लोकांनाही एकमेकांशीं संबंध ठेवितां येत नाहीं तेथेंही मनुष्यांचे मोठे समाज बनणें शक्य नसतें. अशा प्रकारची परिस्थिति असली म्हणजे समाजाची वाढ बहुधा महत्कुटुंबापर्यंत जाते व कुटुंबनायकाच्या ( महत्पित्याच्या ) देखरेखीखालीं त्या अल्प समाजाची व्यवस्था चालून त्याच्या हुकुमांत वागण्याची लोकांना संवय होते. खोंड लोकांमध्यें हा प्रकार आढळून येतो. " ह्या लोकांच्या सर्व टोळ्यांमध्यें कुटुंबाधिपतीला मोठा मान मिळतो. त्यांमध्यें अशी एक म्हणच पडून गेली आहे कीं, ' मनुष्याचा बाप म्हणजे त्याचा ह्या लोकींचा देव. ' त्यांची समाजघटना कौटुंबिक पद्धतीवर असून कुटुंबाधिपतीचा त्याच्या कुटुंबांतील मनुष्यांवर पूर्ण अधिकार असतो. कोणत्याही प्रसंगीं त्याची आज्ञा मोडणें हा गुन्हा समजला जातो. "

अशाच प्रकारची स्थिति भिल्ल म्हणून लोक आहेत त्यांत आढळून येते. हे लोक डोंगरी प्रदेशांत राहणारे असून त्यांच्या टोळ्यांचे जे मुख्य सरदार असतात त्यांचा थोडासा अंमल सहन करण्याची त्यांना संवय झाली आहे. परंतु कुटुंबाधिपतीवर मात्र त्यांची अतोनात निष्ठा असते. त्या कुटुंबाधिपतींना ( पेट्रिआर्कांना ) 'टर्वी' असें म्हणतात. त्यांबद्दल एक ग्रंथकार म्हणतोः—

" ह्या मूर्ख लोकांवर त्यांच्या पेट्रिआर्कींचें इतकें वजन असतें कीं,ते कितीही जिवावरच्या संकटांत असले तरी त्याचा विश्वासघात करण्याला प्रवृत्त होणार नाहींत."

" टर्वीनें आपली इच्छा मात्र प्रदर्शित केली पाहिजे. मग दुसऱ्याचा जीव घेण्याचा प्रसंग असो किंवा स्वतःचा जीव देण्याचा असो, त्या दोहोंची किंमत त्यांस सारखीच वाटते व त्या दोहोंविषयींही त्यांची सारखीच तत्परता असते. "

अशा रीतीनें पितृभक्तीचें क्षेत्र विस्तृत होऊन सभोंवतालची स्थिति अनुकूल असली तर कालेंकरून लोकांमध्यें राजनिष्ठा उत्पन्न होणें शक्य आहे. आणि विशेषतः ज्या ठिकाणीं युद्धाच्या कामांत एकोप्यानें झटण्याची अवश्यकता उत्पन्न होते त्या ठिकाणीं तर तसा अधिकच संभव असतो. पालास सांगतो कीं, कालमक लोकांमध्यें राजनिष्ठा फार दिसून येते आणि ते आईबापांचा सन्मान राखितात व त्यांच्या आज्ञेंत वागतात. कारेन् लोकांमध्यें सेगा म्हणून एक पोटभेद आहे त्यांतील लोक इतर कारेन् लोकांहून अगदीं भिन्न आहेत.

" त्यांचे वृद्ध उपदेशक सांगतात ' मुलांनो आणि मुलांच्या मुलांनो, आपल्या आईबापांचा सन्मान राखा आणि त्यांना पूज्य माना. '....' मुलांनो आणि मुलांच्या मुलांनो, आपल्या राजांच्या आज्ञा पाळा. कारण पूर्वी राजे ईश्वराच्या आज्ञा पाळीत होते.' "

परंतु आज्ञाधारकपणाच्या दोन्ही प्रकारांचा जो एकत्र मिलाफ आढळून येतो तो विशेषतः प्राथमिक स्थि-

तींतील ज्या समाजांचा बराच विस्तार झालेला आहे त्यांत सांपडतो. चिनी लोकांत पहिल्या प्रकाराचा कळस झालेला पूर्वी सांगण्यांत आलाच आहे. त्या लोकांमध्यें दोन्ही प्रकारांची सांगड घातलेली दिसून येते. झीं ही ह्या नीतिकारानें म्हटलें आहेः–" आपल्या आईबापांची सेवा करण्याकरितां जो मनुष्य आपलें सर्व सामर्थ्य खर्च करितो व आपल्या राजाच्या सेवेंत जो आपलें सर्व आयुष्य घालवितो त्या मनुष्याचें वर्तन स्तुत्य समजावें. " ह्या ठिकाणीं आज्ञाधारकपणाच्या दोन्ही प्रकारांचा एकत्र उल्लेख करण्यांत त्यांजमधील निकट संबंध ध्वनित केला आहे. कन्फ्यूशिअस ह्याचें पित्राज्ञापालनाच्या अवश्यकतेविषयीं वचन पूर्वी दिलेंच आहे. त्याचें राजनिष्ठेविषयीं मत त्याच्या स्वतःच्या वर्तनावरून ध्वनित होतें. " त्याला एकदां राजाच्या सिंहासनाजवळून जाण्याचा प्रसंग आला होता, त्यावेळीं तें सिंहासन जरी रिकामें होतें तरी लागलींच त्याची चर्या पालटली, पाय डळमळूं लागले व बोलतांना जीभ अडखळूं लागली. इतका तो घाबरून गेला. " चीनदेशांतील सर्वच नीतिकार अशा मताचे होते असें नाहीं. कित्येकांचीं मतें भिन्न होतीं. मेन्शिअस हा कित्येक प्रसंगीं राजाविरुद्ध बंड करावें असेंही सुचवितो. आतां चीनदेश सोडून पर्शियाकडे वळूं. येथें देखील क्वचित्स्थलीं स्वातंत्र्याविषयीं निघालेले उद्गार आढळून येतात. दरवेशानें लिहिलें आहे कीं:–" प्रजेच्या संरक्षणासाठीं राजाचें अस्तित्व आहे; राजाच्या सेवेसाठीं प्रजेचें नाहीं." पण अशा मताचे ग्रंथकार फारच थोडे. बहुतेकांनीं रा-

जाज्ञापालनाची अवश्यकता दर्शविली आहे. ज्यांना दुसरीं कांहीं कारणें देतां आलीं नाहींत त्यांनीं दूरदर्शीपणाच्या विचारांनीं तरी तसें करावें असें आपलें मत दिलें आहे. एका वजीरानें पुढील उद्गार काढिले आहेतः—

" राजाच्या मताविरुद्ध आपलें मत प्रदर्शित करणें म्हणजे आपल्याच रक्तानें आपले हात माखण्याप्रमाणें आहे. ( आपल्या हातानें आपला नाश करून घेणें आहे. ) घडघडीत दिवस असतां जर राजा 'आतां रात्र आहे' असें म्हणूं लागला, तर लागलेंच 'आम्हांला चंद्र देखील दिसत आहे व त्या कृत्तिका चकाकत आहेत ' असें जवळच्या मनुष्यांनीं म्हटलें पाहिजे." राजाची आज्ञा पाळणें हें मनुष्यांचें कर्तव्य आहे म्हणून तें त्यानें केलें पाहिजे असें सादीचें म्हणणें आहे. त्याचें पुढील वाक्य पहाः—

" सद्गुणी मनुष्य आज्ञापालनासाठीं आपला जीवही धोक्यांत घालील. " प्राचीन हिंदुलोकांत पित्राज्ञापालनाची कमाल झालेली वर एका उदाहरणांत दाखविलीच आहे. पितृभक्तीप्रमाणेंच राजनिष्ठेचेंही महत्त्व त्यांच्या पुस्तकांतून मोठ्या जोरदार रीतीनें वर्णिलें आहे. हा मनुस्मृतींतील श्लोक पहाः—

*बालोऽपि नावमन्तव्यो मनुष्य इति भूमिपः ।<br>
महती देवता ह्येषा नररूपेण तिष्ठति ॥

अ० ७, श्लो० ८.

---

* राजा जरी अल्पवयस्क असला तरी तो मनुष्य आहे ह्या समजुतीवर त्याचा अवमान करूं नये. मनुष्याचे रूपानें ती एक मोठी देवताच ( अवतरलेली ) असते.

हिंदु लोकांत राजाचें महत्त्व फारच मानिलेलें होतें. राजा हा ईश्वराचा अंश असतो अशी त्यांची दृढसमजूत होती. ' राजा कालस्य कारणं ' असें एक सुभाषित आहे. त्यावरून राजांच्या सामर्थ्याविषयीं त्या लोकांची काय कल्पना होती ती दिसून येते. अजून देखील ही त्यांची बुद्धि बहुत अंशांनीं कायम आहे. ईजिप्ट देशांतही ह्या दोहोंची सांगड होती. टाहोटेप ह्याचें वर जें वचन दिलें आहे त्यांत प्रथम आज्ञाधारकपणाचा सामान्य उल्लेख असून पित्राज्ञापालनाचा विशेष उल्लेख होता. पुढील वचनांत वरिष्ठाची–अर्थात् राजाचीही–आज्ञा पाळण्याविषयीं उल्लेख आहे. " वरिष्ठाची आज्ञा पाळण्यासाठीं जरी तुला आपणाकडे कमीपणा घ्यावा लागला तरी तुझें वर्तन ईश्वराच्या घरीं उत्तम ठरेल. " त्यांच्या खोदीव कामांत व भिंतींवर रंगविलेल्या चित्रांत मनुष्यांनीं राजांपुढें लोटांगणें घातलेलीं दाखविलेलीं असतात. ह्या गोष्टीवर टीका करितांना डंकर लिहितोः– " ईजिप्शियन् लोक आपल्या राजांना देवतांप्रमाणें समजून त्यांची पूजा करीत. " आणि तसें मानण्याला थोडासा दुसराही पुरावा सांपडतो. मोठमोठाल्या सरदारांच्या थडग्यांवर जे लेख आहेत त्यांत त्यांच्या सद्गुणांचा निर्देश करण्याकरितां त्यांनीं केलेल्या कृत्यांचा उल्लेख केलेला आहे. ह्यांपैकीं कित्येक कृत्यें ते लोक खरोखरच राजाची पूजा करीत असें दर्शविणारीं आहेत. आतां हीब्र्यू लोकांमध्यें काय स्थिति होती तें पाहूं. त्यांच्या आज्ञादशकांत ईश्वराची आज्ञा पाळणें व आईबापांची आज्ञा पा-

ळणें ह्या दोन गोष्टी एकाखालीं एक दिल्या आहेत म्हणून पूर्वी सांगितलेंच आहे. आणि दुसऱ्या एका ठिकाणीं ह्या दोहोंबरोबर राजाज्ञापालनाचाही उल्लेख केला आहे. 'प्राव्हर्ब्स' म्हणून बायबलांतील जुन्या करारांत एक पुस्तक आहे त्यांत म्हटलें आहेः– "राजाच्या तोंडांतून बाहेर पडणारा शिक्षेचा हुकूम ईश्वराच्या तोंडांतून बाहेर पडतो असें समजलें पाहिजे. राजाच्या तोंडून अन्यायाचा शब्द निघावयाचाच नाहीं."

यूरोपाच्या इतिहासांतही सर्वत्र हा संबंध दिसून येतो. ज्याप्रमाणें आईबापांचा मुलांवर पूर्णपणें ताबा असावा अशा लोकांच्या समजुती होत्या व त्या त्यांच्या आचरणांतही स्पष्ट दिसून येत होत्या, त्याचप्रमाणें लोकांचे लहानलहान जमाव होते तोंपर्यंत टोळीच्या मुख्याच्या, व मोठे आणि व्यवस्थित समाज झाल्यानंतर जो सर्वांत वरिष्ठ मानिला जात असेल त्याच्या हुकुमांत सर्वांनीं वागावें असा लोकांचा समज असून त्याप्रमाणें त्यांचें आचरणही घडून येत होतें. पहिली अनियमित व्यवस्था नाहींशी होऊन तिच्या ऐवजीं फ्यूडल सिस्टिम अस्तित्वांत आल्यानंतर पहिल्यानें जो फ्यूडल लार्ड (लहान टोळीचा शास्ता) असे त्याचा हुकूम लोक मानूं लागले, व जसजशा अनेक टोळ्या एकत्र होत जाऊन त्यांना राष्ट्रत्व येत चाललें तसतशी लोकांमध्यें राजनिष्ठाही उत्पन्न होऊं लागली. प्राचीन फ्रेंच काव्यांत राजद्रोहासारखा दुसरा दुर्गुण नाहीं व राजनिष्ठेसारखा दुसरा सद्गुण नाहीं अशा प्रकारचें वर्णन केलें आहे. इतर सर्व पापांचें क्षालन होईल पण रा-

जद्रोहाचें मात्र होणार नाहीं असेंही वर्णन फ्रेंच काव्यांत आढळतें. इंग्लंड देशांत देखील डोंगरीलोक आपल्या टोळ्यांच्या नाइकांना मोठा मान देत असत व त्यांवर त्यांची फार निष्ठा असे. आणि त्याच लोकांची पुढें स्टुअर्ट* घराण्यांतील राजांवर मोठी निष्ठा बसली. ह्यावरून इंग्लंडांत असल्या विचारांचें प्राबल्य किती होतें तें दिसून येतें. इंग्लंडांतील सरदारलोक सुद्धां अनेक प्रकारांनीं आपली राजनिष्ठा प्रदर्शित करीत असत. कित्येक वडेलोकांच्या घराण्यांचीं जीं ब्रीदें आहेत त्यांवरून त्यांची राजनिष्ठा व्यक्त होते. लिंडसेच्या अर्लाचें ब्रीद 'मला राजनिष्ठेचें बंधन आहे' असें आहे. ग्याब्रेच्या ब्यारनाचें 'मी यावज्जीव राजनिष्ठ असेन.' रोझेच्या अर्लाचें 'देवासाठीं आणि राजासाठीं.' आडेरचें 'मरेपर्यंत राजनिष्ठ.'

आतां जीं ब्रीदें दिलीं त्यांसारखीं अनेक देतां येतील. त्यांवरून सरदारलोकांमध्यें राजनिष्ठेचा गुण किती वसत होता ह्याची कल्पना करितां येईल. आपल्या राजनिष्ठेचें लोकांपुढें प्रदर्शन करणें हें त्यावेळीं भूषणास्पद वाटत असे म्हणूनच त्यांनीं अशा प्रकारचीं ब्रीदें धारण केलीं. ज्याप्रमाणें कित्येकांना राजनिष्ठाव्यंजक ब्रीदें धारण करावींशीं वाटलीं त्याचप्रमाणें कित्येकांनीं 'वळी तो कान पिळी' ह्या तत्त्वाचीं व्यंजक ब्रीदें धारण केलीं. मागच्या एका प्रकरणांत अशा प्रकारच्या ब्रीदांचीं पुष्कळ उदाहारणें दिलीं आहेत. त्या ब्रीदां-

---

* स्टुअर्ट घराण्यांतील राजांनीं सन १६०३ पासून सन १६८८ पर्यंत राज्य केलें.

वरून प्रबलांनीं दुर्बलांवर जुलूम करणें त्यावेळीं भूषणा-स्पद मानिलें जात होतें असें दिसतें. आणि ह्या उभय प्रकारच्या ब्रीदांपैकीं पुष्कळ समकालीन आहेत. ह्याव-रून असें स्पष्ट होतें कीं, राजनिष्ठा आणि जुलूम कर-ण्याची इच्छा ह्या दोन्ही मनोवृत्ति एकाच कालीं बऱ्या-च प्रबल होत्या.

ह्या दोन मनोवृत्तींचें एकत्र वास्तव्य असण्याचें का-रण इतकेंच कीं, त्या दोहोंचीही उत्पत्ति एकाच बी-जापासून आहे. ज्यावेळीं युद्धाच्या व्यवसायांवांचून लो-कांना दुसरें कांहीं दिसत नव्हतें त्यावेळीं ह्या समजुती उत्पन्न होऊन त्या दृढ होत गेल्या. प्राथमिक स्थितींत राज्यव्यवस्थेचे मुलकी आणि लष्करी, किंवा सिव्हिल आणि मिलिटरी, असे दोन विभाग झालेले नसतात. ल-ढाईचे वेळीं ज्यांचें वर्चस्व मानिलें जातें त्यांचेंच इतर प्रसंगींही वर्चस्व असतें. म्हणजे समाजनायक हाच सर्व-प्रसंगीं शास्ता असतो. लहानलहान टोळ्या स्वतंत्ररी-तीनें राहत असल्या म्हणजे त्यांचे नाईक हेच लोकांचे सेनापति व राज्यकर्ते असतात. पुढें अनेक टोळ्या ए-कत्र होऊन लढण्याचा प्रसंग आला म्हणजे त्या सर्वां-ना कोणाच्या तरी तंत्रानें चालावें लागतें. व बहुधा त्या एकत्र होणाऱ्या टोळ्यांच्या नाइकांत जो विशेष परा-क्रमी असेल तोच सर्वांवर आपलें वर्चस्व स्थापित क-रितो, आणि त्यालाच सर्व लोक राजा मानूं लागतात व त्याच्या हुकुमांत वागूं लागतात. प्राथमिक स्थितीं-तील सर्व राजे सेनापतिही असतात. ह्यावरून उघड दिसून येईल कीं, आरंभीं राजाचा हुकूम पाळणें आणि

लष्करी हुकूम पाळणें ह्या दोनही गोष्टी एकत्र असतात. शिवाय युद्धांत यशप्राप्ति होण्याला सेनापतीचा हुकूम त्याच्या हाताखालच्या सरदारांनीं व शिपायांनीं अक्षरशःपाळणें अत्यवश्य असतें व युद्धप्रसंगीं सेनापति ह्या नात्यानें त्याच्या हुकुमांना मान देण्याची संवय झाली म्हणजे इतर प्रसंगीं राजा ह्या नात्यानेंही त्याचा हुकूम तसाच मानिला जातो. हा क्रम जोंपर्यंत सांग्रामिक व्यवसायांचें प्राबल्य असतें तोंपर्यंत चालतो.

कित्येक उदाहरणें अशीं आढळतात कीं, त्यांत राजा आणि प्रजा ह्यांजमधील वर सांगितलेल्या संबंधाचा अगदीं कळस होऊन गेलेला असतो. ह्यासंबंधानें उत्तर-अमेरिकेंतल्या मेक्सिकन् लोकांना अग्रस्थान दिलें पाहिजे. ते लोक सध्यां जगांतून अजीबात नाहींसे झाले आहेत. ते मनुष्यभक्षक होते व त्यांना लढाईचा नाद असे. आपल्या बुभुक्षित देवांना तृप्त करण्याठीं ते शेजारपाजारच्या लोकांवर स्वाऱ्या करून माणसें धरून आणीत आणि त्यांना त्यांपुढें बळी देत. हेरेरा* म्हणतोः—" मां-

---

* हेरेरा हा स्पेन देशांतील इतिहासकार सोळाव्या शतकांत झाला. त्याचें अत्युपयोगी पुस्तक म्हटलें म्हणजे 'इसवी सन १४९२ पासून १५५४ पर्यंतचा स्पानिश् लोकांच्या अमेरिकेंतील वसाहतींचा इतिहास' हें होय. स्पेनच्या दुसऱ्या फिलिप राजानें हेरेराची इतिहास लिहिण्याचे कामावर नेमणूक केली होती. त्यामुळें त्याला सर्व सरकारी कागदपत्र पहावयास मिळाले. त्यानें अमेरिकन् लोकांसंबंधानें इतर प्रकारेंही माहिती मिळविली होती व तो सरकारी अधिकारी असल्यामुळें ती त्याला सहज मिळवितां आली. ह्या सर्व गोष्टींमुळें त्याचें पुस्तक फारच उत्तम झालें आहे.

टेझुमा ह्या नांवाचे जे अनेक राजे झाले त्यांपैकीं दुसऱ्या राजानें आपणाविषयीं लोकांत इतकी पूज्यबुद्धि उत्पन्न केली कीं, ते त्याला बहुतेक देवाप्रमाणें मानूं लागले. सामान्य मनुष्यानें समोर उभें राहून त्याच्या तोंडाकडे पाहिलेलें देखील त्याला खपत नसे. एकाद्यानें तसा अपराध केला तर त्याबद्दल त्याला देहान्तप्रायश्चित्तच मिळे " तिकडील माहिती देणारा दुसरा एक ग्रंथकार लिहितोः–" ह्या लोकांच्या स्वभावांतील अति मोठा दुर्गुण म्हटला म्हणजे अत्यंत नीच स्थितीस पोंचलेला त्यांचा आज्ञाधारकपणा होय. " हल्लीं अस्तित्वांत असलेल्या लोकांमध्यें ह्या संबंधानें पहिलें स्थान फिजियन् लोकांना दिलें पाहिजे. लढाया आणि रक्तपात हे ज्यांचे खेळ आहेत ते क्रूर, रानटी फिजियन् लोक अत्यंत राजनिष्ठ आहेत असें अर्स्किन् ह्याचें म्हणणें आहे. जाकसन् म्हणतोः–" आपल्या सरदारांच्या हुकुमांत राहण्यासंबंधानें त्या लोकांची इतकी कमाल आहे कीं, त्यांना त्यांनीं दगड खाण्यास सांगावें व त्यांनीं ते खावे अशींही उदाहरणें घडून आलीं आहेत " आणि वुइल्यम्स म्हणतो कीं, एकाद्या मनुष्याला कांहीं अपराधासाठीं जर देहान्तशिक्षा झाली तर त्याला वधस्थानीं बांधून बंदोबस्तानें उभा करण्याची जरूर नसते. तो तेथें मोकळाच असतो व आपण होऊन लोकांना सांगतोः–"राजा जें म्हणेल तें केलेंच पाहिजे. " स्त्रियांचें सैन्य बाळगिणाऱ्या क्रूर डहोमन् लोकांविषयीं एक प्रवासी असें म्हणतो कीं, " राजापुढें ते सर्व लोक अगदीं बंद्या गुलामाप्रमाणें वागतात. " दुसरा एक प्रवासी लिहितोः—

" त्या लोकांची आपल्या राजाविषयीं विलक्षण पूज्यबुद्धि आहे व ती प्रेम आणि भय ह्यांच्या मिश्रणानें उत्पन्न झाली आहे. त्यांच्या राजाचा अधिकार इतक्या पायरीस गेला आहे कीं, आईबापांचा मुलांवर कोणत्याही प्रकारचा हक्क नसतो. इतर सर्व मालमत्तेप्रमाणें मुलांवरही राजाचाच हक्क असतो " ह्या ठिकाणीं आज्ञाधारकपणाचें एकच स्वरूप शिल्लक राहतें.

आतां अगदीं कडेलोटीचीं उदाहरणें सोडून देऊन मध्यम स्थितींतील उदाहरणें घेऊं. यूरोपांतील रशियाच्या राज्यव्यवस्थेचा मुख्य भाग म्हटला म्हणजे लष्करी खातें. तेथील लोकांना प्रतिष्ठा मिळविण्याचें कार्यंत एकच साधन दिसतें. तें कोणतें म्हणाल तर शिपाईगिरी. त्यांच्या राष्ट्रीय जीवितांत इतर भाग फारच गौण मानिले जातात. आणि यूरोपियन लोकांमध्यें नीचस्थितीस पोंचलेला आज्ञाधारकपणा रशियन लोकांतच आढळून येतो. ह्या गुणामुळें रशियन लोक कार्लाइल्* ह्याच्या स्तुतीस पात्र झाले आहेत. त्यांच्या आज्ञाधारकपणाला बहुतेक पूजेचेंच स्वरूप प्राप्त झालें आहे. अगदीं वरच्या पायरीपासून तों शेवटच्या पायरीपर्यंत एकूनएक सरकारी अधिकाऱ्यांचे हुकूम विनतक्रार पाळिले जातात. उलटपक्षीं यूरोपांतील इतर देशांच्या मानानें पाहिलें असतां इंग्लंडाच्या राष्ट्रीय जीवितांत लष्करी व्यवसायांचें महत्त्व फार कमी आहे. आणि इंग्लिश लोकांना सरकार

---

* कार्लाइल् हा राजपक्षाचा कैवारी होता. त्यानें आपले विचार कित्येक निबंध लिहून प्रकट केले होते. तो सन १८२५ त मरण पावला.

आणि सरकारी अधिकारी ह्यांचा बाऊही वाटत नाहीं. यूरोपांत ह्या दास्यापासून बरेच मुक्त झालेले लोक म्हटले म्हणजे इंग्लिश लोकच होत. धनीपणाचें नातें राजाकडे नसून तें प्रजेकडे आहे अशी आतां तेथील लोकांची स्पष्ट समजूत झाली आहे. लोक आपल्या राजांवर व सरकारी अधिकाऱ्यांवर पाहिजे तितकी कडक टीका करण्यास भीत नाहींत. राजा, बडे लोकांची सभा आणि साधारण लोकांची सभा हे जे ब्रिटिश राज्यव्यवस्थेचे तीन आधारस्तंभ त्यांपैकीं बडे लोकांच्या सभेचें कारण नाहीं म्हणून ती नाहींशी करून टाकण्याच्या प्रश्नावर उघडपणें पाहिजे तितकी चर्चा चालते आणि प्रजेच्या मताप्रमाणें जे प्रधान वागत नाहींत त्यांना दूर करण्याचा अधिकार प्रजेच्या हातांत आहे. बडे लोक व प्रधान ह्यांची गोष्ट दूरच राहिली, पण खुद्द राजघराण्यांतील मनुष्यांना सुद्धां लोकमताला भिऊन वागावें लागतें. राजघराण्यांतील मनुष्यांना वार्षिक वेतनें देण्यांत राष्ट्राचा किती तरी पैसा फुकट खराब होतो असे विचार लोकांच्या मनांत येऊं लागले आहेत व कांहीं विशेष खाजगी खर्चासाठीं अधिक मंजुरी मागण्याचा प्रश्न पुढें आला म्हणजे त्यावेळीं असले विचार बाहेर पडतात.

एकाच राष्ट्रांतील लोकांची पूर्वींची स्थिति आणि अलीकडील स्थिति ह्यांची तुलना केली असतांही निराळा प्रकार दिसून येत नाहीं. जसजसें इतर राष्ट्रांशीं दंडेलीचें वर्तन कमी होत जातें व देशांतल्यादेशांत सर्व व्यवहार सलोख्यानें चालविण्याकडे लोकांची अधिकाधिक प्रवृत्ति होत जाते तसतसें प्रजेचें दास्य कमी हो-

त जाऊन स्वातंत्र्याच्या विचारांना अवकाश मिळत जातो. जर्मन् लोकांच्या मनांत हल्लीं देखील आपल्या बादशहाविषयीं फार पूज्यबुद्धि आहे; पण युद्धाच्या वेळीं स्वतः सेनानायकत्व पतकरून यश मिळविणारा त्याचा पूर्वज जो दुसरा फ्रेडरिक् त्याच्यावेळीं ती जितकी होती तितकी आतां नाहीं. त्या वेळची त्या लोकांची स्थिति वर्णन करितांना फार्स्टरनें लिहिलें आहे:—"हे लोक आपल्या राजाला अगदीं देव मानीत. ह्या गोष्टीचा मला फार किळस आला." फ्रान्स देशांत जरी हल्लीं प्रजासत्ताक राज्य आहे तरी तेथील लोकांना स्वातंत्र्याचा उपयोग अजून करितां येत नाहीं. दुसऱ्याच्या हुकुमांत वागण्याचा त्यांचा पूर्वींचा स्वभाव अजून कायम आहे. अलीकडे धंद्याधंद्याच्या लोकांनीं कट करण्याचें जें यूरोपांत खूळ माजलें आहे त्याविषयीं विचार करण्याकरितां पारिस येथें एक सार्वराष्ट्रीय सभा भरली होती, त्यावेळीं इंग्लंडांतून जे मुकत्यार गेले होते त्यांचे नजरेस हा प्रकार आल्यावरून त्यांनीं उद्गार काढले कीं:—"अशा प्रकारचें वर्तन प्रजासत्ताक राज्यांतील लोकांच्या हातून घडून येणें हें असंबद्ध असून त्या राष्ट्राला काळिमा लाविणारें आहे." तथापि आजच्या स्थितींत जें त्यांचें दास्य दिसून येतें तें पूर्वींच्याशीं ताडून पाहिलें असतां कांहींच नव्हे. ज्यावेळीं फ्रान्सांत राजसत्तेचा अगदीं कळस होऊन गेला होता त्यावेळीं त्या लोकांच्या दास्याचीही कमाल झाली होती. इंग्लिश लोकांविषयीं विचार केला असतांही पूर्वींचा काळ आणि सध्यांचा काळ ह्यांत पुष्कळ अंतर पडलें आहे. पूर्वीं

परकी लोकांशीं मोठमोठीं युद्धें नेहमीं सुरू असून देशांतल्या देशांत सुद्धां लहानमोठ्या लढाया बहुतेक चालतच असत. हल्लीं बाहेरचीं युद्धें फारच क्वचित् उपस्थित होतात व आपापसांतल्या लढायांचें तर नांव देखील घ्यावयास नको. ह्या दोन काळांतील स्थितींत जितका विरोध दिसून येतो तितकाच लोकांच्या राजनिष्ठाविषयक विचारांत पडला आहे. पूर्वींची राजनिष्ठा मनाच्या कळवळ्यापासून असे व हल्लींची केवळ शाब्दिक आहे.

आतां एवढेंच सांगावयाचें राहिलें कीं, ज्यावेळीं राजाच्या दास्यांतून सुटण्याची मनुष्याला इच्छा होऊं लागली त्याचवेळीं आईबापांच्या दास्यांतूनही सुटावें असें त्याला वाटूं लागलें. पूर्वीं आईबापांचा मुलांवर जो क्रूरपणाचा अंमल असे व मुलें देखील त्यांच्या जीं अगदीं दास्यांत असत, ती स्थिति आतां बऱ्याच सुधारलेल्या लोकांतून नाहींशी झाली आहे. आईबापें बेताबातानेंच आपला अंमल मुलांवर गाजवितात व मुलेंही बेतानेंच त्यांच्या दाबांत राहतात. ही मुलें वयांत येण्यापूर्वींची गोष्ट झाली. वयांत आल्यानंतर तीं बहुतकरून स्वतंत्रच होतात. व आईबापेंही त्यांजवर आपला अंमल चालवूं इच्छीत नाहींत.

आज्ञाधारकपणाच्या दोन्ही प्रकारांचे उत्तेजक मनोविकार जरी सारखेच आहेत व त्या दोहोंमध्यें फेरफारही जरी बहुतकरून सारखेच होतात, तरी पूर्वीं सांगितल्याप्रमाणें त्या दोहोंची अवश्यकता निरनिराळ्या कारणांनीं उत्पन्न होते. एक प्रकार जीवसृष्टीच्या नियमांनीं बद्ध आहे व दुसरा सामाजिक स्थितीं-

तील गरजांवर अवलंबून असून त्या जशा बदलतील तसा तोही बदलणारा आहे.

मुलांनीं आईबापांची आज्ञा पाळण्याची अवश्यकता दोन कारणांनीं उत्पन्न होते. मुलें बरींच मोठीं होतपर्यंत त्यांना दुसऱ्यांच्या मदतीवांचून जिवंत राहतां येणें शक्य नाहीं. ही मदत आईबापांकडूनच होणें स्वाभाविक आहे, व ती चांगल्याप्रकारें होण्याला मुलांनीं आईबापांच्या इच्छेप्रमाणें वागलें पाहिजे. दुसरें कारण असें आहे कीं, मुलांना अगदीं दीन स्थितींतून काढून त्यांस स्वतंत्र रीतीनें आपला चरितार्थ चालविण्यास समर्थ करणें हें काम अतिशय काळजीचें व त्रासाचें आहे आणि त्यासाठीं आईबापांना थोडासा मोबदला मिळणें जरूर आहे. हीं कारणें नेहमीं कायम राहणारीं आहेत. मनुष्याची आणि समाजाची जसजशी सुधारणा होत जाते तसतशी आईबापांच्या दाबांत राहण्याची मुलांची प्रवृत्ति कमी होत जाते हें खरें. तथापि आईबापांचा मुलांवर थोडा तरी दाब असणें नेहमीं अवश्यक राहील व तो दाब सहन करण्याला मुलांच्या अंगीं थोडा तरी आज्ञाधारकपणा असावा लागेल. आईबाप आणि मुलें ह्यांजमधील हा संबंध कायम राखण्याविषयीं अनुकूल समजुती लोकांमध्यें नेहमीं जागृत राहतील आणि मनुष्यांकडून जरूर त्या प्रकारचें आचरण घडविणाऱ्या इच्छा त्यांजमध्यें उत्पन्न करितील. ह्या प्रकारच्या समजुती आणि इच्छा ह्यांचा शुद्धनीतींत समावेश केला पाहिजे.

प्रजेनें राजाची आज्ञा पाळण्याची अवश्यकता मूलारंभीं मुळींच नसते. कारण राजा आणि प्रजा हा संबं-

यच अस्तित्वांत नसतो. पुढें मनुष्यें मोठमोठे जमाव करून एकत्र राहूं लागलीं म्हणजे ही अवश्यकता उत्पन्न होते आणि परकी लोकांशीं लढाया करून त्यांना जिंकून मोठालीं राज्यें स्थापित करण्याचे जसजसे प्रयत्न होऊं लागतात तसतशी ही अवश्यकता वाढत जाते. मोठमोठ्या समाजांना व्यवस्थितपणा येण्याला व त्यांची आणखी वाढ होत जाण्याला प्रजेनें राजाच्या हुकुमांत वागणें अवश्य आहे. कारण त्यावांचून ज्या संहत प्रयत्नांनीं अनेक प्रांत जिंकून राज्यविस्तार करितां आला व तो केल्यानंतर जिंकणाऱ्या आणि जिंकिलेल्या अशा दोन्ही लोकांमिळून राष्ट्र बनवितां आलें, ते प्रयत्न करितां येणें शक्य नव्हतें.

ह्यावरून लक्ष्यांत येईल कीं, आज्ञाधारकपणाच्या दुसऱ्या प्रकाराच्या हातून एक विवक्षित कार्य घडून यावयाचें असतें व तें घडून येईपर्यंत त्याची अवश्यकता असते. ही अवश्यकता नाहींशी होईपर्यंत त्याविषयीं अनुकूल समजुती लोकांमध्यें असतात व जरूर तें आचरण घडविणाऱ्या इच्छाही त्या समजुतींमुळें उत्पन्न होत असतात. आतां जें विवक्षित कार्य घडून यावयाचें असतें म्हणून सांगितलें तें लोकांच्या अंगीं आपापले व्यवहार सलोख्यानें करण्याची योग्यता आणून देणें हें होय. ज्यावेळीं जुलमानें मनुष्यें एकत्र आणिलेलीं असतात त्यावेळीं त्यांजकडून जुलमानेंच औद्योगिक व्यवसाय करून घ्यावे लागतात. अशा स्थितींत समाजांतील मनुष्यांच्या पायऱ्या ठरलेल्या असतात व प्रत्येक पायरीवरील मनुष्यांचे अधिकारही ठर-

लेले असतात. ज्यानें त्यानें आपापल्या दर्जाप्रमाणें काम करणें जरूर असतें. उदाहरणार्थ, फ्यूडल सिस्टिमच्या वेळीं शेतांत खपणारे जे गुलाम ( सर्फ्स ) असत त्यांना शेतांत खपावेंच लागे व चालू वहिवाटीप्रमाणें त्यांना जें वेतन मिळावयाचें तें मिळत असे. 'हा रोजमुरा मला पसंत पडत नाहीं ह्यासाठीं मी हें काम सोडून दुसऱ्या ठिकाणीं जातों' असें हल्लींप्रमाणें कोणीं म्हटलें असतां चालत नसे. त्याचप्रमाणें सैन्यांतील शिपायांची स्थिति होती. मनुष्यांच्या पायऱ्यांप्रमाणें ठरलेलीं कामें त्यांना इच्छेविरुद्धही करावीं लागत. परंतु जसजसा हा प्रकार कमी होत जाऊन मनुष्यांचे व्यवहार आपखुषीच्या करारानें होऊं लागतात तसतशी प्रजेनें राजाच्या दास्यांत राहण्याची अवश्यकता कमी भासूं लागते. समाजाच्या घटकांमधील पूर्वींचीं बंधनें नाहींशीं होऊन हीं नवीन बंधनें उत्पन्न होऊं लागलीं म्हणजे मनुष्याच्या वर्तनाबद्दलही पूर्वीच्या समजुती बदलून नव्या समजुती उत्पन्न होऊं लागतात. लोकांचे परस्परांमधील संबंध निराळ्या तऱ्हेचे होऊं लागले म्हणजे प्रजेचे राजाशीं किंवा सरकाराशीं संबंधही निराळ्या तऱ्हेचे होऊं लागतात. आणि पूर्वींच्या इतक्या आज्ञापालनाची जरूर राहत नाहीं व लोकांची तिकडे तितकी प्रवृत्तिही होत नाहीं. मग हळूहळू सरकारच्या दास्यांत राहणें हा सद्गुण वाटेनासा होऊन त्याचे जागीं व्यक्तिस्वातंत्र्याची सद्गुणांत गणना होऊं लागते.

सरकारच्या दास्यांत राहणें मनुष्याचें कर्तव्य आहे हा समज नाहींसा होऊन लोक आपणांस त्या दास्यांतून

मुक्त करून घेत असतां शुद्धनीतीच्या तत्त्वांकडे मनुष्याचें मन ओढ घेत असतें व ह्या तत्त्वांचें वर्चस्व कबूल करण्याकडे त्याच्या मनाचा कल होत जाऊन सरकारच्या ठरावांना अनुसरून वागण्याऐवजीं शुद्धनीतीच्या तत्त्वांना अनुसरून वागणें अधिक अवश्य आहे असें त्याला वाटूं लागतें. प्रवर्तकनीतीमुळें उत्पन्न झालेल्या समजुतींनीं राजाच्या हुकुमांत वागण्याकडे मनुष्याची प्रवृत्ति होते व शुद्धनीतितत्त्वांच्या विचारांमुळें सदसद्विचारशक्तीच्या धोरणानें वागावेंसें वाटतें. आणि हा मनोवृत्तींचा झगडा पुष्कळ काळपर्यंत चालून अखेरीस दुसरीचें पहिलीवर वर्चस्व स्थापित होतें, व जे कायदे न्यायाला अनुसरून नसतील त्यांविरुद्ध वर्तन करणें योग्य आहे असें मनुष्याला वाटूं लागतें व त्याप्रमाणें तो वर्तनही करूं लागतो. आणि दिवसेंदिवस ज्याठिकाणीं न्यायाची अंमलबजावणी करणें असेल त्याठिकाणीं मात्र कायद्याच्या दाबाचा उपयोग करणें जरूर आहे परंतु अन्य प्रसंगीं कायद्याचा दाब चालविणें अयोग्य आहे असें लोकमत होत जातें.

ह्यावरून दिसून येईल कीं, कांहीं विशेष स्थितींत मात्र राजनिष्ठेचा सद्गुणांत अंतर्भाव करितां येईल, परंतु ती स्थिति सरल्यानंतर राजनिष्ठेची अवश्यकता राहणार नाहीं. तथापि मनुष्यसमाजाची तितकी उन्नति होईपर्यंत सामान्य लोकांना भावी स्थितीची कल्पना करितां येणार नाहीं आणि तोंपर्यंत प्रजेनें सरकारच्या हुकुमांत वागणें इष्ट आहे अशीच लोकांची समजूत राहील; मग तें सरकार अनियंत्रित सत्ता चालविणारा राजा असो

किंवा बहुमतानें काम चालविणारी पार्लमेंटासारखी प्रतिनिधींची सभा असो. कांहीं काळपर्यंत अशी स्थिति राहील, परंतु भूतकालीं जे फेरफार घडून आले आहेत त्यांवरून जर पुढील फेरफारांचें अनुमान करावयाचें असेल तर सरकारचा अधिकार कालान्तरानें फारच आकुंचित होईल असें दिसतें व ज्याप्रमाणें चाकरानें धन्याची हांजीहांजी करणें प्रतिष्ठास्पद समजलें जात नाहीं त्याचप्रमाणें त्या आकुंचित अधिकारापलीकडे प्रजेनें सरकारच्या हुकुमास ‘ जी, जी ’ करीत राहणें भूषणास्पद मानिलें जाणार नाहीं.

# प्रकरण ११

## औद्योगिक व्यवसाय

औद्योगिक व्यवसायांच्या संबंधानें शुद्धनीतिविषयक व प्रवर्तकनीतिविषयक समजुती कशा उत्पन्न झाल्या आणि त्यांमध्यें निरनिराळ्या स्थळीं व निरनिराळ्या काळीं कसकसे फेरफार होत गेले हें पहावयाचें असल्यास, प्रथमतः उद्योगाच्या ज्या अनेक दिशा आहेत त्या पाहिल्या पाहिजेत व त्यांचा मनुष्याच्या सामाजिक स्थितीशीं काय संबंध असतो ह्याचाही विचार केला पाहिजे.

हल्लीं आपली उद्योगाविषयीं जी कल्पना आहे त्या प्रकारचा उद्योग प्राथमिक स्थितींतील मनुष्यांमध्यें फारसा आढळत नाहीं. आणि मनुष्यें धनगराच्या वृत्तीनें किंवा कृषिकर्मानें उपजीविका करून राहण्याच्या स्थितींत येतपर्यंत तो त्यांमध्यें दिसून येणेंही शक्य नसतो. सृष्टींत आपोआप उत्पन्न होणाऱ्या पदार्थांवर चरितार्थ चालविणाऱ्या आद्यावस्थेंतील लोकांचे व्यवसाय त्या पदार्थांची प्राप्ति करून घेण्यासाठीं असतात. कंद, फळें, मुळें वगैरे कित्येक पदार्थ मिळविण्याचें काम सोपें असून त्यापासून मनुष्याच्या जीवाला धक्का पोहोंचण्याचें भय नसतें; परंतु शिकारीचीं जनावरें पकडावयाचीं असल्यास तें काम बरेंच कठिण व धोक्याचें असतें. कित्येक जनावरें फार चपल असतात व कित्येक मोठीं असतात. आणि त्यांच्या प्राप्तीसाठीं यत्न

करीत असतां अनेक प्रसंगीं मनुष्यांना इजा पोहोंचते. उपजीविकेचीं साधनें मिळविण्याच्या कामांत खर्च हो-ऊन शिल्लक राहिलेल्या सामर्थ्याचा उपयोग बहुतक-रून शिकारीपेक्षांही कठिण व भयंकर अशा युद्धाच्या कामाकडे केला जातो. तेव्हां सुधारणेचा ज्यांना गंध-ही नाहीं अशा लोकांच्या व्यवसायांचे स्थूलमानानें दोन विभाग करितां येतील. एका विभागांतील व्यवसायांत शक्ति, शौर्य आणि चातुर्य ह्या गुणांची विशेष अवश्य-कता लागेल, व दुसऱ्या विभागांतील व्यवसायांना ति-तकी लागणार नाहीं किंवा ह्या गुणांपैकीं कित्येकांची मुळींच जरूर पडणार नाहीं. आणि शिकारींत व यु-द्धांत जी कर्तबगारी दिसून येईल तीवरच बहुतेक प्र-संगीं प्राथमिक स्थितींतील अल्पसमाजांचें पोषण व र-क्षण अवलंबून असल्यामुळें शक्ति, शौर्य व चातुर्य हे गुण मोठ्या महत्त्वाचे मानिले जातात. ह्या गुणांना जो मान मिळतो त्याचें बीज त्यांच्या उपयुक्तत्वांत आहे खरें, पण ती दृष्टि नेहमीं जागृत असते असें नाहीं. ही एका प्रकाराच्या व्यवसायांची गोष्ट झाली. दुसऱ्या प्रकारचे व्यवसाय म्हणजे कंद व मुळें खणून काढणें, रानांतील झाडांवरचीं फळें तोडणें आणि समुद्रांतून वा-हून आलेल्या शिंपल्यांतले जीव गोळा करणें ह्यांना श-क्ति, शौर्य आणि चातुर्य ह्या गुणांची जरूर लागत ना-हीं. ह्यामुळें ह्या व्यवसायांना मान मिळत नाहीं. किं-वा ते तुच्छ मानिले जातात असें म्हटलें तरी चालेल. पुढें स्वाभाविकरीतीनें जो श्रमविभाग उत्पन्न होतो त्यामुळें हा विरोध अधिकाधिक भासमान होऊं लाग-

तो. बळाचीं व शौर्याचीं कामें पुरुषवर्गाकडून उचललीं जातात व राहिलेलीं नीच मानिलेलीं कामें स्त्रीजातीच्या वांट्यास येतात. आणि स्त्रियांना ह्या कामांत युद्धांत कैद करून आणिलेल्या लोकांकडून व गुलामांकडून मदत होते. प्रथमावस्थेंतील लोकांत शौर्यबलाच्या व्यवसायांना इतका मान कां मिळतो व औद्योगिक व्यवसाय तुच्छ कां मानिले जातात ह्याला हें आणखी एक कारण आहे. ह्यावरून असें दिसून येईल कीं, औद्योगिक व्यवसायांचा तिरस्कार करण्याकडे जी प्राथमिक स्थितींतील लोकांची प्रवृत्ति होते तिला स्वाभाविक कारणें आहेत.

प्रथमावस्थेंतील शूर पुरुषांना प्रतिष्ठित वाटण्यासारखे औद्योगिक व्यवसाय कायते दोन राहिले. एक, शिकारीच्या किंवा युद्धाच्या कामासाठीं हत्यारें तयार करण्याकरितां जरूर ते उद्योग, व दुसरे राहण्यासाठीं झोंपड्या बांधण्याच्या संबंधाचे उद्योग. पहिल्या उद्योगाचा शिकारीशीं व युद्धाशीं प्रत्यक्ष संबंध असून त्यांत करामतीचीही बरीच जरूर लागते, आणि दुसऱ्या उद्योगांत करामत व शरीरसामर्थ्य ह्या दोहोंचीही जरूर असते. ज्या उद्योगांत एकसारखे श्रम करावयाचे असतात त्यांना पुरणारें बेताचें शरीरसामर्थ्य ह्या ठिकाणीं पुरें पडत नाहीं. ह्या कामाला थोडा वेळ उपयोगांत येणाऱ्या विशेष शरीरसामर्थ्याची जरूर असते. हीं जीं दोन अपवादक उदाहरणें सांगितलीं त्यांमुळें मूळच्या सिद्धांताला अधिकच बळकटी येते. कारण त्यावरून आणखी असें दिसतें कीं,- ज्या कामांना शरीराच्या किं-

वा बुद्धीच्या विशेष सामर्थ्याची जरूर नसते व त्यामुळें जीं कमी प्रतीच्या माणसांकडून होण्यासारखीं असतात त्यांविषयींच लोकांत तिरस्कारबुद्धि उत्पन्न होत असते.

ह्या दोन प्रकारच्या व्यवसायांविषयींच्या समजुतींत जो विरोध ह्या रीतीनें उत्पन्न झाला तो अजून कायम राहिला आहे. आतां त्यांत मुळींच फेरफार झाले नाहींत असें नाहीं. जसजशी मनुष्याची परिस्थिति बदलत जाऊन त्याची उन्नति होत गेली तसतसा त्याच्या समजुतींमध्येंही थोडाफार भेद पडत गेला, परंतु आतां सांगितलेल्या विरोधाचें बीज कायम राहिलें. ज्या कारणांनीं मूलारंभीं ह्या समजुती उत्पन्न झाल्या तीं कारणें बहुतेक तशींच राहिल्यामुळें त्यांच्या कार्यांमध्येंही विशेष फरक होणें संभवनीयच नव्हतें. अगदीं अलीकडल्या काळापर्यंत—किंवा प्रस्तुत कालापर्यंत म्हटलें तरी चालेल—राष्ट्रांराष्ट्रांतील व्यवहार ‘ बळी तो कानपिळी ’ या तत्त्वावर चालले आहेत. ह्यासाठीं परराष्ट्रांपासून आपल्या राष्ट्राचें संरक्षण करण्यासाठीं युद्धकलेंत प्रावीण्य संपादन केल्यावांचून गत्यन्तर नाहीं. अशी स्थिति असल्यामुळें सहजच सांग्रामिक व्यवसायांचें महत्त्व व औद्योगिक व्यवसायांविषयीं तिरस्कारबुद्धि हीं कायम राहिलीं. राष्ट्राचें कल्याण औद्योगिक व्यवसायांवर अवलंबून आहे ही गोष्ट नुकती अलीकडे लोकांच्या नजरेस येऊं लागली आहे. उपभोगाचे नवेनवे पदार्थ तयार करून मनुष्याच्या सुखाचें क्षेत्र वाढविण्याकडे मनुष्याचें आतां कोठें लक्ष्य लागत आहे. आणि राष्ट्रांच्या वैभवाचें मान ठरवितांना त्याच्या लष्करी सामर्थ्याचा वि-

चार करून, औद्योगिक कलांमध्येंही तें इतरांबरोबर किती व कसा टिकाव धरण्यासारखें आहे ह्या गोष्टीकडे लक्ष्य दिलें जातें. मनुष्याचें सुख उपभोगाच्या साधनांवर अवलंबून आहे आणि उपभोगाचीं अधिकाधिक साधनें उत्पन्न करण्याला विशेष मानसिक सामर्थ्याची जरूर आहे ह्या गोष्टी आतां समजूं लागल्यामुळें सांग्रामिक व्यवसायांशिवाय इतर व्यवसायही हल्लीं प्रतिष्ठित मानिले जात आहेत.

हे कार्यकारणभाव लक्ष्यांत आणिले असतां निरनिराळ्या स्थळीं व निरनिराळ्या काळीं औद्योगिक व्यवसायांसंबंधानें ज्या नीतिविषयक समजुती आढळून येतात त्यांविषयीं उमज पडण्यास कठिण जाणार नाहीं.

उत्तर अमेरिकेंतील इंडियन लोकांत शौर्याचीं व सामर्थ्याचीं कामें करण्याच्या संवई आणि त्यांविषयींच्या समजुती ह्यांचीं स्पष्ट उदाहरणें आढळून येतात. चिपेवा लोकांच्या संबंधानें स्कूलक्राफ्ट म्हणतोः—

" धनुष्यबाण, गदा, भाला इत्यादि शस्त्रांचा ज्या व्यवसायांत उपयोग करावा लागतो ते अत्यंत श्रेष्ठप्रतीचे होत असें ह्या लोकांना वाटतें. मनुष्याच्या महत्त्वाकांक्षेच्या गोष्टी म्हटल्या म्हणजे उत्कृष्टप्रकारें शिकार करणें व शौर्यानें लढणें ह्या होत. मेलेल्या योद्ध्यांचे व जिवंत सरदारांचे जे स्तुतिपाठ गावयाचे ते ह्या गुणांबद्दलच. जमिनींत खणणें आणि कारागिरीचीं वगैरे कामें करणें हे ह्या लोकांत अगदीं हलक्या प्रतीचे धंदे मानिले गेले आहेत. "

स्नेक इंडियन लोकांच्या संबंधानें लुई आणि क्लार्क म्हणतात:—

"थोड्या अंतरावर जावयाचें असलें तरी देखील पायांनीं चालत जाण्याचा प्रसंग आला असतां त्या लोकांस आपली मोठी मानहानि झाली असें वाटतें."

डकोट लोकांच्या संबंधानें वर्टन् साहेबानें दिलेली हकीकत तशीच आहे:—

"श्रमाचीं कामें करण्याची मोठीच पीडा मनुष्याचे पाठीमागें लागली आहे असें त्यांना वाटतें. शिकारीचें काम हेंच आपणांस फार आहे अशी लढणाऱ्या लोकांची समजूत असल्यामुळें घोड्यावर खोगीर घालणें किंवा काढून ठेविणें ह्या कामासाठीं ते बिलकुल हातपाय हालवावयाचे नाहींत. रानटी जनावरांना ज्याप्रमाणें माणसाळलेल्या जनावरांसारखें काम करावयास शिकविणें कठिण असतें, त्याप्रमाणेंच ह्या लोकांना कामास लाविणें फार कठिण असतें. गरीब प्रामाणिक मजुरासारखें काम करण्याचा त्यांच्यावर प्रसंग आला असतां त्यांना मरणें बरें वाटेल."

त्यांच्यापेक्षां सुधारलेल्या इरोकोई लोकांमध्यें सुद्धां ही पूर्वीची समजूत आढळून येत होती. "लढणाऱ्या शिपायाला शेतकीच्या धंद्यांतील श्रमांचा तिरस्कार वाटत असे आणि कोणत्याही हलक्या प्रकारचे श्रम आपल्या योग्यतेला शोभत नाहींत अशी त्याची समजूत असे." एस्किमो लोकांना लढाईची संवय नाहीं पण त्यांना देखील औद्योगिक व्यवसायांचा कंटाळा आहे.

"ते पारध करितात व मासे मारितात, पण एकदां

शिकार जमिनीवर आणून टाकिली कीं पुढें ते तिकडे काडीइतकेंही लक्ष्य द्यावयाचे नाहींत. कारण पाण्यांत मारून टाकिलेला सील मासा नुसता जमिनीवर ओढीत आणिला तरी तेवढ्यानें त्यांच्या नांवाला मोठा कलंक लागतो. "

चिपेवा येथील लोकांनीं जर एकादें मोठें शिकारीचें जनावर मारिलें तर त्याला ते रानांतच टाकून देतात. व आपण घरीं येऊन आपल्या बायकांना त्याला आणण्यासाठीं पाठवून देतात. आणि असें करण्याचें कारण विचारिलें असतां ते म्हणतातः—" जमिनीवरचें काय आणि समुद्रावरचें काय, शिकारीचें काम म्हटलें म्हणजे मोठ्या प्रयासाचें आहे. आणि तें करून थकवा आल्यानंतर पुढलें काम दुसऱ्यांनींच केलें पाहिजे. " ह्याच सबबीवर कदाचित् एस्किमो लोक तसें करूं लागले असतील. उत्तर अमेरिकेला सोडून दक्षिण अमेरिकेकडे गेलें असतांही अशाच मासल्याचीं उदाहरणें आढळतात. गयाना देशांतील रानवट जातींचे लोक साधीं श्रमाचीं कामें करावयाचे नाहींत. धान्य पेरावयाचे वेळीं जमीन साफ करण्याचें काम मात्र ते करितात. एरव्हीं सर्व दिवसभर ते आपल्या झोंपड्यांत पडून राहतात व घरांतल्या माणसांस कांहीं खावयासच नाहींसें झालें तर मासे मारण्यास किंवा शिकार करण्यास बाहेर पडतात. आरोकेनियन् लोक लढवय्ये असून शेतकीही करितात. बहुधा शिकार मिळण्याची पंचाईत असल्यामुळें त्यांना शेतकीकडे लक्ष्य देणें भाग पडलें असावें. ह्या लोकांत देखील प्रतिष्ठित माणसें खा-

णें, पिणें, निजणें आणि चैनीनें घोड्यावरून फिरणें ह्या-
वांचून दुसरें कांहींएक करावयाचीं नाहींत.

ह्या सर्व उदाहरणांत एक गोष्ट स्पष्ट दिसून येते. प्राथमिक स्थितींतील मनुष्यांमध्यें परार्थबुद्धीचा अगदीं अभाव असल्यामुळें त्यांच्या स्वार्थाला आळा घालण्याला कांहींच नसतें. त्यामुळें पुरुषवर्गाकडून सगळीं श्रमाचीं व त्रासाचीं कामें स्त्रीवर्गावर लादिलीं जातात. आणि मनांत हुरूप उत्पन्न करणारीं व तडीस गेल्यानंतर विशेष आनंदाचा अनुभव देणारीं युद्धाचीं व शिकारीचीं कामें मात्र ते आपल्याकडे ठेवितात. पुरुषांनीं मनास वाटेल तसें वागावें व स्त्रियांनीं मात्र रात्रंदिवस कंटाळवाण्या कामांत राबत असावें असा प्रकार चालतो, ह्याबद्दल पाहिजे तितका पुरावा मिळण्यासारखा आहे. अमेरिकेंत चिपेवेअन्, क्रीक, टच्यूपी व पाटागोनियन् ह्या लोकांचीं उदाहरणें आहेत. त्यांजबद्दल हे पुढील उतारे पहा:—

"हें विनचाकी गाड्या ओढण्याचें श्रमाचें काम स्त्रियांवरच पडतें व त्याखालीं त्या अगदीं खचून जातात. सुधारलेल्या देशांतील मनुष्याला ती त्यांची शोचनीय स्थिति पाहून कींव येते."

"घरांतलीं आणि शेतांतलीं सर्व श्रमाचीं कामें बायकाच करितात आणि बायकांची वास्तविक स्थिति म्हटली म्हणजे केवळ पुरुषांचे गुलाम होऊन राहण्याची आहे."

"त्यांना ज्यावेळीं आपलें राहण्याचें ठिकाण बदलावयाचें असतें त्यावेळीं ओझीं वाहणाऱ्या जनावरांचें

काम बायकांनाच करावें लागतें. झोंपड्यांचें सामान भांडीं आणि घरांतील इतर सर्व पदार्थ बायकांनींच नेले पाहिजेत. "

"पाटागोनियन् स्त्रियांच्या आयुष्याची कहाणी सांगावयाची असल्यास थोडक्यांत सांगतां येते. त्यांनीं एकसारखें कष्ट करीत असावें. शिकार आणि पारध ह्यांवांचून एकूनएक कामें त्याच करितात."

आतां आफ्रिकेंतील लोकांविषयीं प्रवाशांनीं दिलेली माहिती पाहूं. हाटेंटाट, बेच्युआना, काफर, आशांटी, फर्नांडोपो येथील लोक आणि नायजर नदीजवळच्या खालच्या प्रदेशांतील लोक ह्यांच्या संबंधानें पुढील उतारे आहेत.

"नवऱ्यासाठीं, स्वतःसाठीं व आपल्या मुलांसाठीं अन्न मिळविणें आणि तें शिजवून तयार करणें ह्याबद्दल सर्व त्रास बायकोच्याच कपाळीं येतो. त्याशिवाय घरांतील इतर कामही तिच्या पाठीमागें असतेंच. इतकेंही करून आणखी गुरांची चाकरी करण्याच्या कामांत तिला नवऱ्याला मदत करावी लागतेच."

"बायका घरें बांधण्याचें काम करितात; धान्य पेरितात व शेत कापून घरीं आणितात; पाणी व सरपण घेऊन येतात; आणि अन्न शिजावितात. अतिशय श्रमाच्या कामांत देखील बायकांना पुरुषांनीं मदत केलेली फार क्वचित् आढळून येते."

"घरांतील कामें संभाळून शिवाय बायकोला सर्व श्रमाचीं व कष्टाचीं कामें करावयाचीं असतात. एक क़ाफर माझ्याजवळ म्हणाला ' बायको म्हटली म्हणजे

आमचा बैल आहे. ती विकत घेतलेली असते म्हणून तिनें काम केलेंच पाहिजे. ' "

" सर्व महत्त्वाचीं कामें बायकोलाच करावीं लागतात. धान्य दळणें किंवा वांटणें, बाजारांतून जिन्नस आणणें, लागवड करणें वगैरे कांहीं तरी काम करीत असलेली ती नेहमीं दृष्टीस पडते. "

" फर्नांडोपो येथील स्त्रियांच्या वांट्यास बरेंच काम येतें. बटाट्यासारखे 'याम' नांवाचे कंद आहेत त्यांची लागवड करणें, ते तयार झाल्यानंतर खणून काढणें वगैरे कामें त्यांनाच करावीं लागतात. परंतु आफ्रिकेंतील इतर प्रदेशांत बायकांना वागविण्याची जी तऱ्हा आमचे नजरेस आली तीपेक्षां येथील लोकांची बायकांना वागविण्याची तऱ्हा एकंदरींत ममतेची व काळजीची दिसून येते. "

" लोअर नायजर प्रदेशांत व्यापाराच्या जिनसांची किरकोळ विक्री करण्याचें काम बायकांवरच पडतें. त्याशिवाय त्यांना श्रमांचींही कामें पुष्कळ करावीं लागतात. जमिनीची लागवड करण्याचें काम त्याच करितात. "

ह्यांपैकीं शेवटल्या तीन उदाहरणांतील लोक बरेच पुढें गेलेले आहेत व त्यांना व्यवस्थितरीतीनें उद्योगधंदे करण्याची थोडीशी आवड दिसून येते. ह्या लोकांमधील बायकांची गुलामगिरी थोड्या कमी प्रमाणावर आहे.

युद्धाच्या किंवा शिकारीच्या कामाला स्त्रिया निरुपयोगी असतात; किंवा त्या कामांना त्या निरुपयोगी आहेत असें निदान मानिलें तरी जातें. ह्यामुळें त्यां-

च्या हातून न होण्यासारखीं बाकीचीं श्रमाचीं व कष्टाचीं कामें त्यांच्या वांट्यास येतात. प्राथमिक स्थितींतील लोकांना असलीं कामें जीं हलकीं वाटतात त्याला हें एक कारण आहेच, पण त्याशिवाय पूर्वीं सांगितल्याप्रमाणें तितकेंच महत्त्वाचें आणखीही एक कारण आहे. पुरुषाहून स्त्री कमी प्रतीची आहे ही गोष्ट मनांत बिंबल्यामुळें ज्याप्रमाणें स्त्रीकडून होणारीं कामें हलक्या प्रतीचीं वाटूं लागलीं त्याचप्रमाणें लढाईत पकडलेल्या लोकांकडून किंवा गुलामांकडून करविण्याच्या कामांबद्दलही तशीच तिरस्कारबुद्धि उत्पन्न झाली. प्राथमिक स्थितींतील लोकांत शूर शिपायांना त्रासदायक व कंटाळवाणीं वाटणारीं कामें गुलामांकडून करविलीं जातात ह्याबद्दल अनेक उदाहरणें आढळतात. चिनूक लोकांविषयीं असें वाचण्यांत येतें कीं, ते श्रमांचीं सर्व कामें आपल्या गुलामांकडून करवितात. आणि कित्येक प्रसंगीं त्यांच्या बायका गुलामांना मदत करितात. अंडर्सन् म्हणतोः—

डमार लोक आळशी आहेत. जें काम बायकांकडून होत नाहीं तें ते गुलामांकडून करवितात. हे गुलाम त्यांच्याच जातीचे गरीबीस पोहोंचलेले लोक असतात किंवा शेजारच्या लोकांपैकीं पकडून आणिलेले कैदी असतात."

कांगो नदीवर एंबोमा म्हणून शहर आहे तेथील लोकांचें वर्णन करितांना ठके लिहितोः—

"जमिनीची लागवड करण्याचें काम सर्वस्वीं गुलाम व बायका ह्यांजवर सोंपविलेलें असतें. राजांच्या मुली

आणि राजपुत्रांच्या बायका ह्यांना देखील हें काम करण्याचा वारंवार प्रसंग येतो."

बर्टन् सांगतो कीं "डहोमे प्रांतांत शेतकीचें सर्व काम गुलामांकडे असल्यामुळें तें हलक्या प्रतीचें समजलें जातें. तथापि त्या कामाचा बराच भाग स्त्रियांकडून करविला जातो." त्याचप्रमाणें एशिया खंडांतील मिश्मी लोकांविषयीं असें वाचण्यांत येतें कीं त्यांचें लागवडीचें सर्व काम बायका व गुलाम करितात.

एवढा वेळपर्यंत झालेल्या प्रतिपादनावरून स्पष्ट दिसून येईल कीं, वर सांगितलेल्या प्रकारच्या लोकांमध्यें औद्योगिक व्यवसायांविषयीं तिरस्कारबुद्धि उत्पन्न होणें अगदीं साहजिक--किंबहुना अपरिहार्य आहे असें म्हटलें तरी चालेल. ह्या प्रवर्तकनीतीच्या संमतीला पूर्वापार रूढीची संमति मिळते आणि निरनिराळ्या लोकांच्या निरनिराळ्या परिस्थितीप्रमाणें तिला विशेष स्वरूप येतें. ह्याबद्दल हीं उदाहरणें पहाः—

" सेआन् लोकांना मेंढपाळाच्या किंवा गोंवाऱ्याच्या धंद्याचा मोठा तिरस्कार वाटतो. 'पारधीवर किंवा लुटीवर निर्वाह करावा' अशा अर्थाच्या कित्येक म्हणी त्या लोकांत आढळतात. "

" जो जातीचा आरब आहे त्याला शेतकीचा धंदा फार हलका वाटतो. तो मनुष्याच्या नीचपणाचा द्योतक आहे अशी त्याची समजूत आहे. "

ह्या व पूर्वीच्या उदाहरणांवरून उघड दिसून येईल कीं, ज्या प्रकारच्या राहटीची मनुष्याला संवय होते तिला अनुकूल अशा त्याच्या कल्पना व समजुती बनत जा-

तात. आणि अशा समजुतींच्या अंगीं किती सामर्थ्य असतें हें कित्येक चाली पिढ्यान्‌पिढ्या सारख्या चालू राहिल्याचीं जीं चमत्कारिक उदाहरणें आढळून येतात त्यांवरून दिसतें. पूर्व आफ्रिकेंतील लोकांविषयीं लिव्हिंग्स्टन् म्हणतोः—

"ज्या ठिकाणीं गुरें असतात तेथल्या स्त्रिया जमीन नांगरतात, धान्य पेरितात व झोंपड्या बांधितात. आणि पुरुष घरीं राहून शिवणकाम करितात, सूत कांततात, कापड विणतात, गाईचें दूध काढितात आणि एकमेकांशीं गप्पागोष्टी करीत बसतात."

अबिसीनिया देशांत रूढ झालेला स्त्रीपुरुषांमधील श्रमविभाग तर ह्यापेक्षांही चमत्कारिक आहे. ब्रूस म्हणतोः-

"कोणताही जिन्नस विकत आणण्याकरितां बाजारांत जाणें हें पुरुषाच्या नांवाला बट्टा लाविणारें आहे. त्यानें पाणीही आणितां कामा नये किंवा भाकरी भाजितां कामा नये. घरांतील सर्व मनुष्यांचे कपडे धुणें हें त्याचें काम असतें व त्या कामांत त्याला बायकांनीं मदत करण्याची सोय नसते."

कनारी म्हणून पेरू देशांत पूर्वीं लोक होते त्यांमध्येंही अशीच स्थिति होती, असें सीझा ह्यानें दिलेल्या माहितीवरून कळतें.

"येथल्या स्त्रिया मोठ्या वस्ताद काम करणाऱ्या आहेत. त्या जमीन खणून साफ करितात आणि त्यांचे नवरे घरांत बसून शिवणकाम, विणकाम, कपड्यावर नक्षी करण्याचें काम व दुसरीं बायकी कामें करितात. कित्येक इंडियन लोक म्हणतात कीं, असा प्रघात पडण्याचें कारण

पुरुपांची कमताई आणि बायकांची विपुलता हें होय.

हे अस्वाभाविक दिसणारे प्रघात उत्पन्न होण्याचें कारण वहुधा असें असावें कीं, परिस्थितींत बदल झाल्यामुळें युद्धाचीं व शिकारीचीं कामें करण्याला कांहीं तरी अडचणी आल्या असाव्या व पूर्वीं जीं कामें स्त्रियांकडून होत होतीं तीं त्यांजकडेच राहून पुरुष आळसांत किंवा अल्पश्रमाचीं कामें करण्यांत आपला काळ घालवूं लागले असावे. ज्या कामांत सतत श्रम करावे लागतात अशीं कामें अगदीं नाइलाज झाल्यावांचून रानटी स्थितींतील पुरुषांनीं आपणांकडे कधीं घेतलींच नाहींत असें दिसतें.

परंतु ज्याठिकाणीं युद्धाच्या चळवळी नसल्यामुळें लोकसंख्या वाढत चालली त्याठिकाणीं उदरनिर्वाहासाठीं पुरुपांना खाण्याचे पदार्थ उत्पन्न करण्याचीं कामें हातांत घ्यावींच लागलीं. त्यांच्या आयुष्यक्रमांत असा फेरफार झाल्यामुळें हळूहळू त्यांच्या समजुतींतही फरक पडला व त्यांना शेतकीचे वगैरे उद्योग प्रतिष्ठित वाटूं लागले. खोंड लोकांत अशी स्थिति आढळते.

" व्यापाराच्या किंवा इतर प्रकारच्या देवघेवींचे व्यवहार आपल्या मोठेपणाला न शोभणारे आहेत अशी त्यांची समजूत आहे. शिपाईगिरीचीं व शेतकीचीं कामें न करणारे सर्व लोक त्यांना नीच वाटतात. "

त्याचप्रमाणें जाव्हा बेटांतील लोकांविपयीं असें वाचण्यांत येतें कीं:—

" त्या लोकांना व्यापाराविपयीं फार तिटकारा आहे. आणि वरिष्ठ प्रतीच्या लोकांना त्या धंद्यांत पडणें

अपकीर्तिकारक वाटतें. परंतु साधारण लोक शेतकीच्या धंद्यांतील श्रम करण्यास नेहमीं तयार असतात व बडे लोकही त्यांना उत्तेजन देतात व तो धंदा प्रतिष्ठित समजतात."

अनेक द्वारांनीं मिळविलेल्या माहितीवरून असें समजतें कीं, जर्मन् लोकांच्या टोळ्यांमध्यें देखील शेतकीचा धंदा प्रतिष्ठित मानिला जाऊं लागला होता. त्यांच्या मूळ ठिकाणीं व नवीन जिंकिलेल्या प्रांतांत शिकारीवर व लुटीवर नीटपणें निर्वाह होईनासा झाल्यामुळें त्यांना शेतकीचा धंदा हातांत घेणें भागच पडलें असें म्हणण्यास हरकत नाहीं.

लोकांच्या समजुतींतील उद्योगधंद्यांविषयींची तिरस्कारबुद्धि नाहींशी होऊन त्यांबद्दल गोडी उत्पन्न होत असतां मधल्या संक्रमणस्थितीविषयीं दोन गोष्टी लिहिण्यासारख्या आहेत. ज्यावेळीं पुरुषांना उद्योगधंदे—विशेषतः शेतकीचाच धंदा म्हटलें तरी चालेल—हातांत घेणें भाग पडतें त्यावेळीं पहिल्यानें ते पुरुषांच्या तावेदारीखालीं राहणाऱ्या बायकांकडून व गुलामांकडून होत असल्यामुळें,आपली एकदम त्यांच्यासारखीच स्थिति होऊं देणें त्यांस इष्ट वाटत नाहीं. ह्याकरितां स्वतःसाठीं उद्योगधंदा करणें भाग पडल्यास मात्र ते तयार होतात, परंतु दुसऱ्यासाठीं त्यांच्या तावेदारींत राहून श्रम करणें हें हलकेपणाचें आहे अशी समजूत त्यांजमध्यें उत्पन्न होते. कारण मजूरी घेण्याविषयीं करार करून दुसऱ्याचें काम करणें झालें तरी तो एका प्रकारची तावेदारीच आहे, आणि बायका किंवा गुलाम ह्यां-

नीं जुलमानें पेंचल्यामुळें काम करणें व आपण दुसऱ्याच्या तावेदारीखालीं मजूरीनें काम करणें हीं दोन्ही बहुतेक सारखींच आहेत असें त्यांस वाटतें. गयाना देशांतील क्यारिब् लोकांच्या संबंधानें स्कोंवर्ग म्हणतो कीं, ते मोठे कष्टाळू लोक आहेत, पण अगदीं जीवावर येऊन बेतल्याशिवाय ते युरोपियन मनुष्याच्या घरीं मजूरीनें काम करण्यास जावयाचे नाहींत. त्यांना तें इतकें अपमानास्पद वाटतें. दुसऱ्याच्या ताब्यांत राहण्याची ज्यांना संवय नाहीं अशा कित्येक गरीब स्वभावाच्या लोकांत ही समजूत इतक्याच किंवा ह्याच्याही पलीकडल्या पायरीस जाऊन पोहोंचलेली आढळून येते. दक्षिण हिंदुस्थानांतल्या कित्येक डोंगरी लोकांविषयीं लिहितांना ल्यूइन् म्हणतोः—

" डोंगरी लोकांमध्यें मजूरीनें काम करण्यास माणसें मिळत नाहींत. प्रत्येक मनुष्य आपल्यापुरतें मात्र काम करितो. सन १८६९ सालीं येथें एका रस्त्याचें काम करावयाचें होतें, त्यावेळीं कल्पनेच्या बाहेर मजूरी देऊं केली, पण ते लोक काम करावयास कबूल होतना. "

सांथाळ लोकांनाही एरव्हीं उद्योगाची हौस आहे परंतु दुसऱ्याच्या हुकुमांत राहून काम करण्याला ते कधीं कबूल व्हावयाचे नाहींत.

" सांथाळ जातीचा मनुष्य कोणाच्या चाकरीस रहावयाचा नाहीं. तो स्वतःकरितां व कुटुंबाकरितां मात्र काम करील पण दुसऱ्या कोणासाठीं करणार नाहीं. जुलुमानें त्याजकडून काम करून घेण्याचा जर प्रयत्न

केला तर तो मुळींच तो देश सोडून कोठें तरी जातो, किंवा जवळच जंगलांत पळून जाऊन तेथें एकांतप्रदेशांत थोडीशी जमीन साफ करितो व तेथें आपणासाठीं लहानशी झोंपडी बांधितो. "

मनुष्य पहिल्यानें स्वतःसाठीं मात्र काम करण्यास तयार होतो परंतु मजूरीनें काम करणें त्यास नीच वाटतें, ही संक्रमणस्थितीच्या संबंधानें पहिली गोष्ट झाली. दुसरी गोष्ट ही कीं, पूर्वीं कित्येक उदाहरणांत दाखविल्याप्रमाणें शेतकीला मान मिळूं लागल्यानंतरही व्यापाराविषयीं जी तिरस्कारबुद्धि कायम राहिली ती बहुधा ज्यांना समाजांत महत्त्व नसतें अशा लोकांकडून तो धंदा होत असल्यामुळें राहिली असावी. प्राथमिक लोकांच्या सामाजिक स्थितींत मनुष्याच्या योग्यतेच्या पायऱ्या ठरलेल्या असल्यामुळें वरच्या पायरीवरील लोकांना आपलीं ठिकाणें सोडून दूर जावें असें वाटण्याचा संभव नव्हता. व्यापाराच्या कामाला अनेक ठिकाणीं फिरून मालाची नेआण केली पाहिजे. तेव्हां हें काम अर्थातच ज्यांना एका ठिकाणीं कोठें थारा नसे त्या खालच्या पायरीच्या कांहीं लोकांवरच पडलें व त्यामुळें तें लोकांस तिरस्करणीय वाटूं लागलें. दुसरें, त्यावेळीं लोकांच्या गरजा अगदीं नियमित व जागच्याजागीं भागण्यासारख्या असल्यामुळें त्यांना व्यापाराची अवश्यकताही वाटत नसे. ज्यांचें दुसऱ्या कशानें पोट भरेना तेच व्यापाराचे मार्गे लागत. पण व्यापाराची जसजशी वाढ होत गेली तसतसा त्याचा उपयोग लोकांच्या लक्ष्यांत येऊं लागला व

त्यासंबंधानें लोकांच्या समजुतीही हळूहळू पालटत चालल्या. शिकार करणाऱ्या लोकांमध्यें ज्याप्रमाणें पहिल्यानें शेतकीची अवश्यकता नसल्यामुळें ती नीच वाटत होती, परंतु अवश्यकता उत्पन्न झाल्यावर तिला मान मिळूं लागला; त्याचप्रमाणें जोंपर्यंत व्यापाराची अवश्यकता वाटत नव्हती तोंपर्यंत त्याविषयीं लोकांची वाईट बुद्धि होती, पण अवश्यकता वाटूं लागल्यावरोवर ती नाहींशी होऊं लागली.

लोकसंख्या वाढत जाऊन समाज मोठे होऊं लागल्यानंतर व निर्वाहासाठीं अन्न उत्पन्न करण्याची अवश्यकता वाटूं लागल्यानंतरही कांहीं काळपर्यंत शेतकीचा धंदा प्रतिष्ठित मानिला जात नव्हता ह्याचीं कारणें ह्या प्रकरणाच्या आरंभीं दिलींच आहेत. पहिल्यानें तो गुलामांकडून करविला जात असे व नंतर खालच्या प्रतीचीं माणसें त्यांत पडूं लागलीं. ह्यामुळें शारीरिक किंवा मानसिक दौर्बल्य आणि अशा प्रकारचीं कामें ह्यांचें साहचर्य मनुष्यांचे मनांत ठिबून गेलें. आणि अंग मोडून मेहनत करणें म्हणजे आपला नीचपणा कबूल करणें होय अशी समजूत उत्पन्न झाल्यामुळें मनुष्याला कामाचा जो स्वभाविक कंटाळा असतो त्याला उत्तेजन मिळालें.

प्राचीन काळच्या सुधारलेल्या लोकांच्या ग्रंथांत उद्योग करणें हें मनुष्याचें कर्तव्य आहे अशा प्रकारचे उल्लेख ठिकठिकाणीं आढळतात. परंतु ते खालच्या पायरीवरील लोकांस उद्देशून लिहिलेले असावे. मनुस्मृतींत पुढील अर्थाचें वचन आहेः—

"तुला नेमून दिलेलें काम तूं दररोज अश्रांतपणें करीत जा."

वरील वाक्यांत ज्याअर्थीं 'नेमून दिलेलें' ह्या शब्दांचा उपयोग केला आहे त्याअर्थीं काम नेमून देणारा कोणी तरी धनी असला पाहिजे असा बोध होतो. म्हणजे हें वाक्य चाकरांना उद्देशून लिहिलें असावें. * ईजिप्शियन् लोकांच्या पवित्रपुस्तकांत असें लिहिलें आहे कीं, ईजिप्शियन् मनुष्य मरणोत्तर परलोकीं गेल्यावर त्यानें आपलें कर्तव्य कसें केलें ह्याविषयीं त्याला प्रश्न विचारिले जातात व त्या प्रश्नांचीं पुढें दिल्याप्रमाणें उत्तरें देतां आलीं तर त्याला सद्गति मिळते. "मी आळशी बसलों नाहीं" आणि "मीं आपलें काम कर-

---

* कदाचित् 'नेमून दिलेलें' ह्याचा अर्थ वर्णाश्रमधर्माप्रमाणें ज्याच्या त्याच्या वांट्यास आलेलें असाही असण्याचा संभव आहे. परंतु तसा असला तरी येथें आपणांला जरूर त्या प्रकारचा पुरावा त्यापासूनही मिळतो. वर्णव्यवस्थेंत जो श्रमविभाग केला आहे त्यांत औद्योगिक व्यवसाय समाजांतील अगदीं खालच्या पायरीच्या लोकांवरच सोंपविले आहेत. बहुतेक रानटी लोकांत वणिग्वृत्तीपेक्षां कृषिकर्माला अधिक मान असतो, त्यासंबंधानें मात्र आपल्या देशांत व्युत्क्रम झालेला आहे. वणिग्वृत्तीचें काम वैश्यवर्गाकडे असून कृषिकर्म शूद्रांवर सोंपविलें आहे. वैश्य आणि शूद्र ह्या दोन वर्णांमध्यें पुष्कळच अंतर आहे. वैश्यांना मौंजीबंधनाचा वगैरे अधिकार आहे व शूद्रांना तो नाहीं. वैश्य हे बहुधा आर्यांपैकींच खालच्या पायरीवरचे लोक असावे व शूद्र हे हिकडील मूळचे रहिवासी असावे. इतर प्राथमिक स्थितींतील लोकांप्रमाणेंच आपलेकडेही युद्धाच्या व शिकारीच्या व्यवसायांना अग्रस्थान मिळालेलें दिसतें. बुद्धिविषयक व्यवसायांना त्यांच्याही वर स्थल मिळालेलें आहे, परंतु त्या व्यवसायांत पडलेले लोक बहुतकरून एकान्तांत आयुष्य घालवीत व त्यांचा जगाच्या खटपटींशीं फारसा संबंध नसे.

ण्यास उशीर लाविला नाहीं." ह्या शेवटल्या वाक्याचा तरी भावार्थ असा दिसतो कीं, धन्यानें सांगितलेलें काम मीं वेळेवर केलें. हीब्र्यू लोकांविषयींसुद्धां तसेंच म्हणण्यास हरकत नाहीं. ते लोक पहिल्यानें गुरें व मेंढरें ह्यांचे कळप बाळगून त्यांवर आपला चरितार्थ चालविणारे असल्यामुळें पुढें देखील त्या लोकांमध्यें तो धंदा प्रतिष्ठित मानिला जात असे. हल्लींच्या आरब लोकांना देखील बाहेर स्वाऱ्या वगैरे करण्याचें काम नसलें म्हणजे ते आवडीनें गुराख्याचें काम करितात. ही गोष्ट लक्ष्यांत ठेविली असतां असें दिसून येईल कीं, हीब्र्यू लोकांच्या प्राचीन पुस्तकांत सांगितलेलें उद्योगाच्या संबंधाचें कर्तव्य विशेषतः गुलामांना उद्देशूनच लिहिलें आहे. त्यांच्या दहा आज्ञांपैकीं तिसरी आज्ञा जरी धनी व चाकर ह्या दोघांनाही उद्देशून लिहिलेली दिसते तरी त्या लोकांच्या पूर्वींच्या आयुष्यक्रमाकडे लक्ष्य दिलें असतां त्याठिकाणीं 'उद्योग' शब्दानें गुरांच्या संबंधाचें कामच समजलें पाहिजे, इतर श्रमांचीं कामें नव्हत. बायबलांतील ॲडाम* आणि ईव्ह ह्यांच्या पौ-

---

*ईश्वरानें पहिल्यानें एक जोडपें उत्पन्न केलें व त्या जोडप्यापासून पुढें सर्व मनुष्यजातीचा विस्तार झाला, असा बऱ्याच धर्मांतील लोकांचा समज आहे. हें पहिलें जोडपें आडाम आणि ईव्ह ह्यांचें होय अशी हीब्र्यू लोकांची व त्यांच्याच धर्मापासून उत्क्रान्त झालेल्या ख्रिस्तीधर्माच्या अनुयायांची समजूत आहे. ह्या जोडप्याला देवानें ईडन् येथील बागेंत ठेविलें होतें, तेथें तें मोठ्या आनंदानें नांदत होतें. त्या बागेंतील एका झाडाचीं फळें खाऊं नका म्हणून देवानें त्यांना आज्ञा केली होती. परंतु सायकोनें मनांत भरवून दिल्यावरून आडामानें त्या झाडाचें फळ खाल्लें. त्यामुळें देवाला राग आला व त्यानें 'श्रम करून उपजी-

राणिक कथेवरून उद्योगाचें कर्तव्य सर्व मनुष्यजातीस-च लागू केलेलें असावें असें दिसतें खरें, परंतु ह्या पौराणिक कथेचें मूळ पाहिलें असतां निराळ्या प्रकारचा संभव वाटतो. ही दंतकथा मूळची बाबिलोनियन् लोकांची असावी असें मानण्याला बराच आधार आहे. आणि अलीकडील शोधांवरून असें कळून आलें आहे कीं, पूर्वीं आडामी नांवाचे काळे लोक असत, ते गुलाम होते. त्यांनीं वरिष्ठ प्रतीच्या लोकांसाठीं राखून ठेविलेलीं फळें खाणें हा गुन्हा समजला जात असावा. प्राचीन काळीं पेरू देशांत देखील यूका म्हणून वरच्या वर्गांतले जे लोक असत त्यांच्याकरितां राखून ठेविलेलीं 'कोका' नांवाचीं फळें चाकरांनीं खाणें हा गुन्हा समजला जात असे. त्यावरून आडामाच्या पौराणिक कथेचाही भावार्थ—गुलामांनीं श्रमाचीं कामें करावीं असा दिसतो. तेव्हां, बहुधा हीब्र्यू लोकांमध्यें देखील उद्योग करण्याचें कर्तव्य खालच्या लोकांवरच लादलेलें असून त्याचा संबंध सर्व मनुष्यजातीशीं नसावा असें दिसतें. पर्शियन् लोकांच्या ग्रंथांत मात्र मनुष्याच्या स्थितीकडे लक्ष्य न देतां उद्योगधंद्यांचें महत्त्व वर्णिलेलें आढळतें. त्यांच्या ग्रंथांतील हें वाक्य पहा. "ईश्वराच्या दृष्टीनें शेतीभाती करणारा मनुष्य हजार माणसांचें अस्तित्व ज्यावर अवलंबून आहे त्या मनुष्याइतका श्रेष्ठ आहे."

यूरोपांतील लोकांतसुद्धां प्राचीन काळापासून प्रस्तुत

---

विका करा' असा त्याला व त्याच्या संततीला शाप दिला. ही कथा जुन्या करारांत विस्तारानें दिली आहे.

काळापर्यंत त्या त्या काळच्या लोकांचा आयुष्यक्रम आणि श्रमांच्या कामांविषयीं त्यांच्या समजुती ह्यांमध्यें वर सांगितलेले संबंध आढळून येतात.

प्रथमतः ग्रीक लोकांचें उदाहरण घेऊं. प्लेटोच्या* ग्रंथांवरून त्यावेळचें लोकमत दिसून येतें. तेव्हां व्यापारी लोकांचा धंदा हलका समजला जात असे व व्यापाऱ्यांना कायद्यांचा फायदा मिळत नसे, म्हणजे व्यापाऱ्यानें केलेली फिर्याद चालत नसे. परंतु शेतकीचा धंदा तितका नीच मानिला जात नसे, हें शेतकऱ्यांना कायद्यांचा उपयोग करून घेतां येत असे ह्या गोष्टीवरून स्पष्ट दिसतें. प्लेटोनें 'लोकसत्तात्मक राज्य' ह्या पुस्तकांत उत्पादक धंद्यांत शिरलेले लोक आणि व्यापारी ह्या सर्वांना अगदीं नीच मानिलें आहे. आरिस्टाटल† ह्यानें ज्या आपल्या मनोवृत्ति प्रकट केल्या आहेत त्यांवरूनही अशाच प्रकारचा समज दिसून येतो. तो म्हणतोः—"सुतार, कांसार, लोहार इत्यादिकांचे धंदे करणाऱ्या किंवा मजूरीवर निर्वाह करणाऱ्या लोकांच्या हातून सदाचाराचें वर्तन होणें अशक्य आहे."

त्या लोकांच्या पश्चिमेस राहणाऱ्या लोकांच्याही समजुती निराळ्या नव्हत्या. रोमन लोकांमध्यें एकसार-

---

* प्लेटो हा ग्रीक तत्त्ववेत्ता इसवी सनाचे अगोदर ४०० वर्षांच्या सुमारास होऊन गेला.

† आरिस्टाटल प्लेटोच्या मागून चाळीसपन्नास वर्षांनीं झाला. तो प्लेटोचा शिष्य होता. त्यानें वीस वर्षें प्लेटोजवळ काढिलीं. यूरोपांतील हल्लींच्या ज्ञानप्रसाराला आरिस्टाटलाचे ग्रंथ कारणीभूत झालेले आहेत.

खीं युद्धें चालू राहिल्यामुळें शिपाईगिरीला फारच मान मिळूं लागला व इतर धंद्यांतील लोकांविषयीं तिरस्कार-बुद्धि उत्पन्न झाली. रोमन लोकांच्या राज्याचा व त्यांच्या क्रौर्यमिश्रित सुधारणेचा अंत झाल्यावर ज्या काळाला सुरुवात झाली त्याला यूरोपाच्या इतिहासांत 'कृष्णयुग' ( डार्क एजिस् ) असें नांव दिलें आहे. ह्या कृष्णयुगांत व पुढें एकसारखीं युद्धें चालून मोठमोठीं राज्यें स्थापन झाल्यानंतरही शारीरिक व मानसिक अशा दोन्ही प्रकारच्या उद्योगांविषयीं तिरस्कारबुद्धि कायम राहिली. ह्यामुळें केवळ शारीरिक श्रम करणाऱ्या मजुरांचे व कुशल कारागिरांचे धंदे नीच वाटत असत एवढेंच नव्हे, तर सुशिक्षित लोकांच्या बुद्धिविषयक व्यवसायांबद्दलही तितकीच तिरस्कारबुद्धि वाटत असे. जोंपर्यंत जिंकिलेल्या लोकांशिवाय बाकीच्या सर्व लोकांचें आयुष्यांतील मुख्य काम लढणें हें होतें तोंपर्यंत ही स्थिति कायम राहिली. पुढें ज्यावेळीं विजयी लोकांचें लढण्याचें काम बरेंच कमी झालें व जिंकिलेल्या लोकांना हळूहळू महत्त्व येत जाऊन त्यांच्या मताचा जिंकणाऱ्या लोकांच्या मतावर परिणाम होऊं लागला त्यावेळीं उद्योगधंदे प्रतिष्ठित मानण्याकडे लोकांची थोडीशी प्रवृत्ति होऊं लागली. अशी स्थिति येण्यापूर्वीं विजयी लोकांनीं उद्योगधंद्यांची वाखाणणी केलेली जी कित्येक प्रसंगीं आढळून येते ती केवळ स्वार्थाच्या दृष्टीनें केलेली दिसते. जिंकिलेल्या लोकांनीं ते धंदे करीत बसावें व आपण खुशाल त्यांजवर राज्य चालवावें असा त्यांचा अंतस्थ हेतु दिसतो.

अलीकडल्या काळांत विशेपतः इंग्लंडांत आणि अमेरिकेंतील स्वतंत्र संस्थानांत औद्योगिक कलांकडे लोकांचें फार लक्ष्य लागलें आहे, व त्यामुळें उत्पादक धंद्यांत शिरलेल्या लोकांचें महत्त्व इतकें वाढलें आहे कीं त्यांच्या पुढें सांग्रामिक व्यवसायांचा अभिमान बाळगिणारे लोक अगदीं लोपून जातात. औद्योगिक व्यवसायांत पडलेल्या लोकांच्या मताचें बरेंच वळण लोकमताला मिळत असल्यामुळें उद्योगधंद्यांबद्दलच्या पूर्वीच्या समजुती ब-याच बदलून गेल्या आहेत. केवळ शारीरिक श्रमांचे जे धंदे आहेत त्यांविपयींची तिरस्कारबुद्धि अजूनही समूळ निवून गेली नाहीं. कारण त्या धंद्यांची कल्पना मनांत आल्याबरोबर साहचर्यानें आणखी दोन गोष्टी मनांत येतात. एक, त्या धंद्यांत पडलेले लोक समाजांतल्या अगदीं खालच्या पायरीवरचे असतात ही; व दुसरी, बुद्धीच्या कमीपणामुळें त्या लोकांची धांवच तितकी असते ही. ह्या गोष्टी नेहमींच जरी ख-या नसल्या तरी त्या मनांत आल्यावांचून राहत नाहींत. चतुर कारागिरांची स्थिति मजुरांच्या स्थितीपेक्षां पुष्कळ चांगली आहे. वरिष्ठ प्रतीच्या बुद्धिसामर्थ्याची जरूर असल्यामुळें त्यांच्या धंद्यांना बराच मान मिळतो, तरी त्या धंद्यांची कल्पना मनांत आल्याबरोबर त्याशीं संयुक्त असलेली सामाजिक स्थितीचीही कल्पना मनांत आल्यावांचून राहत नाहीं. कारागीर लोक जरी अगदीं खालच्या स्थितींतले नसतात तरी फारसे वरच्या दर्जाचेही नसतात. ह्यामुळें त्यांबद्दल हल्लीं देखील थोडीशी तिरस्कारबुद्धि उत्पन्न होते. बुद्धिविपयक व्यवसायांची स्थिति मात्र अगदीं

बदलली आहे. पूर्वी त्यांच्या संबंधानें जो तिरस्कार वाटत होता तो आतां अगदीं नाहींसा होऊन ते प्रतिष्ठित मानिले जाऊं लागले आहेत. औद्योगिक व्यवसायांविषयीं लोकमतांत जो इतका फरक पडला आहे व आणखीही पडण्याचा रंग दिसत आहे त्यासंबंधानें एक गोष्ट विशेष लक्ष्यांत ठेविण्यासारखी आहे. ती ही कीं, प्रत्येक मनुष्यानें कांहीं तरी उपयुक्त धंदा करणें अवश्य आहे ही समजूत बहुतेक सार्वत्रिक होत चालली आहे, व हल्लींच्या काळांतले श्रीमंत लोक देखील आपल्या वर्गांतील आळशी लोकांची निर्भर्त्सना करितांना आढळून येतात.

अजून देखील सांग्रामिक कालांतील अवशिष्ट राहिलेल्या कल्पना पहावयाच्या असल्यास सैन्याकडे किंवा आरमाराकडे दृष्टि फेंकिली म्हणजे झालें. सैन्यांतील व आरमारावरील आफिसरलोक माणसांची किंमत त्यांच्या पदवीवरून करीत असतात. त्यांच्या विद्येकडे किंवा हुशारीकडे ते पाहत नाहींत. ह्यामुळें असा प्रकार घडतो, कीं सैन्याला किंवा आरमाराला जोडून जीं वैद्यकीचीं व एंजिनियरिंगचीं खातीं असतात त्यांतल्या बुद्धिमान् व विद्वान् डाक्टर आणि एंजिनिअर आफिसरांची योग्यता इतर आफिसरांपेक्षां कमी समजली जाते व अगदीं वरिष्ठ अधिकारीही त्यांना तशाच रीतीनें वागवितात.

ह्या सर्व विवेचनावरून दिसून येईल कीं, पूर्वीच्या प्रकरणांतील विषयांप्रमाणेंच ह्या प्रकरणांतील विषयाबद्दलही लोकांच्या समजुती त्यांच्या नित्य व्यवसायां-

वर अवलंबून असतात. समाजाच्या सुस्थितीला ज्या व्यवसायांची अत्यवश्यकता असते ते लोकांना आवडूं लागतात व इतर व्यवसायांविषयीं तिरस्कारबुद्धि उत्पन्न होते आणि अशा रीतीनें प्रवर्तकनीतीच्या समजुती बनत जातात. समाजांतील प्रमुख माणसें ज्या गोष्टी करीत असतील त्या योग्य व प्रतिष्ठादायक आणि इतर गोष्टी अयोग्य व अपमानास्पद असा समज हळूहळू बनत जातो.

ह्यामुळें प्राचीन काळापासून प्रस्तुत काळापर्यंत भिन्न परिस्थितींतील समाजांत विरोधात्मक समजुती नजरेस पडतात. ज्या समाजांत क्षात्रतेज चमकत असतें त्यांतील लोकांना उद्योगधंदे करणें नीच वाटतें, परंतु ज्या समाजांत शांतता असते त्यांतील लोकांना उलट तें प्रतिष्ठित वाटतें. राज्याधिकाऱ्यांच्या राजपदारोहणाच्या प्रसंगीं निरनिराळ्या समाजांत जे समारंभ केले जातात त्यांत हा विरोध स्पष्टपणें दिसून येतो. संग्रामशील रानटी लोकांत नवीन राजाला राज्याभिषेक करावयाचा झाला म्हणजे केवळ उपचारादाखल जे विधि केले जातात त्यांत शस्त्रांचें बरेंच प्राधान्य असतें. कित्येक ठिकाणीं राजाला ढालेवर बसवून सभोंवतालच्या सर्व लोकांना त्याचें तोंड दिसावें म्हणून ती उंच उचलून धरितात. कित्येक ठिकाणीं राजाच्या कमरेभोंवतीं तरवार लटकाविली जाते किंवा त्याच्या हातांत भाला दिला जातो. आणि बहुतेक ठिकाणच्या लोकांना सांग्रामिक स्थितीचा कधींना कधीं तरी अनुभव असल्यामुळें त्यावेळीं ज्या चाली रूढ होऊन जातात त्या

पुढें शांततेचा काळ आला तरी तशाच चालू राहतात. ह्यामुळें हल्लीं ज्या लोकांत शांतता आढळून येते त्यांमध्यें देखील राज्याभिषेकाच्या प्रसंगीं असल्या राजचिन्हांचा उपयोग केला जातो. परंतु ज्या ठिकाणीं असल्या चिन्हांचें नांव देखील ऐकूं येत नाहीं असें एक उदाहरण आढळून आलें आहे. मानान्सा म्हणून आफ्रिकेंत राहणारे प्राथमिक स्थितींतील लोक आहेत, त्यांचा पूर्वीं कित्येक प्रसंगीं उल्लेख केलाच आहे. शेजारच्या लढाऊ लोकांच्या त्रासाला कंटाळून ते डोंगराळ प्रदेशांत जाऊन राहिले व तेथें ते शेतकीवर निर्वाह करितात. "आह्मांला पशूंच्या रक्ताचीही तहान नाहीं मग माणसांच्या रक्ताची कोठून असणार ?" असें ते म्हणत असतात असेंही पूर्वींच सांगण्यांत आलें आहे. ह्यावरून सांग्रामिक व्यवसायांचा त्यांना किती तिटकारा आहे हें दिसून येतें. त्यांच्या संबंधानें होल्ब सांगतो कीं, नवीन राजा गादीवर बसावयाचा झाला म्हणजे त्याच्या हातांत थोडीशी वाळू, दगड आणि हातोडा हीं राजचिन्हें दिलीं जातात. हीं चिन्हें त्यांच्या धंद्यांचीं द्योतक आहेत.

आतां एका गोष्टीचा मात्र उल्लेख करावयाचा राहिला आहे तो करून त्या गोष्टीच्या महत्त्वाबद्दलही चार शब्द लिहिणें जरूर आहे. उद्योगधंद्यांच्या संबंधानें जी प्रवर्तकनीतीची समजूत उत्पन्न होते व जीमुळें उद्योगधंदे करणें प्रतिष्ठित वाटूं लागतें त्याच समजुतीपासून हल्लींची शुद्धनीतिविषयक समजूत उत्पन्न झाली आहे. शुद्धनीतीच्या दृष्टीनें उद्योग करणें हें मनुष्याचें

कर्तव्य असतें खरें, पण तें निरपेक्ष कर्तव्य नसतें. त्यापासून स्वोदरपोषणाच्या फलाची अपेक्षा असते. प्रत्येक मनुष्यानें स्वतःच्या श्रमांवर आपला निर्वाह चालविला पाहिजे, त्यासाठीं दुसऱ्यांवर अवलंबून राहतां कामा नये, हें तत्त्व आतां मनुष्यांचे लक्ष्यांत येऊं लागलें आहे व त्याकडे दृष्टि देऊन प्रत्येक मनुष्यानें उद्योग करणें अवश्य आहे असें आतां त्यांस वाटूं लागलें आहे. आपल्या व आपल्या आश्रितांच्या निर्वाहासाठीं आणि सामाजिक कर्तव्यें करण्यास समर्थ होण्यासाठीं मनुष्यानें ज्या क्रिया करणें अवश्य आहे त्यांजकडे लक्ष्य देऊनच उद्योगशीलतेचा सद्गुणांत समावेश केला पाहिजे. आणि आळसाला दुर्गुण म्हणण्याचें तरी मुख्य कारण हेंच कीं, आळशी मनुष्य समाजाच्या सामायिक संग्रहांतून आपल्या निर्वाहास लागणारे पदार्थ घेत असून तो संग्रह वाढविण्यासाठीं किंवा इतर प्रकारें समाजाच्या सुखसाधनांत भर टाकिण्यासाठीं त्या मनुष्याच्या हातून कांहींएक होत नसतें.

# प्रकरण १२

## खाण्यापिण्याचा नेमस्तपणा

खाण्यापिण्याच्या नेमस्तपणाविषयीं लोकांच्या ज्या प्रवर्तकनीतीच्या समजुती आहेत त्यांचा उगम धर्मांत आहे. दुसऱ्याही कित्येक समजुतींचा उगम धर्मांत असल्याविषयीं पूर्वीं सांगण्यांत आलेंच आहे. 'समाजशास्त्राच्या मूलतत्त्वां' त असें दाखविण्यांत आलें आहे कीं, कित्येक प्रसंगीं भूक सहन करणें हें सद्गुणाचें व्यंजक मानिलें जातें. कारण पितरांना किंवा देवांना अन्न देणें हें प्राथमिक स्थितींतील मनुष्याचें पहिलें कर्तव्य असतें व तें होऊन क्षुधाशमन होण्यापुरतें अन्न उरलें नाहीं तर त्याला भूक सोसावी लागते; आणि धर्माकरितां भूक सोसणें हा सद्गुण मानिला जाणें साहजिक आहे. ज्या ठिकाणीं अन्नाची विपुलता नसते त्याठिकाणीं पितरांचा व देवांचा भाग त्यांना पहिल्यानें काढून देणें अवश्य असल्यामुळें मनुष्यांना कधींकधीं अर्धपोटीं व केव्हां तर मुळींच उपोषित राहणें भाग पडतें. ह्यामुळें धर्माज्ञा पाळणें आणि भूकराखून खाणें ह्या दोन गोष्टींचा संबंध प्राथमिक स्थितींतील मनुष्यांच्या मनांत येऊं लागतो व ह्या दोन गोष्टींचें साहचर्य जें एकदां स्थापित होतें तें पुढें हा मूळचा संबंध नाहींसा झाला तरी कायम राहतें.

मद्यादिरसप्राशनाच्या संबंधानेंही कित्येक लोकांत असा प्रकार घडून आला असेल. कारण त्यांचा मनुष्यांनीं अधिक उपयोग करणें म्हणजे होमहवन, व-

लिदान इत्यादि धर्मकृत्यांच्या कामांत त्यांचा कमी ख-र्च करणें असा परिणाम होतो. आह्मी ज्या उद्देशानें चित्रावती घालितों त्याच उद्देशानें कित्येक लोक कांहीं अन्न व पिण्याचें मादक द्रव्य सभोंवतीं फेंकीत असतात. आपण घरीं जेवितांना ज्याप्रमाणें चित्रावती घालितों त्याचप्रमाणें बाहेर प्रवासांत वगैरे असतां मार्गांत एखाद्या नदीच्या किंवा तळ्याच्या कांठीं फराळासाठीं उतरल्यावर अन्न खाऊं लागण्यापूर्वीं त्याचा थोडासा भाग बाहेर फेंकीत असतों. अशा रीतीनें देवांसाठीं व भुतांखेतांसाठीं आपण जें अन्न फेंकितों तें फार थोडें असतें, परंतु श्राद्धपक्षाच्या वेळीं आपण पितरांना जे पिण्ड देतों त्यांना पुष्कळ अन्न लागतें. वैश्वदेवाचे वेळींही अग्नींत आहुति टाकिण्यासाठीं बऱ्याच अन्नाची जरूर लागते. प्राथमिक स्थितींत ह्या गोष्टींचें लोकांना फारच महत्त्व वाटत असलें पाहिजे व त्या स्थितींत खाद्यपेयांचा पुरवठाही फार बेताचा असणार. तेव्हां देवकर्मे व पितृकर्मे यथासांग करण्यासाठीं लोकांना आपली भूक व तहान मारणें भाग पडलें असेल. इंद्रादि देव यज्ञांत येऊन सोमरसाचें पान करीत असें वर्णन ऋग्वेदांत कित्येक ठिकाणीं आढळतें. तेव्हां, देवांना सोमरस दिल्यानंतर उरेल त्याचें ऋषिगणांनीं प्राशन करावें अशी चाल असण्याचा संभव आहे. मद्याच्या संबंधानें ज्या लोकांत अशा प्रकारच्या चाली असतील त्या लोकांत जर कोणीं अंगावर कैफ येईपर्यंत मद्यप्राशन केलें तर, त्यावरून त्यानें आपल्या धर्मकृत्यांकडे दुर्लक्ष्य केलें असा तर्क होऊन तो दोषास पात्र होणें संभवनीय आ-

हे. खाण्यापिण्याच्या संबंधानें ह्याच्या अगदीं उलट समजुती उत्पन्न होण्यालाही कारणें आहेत व त्यांचा पुढें विचार करण्यांत येईल. परंतु भूक राखून खाणें व तहान राखून पिणें ह्या गोष्टी ईश्वराला प्रिय आहेत हा समज जो अनेक लोकांत आढळून येतो तो वरील कारणांनीं उत्पन्न झाला असावा.

ह्या विचारांच्या संभवनीयतेबद्दल कांहीं पुरावाही देण्यासारखा आहे. पितरांची किंवा पूर्वजांची पूजा आणि त्यांच्यासाठीं अन्नादिकांचें दान वगैरे प्रघात चिनी लोकांमध्यें युगांचींयुगें चालत आलेले आहेत. त्या लोकांत खाण्यापिण्याच्या संबंधानें इतका निर्बंध आढळतो कीं, अगदीं नियमांप्रमाणें वागणें म्हणजे बहुतेक तपस्व्याच्या वृत्तीनेंच राहिलें पाहिजे. त्या लोकांमध्यें असे नियम उत्पन्न होण्याला त्यांची मृतांसाठीं वारंवार बळी देण्याची चालच कारण झाली असावी. कन्फ्यूशिअस म्हणतोः—" भोजनाचे कामांत जो मनुष्य आपले वर्तन श्रेष्ठप्रतीचें ठेवूं इच्छितो तो आपली क्षुधा तृप्त करण्याचा प्रयत्न करीत नाहीं. " वरील वचनांत अल्पाहार करणें हा सद्गुण आहे असें सांगितलें, परंतु त्याचें कारण कांहीं दिलें नाहीं. तें कन्फ्यूशिअस ह्यानेंच आणखी एका ठिकाणीं जें आपलें मत प्रदर्शित केलें आहे त्यावरून व्यक्त होतें. यू ह्या साधूच्या वर्तनाविषयीं आपलें मत देतांना तो म्हणतोः—" यू ह्याच्या वर्तनांत मला लवमात्र दोष दिसत नाहीं. त्याचें खाणेंपिणें अगदीं साधें असे, परंतु पितरांविषयीं मात्र हयगय करीत नसे ( त्यांना उत्कृष्ट प्रतीचें खाद्य

व पेय देत असे ). त्याचे नेहमींचे घालावयाचे कपडे अगदीं साधे व गरीबीचे असत, परंतु यज्ञाचे वेळीं घालावयाची टोपी व उपवस्त्र हीं फार सुंदर असत. " ह्या ठिकाणीं खाण्यापिण्याचे संबंधानें अनुकरणीय वर्तन आणि पितरांच्या संबंधाचें धर्मदृष्टीनें कर्तव्य ह्या दोन गोष्टी त्यानें एकाशीं एक जोडून दिल्या आहेत. अर्थात् त्यांमध्यें कार्यकारणभावाचा संबंध आहे हें त्यानें ध्वनित केलें आहे.

खाण्यापिण्याच्या नेमस्तपणासंबंधानें जी धर्माची आज्ञा आहे तीशिवाय दुसऱ्या कोणत्या कारणानें तशी अवश्यकता उत्पन्न होते कीं नाहीं हें पाहूं लागलें असतां उपयोगात्मकनीतीच्या विचारांनीं मात्र खाण्यापिण्याचे कामांत बातन्नेत राखणें इष्ट आहे असें दिसून येईल. उपयोगात्मकनीतीची इमारत अनुभवाचे पायावर रचिलेली आहे. खाण्यापिण्याचे कामांत नेमस्तपणा ठेविल्यानें शरीरावर व मनावर चांगले परिणाम होतात आणि अतिरेक केला असतां वाईट परिणाम होतात हें अनुभवानें सिद्ध झालें आहे. ह्यासाठींच खाण्यापिण्याच्या नेमस्तपणाला सद्गुण म्हणावयाचें व अतिरेकाला दुर्गुण म्हणावयाचें.

नेमस्तपणाविषयीं—विशेषतः भोजनाच्या नेमस्तपणाविषयीं—यथायोग्य कल्पना करणें झाल्यास, प्रथमतः परिस्थितींत बदल झाला असतां जीवनेंद्रिय श[illegible] [illegible] दृष्टीनें खाण्यांत कोणत्या प्रकारचा बदल करणें जरूर आहे हें पाहिलें पाहिजे.

आह्मांला जो विलक्षण प्रकारचा खादाडपणा व [illegible]

व ज्याचा आपणांस कित्येक प्रसंगीं किळसही येईल तो दुसऱ्या कांहीं लोकांस कदाचित् तसा वाटणार नाहीं. कित्येक लोकांची परिस्थिति अशी कांहीं चमत्कारिक असते कीं, कांहीं विशेष प्रसंगीं त्यांनीं आमच्या दृष्टीनें खादाडपणा करणें अगदीं स्वाभाविक, किंबहुना अवश्य असतें. कल्पना करा, कीं एका ठिकाणीं अन्नाची अतिशय कमताई असून कांहीं प्रसंगीं मात्र तें पाहिजे तितकें विपुल मिळण्यासारखें आहे. अशा स्थितींत ज्यावेळीं अन्नाची विपुलता असेल त्यावेळीं तें पुष्कळसें खाऊन घेण्याची ज्यांच्या अंगीं शक्ति असेल त्यांचेंच जीवित शक्य होईल. आस्ट्रेलियाच्या किनाऱ्यावर एकादें देवमाशाचें प्रेत वाहून आलें म्हणजे तेथील लोकांची अगदीं चैन उडून जाते. अशा प्रसंगीं ते लोक कसें वर्तन करितात त्याचें सर जार्ज ग्रे ह्यानें अगदीं हुबेहुब वर्णन केलें आहे. तो म्हणतोः—

"मग हळूहळू दुसरे लोक लहानलहान जमाव करून चोहोंकडून येतांना दृष्टीस पडतात. ते आनंदानें उडत बागडतच येत असतात. तेथें आल्यावर दिवसास ओ येईपर्यंत खावें आणि निजावें व रात्रीस गावें आणि नाचावें हा त्यांचा आयुष्यक्रम सुरू होतो. असें बरेच दिवस चालल्यानंतर देवमाशाचा वरचा भाग संपून ते हळूहळू त्याचें शरीर पोंखरून आंत प्रवेश करूं लागतात. इतक्या मुदतींत त्याचा बराच भाग कुजतो व त्याला अगदीं घाण येऊं लागते. परंतु त्या लोकांना त्याबद्दल कांहीं वाटत नाहीं. ते कुजलेलेंच मांस खातात. ते बाजूनें वर चढून पोंखरलेल्या भागाच्या आंत उतर-

तात व भराभर लपके काढून तोंडांत टाकितात. त्यांचें सर्वांग चरबीनें माखलेलें असतें. पुष्कळ दिवसपर्यंत त्या प्रेताच्या सन्निध राहून अखेरीस जेव्हां ते तेथून निघून जातात तेव्हां प्रत्येकजण आपली अगदीं शिकस्त करून नेववेल तितकें ओझें बरोबर घेऊन जातो. "

आस्ट्रेलियन् लोकांप्रमाणें जे नापीक प्रदेशांत राहत असतील व ज्यांना अनेक वेळां उपाशीं किंवा अर्धपोटीं राहण्याची पाळी येत असेल त्यांपैकीं ज्यांना असल्या प्रसंगांचा पूर्णपणें उपयोग करून घेतां येणार नाहीं ते दुष्काळाच्या वगैरे प्रसंगीं पहिल्यानें मरतील. ह्या अनुमानाच्या सत्यतेबद्दल आणखी पुरावा पाहिजे असल्यास क्वीन्सलांड बेटाच्या मध्यप्रदेशांत राहणाऱ्या लोकांविषयीं क्रिस्तिसन् ह्यानें जी हकीकत दिली आहे ती वाचावी. हे लोक पहिल्या पहिल्यानें मात्र अतिशय खादाडपणा करितात, पण त्यांना नेहमीं नियमित वेळीं अन्न मिळूं लागलें म्हणजे त्यांची भूक लवकरच शमते व युरोपियन लोकांपेक्षांही अधिक नेमस्तपणा त्यांच्या अंगीं येतो.

आणखी एका कारणानें मनुष्यांनीं खादाडपणा करणें संभवनीय आहे. आपण जें अन्न खातों त्याचा शरीरांत मंददाह होत असतो व त्या दाहापासून जी उष्णता उत्पन्न होते तिच्या योगानें शरीर आपले सर्व व्यापार करण्यास समर्थ होतें. थंडदेशांत मनुष्याच्या शरीरांतून पुष्कळ उष्णता एकसारखी बाहेर पडत असते. त्या उष्णतेचा पुरवठा करण्यासाठीं थंडदेशांतल्या मनुष्यांना अन्नही अधिक खावें लागतें. ह्यासाठीं थंड-

देशांतील लोकांचा आहार उष्णदेशांतील लोकांच्या आहारापेक्षां स्वभावतःच अधिक असला पाहिजे. शीत-कटिबंधांतील प्रदेशांत तर थंडीचा अगदीं कहर असतो व तेथें पाघरुणांचाही पुरवठा फार बेताचा असतो. अ-शा स्थितींत राक्षसी आहारावांचून मनुष्यांचा निभावच लागावयाचा नाहीं. हें कारण लक्ष्यांत आणिलें म्हणजे पुढील गोष्टीचा उलगडा होईल. लायन् म्हणतोः—

"एस्किमो लोकांतील आणखी एक अधाशीपणा-चा प्रकार मला दिसून आला. एका मनुष्यानें इतकें अन्न खाल्लें होतें कीं तें त्याचे अंगावर येऊन तो अगदीं आहारून पडला होता व क्षणोक्षणीं त्याचा डोळा ला-गत होता. त्याचा चेहरा अगदीं तांबूस झाला होता. त्या-च्या शेजारींच त्याची बायको आर्नालुआ ही बसली होती. तिचें लक्ष्य चुलीवरच्या भांड्याकडे होतें. ती म-धून मधून नवऱ्याला जागा करी व चुलीवरच्या अर्ध-वट शिजलेल्या मांसाच्या मोठ्या गोळ्याचे लहानलहान तुकडे काढून ते आपल्या मधल्या बोटानें त्याच्या घ-शांत कोंबी, आणि त्याचें तोंड अगदीं भरलें म्हणजे शेवटच्या तुकड्याचा कांहीं भाग आंत जाऊन कांहीं भाग जर बाहेर राहिला असला तर बाहेरचा भाग ओं-ठाबरोबरच कापून काढी. मग तो तोंडांतलें मांस हळू-हळू चघळी आणि थोडीशी जागा रिकामी झाल्यावरो-बर त्याची बायको हिरव्या चरबीच्या गोळ्यानें ती भ-रून काढी. हा सर्व प्रकार चालला असतांना त्या म-नुष्याचा जबडा मात्र हालत होता; बाकीचें सर्व शरीर अगदीं स्तब्ध होतें व डोळे देखील मिटलेलेच होते. प-

ण मथूनमथून, तोंडांतून वारा बाहेर सोडतां येण्यासारखी आंत रिकामी जागा असली, म्हणजे तो जो चमत्कारिक प्रकारचा शब्द करी त्यावरून त्याला अत्यानंद होत आहे असें दिसून येई."

आणखी एक तितकीच आश्चर्यकारक गोष्ट एशिया खंडाच्या उत्तर भागांतली आहे. कोक्रेन म्हणतोः—

"याकुती व टांगोसी लोक जबर खादाड आहेत. त्यांच्या एका पांचवर्षांच्या मुलाला मीं एक घाणेरड्या चरबीची मेणबत्ती दिली ती त्यानें पटकन खाऊन टाकिली. तेव्हां दुसरी व तिच्यामागून तिसरी दिली त्याही त्यानें भराभर खाऊन टाकिल्या. मग आमच्या सुकाणवाल्यानें त्याला कांहीं पौंड थिजलेलें लोणी दिलें तें पण त्यानें लागलेंच गट्ट केलें. सरतेशेवटीं त्याला एक पिंवळ्या रंगाची साबणाची वडी दिली तिची देखील बाकीच्या पदार्थांप्रमाणेंच वाट लागली. प्राण्याच्या शरीरांतला खाण्याचा पदार्थ असला म्हणजे तो कितीही जुना किंवा कुजलेला असो, त्याविषयीं त्यांना विधिनिषेध नाहीं. आणि अन्न खाण्याची इयत्ता त्यांच्या जवळ जो पुरवठा असेल त्यावर अवलंबून असावयाची. याकुती व टांगोसी मनुष्य दिवसांतून चाळीस पौंड मांस खातांना मीं पुष्कळ वेळां पाहिले आहेत."

ह्या खाण्याच्या विलक्षण प्रकाराचा त्यांना कसा उपयोग होतो हें क्याप्टन रांगेल ह्यानें पुढील हकीकत दिली आहे तीवरून लक्ष्यांत येईल.

"सैबीरिया देशांत याकुती लोकांना सुद्धां 'लोखंडी

माणसें ' असें म्हणण्याचा प्रघात पडला आहे. आणि मला वाटतें त्यांच्यासारखे थंडी व भूक सहन करणारे लोक जगांत दुसरे नसतील. ह्या अतिशय थंड देशांत विस्तव वगैरे विझाल्यावर अंगांत एक लहानसें डगलें घालून अगदीं उघड्यावर निजलेले हे लोक दृष्टीस पडतात. तें लहानसें डगलें सुद्धां बहुतकरून एका बाजूस सरून त्यांचें बहुतेक अंग उघडें पडतें व त्यावर दंव पडून तें थिजून त्याचें पातळ आच्छादन बनतें. आणि अशा स्थितींत देखील त्यांना स्वस्थ झोंप लागते. "

हें कित्येक लोकांमधल्या वस्तुस्थितीचें वर्णन झालें. आतां त्यांच्या समजुती पाहूं. परिस्थितीमुळें ज्यांना खाण्याच्या कामांत असलें राक्षसी वर्तन करणें भाग पडतें त्या लोकांत बहुतकरून अत्याहाराला नीतीची किंवा प्रवर्तकनीतीची संमति असते. अर्मन् ह्यानें याकुती लोकांमधील एक म्हण दिली आहे ती येणेंप्रमाणें आहे:—
" खूप मांस खाऊन लठ्ठ होणें हा अत्यंत श्रेष्ठप्रतीचा पुरुषार्थ आहे. " परंतु एवढें लक्ष्यांत ठेविलें पाहिजे कीं अशा स्थितींत राहणारे लोक जगांत फार थोडे आहेत.

हीं कमालीचीं उदाहरणें सोडून देऊन समशीतोष्ण व उष्ण कटिबंधांत राहणाऱ्या बहुतेक लोकांविषयीं विचार केला असतां नेमस्तपणाविषयींच्या त्यांच्या कल्पना आणि त्यांच्या अंगचे इतर गुण ह्यांमध्यें फारसा संबंध आढळून येत नाहीं. कदाचित् अवनतास्थिति आणि अत्याहार ह्यांचें साहचर्य असण्याचा संभव आहे.

हें अनुमान देखील बरेंच संशयास्पद दिसतें. टाहि-

टियन् लोकांचा आहार राक्षसी आहे असें कुकसाहेबानें सांगितलें आहे, तथापि ते लोक शरीरानें बांधेसूद व सुंदर असून बुद्धीनें जवळपासच्या मिताहारी लोकांपेक्षां पुष्कळ श्रेष्ठ आहेत. आतां हे दुराचारी आहेत खरे, पण त्यांचे कित्येक गुण वाखाणणी करण्यासारखे आहेत. लोक अत्याहारी असले तरी ते बऱ्या प्रकारच्या स्थितींत असणें संभवनीय आहे ही गोष्ट वरील उदाहरणावरून दिसून येते. आतां ह्याच्या उलट उदाहरण घेऊं. ... औरवलोकांचें खाणेंपिणें बरेंच नेमस्तपणाचें आहे, परंतु स्त्रीपुरुषांच्या संबंधांत ते टाहिटियन् लोकांइतके नीचस्थितीस पोहोंचलेले असून त्यांमध्यें दुसरेही प्रशंसा करण्यासारखे गुण नाहींत. ते विलक्षण प्रकारचा डांव धरणारे लोक असून दरोडेखोरीच्या कामांतही [illegible] आहेत असें पूर्वीं सांगण्यांत आलेंच [illegible]णंच वाट ल[illegible] पदार्थ असला म्हण[illegible]

हर्लीच[illegible] असो, त्याविपरीतमान्यतः मिताहार किंवा अत्याहार आ[illegible] गुण ह्यांमध्यें कांहीं संबंध दिसून येत नाहीं व आहाराच्या संबंधानें त्यांच्या नीतिविषयक समजुतीही बनलेल्या नाहींत. वर याकुती लोकांचें उदाहरण दिलें आहे त्यासारखे अपवाद क्वचित् आढळतील.

तथापि प्राचीनकाळच्या मध्यमावस्थेतील समाजांत आहारासंबंधानें नीतिविषयक समजुती बनलया होत्या व अत्याहार करणें त्या लोकांना अयोग्य वाटूं लागलें होतें. मनुस्मृतींत पुढील वचन आढळतें:—

*अनारोग्यमनायुष्यमस्वर्ग्यं चाति भोजनम् ।
अपुण्यं लोकविद्विष्टं तस्मात्तत्परिवर्जयेत् ॥

अ० २, श्लो० ५७.

महाभारताच्या कांहीं भागांत जी स्वर्गसुखाची कल्पना केली आहे तींत इंद्रियसुखोपभोगाचें नांव नाहीं. ह्याचें कारण बहुधा त्या वेळीं विरक्ततेकडे लोकांचें लक्ष्य लागलें होतें हें असावें. ह्या स्वर्ग-वर्णनावरून अत्याहार तिरस्करणीय मानिला जात होता असें ध्वनित होतें. हिंदुलोकांची प्राचीनकाळापासून वैराग्याकडे फार प्रवृत्ति आहे. शरीरपोषणासाठीं अन्न खाल्लेंच पाहिजे म्हणून खावयाचें असा त्यांचा साधारण समज होता. रसनेंद्रियाच्या तृप्तीकडे त्यांचें फारसें लक्ष्य नव्हतें. हीब्र्यू लोकांमध्यें सुद्धां असेच विचार आढळतात. खाण्यापिण्याच्या कामांत नेमस्तपणा ठेविण्याविषयीं त्यांच्या पुस्तकांतून पुष्कळ ठिकाणीं उपदेश आढळतात. पुढील उपदेश जुन्या करारांतील 'प्रॉव्हर्ब्स' नांवाच्या पुस्तकांतून घेतला आहे:—

" तुम्ही मद्यपी आणि अत्याहारी लोकांत आपला समावेश करून घेऊं नका. कारण मद्यपी आणि अत्याहारी मनुष्य भिकेस लागतात व त्यांच्या झिंगीमुळें आणि आळसामुळें त्यांना चिंध्या पांघराव्या लागतात. "

अत्याहार हा दुर्गुण आहे ह्याविषयीं ईजिप्शियन् लोकांनाही उमज पडला होता, तथापि ते जाणूनबुजून

---

* अतिभोजन हें रोग उत्पन्न करणारें, आयुष्याचा नाश करणारें, स्वर्गप्राप्तीचा विघात करणारें, पापमूलक, आणि लोकांत निंदा करणारें आहे, अतएव तें वर्ज करावें.

खाण्याच्या कामांत अतिरेक करीत असत. एकीकडे पहावें तों त्या लोकांमध्यें जीं बेचाळीस महापातकें मानिलीं आहेत त्यांत अत्याहाराचा निर्देश केलेला आढळे, व दुसरीकडे पहावें तों त्यांचा खाण्यापिण्याचा सारखा धडाका चालला आहे असें स्पष्ट दिसून येई. डंकर ह्याचें 'प्राचीन काळचा इतिहास' म्हणून एक पुस्तक आहे त्यांत तो म्हणतो:—

"मिष्टान्न भोजनाचे प्रसंगीं ईजिप्शियन् लोकांमध्यें नेमस्तपणाचें नांव देखील नसे. हेरोडोटस* सांगतो कीं,

---

* हा ग्रीक इतिहासकार इसवी सनाच्या पूर्वीं ४८० वे वर्षीं जन्मला. इतिहासाचा एक प्रचंड ग्रंथ लिहिण्याची कल्पना तो लहान असतांनाच त्याचे मनांत आली, व ज्या स्थळांचा इतिहास त्याचे मनांत लिहावयाचा होता तीं स्थळें प्रत्यक्ष पाहून तेथील माहिती मिळविण्याकरितां त्यानें आपल्या वयाच्या विसाव्या वर्षापासून सदतिसाव्या वर्षापर्यंत हा काळ प्रवासांत घालविला. महत्त्वाचें स्थळ असलें म्हणजे त्याठिकाणीं पुष्कळ दिवस रहावें व तेथील सर्व महत्त्वाची माहिती मिळवावी असा क्रम त्यानें चालविला होता. ज्या ठिकाणीं लढाया झालेल्या असतील त्या स्थळांचें व महत्त्वाच्या स्थळांमधील अंतरांचें तो स्वतः मोजमाप करित असे. त्यानें ईजिप्ट देशांत वरींच वर्षें काढिलीं. त्याचा इतिहास प्रत्यक्ष माहितीनें लिहिलेला असल्यामुळें त्याला फारच महत्त्व आलें आहे. हेरोडोटस नसता तर मनुष्यजातीला प्राचीन इतिहासाचें केवढें तरी अज्ञान राहिलें असतें. थोर पुरुषांना आपल्या देशांत कधीं मान मिळत नाहीं. त्याचा जन्म ग्रीस व एशियामायनर ह्यांच्या सांधीवरच्या एका शहरीं झाला होता. आपण आपल्या जन्मभूमीच्या ठिकाणीं जाऊन तेथें आनंदानें रहावें व आपला इतिहास लिहावा अशी त्याची इच्छा होती परंतु ती तेथल्या लोकांनीं तृप्त होऊं दिली नाहीं. त्याच्या गुणांची किंमत ओळखणारा तेथें कोणी नव्हता. मग तो आथेन्स येथें आला व तेथें मात्र त्याची मोठी वाहवा झाली.

मृतशरीरासारखी एक लांकडाची प्रतिमा करून ती मेजवान्यांचे प्रसंगीं लोकांपुढें फिरवीत व फिरवितांना 'ह्या प्रतिमेकडे पहा, मद्यप्राशन करा आणि आनंदी व्हा; मेल्यानंतर तुमची अशी स्थिति होईल!' असा उपदेश केला जात असे. ह्या उपदेशाचा इष्टपरिणाम झाल्यावांचून राहत नसे. प्राचीन काळच्या त्यांच्या ज्या भव्य इमारती आहेत त्यांवर काढिलेल्या चित्रांत पुरुषच नव्हत पण स्त्रिया देखील ओ येईतों खाऊन उरलेलें अन्न व मद्य फेंकून देत आहेत असें दर्शविलें आहे."

परंतु पुराव्याचा एकंदर झोंक असा दिसतो कीं मनुष्यसमाजांना स्थिरता आल्यानंतर व अनुभवानें अतिरिक्त खाण्याचे परिणाम समजल्यानंतर उपयोगाकडे लक्ष्य जाऊन अत्याहाराविषयीं तिरस्कार उत्पन्न झाला असावा. धर्मदृष्टीचा तिरस्कार आणि उपयोगात्मकनीतीच्या दृष्टीचा तिरस्कार ह्यांत भेद आहे. बहुतेक विचारी लोकांना ह्या दुसऱ्या प्रकारच्या तिरस्काराविषयींही कल्पना झाली असावी.

आतां अतिरिक्तपानाविषयीं विचार करूं. 'अतिरिक्तपान' ह्या शब्दाचा अर्थ पुष्कळ पिणें एवढाच आहे. मूळ अर्थांत उन्मादकारक पेयांचा संबंध नाहीं, परंतु त्या शब्दाचा 'उन्मादकारक पेयें वाजवीहून अधिक पिणें' ह्या अर्थानें उपयोग केला असतां सोईवार पडेल. बेताबातानें मद्य प्यालें असतां उन्माद चढत नाहीं. ज्या पिण्यानें उन्माद येतो त्यालाच अतिरिक्त

---

व त्याच्या गुणांची किंमत ओळखून तेथील सरकारानें त्यास २५००० रुपयांचें बक्षीस दिलें. तो साठ वर्षांचा होऊन मरण पावला.

पान म्हणावयाचें. बहुतेक लोकांचें अतिरिक्तपानाविषयीं मत त्याच्या परिणामांकडे लक्ष्य जाऊनच बनलेलें आहे. कित्येक ठिकाणीं अतिरिक्तपानाची दुर्गुणांत गणना केली जाते व कित्येक ठिकाणीं तें स्वाभाविक मानिलें जातें.

मद्य प्यालयानें जो उन्माद येतो तो सर्व ठिकाणीं तिरस्करणीय मानिला जातो अशी कित्येकांची समजूत आहे, परंतु ती चुकीची आहे. मद्यानें व दुसऱ्या कांहीं मादक पदार्थांच्या सेवनानें उत्पन्न होणारी ही मनाची स्थिति प्राचीन काळीं बहुतेक लोकांस फार प्रिय होती व अजूनही ती कित्येकांना फार आवडते. एका अराफूर जातीच्या मनुष्याला ख्रिस्तीधर्माचा उपदेश चालला होता. तेव्हां त्याला सांगण्यांत आलें कीं, ईश्वर सर्वव्यापक आहे. हें ऐकिल्याबरोबर एकदम त्याच्या मनांत एक विचार येऊन तो म्हणालाः—" तर मग तो देव खचित ह्या तुमच्या मद्यांत देखील आहे. कारण तें पुष्कळसें प्यालयानें मला जितका आनंद होतो तितका दुसऱ्या कशानेंही होत नाहीं. " ह्यावरून अराफूर लोकांना मद्याची किती आवड आहे ह्याची कल्पना करितां येईल. मद्याचे अंगीं अत्युत्तम गुण आहेत असें त्या मनुष्याला वाटत होतें पण ते गुण असण्याचें कारण त्याच्या लक्ष्यांत येत नव्हतें; मग त्याला जेव्हां देवाविषयीं ही नवी कल्पना समजली तेव्हां त्याला त्या गोष्टीचा उमज पडला. त्या अराफूर मनुष्याला जी कल्पना एकदम सुचली ती पुरातन हिंदूंच्या ग्रंथांत सोमपानाच्या वर्णनांत ठिकठिकाणीं आढळून येते. सोम-

वल्लीच्या रसांत सोमदेव असतो व सोमरसाच्या पानानें जो उन्माद येतो तो त्या देवाचा तसा गुण आहे म्हणून येतो असें त्यांना वाटत असे. सोमरसाच्या पानानें उत्पन्न होणारी मनाची स्थिति स्वर्गीय सुखाचा अनुभव देणारी आहे असें त्यांना वाटे व त्या सुखाचा अनुभव आपणांस मिळावा ह्यासाठीं ते सोमदेवाची प्रार्थना करीत. इतर देवांनासुद्धां सोमदेवच ह्या आनंदाचा अनुभव देतो असें त्यांना वाटे.

पवमानाच्या पहिल्याच ऋचेंत सोमदेवाला संबोधून इंद्रासाठीं तूं स्वादिष्ठ आणि मदिष्ठ अशा धारेनें वहा असें सांगितलें आहे.

स्वादिष्ठया[1] मदिष्ठया पवस्व सोम धारया । इंद्राय पातवे सुतः ९. १. १.

पुढील ऋचेंत सोमरसाचे गुण सांगितले आहेत.

स्वादुष्किलायं[2] मधुमाँ उतायं तीव्रः किलायं रसवाँ उतायं ।
उतोन्वस्य पपिवांसमिद्रं न कश्चन सहत आहवेषु ॥

६. ४७. १.

पुढील ऋचेच्या अर्थात तो प्याल्यानें किती तरतरी येते तें सांगितलें आहे.

---

१. हे सोमदेवा, इंद्रानें प्राशन करावें ह्यासाठीं आह्मीं सोमरस काढिला आहे. तरी तूं स्वादिष्ठ व आल्हादकारी अशा धारेनें वाहा.

२. हा सोमरस खरोखर स्वादिष्ठ, गोड, झणझणीत आणि रुचिकर आहे. हा रस प्याल्यानंतर इंद्राच्या अंगीं इतकें सामर्थ्य येतें कीं रणांत त्याचें तेज कोणाला सहन करवत नाहीं.

अयं[1] मे पीत उदियर्ति वाचमयं मनीषामुशतीमजीगः ।
६. ४७. ३.

सोमरसाविषयीं पुरातन ऋषींना इतकी कांहीं आवड उत्पन्न झालेली होती कीं, त्याच्या प्राशनानें सर्व कांहीं प्राप्त होतें असें त्यांना वाटूं लागलें.

अपाम[2] सोमममृता अभूमागन्म ज्योतिरविदाम देवान् ।
किं नूनमस्मान्कृणवदरातिः किमु धूर्तिरमृत मर्त्यस्य ॥
८. ४८. ३.

त्याचप्रमाणें ग्रीक लोकांतही अशा प्रकारचे समज होते. डायोनिसस नांवाचा देव मद्यांत असल्यामुळें आनंदातिशय उत्पन्न करण्याची त्याच्या अंगीं शक्ति आहे असें त्यांना वाटत असे. व मद्यप्राशनानें भविष्य कथन करण्याची शक्ति मनुष्याचे अंगीं येते असाही त्यांचा समज असे. ह्यामुळें मद्यप्राशनाला त्यांच्या धर्माचें अनुमत मिळालें होतें. 'आर्जी[3]' नांवाच्या त्यांच्या

---

१. तो प्याल्यानें माझी वाणी उत्तेजित होते व माझी बुद्धि प्रदीप्त होते.

२. आह्मी सोम प्यालों. आतां आह्मी अमर झालों आहों. देदीप्यमान भुवनांत आमचा प्रवेश झाला आहे व देवांना आह्मीं जाणिलें आहे. हे अमर देवा, आतां कोणता शत्रु आमचें काय करणार आहे ?

३. डायोनिसस झाग्रियस म्हणून त्यांची मद्याधिदेवता होती तिच्या संबंधानें जे उत्सव करीत असत त्यांना 'आर्जी' असें म्हणत. ह्या उत्सवांत स्त्रियांचा मात्र संबंध असे. हिंवाळ्यांत नेमलेल्या दिवशीं शहरांपासून दूर अशा डोंगरांत जवळपासच्या सर्व स्त्रिया जमत व केंस मोकळे टाकून झांजा वाजवीत आणि नाचत. आपल्याकडे नवरात्रांत महालक्ष्मीचे दिवशीं बायका घुमूं लागल्या म्हणजे त्यांचे जसें अंगावर येतें त्याप्रमाणें त्यांची

धर्मसंबंधाच्या मेजवान्या असत त्यांत मद्याचा उपयोग केला जात असे. हल्लींही अशा प्रकारचे लोक अगदीं-च नाहींत असें नाहीं. बर्टन् सांगतो कीं, दहोमे येथील लोकांना दारू पिऊन झिंगणें हें देवांसाठीं मनुष्यानें करावयाचें एक अवश्य कर्तव्य आहे असें वाटतें. आणि आयनो लोकही देवाच्या नांवानें दारू पिऊन आपल्या मद्यप्राशनाला पवित्रपणा आणितात. ते 'सके' नांवाचें मादक पेय पितात. मनुष्य जितका हा पदार्थ अधिक पिईल तितकी त्याची भक्ति अधिक व देवांनाही त्यापासून तितका अधिक संतोष होतो असें त्यांना वाटतें. पालिनिशियांतील लोकांमध्येंही तेथें उत्पन्न होणाऱ्या मादक पेयांच्या संबंधानें अशाच प्रकारच्या कल्पना व समजुती आढळतात. फिजियन् लोकांमध्यें मादक पेयें तयार करितांना व पितांना ईश्वराचीं स्तोत्रें म्हणावयाचीं असतात व मंत्रांचें पठन

---

स्थिति होत असे. ह्या उत्सवांतील अतिपवित्र भाग रात्रीं दिवट्यांच्या उजेडांत होत असे. त्या देवाचा ज्याप्रमाणें अंत झाला होता त्याप्रमाणें त्या देवाच्या जागीं एक बैल आणून त्याला मारीत. त्या बैलाचें शरीर बायका फाडूं लागल्या म्हणजे तो मोठ्यांनीं हंबरडे फोडी तेव्हां ह्या देवाच्याच आरोळ्या असें त्यांस वाटे. बायका दांतांनीं त्या बैलाच्या शरीराचे चावे घेत व त्याचें हिरवेंच मांस खात. तसें करणें हा अतिपवित्र व महत्त्वाचा विधि होता. मग तो मेलेला देव पुन्हा जिवंत होत असे. त्याच्या पुनरुत्थानाचा उत्सव वसंतऋतूंत होत असे. त्यावेळींही स्त्रिया डोंगरांवर जमत व लहान मुलाची प्रतिमा पाळण्यांत घालून बरोबर नेत आणि तेथें मोठा उत्सव करीत. आटिका आणि फोशिया ह्या प्रांतातल्या स्त्रिया पार्नेसस पर्वतावर जमत असत.

करावयाचें असतें. आणि अशा समारंभांना मदत करणें प्रशंसनीय मानिलें जातें.

ह्यावरून स्पष्ट दिसून येईल कीं, सर्वच ठिकाणीं धर्मानें मद्यप्राशनाचा निषेध केला नसून कित्येक ठिकाणीं तर धर्माचें त्याला उत्तेजन आहे व ह्यामुळें प्रवर्तकनीतीच्या दृष्टीनेंही तें अवश्य मानिलें जातें. आयनो लोकांच्या उदाहरणावरून हें चांगलें लक्ष्यांत येईल. त्यांचें सके नांवाचें पेय जे लोक पीत नाहींत त्यांना ते अपवित्र समजतात व त्यांच्याशीं ते कसलाही संबंध ठेवीत नाहींत.

धर्माची संमति मिळाल्यामुळें किंवा तीवांचूनही, प्राथमिक स्थितींतील पुष्कळ लोकांत मादक पेयें पिण्याची चाल आढळून येते.

कालमक लोकांविषयीं पालास सांगतो कीं, ते सवड सांपडेल त्यावेळीं खाण्यापिण्याचे कामांत बेसुमारपणें वागणारे आहेत. क्यांपबेल म्हणतोः—“खोंड लोकांच्या मेजवान्यांत एकूनएक लोक झिंगून जातात.” ब्रेट् लिहितो कीं गयाना येथील नेटिव्ह लोकांत अतिरिक्तपानाची कधींकधीं अगदीं कमाल होऊन जाते. ग्वाटेमाला येथील लोकांची सुखातिशयाची कल्पना म्हटली म्हणजे ‘चिचा’ नांवाच्या मद्याचें अतिपान करून तर्र होऊन पडणें ही होय. अमेरिकेंतल्या हल्लींच्या आद्यावस्थेंतील लोकांवरून तेथल्या पूर्वींच्या लोकांची आठवण होते. पेरूव्हियन् लोकांच्या संबंधानें गार्सिलासो म्हणतोः—“त्यांनीं पुष्कळ दारू आणिली; कारण मद्यप्राशनाचा दुर्गुण इंडियन लोकांमध्यें पुष्कळ पसरलेला हो-

ता." युकाटान येथील लोकांविषयीं लान्डा लिहितो:–
"इंडियन लोक दुराचारी असून पुष्कळ वेळां झिंगलेले आढळत. मेजवान्यांचे प्रसंगीं त्यांच्या बायका देखील झिंगत, परंतु त्या पुरुषांमध्यें मात्र मिसळलेल्या नसत.'
मेक्सिकन् लोकांविषयीं सहागन् लिहितो:—

"ते म्हणत कीं मद्यानें उत्पन्न होणाऱ्या उन्मादाचे वाईट परिणाम मद्याधिदेवतांपैकींच एकीनें घडवून आणिलेले असतात. ह्यावरून मद्याच्या तारेंत असतां मनुष्याचे हातून एकादें पाप घडलें तरी त्याचा दोष त्या मनुष्याकडे नाहीं अशी त्यांची समजूत असावीशी दिसते."

परंतु आद्यावस्थेंतील आणि मध्यमावस्थेंतील सर्वच लोकांत अतिपानाची चाल आहे असें दिसत नाहीं. कित्येक लोक मद्याला मुळींच न शिवणारे व कित्येक उन्माद येईपर्यंत न पिणारे असे आहेत. वेद्दा लोकांविषयीं असें वाचण्यांत येतें कीं "ते तंबाकू देखील ओढीत नाहींत व पाण्यावरच आपली तहान भागवितात."
नेपाळांतल्या लोकांविषयीं क्यांपबेल् म्हणतो:—

"ह्या लोकांना मद्याची आवड आहे, परंतु ते दारूच्या व्यसनांत गढून गेलेले नाहींत."

सुमात्रा बेटाच्या मध्यप्रदेशांतील लोक मलायन् लोकांच्या सहवासानें थोडेसे बिघडले आहेत. तथापि त्यांजबद्दल मार्स्डन् लिहितो:–"ते खाण्यापिण्याचे कामांत नेमस्तपणानें वागणारे असल्यामुळें आहारलेले किंवा झिंगलेले आढळत नाहींत." आफ्रिकेंत देखील अशीं उदाहरणें आढळतात.

"फूला आणि मांडिंगो लोक गोड्या रसाचा उप-

योग करितात, परंतु त्यापासून किंवा इतर पदार्थांपासून बनविलेल्या दारूचा ते बिलकुल उपयोग करीत नाहींत. असल्या दारूचा त्यांना इतका तिटकारा आहे कीं, एखाद्या स्वच्छ वस्त्रावर जर तिचा एक थेंब पडला तर तें पुन्हां धुतल्याशिवाय ते पांघरण्यास घ्यावयाचे नाहींत. आणि वेट्झ ह्यानें पुढें दिल्याप्रमाणें सामान्य विधान केलें आहे.

"युरोपियन लोकांशीं ज्यांचें बरेंच संघट्टन झालें आहे ते लोक शिवाय करून बाकीच्या नीग्रो लोकांना उन्मादकारक मद्याचें फारसें व्यसन दिसत नाहीं."

ह्या शेवटल्या उताऱ्यावरून युरोपियन लोकांच्या सहवासानें बहुतेक ठिकाणचे नेटिव्ह लोक कसे बिघडून गेले आहेत ह्या गोष्टीची आठवण होते, आणि विशेषतः युरोपियन लोक जेथें जातात तेथें व्हिस्की, रम्, वगैरे नानाप्रकारच्या मद्यांचा विपुल पुरवठा होत असल्यामुळें ह्या मद्यांची लोकांना चटक लागण्याला उशीर लागत नाहीं. आपल्याच लोकांचें उदाहरण घ्या. युरोपियन लोक येण्यापूर्वी आपल्या देशांत मद्य किती खपत होतें व हल्लीं किती खपतें तें पहा म्हणजे झालें. पूर्वी गांवठी दारू जितकी उत्पन्न केली जात असे तिच्या अनेकपटीनें हल्लीं उत्पन्न केली जात असून तेवढीनेंही भागत नाहीं. प्रतिवर्षी यूरोपांतून सहस्रावधि पिंपें दारू आपल्या देशांत येत आहे व तिचा फन्ना उडत आहे. तेव्हां मद्यप्राशनाच्या संबंधानें लोकांच्या संवई आणि त्यांच्या सामाजिक स्थिति ह्यांजमधील संबंधाबद्दल अनुमानें काढितांना फार सावधगिरी ठेविली पा-

हिजे. कित्येक ठिकाणीं मादक पदार्थांचा अभाव अस-ल्यामुळें तेथले लोक असल्या व्यसनांपासून मुक्त सांप-डतील. वेद्दा लोकांची अशीच स्थिति आहे. दुसऱ्या कित्येक ठिकाणच्या लोकांचें मद्यप्राशनाचें व्यसन त्यां-च्या सामाजिक स्थितीमुळें उत्पन्न झालेलें नसून परकी लोकांच्या सहवासामुळें तें त्यांना जडलेलें असण्याचा संभव आहे.

मद्यपानाचें व्यसन आणि कांहीं विशेष प्रकारची सामाजिक स्थिति ह्यांचा संबंध असल्यास तो युरोपि-यन लोकांच्या इतिहासांत कदाचित् लवकर दृष्टोत्प-त्तीस येईल. कारण त्या लोकांच्या अनेक शतकांच्या इतिहासाची विश्वसनीय माहिती मिळण्यासारखी आहे. त्यामुळें अनेक ठिकाणच्या लोकांची परस्परांशीं तुलना करण्यास किंवा एकाच ठिकाणच्या लोकांच्या निरनि-राळ्या स्थितींची तुलना करण्यास बरेंच सुलभ जाईल.

स्पार्टन लोकांची समाजव्यवस्था क्रूरपणाची होती, पण त्यांचें खाणेंपिणें अगदीं बेताबाताचें असे. आणि दारूनें झिंगलेल्या लोकांस ज्या शिक्षा केल्या जात अ-सत त्या मनांत आणिल्या म्हणजे स्पार्टन लोक मद्य-पानाचा तिरस्कार करीत असत असें स्पष्ट दिसतें. अ-थीनियन् लोकांची सामाजिक स्थिति बरीच सुधारलेली होती व विद्येनेंही ते स्पार्टन लोकांहून फार श्रेष्ठ होते, परंतु ते मादक पदार्थांच्या व्यसनापासून मुक्त नव्हते. त्या वेळच्या इतर युरोपियन लोकांची सामा-जिक स्थिति अगदीं निकृष्ट होती व त्यांमध्यें मद्यपा-नाचा प्रसार फार होता ह्याविषयीं थोडासा पुरावा सां-

आंगल्* लोकांचें व डेन्स[1] लोकांचें वर्चस्व होतें तेव्हां तर धर्मोपदेशक देखील दारूच्या व्यसनांत गढून गेलेले होते. त्या काळापासून तों नार्मन लोकांची सत्ता संपेपर्यंत तोच प्रकार चालला होता. विजयी नार्मन लोकही पराजित इंग्लिश लोकांप्रमाणेंच मद्यपी बनले. त्या लोकांनाही पूर्वी मद्यपान अगदींच माहीत नव्हतें असें नाहीं. तथापि इंग्लिश लोकांच्या सहवासानें त्या त्यांच्या व्यसनाला आणखी उत्तेजन मिळालें. त्यानंतरच्या काळांतही मद्यपानाचें व्यसन म्हणण्यासारखें कमी झालें नाहीं. फरक एवढाच पडला कीं पूर्वी जो अतिमादक मद्यांचा उपयोग होत असे तो किंचित् सौम्य मद्यांचा होऊं लागला. गेल्या शतकाच्या आरंभीं मद्यपानाचें व्यसन फारच फैलावलें होतें. देशांत प्रतिवर्षी जें मद्य खपे तें त्यावेळच्या लोकसंख्येवर विभागून दिलें असतां दर माणशीं एक ग्यालन पडे. त्या काळांत दारूच्या झिंगींत मद्यपी लोकांच्या हातून जीं कृत्यें घडत असत त्यांचें होगार्थ[2] ह्यानें आपल्या 'मद्यवीथिके' त उत्कृष्ट तऱ्हेचें चित्र दिलें आहे. ह्या व्यसनाचा जोर मोडण्यासाठीं त्यावेळीं दारूच्या संबंधानें एक कायदाही करण्यांत आला होता, परंतु तो लवकरच रद्द करण्यांत आला. ह्या कायद्याचा कांहींएक उपयोग न होतां

---

* आंगल् लोकांनीं पांचव्या शतकांत इंग्लंडावर आपलें वर्चस्व स्थापित केलें होतें.

१. डेन्स लोकांनीं नवव्या शतकांत इंग्लंडावर आपलें वर्चस्व स्थापित केलें.

२. होगार्थ हा अठराव्या शतकांतील एक उत्कृष्ट चित्रकार व कवि होता.

उलट त्यापासून अपकार मात्र झाला. गेल्या शतकांत हें व्यसन मध्यम स्थितींतील व खालच्या वर्गांतील लोकांत अगदीं साधारण होऊन गेलें होतें. श्रीमंत लोकांत तर त्याची कमालच झाली होती. मेजवान्यांचे वेळीं व इतर विशेष प्रसंगीं ते मद्याचा इतका उपयोग करीत असत कीं, त्यामुळें भिकेस लागलेल्या लोकांचीं पुष्कळ उदाहरणें घडून येत.

मद्यपानाचें व्यसन आणि समाजाच्या उत्क्रमणाच्या निरनिराळ्या अवस्था ह्यांमध्यें कांहीं संबंध असावा असें वाटत नाहीं. कदाचित् असलाच तर तो सहज दृष्टोत्पत्तीस येण्यासारखा तरी नाहीं. कित्येक मद्यपाननिषेधक मंडळ्यांच्या अभिमानी लोकांत जो समज दिसून येतो तो खरा असण्याचा संभव नाहीं. त्यांना असें वाटतें कीं ह्या व्यसनाविषयीं पराङ्मुखता आणि सुधारणा किंवा नीतिमत्ता हीं समप्रमाणांत असतात. ज्या प्रमाणानें लोक ह्या व्यसनाच्या अधीन असतील त्याप्रमाणानें त्यांमध्यें अनीति आढळून येईल असें त्यांचें म्हणणें आहे. सर्जन जनरल बाल्फर म्हणतोः—" एशिया खंडांतील लोकांच्या निंमे जाति—आरब, पर्शियन्, हिंदु, ब्रह्मी, मलायन् आणि सयामीज ह्या लोकांच्या अनेक पोटजाति—मद्याचा निषेध करणाऱ्या आहेत." तथापि सामाजिक सुधारणेंत किंवा नीत्याचारांत त्या मद्यपानासक्त युरोपियन लोकांहून श्रेष्ठ आहेत असें कोणीही म्हणणार नाहींत. यूरोपांतल्या यूरोपांतच निरनिराळ्या राष्ट्रांची तुलना केली असतांही तीच गोष्ट स्पष्ट दिसून येईल. मद्यापासून बराच अलिप्त राहणारा

टर्की देश हरएक गोष्टींत, व्हिस्की दारूंत बुडून मेले-ल्या स्कॉटलंडाच्या किती तरी मागें आहे. त्याचप्र-माणें इताली आणि जर्मनी ह्या दोन देशांची तुलना केली असतां दिसून येईल. इतालियन् लोकांत मद्यपा-नाचा फारसा प्रसार नाहीं. परंतु जर्मन् लोकांत त्या व्यसनाचा बराच फैलाव आहे. तथापि सुधारणेंत व नीतिमत्तेंत इतालियन् लोक जर्मन् लोकांच्या किती-तरी खालीं आहेत. हीच गोष्ट विशेष स्पष्ट रीतीनें ल-क्ष्यांत येण्याकरितां आणखी दोन लोकांची तुलना करूं. एका बाजूला बेडुइन लोक घ्या व दुसऱ्या बाजूला इं-ग्लिश कारागीर लोक घ्या. बेडुइन लोक वरचटलेले चोर असून त्यांच्या आचरणांत अनेक प्रकारचे दुर्गुण दिसून येतात. पण मद्यपानाच्या संबंधानें पाहिलें तर ते उन्मादकारक दारूचा मुळींच उपयोग करीत ना-हींत व दारूबाज मनुष्य म्हणजे अगदीं पतित असें त्यांना वाटतें. इकडे इंग्लिश कारागिराकडे पाहिलें अ-सतां तो पुष्कळ वेळां झिंगलेला आढळतो. आणि बहु-तकरून जितका मनुष्य कसबी अधिक तितका त्याला दारूचा नादही अधिक, असें आढळून येतें. पण एव-ढी गोष्ट एका बाजूला ठेविली असतां तो मनुष्य बहु-तकरून इतर व्यवहारांत फार चोख असतो. ह्यावरून स्पष्ट दिसून येईल कीं, ह्या व्यसनाचा आणि दुराचर-णाचा कित्येकांना वाटतो तसा संबंध असण्याचा सं-भव नाहीं.

मद्यपानाचें व्यसन आणि दैन्यावस्था ह्यांमध्यें मात्र थोडाबहुत संबंध असण्याचा संभव दिसतो. मनुष्याला

आपलें जीवित कष्टमय वाटूं लागलें म्हणजे त्याला दारू प्यावी असें वाटेल. प्रस्तुतच्या व पुढल्या दुःखद स्थितीचे विचार डोक्यांतून घालविण्यासाठीं त्याला दारूशिवाय दुसरा उपाय दिसत नाहीं. शिवाय ती पितांना क्षणिक आनंदाचा अनुभव असतोच. तथापि ह्या कारणावांचून लोकांना मद्याची चटक लागणार नाहीं असें नाहीं. गेल्या शतकांत इंग्लंडांतल्या वरच्या वर्गांतील लोकांत मद्यपानाचें व्यसन जें इतकें बोकळलें होतें त्याला वरचें कारण लागू पडण्याचा संभव नाहीं. मानसिक दुःखांमुळें आयुष्याला कंटाळलेल्या लोकांचीं तुरळक उदाहरणें वरच्या वर्गांतील लोकांत सुद्धां आढळतात, परंतु सामान्यतः त्या लोकांना कसली काळजी नसते. त्यांना दारूचें व्यसन लागण्याला दुसरेंच कांहीं तरी कारण असलें पाहिजे. कांहीं काम नसलें म्हणजे जो एका प्रकारचा अस्वस्थपणा उत्पन्न होत असतो त्यानें मनाची हुरूप जाऊन शरीराला एका प्रकारची ग्लानि येत असते. अशा स्थितींत दारू पिऊन अंगांत तरतरी आणावी असें मनुष्याला वाटणें साहजिक आहे. श्रीमंत लोकांना मद्यपानाचें व्यसन जडण्याला बहुधा हें कारण असतें. आणि फार प्राचीन काळीं सगळ्या यूरोपखंडभर हें व्यसन जें इतकें फैलावलें होतें त्याचें पुष्कळ अंशीं हेंच कारण असावें. लढाईचें किंवा शिकारीचें काम नसलें म्हणजे त्या स्थितींतल्या लोकांना वेळ कसा घालवावा ह्याची पंचाईत पडते. आणि दारूच्या गुंगींत पडून राहणें त्यांस बरें वाटतें. अशा स्थितींतल्या तरी सगळ्याच लोकांत ह्या व्यसना-

चा शिरकाव होतो असें नाहीं. पुष्कळ जाति अशा आढळून येतात कीं, त्यांतील लोकांचा आयुष्यक्रम अगदीं कंटाळवाणा असतो, परंतु ते लोक ह्या व्यसनाच्या नादीं लागत नाहींत. ह्यावरून असें दिसतें कीं, अनेक कारणांमुळें ह्या व्यसनाकडे मनुष्याची प्रवृत्ति होत असते आणि त्या कारणांचीं कार्यें इतकीं अनियमित रीतीनें घडून येणारीं आहेत कीं त्यांजबद्दल कांहीं सामान्य अनुमानें निघणें शक्य नाहीं.

परंतु आपणांस विशेषतः अत्याहार आणि अतिपान ह्यांविषयीं लोकांच्या नीतिविषयक समजुती कशा आहेत हें पहावयाचें आहे. शुद्धनीतीच्या दृष्टीनें ह्या दोन्ही गोष्टी अनीतिकारक मानिल्या पाहिजेत हें उघड आहे. कारण शुद्धनीतीला त्यांजविषयीं समजुती काय आहेत हें न पाहतां त्यांचें परिणाम काय होतात हें पहावयाचें असतें. त्या दोहोंपासूनही शरीरावर व मनावर वाईट परिणाम घडत असतात ह्याविषयीं कोणाला संशय नाहीं. आणि ह्या परिणामांमुळेंच त्यांना अनीतीचे सदरांत घातलें पाहिजे. परंतु प्रवर्तकनीतीच्या समजुतींची गोष्ट निराळी आहे. लोकांचे धर्मविचार व सामाजिक रीतिभाति ह्यांवर त्या अवलंबून असतात. कित्येक ठिकाणीं ह्या दोहोंच्याही संबंधाचा अतिरेक प्रशंसनीय मानिला जातो व दुसऱ्या कित्येक ठिकाणीं तिरस्करणीय मानिला जातो.

अतिपानापासून उत्पन्न होणाऱ्या उन्मादाला धर्मविषयक समजुतींनीं पवित्रता आल्याचीं कित्येक उदाहरणें पूर्वीं दिलींच आहेत. ह्या ठिकाणीं, लोकांना अति-

पानाची चटक लागलेली असल्यास त्या व्यसना-
विषयीं हळूहळू लोकमत अनुकूल होत जातें व काला-
न्तरानें त्याला समाजाचें अनुमत मिळतें हें दाखवाव-
याचें आहे. अशिक्षित लोकांमध्यें असें एक उदाहरण
आढळण्यांत आलें आहे. तें दारूच्या संबंधाचें नसून
दुसऱ्या एका मादक पदार्थाच्या संबंधानें आहे. त्या
पदार्थाचें सेवन करण्याला त्या लोकांना समाजाची सं-
मति मिळाली आहे एवढेंच नव्हे, तर तसें करणें भूष-
णास्पद मानिलें जातें. क्रासिया लोकांच्या संबंधानें यूल
म्हणतो:—

"परकी मनुष्य ह्या लोकांत आला म्हणजे पहि-
ल्यानें त्याचें पानतंबाकूचें व्यसन त्याच्या लक्ष्यांत येतें.
ह्या व्यसनाचा त्यांना अतिशयच चाळा आहे आणि
त्यामुळें त्यांचे दांत आणि ओंठ अगदीं घाणेरडे होऊन
गेलेले असतात. तथापि त्यांना त्याबद्दल खंत न वाटतां
उलट अभिमानच वाटतो. ते मोठ्या डौलानें म्हणतात
'कुत्र्यांचे आणि बंगाली लोकांचे दांत पांढरे असतात.'"

प्राचीन काळच्या सुधारलेल्या लोकांत अतिपानाब-
द्दल तिरस्कार वाटत नसून उलट अभिमान वाटत असे
ह्याबद्दल थोडासा पुरावा मिळतो. सोमरसाचें प्राशन क-
रण्याला धर्माची संमति होती ही गोष्ट एका बाजूला
ठेवून विचार केला असतांही पुरातन ऋषींना सोमरसा-
च्या पानापासून येणारा उन्माद अत्यंत प्रिय वाटत
होता असें दिसून येतें.* हिंदु लोकांच्या शेजारीं रा-

---

* ऋग्वेदादि ग्रंथांत ज्या 'सोम' रसाचें वर्णन केलें आहे
तो मद्यासारखाच पदार्थ असून त्यांत मद्याचे सर्व गुण होते असा

हणाऱ्या पार्शियन् लोकांतही मद्यपानाचें व्यसन भूषणा-स्पद मानिलें जात होतें. डरायस हिस्टास्पीज* म्हणून जो त्यांचा राजा होऊन गेला त्याच्या थडग्यावरील लेखांत त्याच्या गुणांचें वर्णन करितांना तो वस्ताद दारू पिणारा होता असा उल्लेख केला आहे. मृत्युलेखांत मनुष्यांच्या गुणांचाच नेहमीं उल्लेख केला जात असतो. आणि त्याच्याच शेजारीं त्याच्या विजयशालितेचेंही वर्णन केलें आहे हें लक्ष्यांत आणिलें म्हणजे त्याचा गौरव करावा असाच तो लेख लिहिणाराचा उद्देश होता असें स्पष्ट दिसतें. त्याचप्रमाणें सायरस† ह्यानें जी

---

युरोपियन लोकांचा समज आहे. आपलेकडील जुन्या लोकांचें असें मत आहे कीं, सोमरसाला जरी मदिष्ठ असें विशेषण दिलेलें आहे, तरी 'मद' शब्दानें उन्माद समजावयाचा नव्हे. मद शब्द हर्षवाचक घेतला पाहिजे. चित्तवृत्ति उल्हसित करण्याचा त्याच्या अंगीं गुण असून मद्याप्रमाणें उन्माद आणण्याचा दोष त्याच्या अंगीं नव्हता.

* हा पहिला डरायस होय. तो इसवी सनाचे अगोदर पांचशें वर्षांच्या सुमारानें झाला. त्याला राज्य कसें मिळालें त्यासंबंधानें एक चमत्कारिक गोष्ट आहे. डरायस व आणखी सहा सरदार मिळून सात असाम्यांनीं इराणच्या पूर्वीच्या राजावर उठून बंड केलें व त्याला त्यांनीं युद्धांत मारिलें. पुढें राज्य कोणीं घ्यावें ह्याबद्दल वाद पडला. तेव्हां एका नेमलेल्या दिवशीं सकाळीं ज्याचा घोडा सर्वांचे अगोदर खिंकाळेल त्याला राजपद द्यावें असा सर्वांनीं ठराव केला. त्यांत डरायस ह्याचा घोडा पहिल्यानें खिंकाळला म्हणून बाकीच्यांनीं तें राज्य त्याचे स्वाधीन केलें.

† पार्शियांत सायरस नांवाचे दोन प्रसिद्ध मनुष्य झाले त्यांतला हा दुसरा. पहिल्यानें पार्शियन् बादशाहीची स्थापना केली आणि हा दुसरा दुसऱ्या डरायसचा मुलगा व आर्टक्झर्क्झीस ह्याचा धाकटा भाऊ होता. ज्यावे-

आत्मप्रशंसा केली आहे तींत त्यानें ह्या गुणाचा उल्लेख केला आहे. आपल्या भावापेक्षां आपण राजपदाला अधिक योग्य आहों हें स्पार्टन् लोकांना कळवून त्यांजकडून मदत मागण्यासाठीं त्यानें त्यांजकडे एक खलिता पाठविला होता त्यांत तो लिहितोः—“ माझ्या भावापेक्षां माझे अंगीं दुसरे पुष्कळ गुण अधिक आहेत, पण मुख्यत्वेंकरून पुष्कळ मद्य पिण्याचें माझ्या अंगीं सामर्थ्य आहे ह्यासाठीं मीच राजपदाला अधिक योग्य आहें. ” मद्यपानाचें व्यसन लोकांत रूढ असलें म्हणजे त्याला समाजाची कशी अनुमति मिळते हें यूरोपखंडांतील लोकांच्या स्थितीवरून जितकें स्पष्ट होईल तितकें दुसऱ्या कोणत्याही उदाहरणानें होणार नाहीं. प्राचीन काळापासून हल्लींच्या काळापर्यंत जर्मन् लोकांची ह्या व्यसनावर फार आसक्ति आहे. त्यांच्या तरुण विद्यार्थ्यांमध्यें मद्याची विलक्षण आवड दिसून येते, व सांगितलें असतां खरें देखील वाटणार नाहीं इतकें मद्य जिरविण्याची संवईनें त्यांच्या अंगीं शक्ति आलेली आहे. एकादा विद्यार्थी जर ह्या कामांत इतरां-

---

ळीं आर्टेक्झर्झीस गादीवर बसला त्यावेळीं सायरस स्वतः गादी बळकाविण्याचा प्रयत्न करीत होता परंतु त्याला यश आलें नाहीं. त्याचा भाऊ त्यावेळीं त्याला ठार मारणार होता परंतु आईच्या विनवणीवरून त्यानें त्याला क्षमा केली. पुढें त्यानें त्याला एका प्रांताची सुभेदारीही दिली, परंतु हे सर्व उपकार विसरून त्यानें पुष्कळ सैन्य जमविलें व ग्रीक लोकांकडून मदत मिळवून उघडपणें बंड केलें. त्या दोघां भावांत भयंकर युद्ध होऊन त्यांत सायरसच मारिला गेला. ही गोष्ट इसवी सनाच्या पूर्वीं ४०१ ह्यावर्षीं घडून आली.

पेक्षां बराच कमी असला तर त्याची अगदीं फजीती उडून जाते आणि सर्वांवर ताण करणारा जो विद्यार्थी असेल त्याची मोठी वाहवा होते. इंग्लिश लोकांत देखील गेल्या शतकांत अशाच कल्पना व समजुती आढळून येत होत्या. जीं मनुष्यें अतिपानासक्त नसत तीं दुर्दैवी असें लोकांना वाटत असे. तहान लागावी म्हणून कित्येक लोक मीठ खात असत व दारूच्या ग्लासांत एक टिपूस देखील उरवितां कामा नये अशी सर्वांना विनंति केली जात असे ह्यावरून त्यावेळच्या स्थितीची कल्पना करितां येईल. तहान राखून पिणाऱ्या माणसाची जिकडेतिकडे नाचक्की होई व तीन बाटल्या निजविणाराचें नांव सर्वतोमुखीं होत असे. इंग्लंडांत अजून कांहीं म्हातारे लोक जिवंत आहेत, त्यांनीं त्या वेळच्या रात्रीची चैन उडविणाऱ्या मेळ्यांत मौज मारलेली आहे. नियमित मित्रमंडळी जमली व दरवाजा लागला म्हणजे मंडळी असेल त्या अजमासानें यजमान दारूच्या बाटल्या काढी व उठण्यापूर्वीं इतक्या रिकाम्या झाल्या पाहिजेत असें मंडळीस सांगे. आणि मग जर कोणी आपल्या वांटणीचें संपविण्यास कांकूं करूं लागला तर त्याची थट्टा होत असे. *

---

* परलोकवासी जान बाल, एफ्. आर. एस्., हा बेलफास्ट शहरानजीक एका खेड्यांत राहत असे. तो क्याथोलिक पंथाचा होता पण एका श्रीमंत प्राटेस्टंट पंथाच्या घराण्याशीं त्याचा चांगला घरोबा होता. त्या घराण्यांत एक वृद्ध गृहस्थ होता त्याविषयीं घरांतल्या व शेजारच्या सर्व मनुष्यांची पूज्यबुद्धि असे. बाल साहेब लहान असतांना त्यावर त्याची फार प्रीति असे. एके दिवशीं जेवणें झाल्यावर त्या वृद्धगृहस्थानें बाल

मागच्या पिढ्यांत इंग्लंडांत अतिपानाला अनुकूल अशा प्रवर्तकनीतीच्या समजुती होत्या परंतु त्या हळूहळू नाहींशा होऊन हल्लींच्या पिढींत उलट समजुती उत्पन्न झाल्या आहेत. आणि हल्लीं शुद्धनीतीच्या व प्रवर्तकनीतीच्याही दृष्टीनें दारू पिणें लोकांस तिरस्करणीय वाटूं लागलें आहे. अतिपानाविषयीं तर फारच तिटकारा उत्पन्न झालेला आहे व सगळ्या जन्मांत जरी मनुष्य एकदांच झिंगून पडलेला असला तरी तेवढ्यानेंही त्याच्या कीर्तीला जो डाग लागतो तो कधीं निघत नाहीं. ही अतिपानाची गोष्ट झाली. परंतु मितपानाचाही निषेध करणारी मंडळी हल्लीं बरीच तयार होत आहे, आणि अमेरिकेंत तर जेवणाचेवेळीं बहुतेक लोक पाण्यानेंच आपली तहान भागवितात. जेवणाचेवेळीं दारूचा उपयोग करणें आतां तेथें प्रतिष्ठित मानिलें जात नाहीं.

---

साहेबाला एकीकडे एका खोलींत नेलें आणि प्रेमानें त्याच्या पाठीवर थोपटून म्हणालाः—" मला तुझ्या दारूबद्दल तुजजवळ बोलावयाचें आहे. तूं प्यावी तितकी दारू पीत नाहींस हें बरें नव्हे. आतां माझा उपदेश ऐक. तूं लहान आहेस तोंच चांगली संवय करून ठेव म्हणजे तुला जन्मभर ह्या कामांत सभ्य मनुष्याला शोभण्यासारखें वर्तन करण्यास कठिण पडणार नाहीं." ही हकीकत बाल साहेबानें स्वतः **स्पेन्सर** साहेबांस सांगितली.

# प्रकरण १३

## वैवाहिक नीति

ह्या शब्दाचा सामान्य अर्थ घेतला असतां विवाहित स्त्रीपुरुषांनीं परस्परांशीं कोणत्या रीतीचें वर्तन करावें ह्यासंबंधानें लोकांच्या कल्पना, मनोविकार व समजुती ह्यांचा बोध होईल. परंतु प्रस्तुत प्रकरणांत ह्या शब्दाचा उपयोग एका विशेष अर्थानें करावयाचा आहे. कामवासनेच्या तृप्तीसाठीं स्त्रीपुरुषें परस्परांशीं जो संबंध करितात—मग तो संबंध उघडपणें विवाह होऊन घडून येणारा असो किंवा कांहीं मुदतीपर्यंत अथवा एका प्रसंगापुरताच मानसिक विवाह होऊन घडून येणारा असो—त्याविषयीं लोकांच्या कल्पना, मनोविकार व समजुती ह्यांचा वाचक हा शब्द समजला जाईल. ह्या विशेष अर्थाकडे लक्ष्य देऊन वैवाहिक नीतीचा विचार ह्या प्रकरणांत करावयाचा आहे.

वैवाहिक नीतीचा नीतिदृष्टचा विचार करण्यापूर्वीं जीवशास्त्राच्या व समाजशास्त्राच्या दृष्टीनें तिचा विचार केला पाहिजे. उत्क्रान्तनीतीच्या दृष्टीनें सद्वर्तनाची कसोटी म्हटली म्हणजे त्या वर्तनापासून व्यक्तीचें, समाजाचें किंवा उभयतांचेंही हित झालें पाहिजे. तेव्हां कोणत्याही समाजांत पातिव्रत्य व एकपत्नीव्रत ह्यांची अवश्यकता कितपत आहे हें पहावयाचें असल्यास त्यांना वरील कसोटी लावून त्यांजपासून परिणाम काय होतील हें पाहिलें पाहिजे.

मनुष्येतर प्राण्यांप्रमाणेंच मनुष्यांमध्येंही जातीच्या हिताकडे लक्ष्य देऊन स्त्रीपुरुषांमधील कोणत्याही प्रकारच्या संबंधाची इष्टानिष्टता ठरविली पाहिजे. अमुक-एक प्रकारच्या संबंधानें जर एकाद्या जातीच्या प्राण्यांत मुलांची संख्या कमी होण्याचा अथवा त्यांच्या शारीरिक किंवा मानसिक शक्ति क्षीण होत जाण्याचा संभव असेल तर त्यासंबंधानें प्राण्यांच्या त्या जातीला निकृष्टावस्था येऊन ती नष्ट होण्याच्या पंथास लागेल. कित्येक जातींच्या प्राण्यांत एक नर एका मादीशींच संबंध ठेवितो व कित्येकांत अनेक माद्यांशीं ठेवितो. ह्या मनुष्येतर जीवसृष्टींत स्वाभाविकपणें घडून येणाऱ्या गोष्टीचा खुलासा अशा रीतीनेंच होण्यासारखा आहे. ज्या प्राण्यांच्या सभोंवतालच्या स्थितीमुळें जातीच्या उत्कर्षाला एका नरानें एकाच मादीशीं संबंध ठेवणें जरूर पडलें त्या प्राण्यांची तसें करण्याकडे प्रवृत्ति झाली असेल व ज्यांच्या परिस्थितीमुळें एका नरानें अनेक माद्यांशीं संबंध ठेवणें हितावह झालें त्यांची तशीच प्रवृत्ति झाली असेल. ज्या जातींतील प्राण्याची अवश्य त्या प्रकारची प्रवृत्ति झाली नसेल त्या नष्ट झाल्या असतील किंवा नष्ट होण्याच्या पंथास लागल्या असतील. "समाजशास्त्राचीं मूलतत्त्वें" ह्या ग्रंथांत असें दाखविण्यांत आलें आहे कीं, परिस्थितीच्या मानानें स्त्रीपुरुषांमधील संबंध निरनिराळ्या प्रकारचे बनत असतात. आणि कित्येक प्रसंगीं सुधारलेल्या मनुष्याच्या दृष्टीनें अनीतिकारक संबंधही एकाद्या समाजाला अत्यवश्यक असूं शकेल व त्या समाजांतील स्त्रीपुरुषां-

नीं तसा संबंध न ठेवणें हें त्याच्या नाशास कारण हो-
ऊं शकेल. त्याच ठिकाणीं आणखी असें दाखविण्यांत
आलें आहे कीं, एका पुरुषानें अनेक स्त्रियांशीं लग्न क-
रण्याची चाल व टोळ्यांटोळ्यांतील सतत चालणाऱ्या लढा-
यांमुळें होणारा पुरुषजातीचा संहार ह्या गोष्टींचा स्वाभा-
विक संबंध आहे. कारण दोन टोळ्यांतील लोक जर
परस्परांमधील वैमनस्यामुळें एकमेकांचा निःपात करूं
लागले व त्यांपैकीं एका टोळींतील लोकांमध्यें एका पु-
रुषानें पाहिजे तितक्या बायका करण्याची चाल असली
व दुसऱ्या टोळींतील लोकांमध्यें एका पुरुषानें एकच
बायको करण्याची चाल असली, तर दुसऱ्या टोळीं-
तील लोकांचा पहिल्या टोळींतील लोकांपुढें फार दिवस
निभाव लागणार नाहीं. पहिल्या टोळींतील सर्व बाय-
कांना मुलें होतील व त्या टोळींतील कितीही पुरुष मेले
तरी त्यांची जागा भरून काढण्यास नवीन पाहिजे ति-
तके पुरुष तयार होतील. परंतु दुसऱ्या टोळींतील पु-
ष्कळ बायका लग्नावांचून राहतील व मेलेल्या लोकांची
जागा भरून काढण्यास पुरेतसे पुरुष तयार होणार
नाहींत. कित्येक ठिकाणीं व विशेषतः टिबेटांत एका
स्त्रीनें अनेक नवरे करण्याची जी चाल आहे तीच त्या
लोकांच्या स्थितीच्या मानानें त्यांना फायदेशीर आहे.
वैवाहिक नीतीच्या दुसऱ्या कोणत्याही स्वरूपापेक्षां हें
स्वरूपच त्यांस हितावह आहे. त्या देशांत प्रवास क-
रणाऱ्या अनेक परदेशीय गृहस्थांनीं त्यांच्या ह्या
चालीबद्दल अनुकूल अभिप्राय दिले आहेत. एक ख्रि-
स्तीधर्मोपदेशक देखील तिचें समर्थन करितो. त्या धर्मो-

पदेशकाचें असें मत आहे कीं, नापीक देशांत लोकसं-
ख्येची विपुलता असणें हें एक मोठें अनर्थावह अनि-
ष्टच आहे. कारण त्यापासून लोकांमध्यें नेहमीं लढाया
तरी सुरू राहतात किंवा त्यांची एकसारखी उपासमार
तरी चाललेली असते.

हे स्त्रीपुरुषांमधील संबंध ठरविणारे विवाहाचे गौण
प्रकार सुधारलेल्या लोकांतील एकपत्नीकत्वाच्या चाली-
मुळें उत्पन्न झालेल्या नीतिविषयक समजुतींशीं जुळ-
ण्यासारखे नाहींत. सुधारलेल्या लोकांची स्त्रीपुरुषांच्या
शुद्धाचरणाविषयीं समजूत म्हटली म्हणजे मनुष्यानें एक
अविवाहित तरी रहावें—अर्थात् कोणत्याही व्यक्तीशीं
वैवाहिक संबंध ठेवूं नये—किंवा एक स्त्री आणि एक
पुरुष ह्यांनीं परस्परांशीं विवाह करून तो संबंध सदो-
दित पाळावा. परंतु सुधारलेल्या लोकांचे वैवाहिक नी-
तीविषयीं उन्नत विचार रानटी किंवा अर्धवट रानटी
लोकांस लागू पडणार नाहींत. विवाहाचे गौण प्रकार
सुधारलेल्या मनुष्याच्या मनांत ज्याप्रमाणें तिरस्कार
किंवा किळस उत्पन्न करितात त्याप्रमाणेंच ते त्या लो-
कांच्याही मनांत करीत असतील असें गृहीत घेतां का-
मा नये. हें नीट समजण्याकरितां वस्तुस्थितिदर्शक अ-
नेक उदाहरणें घेऊन पाहिलें पाहिजे.

पुष्कळ ठिकाणच्या लोकांना बहुपत्नीकत्वाची चाल
नीतीला धरून आहे व एकपत्नीकत्वाची चाल नीतीला
सोडून असल्यामुळें त्याज्य आहे असें वाटतें. अपुरत्या
शिक्षणामुळें मनुष्याच्या आचारविचारांतील वैचित्र्याचें
ज्ञान ज्यांस झालें नाहीं त्यांना ही गोष्ट वाचून मोठा

अचंबा वाटेल. परंतु तसा अचंबा वाटण्याचें कांहीं कारण नाहीं. लहानपणापासून धर्मपुस्तकांतील गोष्टी ऐकण्याची व वाचण्याची पुष्कळांस हौस असते व त्यांतील आचारविचारांविषयीं मनुष्याचे मनांत स्वाभाविक पूज्यबुद्धि उत्पन्न होते. त्या गोष्टी मनुष्य श्रद्धेनें वाचीत असतो व त्यांस ईश्वराचें अनुमोदन आहे असें त्याच्या मनानें घेतलेलें असतें; त्यामुळें त्या सद्यःस्थितीहून भिन्न असल्या तरी त्यांची विपरीतता त्यास भासत नाहीं. परंतु तसलेंच प्रस्तुतकालीं घडून येणारें एकादें उदाहरण त्याच्या ऐकण्यांत किंवा वाचण्यांत आलें तर त्याला तें लागलेंच विपरीत वाटतें. कोणत्याही प्राचीनधर्मपुस्तकांत अशीं पुष्कळ उदाहरणें सांपडतील. बायबलांत वर्णिलेल्या पुरातन लोकांच्या बहुपत्नीकत्वाविषयीं कोणत्याही ख्रिस्ती मनुष्याच्या मनांत किळस उत्पन्न होत नाहीं. आणि एकाद्या स्त्रीनें आपल्या नवऱ्याला अंगवस्त्र ठेवण्यासाठीं अनुमोदन किंवा उत्तेजन दिलें तर तिला ती चाल पसंत आहे हें तिनें न बोलतां कबूल केल्यासारखें होतें. ह्या पुरातन लोकांमध्यें तशी चाल होती एवढाच बायबलांत उल्लेख आहे, पण तिला धर्माचें व समाजाचें अनुमत होतें कीं नाहीं ह्याबद्दल कांहीं सांगितलें नाहीं. तथापि डेव्हिडाच्या संबंधानें जी माहिती दिली आहे तीवरून त्यावेळच्या लोकस्थितीचें स्पष्ट अनुमान करितां येतें. त्याच्या जनानखान्याला धर्माची व समाजाची अनुज्ञा होती. “ डेव्हिडाला देवानें त्याच्या धन्याच्या बायका दिल्या ” व “ डेव्हिड हा देवाच्या मनाप्रमाणें मनुष्य होता ” अ-

शीं वाक्यें बायबलांत आहेत. ह्या वाक्यांवरून धर्माची अनुज्ञा ध्वनित होते. व नेथनानें डेव्हिडाची जी निर्भर्त्सना केली ती युरियाच्या एकुलत्या एक बायकोला नेल्याबद्दल केली. त्यापूर्वींच त्याच्या पुष्कळ बायका होत्या ह्या गोष्टीबद्दल केली नाहीं. ह्यावरून त्या गोष्टीविषयीं समाजाची अनुज्ञा व्यक्त होते. कारण त्यावेळीं नेथनाच्या मनांत डेव्हिडाची निंदा करावयाची होती, व पुष्कळ बायका करणें हें जर लोकरीतीच्या विरुद्ध असतें तर त्याचा उल्लेख केल्यावांचून तो राहताना. हल्लीं ज्याप्रमाणें रानटी व अर्धवट रानटी लोकांत राजे लोकांच्या पुष्कळ बायका असतात व पुष्कळ बायका असणें हें वैभवाचें लक्षण समजलें जातें त्याप्रमाणेंच त्यावेळींही समजलें जात असावें. ह्यावरून असें अनुमान निघतें कीं कांहीं विशेष प्रकारच्या सामाजिक स्थितींत उन्नत विचारांच्या दृष्टीनें अनीतिमूलक अशा बहुपत्नीकत्वाविषयीं अनुकूल मनोविकार व समजुती लोकांत उत्पन्न होत असतात.

एका स्त्रीनें अनेक पति वरण्याच्या चालीचीही तीच स्थिति आहे. प्राचीन हिंदुलोकांत ही चाल लोकमान्य होती असें ध्वनित करणारीं महाभारतांत अनेक स्थळें आहेत.* व ज्यांचे सद्गुण अनुकरणीय मानिले जातात

---

* बहुपतिकत्वाची चाल प्राचीन हिंदु लोकांत होती असें ध्वनित करणारीं स्थलें महाभारतांत वरींच आहेत असें **स्पेन्सर** साहेबांनीं म्हटलें आहे, त्याबद्दल महाभारताचें काळजीपूर्वक अवलोकन केल्यावांचून मत देतां येणार नाहीं. 'एकस्य बह्व्योजाया भवन्ति नैकस्यै बहवः सहपतयः' असें श्रुतिवचन आहे तेव्हां श्रुतिकालींही अनेक पति करण्याची चाल लोक-

अशा स्त्रियांनीं तसें आचरण केलें आहे. त्या काव्यांतील नायिका जी द्रौपदी ती पांच भ्रतारांची भार्या होती. त्या प्रत्येकाचें आरामस्थान निरनिराळें असून ती पाळीपाळीनें प्रत्येकाजवळ दोन दोन दिवस राहत असे. युधिष्ठिराचें एका ठिकाणीं असें वचन आहे कीं, "परिणामाकडे लक्ष्य न देतां जें वर्तन योग्य असेल तें करावें." व द्रौपदीनें एका ठिकाणीं पातिव्रत्याचें वर्णन केलें आहे व आपलें वर्तन तदनुरूप आहे असें ध्वनित केलें आहे. हिमालयाच्या खिंडींत राहणारे लडाखी व चांफा म्हणून लोक आहेत त्यांच्यामध्यें ही चाल हल्लीं चालत आहे. ड्रू नांवाचा प्रवासी त्या लोकांच्या व-

---

मान्य नसावी असें दिसतें. तथापि द्रौपदीला पांच भ्रतार होते ही गोष्ट मोठ्या महत्त्वाची आहे असें परकीयांस वाटणें साहजिक आहे. लहानपणापासून पूज्यबुद्धीनें असल्या गोष्टी वाचीत व ऐकत गेल्यामुळें त्या गोष्टींवरून आह्मांस इतर विचार सुचत नाहींत. पांच पांडव आणि द्रौपदी हीं अलौकिक मनुष्यें असल्यामुळें त्यांच्या वर्तनावरून त्यावेळच्या लोकस्थितीची कल्पना करितां येत नाहीं असें आपलेकडील श्रद्धावान् लोकांचें म्हणणें आहे.परंतु त्यानें मनाचें समाधान होत नाहीं.अलौकिक मनुष्यें झालीं तरी त्यांना लौकिक मार्ग सोडून फार दूर जाववत नाहीं व तीं गेलीं तर त्यांना तत्कालीन लोकांकडून मान मिळेनासा होतो. पांच पांडव आणि द्रौपदी हीं तर त्यावेळींही सर्व लोकांना वंद्य वाटत होतीं. तेव्हां अनेकपतिकत्वाची चाल त्यावेळीं फारशी प्रचारांत नसली तरी तिजबद्दल फारसा तिरस्कारही वाटत नसावा असें दिसतें. वरील श्रुतिवचनांत बहुपतिकत्वाचा जो निषेध केला आहे तो तशा व्यवहाराचे दुष्परिणाम लक्ष्यांत आल्यामुळें केला असावा. श्रुतिकारांनीं निषेध केला असला तरी सामान्य लोकांत ती थोडीबहुत चालू असण्याचा संभव आहे. मारिषा नामक स्त्रीला प्राचेतस नांवाचे दहा पति होते अशी आणखी एक कथा आहे.

हुपतिकत्वाच्या चालीविषयीं लिहून लडाखी लोकांविषयीं माहिती देतांना असें लिहितो कीं "ते लोक सुस्वभावी व आनंदी असून सत्याभिलाषी आहेत, आणि इंग्लंडांतील मजुरांच्या स्त्रियांना जितकें स्वातंत्र्य असतें तितकें त्यांच्या स्त्रियांस आहे."

ह्या गोष्टींची यथार्थ मीमांसा करितांना एक महत्त्वाची गोष्ट लक्ष्यांत ठेविली पाहिजे, ती ही कीं, पुरातन हिंदुलोकांतील अनेक नवरे करण्याची चाल त्याहूनही खालच्या प्रतीच्या सामाजिक स्थितींतून उत्क्रान्त झालेली आहे.* ग्रीक लोकांचे देव तर वाईट खरेच, पण पुरातन हिंदुलोकांचे देव त्यांहूनही वाईट होते.†

* अनेक नवरे करण्याची चाल पुरातन काळीं आपल्या लोकांत होती कीं नाहीं ह्याबद्दल कितीही संशय असला तरी अनियंत्रित व्यवहाराची होती ह्याबद्दल बिलकुल शंका नाहीं. त्याविषयींचा स्पष्ट पुरावा पुढें दिला आहे.

† **स्पेन्सर** साहेबांचा असा दृढ समज झालेला आहे कीं, देवांची कल्पना मनुष्यांनीं आपल्या स्थितींत जेवढें म्हणून चांगलें सांपडलें तेवढें घेऊन केलेली आहे. ही गोष्ट गृहीत घेतली म्हणजे देवांवर ज्या दोषांचा आरोप केलेला असेल ते दोष त्यावेळच्या लोकांत पुष्कळच अधिक प्रमाणावर आढळून येत असले पाहिजेत असें अनुमान निघतें. आपलेकडील श्रुतिग्रंथांत ज्या कित्येक गोष्टी अलंकारिक भाषेनें वर्णिलेल्या आहेत त्यांचें मर्म पुढें समजत नाहींसें झालें व त्यामुळें पौराणिक ग्रंथांत त्यांना भलतेंच स्वरूप दिलें गेलें असा कित्येक विद्वानांचा समज आहे. देवादिकांच्या व्यभिचाराबद्दल पुराणांत सांगितलेल्या कित्येक गोष्टी अशा प्रकारच्या आहेत, ही गोष्ट खरी असली तरी पौराणिक काळांत ह्या गोष्टी खऱ्या मानिल्या जात होत्या असें दिसतें. अशा गोष्टी देवांच्या हातून घडणें शक्य आहे असें ज्या लोकांस वाटत होतें त्यांची देवाविषयीं कल्पना फारच संकुचित होती असें म्हणण्यास हरकत नाहीं.

पुराणांत व महाभारतांतही इंद्र, वरुण वगैरे देवांच्या व्यभिचाराविषयीं शेंकडों गोष्टी आहेत. स्वर्गींच्या रंभा तर बोलून चालून प्रतिष्ठित कलावंतिनी. ऋषींच्या तपोबलानें देवांना धाक पडला म्हणजे त्यांनीं ह्या रंभांना त्या ऋषींचा तपोभंग करण्यासाठीं पाठवावयाचें; आणि मग त्यांनीं भूलोकीं येऊन आपल्या मनोहर स्वरूपानें व नृत्यगायनादिकांनीं त्यांना रिझवून टाकावयाचें. ज्या लोकांचे देव अशा प्रकारचे त्यांमधील स्त्रीपुरुषांचे संबंध शिथिल असले तर त्यांत आश्चर्य करण्यासारखें कांहीं नाहीं. बहिणीशीं किंवा मुलीशीं देखील व्यभिचार केल्याचीं उदाहरणें देवांमध्येंही घडून येत. ह्यावरून मनुष्यांमध्यें काय स्थिति असावी त्याबद्दल कल्पना करितां येईल. महाभारतांत कुंती आणि पाण्डु ह्यांचा संवाद दिला आहे त्यांत पुरातन हिंदुलोकांच्या स्थितीचें वर्णन केलें आहे. त्या संवादांत स्त्रीपुरुषांमधील अनियमित व्यवहाराचीं त्यानें पुष्कळच उदाहरणें दिलीं आहेत. तीं सर्व देत न बसतां ह्या चालीसंबंधाचें सामान्य विधान व एकपत्नीकत्वाची चाल सुरू होण्याच्या संबंधाची दंतकथा येवढींच येथें दिलीं असतां पुरत.

अनियमित व्यवहार सर्वत्र रूढ होता ह्यासंबंधानें पाण्डु म्हणतोः—

*अनावृताः किल पुरा स्त्रिय आसन् वरानने ।
कामाचारविहारिण्यः स्वतंत्राश्चारुहासिनि ॥

---

*हे सुंदरानने कुन्ति, पूर्वीं स्त्रियांना प्रतिबंध नव्हता. त्या स्वतंत्रपणानें स्वैरवर्तन करीत. पतीवांचून अन्य पुरुषांशीं जर

तासां व्युच्चरमाणानां कौमारात्सुभगे पतीन् ।
नाधर्मोऽभूद्वरारोहे स हि धर्मः पुरा भवत् ॥
प्रमाणदृष्टोधर्मोऽयं पूज्यते च महर्षिभिः ।
उत्तरेषु च रंभोरु कुरुष्वद्यापि पूज्यते ॥
स्त्रीणामनुग्रहकरः स हि धर्मः सनातनः ।

आदिपर्व, अ० १२२, श्लो० ३....७.

आतां एकपत्नीकत्वाची मर्यादा कशी घातली गेली त्यासंबंधाची दंतकथा पहा. पाण्डु म्हणतोः—

*बभूवोद्दालको नाम महर्षिरिति नः श्रुतम् ।
श्वेतकेतुरिति ख्यातः पुत्रस्तस्याभवन्मुनिः ॥
मर्यादेयं कृता तेन धर्म्या वै श्वेतकेतुना ।
श्वेतकेतोः किल पुरा समक्षं मातरं पितुः ॥

---

स्त्रियांनीं व्यभिचार केला तर तो अधर्म होत नसे. कारण पूर्वींची तशी वहिवाटच होती. हा धर्म मोठमोठ्या ऋषींनींही पूज्य मानिला आहे व उत्तर कुरुदेशांत तो हल्लींही रूढ आहे. तो स्त्रियांना सुखकर असा सनातन धर्म आहे.

* उद्दालक नांवाचा एक ऋषि होऊन गेला. त्याला श्वेतकेतु नामें एक मुलगा होता. त्या श्वेतकेतूनें ही मर्यादा घातली. श्वेतकेतूचा बाप जवळ असतां एका ब्राह्मणानें श्वेतकेतूच्या आईचा हात धरिला व 'चला आपण जाऊं' असें म्हणाला. तेव्हां आपल्या आईला घेऊन ब्राह्मण जातो असें पाहून त्या ऋषिकुमाराला फार संताप आला. श्वेतकेतूला कोपायमान् झालेला पाहून उद्दालक म्हणालाः—"मुला, तूं असा संतप्त होऊं नकोस. हा सनातन धर्म आहे. सर्व वर्णांच्या स्त्रिया अप्रतिबंध आहेत. गुरें ज्याप्रमाणें आपापल्या जातींत व्यवहार करितात त्याचप्रमाणें मनुष्येंही आपापल्या वर्णांत यथेच्छ व्यवहार करितात." हें पितृवचन ऐकिल्यानंतरही श्वेतकेतूला तो धर्म असह्य वाटला व त्यानें स्त्रीपुरुषांमध्यें मर्यादा घालून दिली. तेव्हांपासून हा निर्बंध झाला असें ऐकिवांत आहे.

जग्राह ब्राह्मणः पाणौ गच्छाव इति चाब्रवीत् ।
ऋषिपुत्रस्ततः कोपं चकारामर्षचोदितः ॥
मातरं तां तथा दृष्ट्वा नीयमानां बलादिव ।
क्रुद्धं तं तु पिता दृष्ट्वा श्वेतकेतुमुवाच ह ॥
मा तात कोपं कार्षीस्त्वमेष धर्मः सनातनः ।
अनावृता हि सर्वेषां वर्णानामंगना भुवि ॥
यथा गावः स्थितास्तात स्वे स्वे वर्णे तथा प्रजाः
ऋषिपुत्रोऽथ तं धर्मं श्वेतकेतुर्नचक्ष मे ॥
चकार चैव मर्यादामिमां स्त्रीपुंसयोर्भुवि ।
तदाप्रभृति मर्यादा स्थितेयमिति नः श्रुतम् ॥

आदिपर्व, अ० १२२, श्लो० ९....१७.

ही मर्यादा कशी घातली गेली ह्यासंबंधानें आणखी एक कथा महाभारतांत आहे. दीर्घतमा नामक ऋषि जन्मांध होता, त्याची प्रद्वेषी नांवाची स्त्री होती. ती पतीचें व त्यापासून झालेल्या संततीचें पोषण करण्यास असमर्थ होत्साती त्याला सोडून जाऊं लागली त्यावेळीं तो ऋषि कोपायमान् होऊन म्हणालाः—

अद्यप्रभृति मर्यादा मया लोके प्रतिष्ठिता ॥*
एक एव पतिर्नार्या यावज्जीवं परायणम् ।
मृते जीवति वा तस्मिन् नापरं प्राप्नुयान्नरम् ॥

आदिपर्व, अ० १०४, श्लो० ३४, ३५.

वैवाहिक नीतीच्या सुधारणापंथाचा क्रमवार विचार

---

* आजपासून मी ही मर्यादा घालून ठेवितों कीं, स्त्रीच्या जीवांत जीव आहे तोंपर्यंत तिनें एकपतिव्रत पाळिलें पाहिजे. पति जिवंत असो किंवा मृत असो, तिनें दुसरा पति म्हणून करितां कामा नये.

केला असतां असें दिसतें कीं, अनेक पति वरण्याची चाल ही अनियमित व्यवहाराच्या पुढली पायरी आहे. तेव्हां पुरातन हिंदूंच्या ह्या चालीमुळें त्यांच्या अनियंत्रितव्यवहाराला बंधन पडत गेलें असावें आणि ह्या चालीला अनुकूल असे जे पूर्वीच्या लोकांचे ग्रह झाले त्यांनीं स्त्रियांचा पातिव्रत्याकडे जाण्याचा मार्ग सुलभ केला असावा हें संभवनीय वाटतें.

आतां कमी प्रतीच्या विवाहांमुळें उत्पन्न होणाऱ्या वैवाहिकनीतीच्या विशेष प्रकारांचा विचार सोडून सामान्यत्वानें ह्या विषयाचा विचार करूं. प्रथमतः न सुधारलेल्या लोकांत ह्यासंबंधानें काय स्थिति आढळते ती पाहूं. पूर्वीच्या प्रकरणांत वर्तनाच्या इतर प्रकारांविषयीं विचार करितांना जो क्रम स्वीकारलेला आहे तोच कायम ठेवून येथेंही अनेक गोष्टींचा उल्लेख केला जाईल, परंतु सबळ कारण नसेल तर त्यांजकडे दुर्लक्ष्य केलें जाईल. कारण चमत्कारिक व बीभत्स गोष्टी वाचण्याची अत्युत्कट इच्छा तृप्त करण्याकरितां ज्याप्रमाणें वर्तमानपत्रांतून काडी मोडून देण्याच्या व इतर तसल्याच प्रकारच्या खटल्यांविषयीं हकीकती देत असतात त्याचप्रमाणें व त्याच हेतूनें कित्येक ग्रंथकारही असल्या गोष्टींचा संग्रह करीत असतात.

सामान्यतः रानटी लोकांमध्यें वैवाहिकसंबंधाचें फारसें महत्त्व आढळून येत नाहीं. पातिव्रत्य किंवा पत्नीव्रत ह्यांची त्यांमध्यें फारच कमतरता किंबहुना अभाव असतो असें म्हटलें तरी चालेल. प्रवासवर्णनाच्या अनेक पुस्तकांतून उतारे घेऊन ही गोष्ट चांगल्या री-

तीनें दाखवितां येईल. प्रथमतः उत्तर अमेरिकेपासून सुरुवात करूं. तेथील चिनूक लोकांविषयीं ल्युइ आणि क्लार्क ह्या दोन प्रवाशांनीं दिलेलें वर्णन रास यानें दिलेल्या वर्णनाशीं जुळतें. तें येणेंप्रमाणें आहेः—

" सर्व इंडियन लोकांप्रमाणेंच ह्या लोकांतही अविवाहित स्त्रियांच्या अनियंत्रित व्यवहाराला कोणी गुन्हा किंवा पापाचरण मानीत नाहीं. उलट त्यांस अशा प्रकारचें आचरण प्रिय असावें असें दिसतें. कारण स्त्रिया आपण होऊन पुरुषांची मनधरणी करितात व त्यांस त्यांच्या मित्रांचें व आप्तांचें पूर्ण अनुमोदन व प्रसंगीं उत्तेजनही असतें. "

तेच प्रवासी सायो लोकांच्या संबंधानें तितक्याच महत्त्वाची आणखी एक गोष्ट लिहितातः—

" सायो लोकांनीं आपल्या बायका आह्मांकडे पाठविण्याविषयीं आपली इच्छा दर्शविली परंतु आह्मीं त्यांचें म्हणणें कबूल केलें नाहीं. आह्मी तेथें असतांना त्यांची निराशा झाल्यामुळें जेव्हां आह्मी तें स्थळ सोडून पुढें चाललों तेव्हां त्या लोकांनीं दोन दिवसपर्यंत आमची पाठ पुरविली. आणि हें सर्व करण्याचा हेतु आह्मीं त्यांच्या बायकांचा स्वीकार करावा ! "

तेथून थोडेंसें दक्षिणेकडे गेलें म्हणजे क्रीक लोक आढळतात. त्यांची स्थिति चिनूक लोकांप्रमाणेंच आहे. दक्षिण अमेरिकेंतील रानटी लोकांची तीच तऱ्हा आहे. ट्युपी आणि क्यारिब् ह्या लोकांच्या संबंधानें पुढील वर्णन आढळतें.

" वैवाहिकबंधनें तोडण्याला लोकांना कोणत्याही प्र-

कारची दिक्कत वाटत नाहीं व व्यभिचार हा गुन्हा समजला जात नाहीं."

"अविवाहित स्त्रियांच्या शुद्धाचरणाची क्यारिब् लोकांना कांहीं किंमत वाटत नाहीं."

ह्या अनियंत्रित व्यभिचाराच्या उदाहरणांप्रमाणेंच कांहीं नियंत्रित व्यभिचाराचींही उदाहरणें अमेरिकेंतील रानटी लोकांत आढळून येतात. एस्किमो लोकांत बायकांची अदलाबदल करण्याची एक विलक्षण चाल आहे. दोन मित्रांनीं एक दोन दिवस आपापल्या बायकांची अदलाबदल करणें हें त्यांजमधील अप्रतिम स्नेहाचें लक्षण समजलें जातें. ह्या लोकांप्रमाणेंच चिपेवेअन् लोकांची गोष्ट आहे. पुढील उतारा त्यांच्या संबंधानें आहे.

"ह्या लोकांमधील एक सामान्य चाल म्हटली म्हणजे पुरुषांनीं आपापल्या बायकांची एकेक रात्र अदलाबदल करणें ही होय. हे लोक ह्या प्रघाताला दोषास्पद मानीत नाहींत एवढेंच नव्हे, तर असा संबंध ज्या कुटुंबांमध्यें घडून येतो त्या कुटुंबांमधील विलक्षण स्नेहाचा तो दर्शक आहे अशी त्या लोकांची समजूत आहे." कित्येक लोकांमध्यें विवाहाच्या पूर्वीं अनियंत्रित व्यवहाराला पूर्ण मोकळीक असते परंतु विवाहानंतर मात्र वैवाहिक बंधनें कडक रीतीनें पाळावीं लागतात. अमेरिकेंत डकोट म्हणून लोक आहेत त्यांच्या मधल्या अशा प्रकारच्या चालीसंबंधानें लिहितांना वर्ट् म्हणतोः—

"ह्या चालीचा मागमूस ज्यांत अगदीं आढळणार नाहीं अशीं राष्ट्रें जगांत फारच थोडीं असतील. विवा-

हानंतर फशीं पडण्याची पाळी येऊं नये ह्यासाठीं विवाहापूर्वी थोडावहुत तरी अनुभव असावा अशा स्वाभाविक इच्छेमुळें ही चाल आरंभीं प्रचारांत येत असावी. विवाहापूर्वी ह्या लोकांतील स्त्रियांचें वर्तन कसेंही असलें तरी विवाहानंतर स्पार्टन स्त्रियांप्रमाणें त्यांचें वर्तन कडकडीत पातिव्रत्याचें असतें."

शुद्धाचरण आणि व्यभिचार ह्यांची आणखी एक निराळ्याच प्रकारची तोडजोड प्राचीन काळीं निकाराग्वे येथें व इतर कित्येक ठिकाणींही अस्तित्वांत होती. तिचा प्रकार येणेंप्रमाणें असेः—

"वर्षातून एक उत्सवाचा दिवस नेमिलेला असे व त्या दिवशीं कोणत्याही पदवीच्या स्त्रियांना त्यांच्या मर्जीस येईल त्या पुरुषांशीं पाहिजे त्या प्रकारचे व्यवहार करण्यास पूर्ण मोकळीक असे. परंतु इतर प्रसंगीं पातिव्रत्याचा कडक अंमल असे."

हीं विवाहित स्त्रियांची गोष्ट झाली. अविवाहित स्त्रियांना इतर प्रसंगींही बंधनें नसत. हेरेरा नांवाचा ग्रंथकार लिहितोः—

"ह्या लोकांच्या पुष्कळ मुली फार सुंदर असत, आणि त्या उपवर झाल्या म्हणजे त्यांचे आईबाप त्यांना पैसे मिळविण्यासाठीं दूर पाठवीत असत. मग त्या सर्व देशभर निर्लज्जपणानें वर्तन करीत फिरत व लग्न करण्यास पुरेसा पैसा मिळाला म्हणजे परत येऊन लग्न करीत व नवऱ्यांचे घरीं चांगल्या रीतीनें नांदून संसार करीत."

रानटी लोकांत आढळून येणाऱ्या आणखी एका चा-

लीचीं उदाहरणें एशिया खंडांत सांपडतात. कामश्चाट्कांतील लोक व आल्यूट म्हणून लोक आहेत ते आपल्या बायका रात्रीस पाहुण्यांकडे पाठवितात. उत्तरएशियांतील पुष्कळ लोकांत तशी चाल आहे. पालास नांवाचा प्रवासी असें लिहितो कीं, कालमक लोकांना आपल्या बायकांच्या स्वैरवर्तनाविषयीं कांहीं वाटत नाहीं. प्रेमसंशयीपणाची त्या लोकांस ओळखच नाहीं. ते उघडपणें आपल्या बायकांना रात्रीच्या ओळखीच्या गृहस्थांकडे पाठवून देतात. कालमक लोकांच्याच शेजारीं राहणारे दुसऱ्या एका जातीचे लोक आहेत त्यांच्याविषयीं पुढील लेख आहे.

" किर्गिझ् लोकांत स्त्रीपुरुषांमधील संबंध अगदीं आद्यावस्थेंतील लोकांप्रमाणें आहे. स्त्रीपुरुषांनीं व्यभिचार केला तर त्यांचे आई, बाप, भाऊ, बहिणी ह्यांना त्याबद्दल राग येत नाहीं. आणि प्रत्यक्ष नवरे आपण होऊन आपल्या मित्रांना आपल्या बायकांशीं अतिनिकट स्नेहसंबंध ठेविण्यास उत्तेजन देतात. किर्गिझ् लोकांप्रमाणेंच बुरूट लोकही आपल्या बायकांविषयीं अगदीं कांक्षेखोर नाहींत. "

त्याचप्रमाणें मोंगल लोकांविषयीं प्रेव्हल्स्की नामक प्रवासी लिहितोः—

" त्या लोकांना व्यभिचार गुप्त ठेवावा असेंही वाटत नाहीं. कारण व्यभिचार हा दुर्गुणच नव्हे असें त्यांस वाटतें. "

ह्या लोकांच्या दक्षिणेस राहणाऱ्या लोकांचीं दोन उदाहरणें देण्यासारखीं आहेत.

" कारेन् लोकांमध्यें विवाहित व अविवाहित मनुष्यांचे स्त्रीपुरुषांमधील संबंध फारच शिथिल आहेत असें सांगतात. तरुण स्त्रीपुरुषांनीं इतरांच्या उपभोगाकरितां आपल्या शरीरांचा विक्रय करणें ह्यांत कांहींएक वावगें नाहीं असें त्या लोकांस वाटतें व ' आमची अशी चालच आहे ' असें म्हणून ते लोक अशा अत्याचारांचें समर्थन करितात. "

" टोड लोकांच्या स्त्रियांमध्यें पण्यांगनांचा धंदा करणें ही अगदीं साधारण गोष्ट आहे. ह्या लोकांमध्यें पातिव्रत्य फार दुर्मिळ आहे. विवाहामुळें व नात्यामुळें उत्पन्न होणारीं बंधनें केवळ शाब्दिक आहेत. "

वर दिलेल्या अनेक ठिकाणच्या उदाहरणांबरोबर आफ्रिकेंतील लोकांचींही कांहीं उदाहरणें घेतलीं पाहिहिजेत. हारिस नांवाच्या ग्रंथकारानें " ईथिओपियांतील डोंगराळ प्रदेश " ह्या पुस्तकांत पुढील लेख लिहिला आहे:—

" शोआ प्रांतांत पातिव्रत्य ह्या सद्गुणाला मुळींच किंमत नाहीं. एकाद्यानें अतिशय नीचपणानें दुसऱ्याच्या बायकोला फसवून फुसलावून नेलें असतां, ज्याचें नुकसान झालें असेल तो मनुष्य जर न्यायाच्या कोर्टांत फिर्याद घेऊन गेला तर त्याला गुन्हेगाराकडून फार फार म्हणजे चार आण्यांचा मोबदला देवविला जातो!"

ठके नांवाच्या प्रवाशानें दिलेल्या हकीकतींतील उताऱ्यावरून अपर कांगोनजीक राहणाऱ्या लोकांच्या समजुती कळून येतील. तो म्हणतो:—

" लग्नाच्यापूर्वी कुमारिका स्त्रीचे भाऊ, बाप किंवा

इतर नातलग तिच्याकडून शरीरविक्रयाचें काम करवितात. कोणीं चार वार कापड नेऊन त्यांच्या हवालीं केलें म्हणजे ते त्याला तिचा उपभोग करूं देतात. तथापि अशा वर्तनामुळें तिची किंमत कोणत्याही प्रकारें कमी होत नाहीं व त्यामुळें तिच्या लग्नाला कोणतीही अडचण येत नाहीं."

आणखी दक्षिणचे बाजूस राहणाऱ्या वरच्याहून निराळ्या प्रकारच्या लोकांतही तीच तऱ्हा आढळते:—

"बुशमेन् म्हणून लोक आहेत त्यांजमध्यें विवाहित स्त्रीपुरुषांनीं व्यभिचार करणें हा गुन्हा समजला जात नाहीं व नवऱ्याला किंवा बायकोला एकमेकांच्या व्यभिचाराबद्दल फारसा रागही येत नाहीं. त्या लोकांना मुलगी, अविवाहित स्त्री व लग्नाची बायको ह्यांमध्यें कांहीं भेदच दिसत नाहीं. ह्या तिहींचा वाचक एकच शब्द त्यांच्या भाषेंत आहे."

पालिनीशियांतील टाहिटी बेटांत आरोई नांवाची एक मंडळी आहे तिनें तिकडील लोकांविषयीं अशा प्रकारची बरीच माहिती मिळविली आहे.

पेल्यू बेटांतील सार्वत्रिक चाल म्हटली म्हणजे आयांनीं आपल्या नवशिक्या मुलींना वेळच्यावेळीं पैसे वसूल करण्याविषयीं शिकवावें. आईबापांच्या अतितृष्णेला रूढीची परवानगी मिळाल्यामुळें तेथें हा प्रकार फारच फैलावला आहे.

अशिक्षित व रानटी लोकांत ह्याच्या उलटही पुष्कळ उदाहरणें आढळतात. त्यांपैकीं दोन उत्तर अमेरि-

केंतील आहेत. मंडन लोकांबद्दल क्याट्लिन् नांवाचा प्रवासी म्हणतो:—

" त्यांच्या स्त्रिया सुंदर आणि भिडस्त आहेत व त्यांच्या कुलीन घराण्यांत पातिव्रत्याला मोठा मान आहे. ह्या गोष्टींत हे लोक दुसऱ्या कोणत्याही समाजाला हार जाणारे नाहींत."

चिपेवा लोकांच्या संबंधानें कीटिंग् लिहितो:—

" चिपेवा लोकांत शुद्धाचरणाला फार मान आहे. स्त्रीचें आचरण शुद्ध नसेल तर कोणताही रणशूर शिपाई तिच्याशीं लग्न करावयाचा नाहीं."

तथापि लपून छपून व्यभिचार करण्याची ह्या लोकांस बरीच खोडी आहे असें हा ग्रंथकार कबूल करितो. आफ्रिकेंत देखील कांहीं अशीं उदाहरणें आढळून येतात. काफर लोकांच्या स्त्रिया पातिव्रत्यानें वागणाऱ्या असून मर्यादशील आहेत. त्यांच्यामध्यें व्यभिचाराचीं उदाहरणें क्वचित् घडून येतात. बचासिन् लोकांविषयींही तसेंच सांगतात. स्त्रीपुरुषांच्या शुद्धाचरणाचीं पुष्कळ उदाहरणें लहानलहान बेटांत राहणाऱ्या लोकांत आढळून येत नाहींत. मारिनरवरून समजतें कीं, टोंगा बेटांत व्यभिचार फारच क्वचित् दृष्टोत्पत्तीस येतो. सुमात्रा येथील लोकांच्या संबंधानें मार्स्डेन् म्हणतो:—

" पातिव्रत्य व पत्नीव्रत हीं ह्या लोकांत जितकीं आढळून येतात तितकीं दुसऱ्या कोणत्याही लोकांत आढळून येत नाहींत." बोर्निओ बेटाच्या मध्यभागीं राहणाऱ्या लोकांविषयींही लो ह्याचें मत तसेंच आहे. तो लिहितो:—

" व्यभिचार हा गुन्हा त्या ठिकाणीं कोणास माहीतच नाहीं व तो कधीं घडून आल्याचें तेथील लोकांस स्मरणही नाहीं."

त्याचप्रमाणें **काप्स** ह्याच्या माहितीवरून **न्यू गिनी** बेटांतील **डोरी** येथील लोकांत " शुद्धाचरणाला फार मान आहे व व्यभिचार घडलेला कधीं ऐकूंही येत नाहीं." **लायल्टी** बेटांतील **यी** प्रांतांतल्या बायकांविषयीं **अर्स्किन्** लिहितोः—

" त्या लग्नापूर्वी ब्रह्मचर्यानें राहतात व लग्नानंतर पातिव्रत्यानें वागतात."

कित्येक लोक इतर बाबतींत अगदीं नीच असून ह्या बाबतींत मात्र त्यांचें आचरण अत्यंत श्रेष्ठप्रतीचें दिसून येतें. **स्नो** म्हणतो कीं, **पिक्टन्** बेटांतील **फ्यूजिअन्** स्त्रिया फारच मर्यादशील आहेत. आपल्या देशांत **मुशेरा** म्हणून लोक आहेत त्यांजमध्यें लग्नाचा विधि म्हणून कांहीं नाहीं. तथापि एकदां स्त्रीपुरुषांनीं एकमेकांना पसंत केलें म्हणजे तो त्यांचा संबंध जन्मभर कायम राहतो, आणि बहुधा हा संबंध तोडण्यास कोणी प्रवृत्त होत नाहीं. परंतु जर का कोणाच्या हातून ह्या संबंधाविरुद्ध वर्तन घडलें तर त्याच्यावर लागलाच बहिष्कार पडतो. आपल्या देशांत डोंगराळ प्रदेशांत राहणारे व कधीं कोणाचे वाटेस न जाणारे असे कांहीं लोक आहेत त्यांमध्यें अशीं आणखी कांहीं उदाहरणें आढळून येतात. **हाजसन्** म्हणतो कीं **बोडो** आणि **धिमाल** ह्या लोकांमध्यें विवाहित व अविवाहित मनुष्यांच्या शुद्धाचरणाला फार मान असतो. **डाल्टन्** लिहितोः—

" ज्या ज्या लोकांनीं सांथाळी लोकांविषयीं लिहिलें आहे ते त्यांच्या अप्रतिम पातिव्रत्याविषयीं साक्ष देतात. तथापि तरुण स्त्रिया व पुरुष यांच्यामध्यें आपापसांत सृष्टीविरुद्ध क्रमाचा मात्र सपाटा फार आहे. पुरुषांपुरुषांमध्यें व बायकांबायकांमध्यें विलक्षणप्रकारचे प्रेमपाश जडतात व हीं अलौकिक प्रेमबद्ध जोडपीं एकांतांत पुष्कळ काळ घालवितात. "

मूळच्या रहिवासी लोकांत आढळणाऱ्या शुद्धाचरणाचीं जशीं उदाहरणें दिलीं तशींच परकीय लोकांच्या सहवासानें ज्यांची वैवाहिक नीति बिघडत चालली आहे अशींही कांहीं उदाहरणें घेऊं. सिंगाली लोकांमध्यें स्त्रीपुरुषांमधील बंधनें फार शिथिल आहेत. त्यांच्या शेजारींच वेद्दा म्हणून लोक राहतात ते एकपत्नीव्रतानें व पातिव्रत्यानें वागणारे आहेत. परंतु ज्या ज्या ठिकाणीं सिंगाली लोकांनीं त्यांना सुधारण्याविषयीं यत्न केले आहेत त्या त्या ठिकाणीं व्यभिचार व बहुपत्नीकत्व ह्यांचा थोडथोडा प्रसार होत चालला आहे. ख्रिस्ती लोकांच्या सहवासानें मूळच्या रहिवासी लोकांची वैवाहिक नीति बिघडली असा पुरावा ख्रिस्ती धर्मोपदेशकांकडून मिळणें मोठें दुर्घट काम आहे, तथापि आस्ट्रेलियन् लोकांच्या एका टोळीसंबंधानें पुढील वाक्यें रेव्हरंड होल्डन ह्याच्या लेखणींतून निघालीं आहेत.

" गोरे लोक येथें आल्यामुळें मूळच्या रहिवासी लोकांची स्थिति अधिकच बिघडली. ते अगदीं असमर्थ होत चालले व रोगांचा त्यांच्यावर पगडा बसत चालला. आह्मी येथें येण्याच्यापूर्वीं त्यांचे कायदे फार

कडक होते. विशेषतः तरुण स्त्रीपुरुषांमधील व्यवहाराच्या संबंधानें तर फारच कडक होते. विवाहाच्यापूर्वी जर पुरुषाच्या हातून एकाद्या बायकोशीं संबंध घडला तर त्याला मरण बरें असें वाटत असे." तथापि आस्ट्रेलियन् लोकांच्या दुसऱ्या टोळ्यांसंबंधानें तसें म्हणतां येण्यासारखें नाहीं.

वैवाहिक नीतीच्या संबंधानें रानटी लोकांच्या समजुती दर्शविणारीं वर जीं अनेक ठिकाणचीं उदाहरणें दिलीं आहेत त्यांवरून कांहीं व्यापक सिद्धांत काढितां येत नाहींत. अमुक प्रकारची सामाजिक स्थिति असली म्हणजे तमुक प्रकारची वैवाहिक नीति आढळते असा कांहीं संबंध त्यांवरून लक्ष्यांत येत नाहीं. शांततेनें राहणाऱ्या लोकांत वैवाहिक नीति बरीच वरच्या पायरीची असते असें सिद्ध करण्याचा वरील पुराव्याचा रोंख दिसतो खरा तरी त्याला अपवाद पुष्कळ आहेत. ह्याच्या उलट पाहूं गेलें असतां लढाऊ व भांडखोर लोकांमध्यें जरी वैवाहिक नीतीचें मान बरेंच कमी आढळतें तरी सर्वांमध्येंच तें तसें असतें असें नाहीं. कांहीं विशेष गुणाशीं वैवाहिक नीतीचा संबंध असेल असें म्हणावें तर तेंही जुळत नाहीं. फिजियन् लोक पहिल्या नंबरचे क्रूर, मनुष्यभक्षकपणांत कोणास हार न जाणारे, व लबाडी, दरोडेखोरी आणि खन ह्यांमध्यें प्रतिष्ठा मिरविणारे असे असतां अर्स्किन् लिहितो कीं, त्यांच्या स्त्रिया मर्यादशील असून त्यांजमध्यें पातिव्रत्याला मोठा मान आहे. आणि त्यांच्याच संबंधानें सीमन् म्हणतो कीं, व्यभिचाराबद्दल त्या लोकांत बहुतकरून देहांत

शिक्षा मिळते. इतर प्रकारची नीति अगदीं वाईट अ-सून वैवाहिक नीति चांगली असल्याविषयीं हें उदाहरण झालें. ह्याच्या उलट वैवाहिक नीति अतिशय वाईट असून इतर प्रकारची नीति चांगली असल्याबद्दल टाहिटी बेटांतील लोकांचें उदाहरण आहे. कुक साहेबाच्या म्हणण्याप्रमाणें त्यांना वैवाहिक नीतीची ओळख देखील नाहीं. त्यांच्या संबंधानें तो लिहितोः—

" ह्या लोकांना लाज म्हणून एकादी मनोवृत्ति जगांत आहे कीं नाहीं ह्याबद्दल कल्पना देखील नाहीं. आह्मी ज्याप्रमाणें कुटुंबांतील मनुष्यांच्या व मित्रांच्या देखत निःशंकपणें जेवीत बसतों, त्याप्रमाणें ते लोक आपल्या हरएक प्रकारच्या वासना प्रशस्तपणें प्रेक्षकांच्या समक्ष तृप्त करितात. "

आतां ह्या मनुष्यांचें इतर गोष्टींत आचरण कसें आहे तें पहा. हाच ग्रंथकार लिहितोः—

" ते लोक शूर, मोकळ्या मनाचे व स्पष्टवक्ते असे दिसले. शंकेखोरपणा, विश्वासघात, निर्दयपणा आणि सूड घेण्याची बुद्धि हे दुर्गुणही त्यांमध्यें दिसून आले नाहींत. आणि ह्यामुळें मित्रांवर जसा विश्वास ठेवावा तसा आह्मी त्यांच्यावर ठेवीत असूं. "

ह्या सर्व गोष्टी फारच असंबद्ध दिसतात व त्यांचा सुधारलेल्या लोकांत आढळून येणाऱ्या कल्पनांशीं कसा मेळ बसवावा तें समजत नाहीं.

एवढ्या वेळपर्यंत वस्तुस्थितीचें परीक्षण करून त्यापासून सामाजिक स्थिति व वैवाहिक नीति ह्यांजमध्यें कांहीं स्वाभाविक संबंध असेल तर तो, आणि हा सद्गुण

व इतर सद्गुण ह्यांच्यामध्येंही कांहीं संबंध असल्यास तो, शोधून काढण्याविषयीं यत्न केला. आतां लोकांत प्रचलित असलेल्या समजुती व त्यांचा आचरणावर परिणाम ह्यांच्याविषयीं विचार करूं. वर जे अनेक उतारे घेतले आहेत त्यांत प्रत्यक्ष किंवा पर्यायानें ह्या संबंधाचा उल्लेख झालाच आहे. तथापि विषयविवेचन पुरें करण्याकरितां ह्या ठिकाणीं स्वाभाविक दिसणाऱ्या स्थितीचें ज्या ठिकाणीं ढळढळीत अतिक्रमण झालेलें आढळतें अशीं कांहीं उदाहरणें देणें अवश्य आहे. आतां आपण तीनच उदाहरणें घेऊं. एक रानटी लोकांचें, एक अर्धवट सुधारलेल्या परंतु सध्यां अस्तित्वांत नसलेल्या लोकांचें व एक सुधारलेल्या लोकांचें.

वोट्याक ह्मणून यूरोपाचे उत्तरभागीं राहणारे फिनिश जातीचे लोक आहेत त्यांच्या संबंधानें बुच नांवाचा जर्मन् प्रवासी म्हणतोः—" आपल्या प्राप्तीसाठीं अनेक तरुणजनांच्या मनांत तळमळ उत्पन्न करण्यास समर्थ न होणें म्हणजे कुमारिकेस मोठें लांछन आहे असें ह्या लोकांस वाटतें. ह्या समजुतीचा स्वाभाविक परिणाम म्हटला म्हणजे विवाहापूर्वी कुमारिकांना संतति होणें हा होय, व हा प्रकार भूषणावहच मानिला जातो. मुलेंबाळें झालेल्या कुमारिकेला चांगला श्रीमंत नवरा मिळतो व तिच्या बापाला तिच्याबद्दल अधिक मोबदला दिला जातो. "

मध्य अमेरिकेंत चिब्का नांवाचे लोक राहत असत त्यांच्या संबंधानें असें वाचण्यांत येतें कीं:—

" कित्येक इंडियन लोकांमध्यें आपल्या बायका

अनुपभुक्त असाव्या अशी फारशी इच्छा नसे व ह्या-बद्दल ते निष्काळजी असत. कित्येकांना तर उपभुक्त स्त्रियांचीच आवड असे. त्यांना लग्नानंतर जर आपल्या बायकांचा पुरुषाशीं मुळींच संबंध झालेला नाहीं असें दिसून आलें तर त्यांना वाईट वाटे. कारण पुरुषांचे मनांत कामविकार उत्पन्न करण्यासारखें मोहकपण त्यांच्या अंगीं नाहीं असें त्यावरून स्पष्ट होत असे— असें झालें म्हणजे ते त्यांना दुर्दैवी समजत व त्यांची नावड करीत."

साधारण मानानें सुधारलेल्या लोकांत आढळून येणाऱ्या समजुतीच्या अगदीं विरुद्ध समजूत ज्याठिकाणीं दिसून येते असें सुधारलेलें राष्ट्र जपान होय. जपानी लोकांविषयीं डिक्सन् म्हणतो:—

"बापाला दरिद्रावस्था प्राप्त झाली असतां त्याच्या पितृभक्त मुलीनें आपणाला वेश्यालयाच्या मालकांस* कांहीं मुदतीचे करारानें विकून घ्यावें व आपल्या बापाची विपत्ति दूर करून मुदत सरल्यानंतर परत आपल्या घरीं यावें, अशी सामान्य चाल ह्या लोकांत होती. ( व ती हल्लींही समूळ नष्ट झाली आहे असें म्हणण्यास स्पष्ट पुरावा नाहीं. ) अशी कुमारिका परत घरीं आल्यानंतर तिला कोणत्याही प्रकारचा काळिमा लागला असें ते लोक समजत नसत. उलट तिच्या पितृभक्तीबद्दल तिची प्रशंसा होत असे." अलीकडेच प्रसिद्ध झाले-

---

* परोपभोगार्थ आपल्या शरीराचा विक्रय करणाऱ्या स्त्रियांना नियमित पगार देऊन त्यांवर मोठमोठाले धंदे चालवून लक्षावधि रुपयांची कमाई करणारे अनेक सुधारलेल्या देशांत आहेत.

ल्या जपानवर्णनाच्या एका पुस्तकांत हेनरी नार्मन् साहेब हल्लीं तरी अशा स्त्रीला उजळ माथ्यानें परत घरीं येतां येतें ही गोष्ट नाकबूल करितात; तरी वरील उताऱ्यांतील पहिला भाग म्हणजे आईबापें नियमित मुदतीच्या करारानें आपल्या मुलींना विकतात ही गोष्ट ते कबूल करितात. अशा आईबापांना त्या समाजांत थारा मिळतो एवढीच गोष्ट त्या लोकांतील प्रचलित समजूत व्यक्त करण्यास पुरे आहे.

ह्यावरून नीतीच्या इतर विभागांप्रमाणेंच वैवाहिक नीतीच्या संबंधानेंही असें अनुमान निघतें कीं, जसजशा मनुष्यांना संवई पडत जातात तसतसें त्या संवईना अनुकूल असे त्यांचे मनोविकार व ग्रह बनत जातात. सतत अन्यायानें वर्तन करणाऱ्या मनुष्याची न्यायबुद्धि नष्ट होते व संवईनें त्याला अन्यायच न्यायासारखा वाटूं लागतो ही होष्ट अनुभवसिद्ध आहे. आणि जी गोष्ट व्यक्तीला लागू पडते तीच समाजासही लागू पडते. व ती तशी पडलीच पाहिजे. कारण लोकमत म्हणजे एकीकृत व्यक्तिमत असें म्हणण्यास हरकत नाहीं.

एका समाजाची दुसऱ्या समाजाशीं तुलना न करितां सुधारलेल्या समाजांच्या पुरातनकाळच्या व अलीकडल्या निरनिराळ्या स्थितींची परस्परांशीं तुलना केली तरी लोकस्थितीची सुधारणा आणि वैवाहिक नीति ह्यांमध्यें कांहीं नियमित संबंध आढळून येत नाहीं. आधुनिक समाजांत मात्र हा संबंध बराच दिसतो.

फार प्राचीनकाळीं हिंदुलोकांची वैवाहिक नीति किती हलक्या पायरीची होती हें पूर्वीं सांगितलेंच आहे. नं-

तर अनियमित व्यवहार व अनेक नवरे करण्याची चाल हे प्रघात नाहींसे झाल्यावर पुढल्या काळांतील कवि व ऋषि हे पूर्वींच्या पौराणिक कथांतील देवादिकांच्या अतिक्रमाविषयीं उडवाउडवी करण्याचा प्रयत्न करूं लागले. व हल्लींच्या हिंदुलोकांची त्यांच्या देवादिकांच्या व्यभिचाराबद्दल थट्टा केली असतां ते खालीं मान घालितात. ह्या लोकांमध्यें वैवाहिक नीतीची उत्क्रान्ति जशी व्हावी तशी झालेली दिसते.

हिंदुस्थानाजवळच्या कित्येक देशांतही अशाच प्रकारचे कित्येक फेरफार घडून आले असावे असें दिसतें. हिंदुस्थानांत ज्याप्रमाणें कित्येक ठिकाणीं देवांना मुरळ्या वाहण्याची चाल आहे व अशा रीतीनें देवाला वाहिलेल्या मुरळ्यांना अनियंत्रित वर्तन करण्याला धर्माची परवानगी आहे असें लोक समजतात, त्याच प्रमाणें बाबिलोनियन् व ईजिप्शियन् लोकांतही अशा प्रकारची चाल होती व ती आतां बरीच कमी झालेली आहे. आपल्या लोकांप्रमाणेंच त्या लोकांतही ह्या चालीचा संबंध धर्माशीं जोडलेला होता. ज्या चाली इतर सामान्य चालींपेक्षां अधिक काळपर्यंत टिकाव धरितात व ज्यांचा धर्मांतही अंतर्भाव झालेला असतो त्यांचें बीज बहुधा फार पुरातन काळच्या सर्वसामान्य रूढींत असतें. ह्यावरून असा तर्क करितां येतो कीं, ह्या मुरळ्यांचा प्रघात फार प्राचीन काळच्या अनियंत्रित व्यवहाराच्या प्रघाताचा अवशेष असावा, व हिंदुस्थान, बाबिलोनिया आणि ईजिप्ट ह्या देशांतील वैवाहिक नीतीची उत्क्रान्ति अनियंत्रित व्यवहारापासून झाले-

ली असावी. दुसरी एक गोष्ट ध्यानांत ठेविण्यासारखी आहे. बायका चोरून नेण्याची किंवा लढाईंत पकडून नेण्याची चाल न सुधारलेल्या लोकांत अद्यापि आहे व सर्व सुधारलेल्या लोकांच्या प्राथमिक स्थितींत ती होती. अशा रीतीनें नेलेल्या स्त्रिया स्वाभाविकच हलक्या दर्जाच्या समजल्या जात व त्या कोणाकडे अंगवस्त्र म्हणून राहून किंवा उघडपणें पाहिजे त्यास शरीरविक्रय करून निर्वाह करीत. ज्यावेळीं स्त्रियांना पकडून नेण्याची चाल बंद झाली त्यावेळीं स्त्रीपुरुषांच्या अनीतीचें एक कारण नाहींसें झालें. ही गोष्ट वर जें वैवाहिक नीतीच्या उत्क्रान्तीबद्दल अनुमान केलें आहे त्याचें पुष्टीकरण करिते. हीब्र्यू लोकांमध्येंही वैवाहिक नीतीच्या उत्क्रांतीचा क्रम वरच्या धोरणानेंच असावा असें दिसतें. हेरड धि ग्रेट* ह्याला जरी नऊ बायका होत्या व 'मिशना' म्हणून जें त्यांचें पुस्तक आहेत त्यांत जरी बहुपत्नीकत्वाची चाल त्यावेळीं रूढ होती असा उल्लेख आढळतो, तरी त्या नंतरचें एक्लिझिआस्टिकस म्हणून जें त्यांचें पुस्तक आहे त्यावरून एकपत्नीकत्वाचा प्रघात त्यावेळीं स्थापित झाला होता असें दिसतें.

---

* हेरड धि ग्रेट हा हीब्र्यू लोकांचा राजा होता. तो मोठा क्रूर होता. येशू ख्रिस्ताच्या जन्माच्या वेळीं तोच राजा होता व त्यानें येशू ख्रिस्ताचा नाश व्हावा ह्यासाठीं बेथ्लिहेम् खेड्यांत त्यावेळीं जितकीं तान्हीं मुलें सांपडलीं त्या सर्वांस ठार मारविलें अशी हकीकत बायबलाच्या नव्या करारांत सांगितली आहे.

जसजशी सामाजिक स्थिति सुधारत जाते तसतशी वैवाहिक नीतीचीही उन्नति होत जाते हा स्वाभाविक दिसणारा क्रम ग्रीक लोकांच्या सुधारणेंत दिसून येत नाहीं. त्यांच्या इलियड नांवाच्या काव्यावरून त्यावेळीं त्या लोकांत अंगवस्त्रें ठेविण्याचा जितका प्रघात असावा असें दिसतें, त्यापेक्षां तो पुढें अधिक झालेला आढळून येतो. जेव्हां स्त्रियांना गुलाम म्हणून विकत घेऊन घरीं ठेविण्याची व कामकाजासाठीं बायका चाकरीस ठेविण्याची चाल प्रचारांत आली त्यावेळीं वरील प्रघात अधिकच फैलावला. ह्या काळांत ग्रीक लोकांची वैवाहिक नीति बरीच अवनतावस्थेप्रत पोंचली होती हें सिद्ध करून दाखविण्याला अनेक प्रमाणें देतां येतील. त्या वेळचे बहुतेक विद्वान्, शूर व थोर पुरुष हेतराँई ना-

---

* ख्रिस्ती शकाच्या पूर्वी ४।५ शतकांच्या सुमारास ग्रीस देशांत प्रतिष्ठित वारांगनांचें वेड फार माजलें होतें. ह्या स्त्रियांचे अंगीं अनेक मोहक गुण असून त्यांचीं मनें विद्येनें सुसंस्कृत झालेलीं असत त्यामुळें त्यांना अनेक विषयांवर मोठ्या मार्मिक रीतीनें संभाषण करितां येत असे. विद्वान् व शूर पुरुषांची त्यांजकडे जाण्याविषयीं जी प्रवृत्ति होई ती विशेषतः त्यांच्या ह्या गुणांमुळें होई. त्यांची रीतभात, वातचेत वगैरे सर्व फारच मनोहर असे. कामवासना ही तर मनुष्याच्या पाठीस लागलीच आहे, परंतु तिच्या तृप्तीहून निराळें असें एक उन्नतप्रकारचें सुख सुसंस्कृत स्त्रियांच्या सहवासापासून व्हावें अशी मनुष्याचे मनांत इच्छा असते. त्यावेळीं ग्रीक लोकांच्या स्त्रियांची स्थिति तर फारच शोचनीय होती. ह्यामुळें वरील इच्छा घरचे घरीं तृप्त होण्याचें तर मुळींच साधन नव्हतें आणि बाहेर अशा प्रकारची अनुकूलता होती, ह्यामुळें शाहण्यासुर्त्या लोकांनाही ह्या वारांगनांचें वेड लागलें. पेरिक्लीज ह्याची आस्पेशिया नांवाची गुणवती वारांगना प्रख्यात आहे. प्रसिद्ध तत्त्ववेत्ता सा-

मक प्रतिष्ठित कलावंतिणींशीं संबंध ठेवीत असत. सरकारच्या वसुलाच्या बाबींत वेश्यांच्या घरांवर कर बसवून त्यापासून होणाऱ्या उत्पन्नाची एक निराळीच बाब केली होती. अशा रीतीनें एक वसुलाची नवीन बाब उत्पन्न करावी अशी कल्पना मनांत येण्याला वेश्यांच्या धंद्याला किती तेजी असली पाहिजे हें उघडच दिसतें. व्हीनसदेवीच्या नांवानें स्त्रियांनीं दुर्वर्तन करण्याचा जो शिष्टसंमत प्रघात पूर्वींपासून चालू होता त्यालाही ह्या काळांत उत्तेजन मिळालें. रोमनलोकांनीं तर या कामांत ग्रीकलोकांवरही ताण केली. राज्याचा विस्तार करण्याची हांव व ती तृप्त करण्यासाठीं राजकीय संस्था जोमदार करण्याविषयींची बुद्धि ह्यांमुळें जी एक प्रकारची सामाजिक उन्नति होत असते तिच्या बरोबरच लोकांच्या वैवाहिक नीतीचा बिघाड होत असतो. तशी स्थिति रोमनलोकांची झाली होती. आरंभीं रोमनलोकांची नीति बरीच वरच्या पायरीची होती; परंतु पुढें रोमन बादशहांचे वेळीं ती स्थिति अगदीं बदलली. स्त्रीचें मर्यादशीलत्व हा कुरूपतेचा परिणाम मानिला जाऊं लागला आणि संभावित घराण्यांतील स्त्रियांनीं वेश्यांचा धंदा करण्याची बंदी कायद्यानें करावी लागली. ह्यावरून असें दिसतें कीं एका

---

क्रेतीस हा देखील त्यांच्या संभाषणाचा लाभ घेण्यास जात असे. आतां तो मोठाच निश्चयी असल्यामुळें कामवासना कधीं त्याला आडवी आली नाहीं. ग्रीक लोकांचें राज्य नष्ट होऊन रोमन लोकांचें राज्य स्थापित झाल्यानंतर ह्या वारांगनांचें प्रस्थ तिकडेही फार माजलें.

प्रकारच्या सामाजिक सुधारणेबरोबर वैवाहिक नीतीची अवनति होत जाणें शक्य आहे.

ह्या रोमन लोकांच्या अत्यंत अवनतावस्थेंत जी प्रतिक्रिया सुरू झाली किंवा उलट दिशेनें लाट आली तिला ख्रिस्ती धर्माचें बरेंच साह्य मिळालें. तथापि ह्यामुळें जी त्यांच्या वैवाहिक नीतींत सुधारणा झाली ती स्त्रीपुरुषांमधील संबंधाची वास्तविक कल्पना त्यांचे मनांत येऊन व तदनुकूल मनोविकार आणि समजुती बनून झाली असें नाहीं. उलट विषयसुखाचा उपभोग घेणें हें पापमूलक असून शरीराला दुःख देणें हें पुण्यप्रद आहे अशा वैराग्याच्या विचारांमुळें झाली. त्यांची वैवाहिक नीतीकडे प्रवृत्ति करणारा हेतु केवलनीतिविषयक नसून, परलोकाचें साधन किंवा परलोकीं सुखाचें साधन हा होता. तथापि ह्या हेतूमुळें देखील केवलनीतीनें होणारा कार्यभाग साधला. क्रिया आणि प्रतिक्रिया, आघात आणि प्रत्याघात हीं एकेक वेळ होऊनच थांबत नाहींत. आंदोलकाला एकदां हेलकावा मिळाला म्हणजे तो एकसारखा मागेंपुढें हालत राहतो व मग त्याची गति हळूहळू कमी होत जाऊन तो स्थिर होतो. आरंभींचे हेलकावे मोठे असतात व ते स्पष्ट दिसतात परंतु पुढें ते लहान झाले म्हणजे स्पष्ट दिसत नाहींसे होतात. हा जडसृष्टींतील नियम मानससृष्टींतही आढळून येतो. त्याचें उदाहरण ह्या ठिकाणीं चांगलें दिसून येतें. वर सांगितलेल्या प्रतिक्रियेचा अंमल लोकांचे मनावर कांहीं काळपर्यंत राहिल्यानंतर पुन्हां प्रति-प्रतिक्रियेस सुरुवात झाली, म्हणजे पूर्वींच्या

विरुद्ध दिशेनें आणखी एक लाट आली. अर्थात् विषयवासनेला आंवरून धरण्याकडे कांहीं काळपर्यंत लोकांची प्रवृत्ति झाली होती ती नाहींशी होऊन सुखोपभोगाच्या इच्छेला अनावर सोडण्याकडे आतां प्रवृत्ति होऊं लागली. सुखोपभोगाकडे प्रवृति होण्याचा परिणाम उघडच वैवाहिक नीतीवरही घडून आला. ह्या काळांत मानससृष्टींतील क्रिया व प्रतिक्रिया ह्यांच्यामधील एक चमत्कारिक संबंध फार स्पष्ट रीतीनें दिसून आला. ह्या संबंधाची कल्पना त्यावेळच्या वस्तुस्थितीवरून करितां येईल. ती वस्तुस्थिति थोडक्यांत दर्शविणें असल्यास इतकेंच सांगणें पुरे आहे कीं, ब्रह्मचर्यव्रताचा प्रसिद्धपणें अंगीकार करणारे धर्मोपदेशक व तपस्विनी स्त्रियाँ* ह्यांमध्यें सामान्य लोकांपेक्षां अधिक दुराचार आढळत असे.

यूरोपाच्या उत्तर प्रदेशांत राहणाऱ्या लोकांची सुद्धां वैवाहिक नीति प्रथम बऱ्या प्रकारची असून ती वरच्या प्रमाणेंच बिघडत गेली. तथापि त्या लोकांचेंही एका प्रकारच्या सामाजिक सुधारणेंत पुढें पाऊल पडत होतें. अलीकडे मात्र राजकीय व इतर सामाजिक गो-

---

* रोमन क्याथोलिक लोकांमध्यें कित्येक अविवाहित स्त्रिया आपलें आयुष्य परमेश्वरास अर्पण करितात व आपला सर्व काळ ईश्वराच्या आराधनेंत व परोपकारांत घालवितात. अशा स्त्रीला ' नन् ' म्हणतात. नन् ( तपस्विनी ) होतांना ' ब्रह्मचर्य पाळीन " म्हणून शपथ घ्यावी लागते. रोमन क्याथोलिक धर्मोपदेशकांना ( फादर लोकांना ) ही तशीच शपथ घ्यावी लागते. ह्या दोन ईश्वराला वाहिलेल्या अविवाहित वर्गांमध्यें त्या प्रसंगीं फारच अनीति माजली होती.

ष्टींप्रमाणेंच वैवाहिक नीतीच्या संबंधानेंही सुधारलेल्या लोकांचें पाऊल पुढें पडत आहे.

ह्या परस्परविरुद्ध गोष्टींचा व फेरफारांचा मेळ बसविणें अशक्य आहे. ह्याठिकाणीं कार्यकारणसंबंध फारच भानगडीचा आहे. तथापि जीं कित्येक कारणें महत्त्वाचीं दिसतात त्यांच्या परिणामांची इयत्ता जरी सांगतां आली नाहीं तरी त्यांचा उल्लेख करण्यास हरकत नाहीं.

टाहिटी बेटांतील लोकांमधल्या स्त्रीपुरुषांच्या स्वैरवर्तनाला त्या बेटाच्या विलक्षण सुपीकतेमुळें बरेंच उत्तेजन मिळालें असेल. त्यांच्या जमिनींत आपोआप उत्पन्न होणाऱ्या पदार्थांच्या विपुलतेचें वर्णन करितांना कुक साहेब म्हणतोः—

" मनुष्यांनीं निढळच्या घामानें आपलें अन्न मिळवावें हा जो मनुष्यजातीस शाप मिळाला आहे, त्यापासून ह्या लोकांना देवानें मुक्त केलें आहे असें दिसतें." ज्याठिकाणीं स्वतःच्या व मुलांच्या चरितार्थाचें काम इतकें सुकर असतें त्याठिकाणीं बापाची मदत न होतां मुलांविषयीं सर्व जबाबदारी आईवरच पडली तरी फारसें नुकसान होत नाहीं. परंतु ज्याठिकाणीं निर्वाहाचीं साधनें मिळविणें फार कठिण असतें त्याठिकाणीं आईवर अशी जबाबदारी पडली असतां आई व मुलें ह्या उभयतांवरही फार घातक परिणाम होतात. ह्यामुळें बहुधा अशा ठिकाणीं स्त्रीपुरुषांच्या अनियंत्रित व्यवहाराला लोकमत जितकों विरुद्ध असेल, तितकें ज्या

ठिकाणीं निर्वाहाच्या साधनांची विपुलता असेल त्या ठिकाणीं असणार नाहीं.

आणखी एका कारणानें स्त्रीपुरुषांच्या अनियंत्रित वर्तनाला उत्तेजन मिळण्याचा संभव आहे. ह्याचें उदाहरण आफ्रिकेंत आढळून येतें. बहुतेक अर्धवट सुधारलेल्या लोकांप्रमाणेंच दहोमे येथील लोकांमध्यें कुटुंबविस्तार मोठा असणें हें भाग्यशालीपणाचें लक्षण समजलें जातें. मनुष्याच्या प्राथमिक स्थितीचा विचार केला असतां अशा प्रकारची समजूत असणें हें अगदीं स्वाभाविक आहे असें सहज लक्ष्यांत येईल. त्या स्थितींत ' बळी तो कान पिळी ' ह्या तत्त्वावर सर्व व्यवहार चालावयाचे असल्यामुळें एका टोळींतील लोकांनीं दुसऱ्या टोळ्यांपासून आपलें रक्षण करूनच भागत नाहीं. तर टोळींतल्या टोळींत सुद्धां प्रत्येकाला इतरांपासून आपलें रक्षण करावें लागतें. आणि ज्या कुटुंबांत पुष्कळ मनुष्यें असतात तें कुटुंब इतरांपासून आपलें संरक्षण चांगल्या प्रकारें करूं शकतें. ह्यामुळें प्राथमिक स्थितींत संतति नसणें हें हतभागीपणाचें लक्षण व ती विपुल असणें हें भाग्यशालीपणाचें लक्षण समजलें जाणें साहजिक आहे. आणि ह्यामुळेंच बहुधा उत्तर आफ्रिकेंत अविवाहित स्त्रीला मुलेंबाळें होऊन तिनें कुटुंबाचा संसार चालविणें ही नित्याच्या व्यवहारांतली गोष्ट होऊन गेलेली आहे व तीबद्दल कोणास कांहीं फारसें वाटत नाहीं. दुसऱ्या एका ठिकाणच्या लोकांसंबंधानें एक प्रवासी म्हणतो कीं, अविवाहित स्त्रीला जर पुष्कळशीं मुलें झालीं तर तिच्या व्यभि-

चाराबद्दल लोक तिला क्षमा करितात. ज्याठिकाणीं जुलमामुळें फार मनुष्यें मरत असतील त्याठिकाणीं पुष्कळ संतति उत्पन्न होणें अत्यवश्यक होऊन जातें.

ह्यावरून असें अनुमान निघतें कीं, दंग्याधोप्यांचें वास्तव्य आणि वैवाहिक नीतीची शिथिलता ह्यांचा कांहीं तरी संबंध असावा. पूर्वीं दिलेल्या उताऱ्यांत जें अनेक ठिकाणच्या लोकांच्या वस्तुस्थितीचें चित्र काढिलें आहे त्यावरूनही ह्या अनुमानास थोडीबहुत बळकटी येते. हें अनुमान खरेंसें वाटण्याला आणखीही एक कारण आहे. दंग्याधोप्याच्या काळांत स्त्रियांची जी अगदीं शोचनीय अवस्था होऊन जाते तीमुळें वैवाहिक नीतीचा ऱ्हास होण्याला मदत होते. ज्याठिकाणीं नेहमींच्या धांगडधिंग्यामुळें स्त्रियांना सकाळपासून संध्याकाळपर्यंत राबावें लागतें, व ज्याठिकाणीं लढाईंत पकडून आणिलेल्या स्त्रियांना विजयी लोकांच्या इच्छेप्रमाणें वागविलें जातें किंवा गुलामांप्रमाणें त्यांची विक्री केली जाते, त्याठिकाणीं स्त्रियांच्या इच्छेची किंमत नसल्यामुळें पुरुषांच्या स्वार्थाला आळा घालण्यास कांहींच उरत नाहीं. अशा स्थितींत वैवाहिक बंधनें शिथिल होणें अपरिहार्य आहे. लढायांच्या धामधुमींत लक्षावधि लोकांचा संहार होत असल्यामुळें जेथें बहुपत्नीकत्वाची चाल रूढ झालेली असते तेथें राजे, सरदार आणि श्रीमंत लोक ह्यांचे जनानखाने व दासींना विकत देण्याघेण्याची चाल इत्यादि गोष्टी वैवाहिक नीतीच्या उन्नतीला प्रतिबंध करणाऱ्या असतात. वैवाहिक नीतीच्या संबंधानें रो-

मन लोकांना जी अत्यंत निकृष्टावस्था प्राप्त झाली ती लढायांमुळें अनेक शतकेंपर्यंत अस्वस्थता कायम राहिल्यानंतर प्राप्त झाली. सतत चालणाऱ्या लढायांमुळेंच अस्तित्वांत आलेल्या फ्यूडल सिस्टिमच्या काळांत ही पहिल्या रात्रीवरील हक्काची चाल* तशीच चालू राहिली आणि लढाई हेंच ज्याचें सर्वस्व आहे अशा रशिया देशांत थोड्या वर्षांपूर्वी जमिनीच्या मालकास त्या जमिनीवर खपणाऱ्या कुळांच्या मुलींची पाहिजे त्या प्रकारची व्यवस्था लाविण्याचा अधिकार असे. ह्या सर्व गोष्टींचा विचार केला म्हणजे संग्रामशीलत्व हें वैवाहिक नीतीच्या उन्नतीला प्रतिकूल आहे असें दिसून येतें.

तथापि शांततेनें राहणाऱ्या लोकांमध्यें नेहमींच वैवाहिक नीति वरच्या पायरीची असते असें समजतां कामा नये. पूर्वीं जीं कित्येक उदाहरणें दिलीं आहेत त्यांत शांततेनें राहणाऱ्या कित्येक लोकांची वैवाहिक नीति चांगल्या प्रकारची दिसते ही गोष्ट खरी, तरी कित्येकांची ती तशी नाहीं. टोड लोकांची स्थिति अगदीं विरुद्ध आहे. त्याचप्रमाणें एस्किमो लोक आ-

---

* आपल्या कित्येक गुजराथी लोकांमध्यें जशी एक चमत्कारिक चाल आहे तशीच प्राचीन काळीं यूरोपांत होती. ह्या गुजराथी लोकांत स्त्रीपुरुषांचें खरें लग्न होते वेळीं (पहिल्या लटोपटीच्या लग्नाच्या वेळीं नव्हे) प्रथमतः धर्मगुरूनें (महाराजानें) स्त्रीचा उपभोग केल्यानंतर नवऱ्याला तिची प्राप्ति होते. त्याचप्रमाणें यूरोपांत लग्नानंतरच्या पहिल्या रात्रीं नववधूवर जमीनदाराचा (लार्डाचा) हक्क असे व नंतर नवऱ्याचा हक्क लागू होई.

पल्या लग्नाच्या बायकांची देखील अदलाबदल करितात; परंतु लढाई म्हणजे काय ह्याची त्यांस कल्पना देखील नाहीं."

आतां ह्या गुंतागुंतीच्या व विचारदृष्टीला चकविणाऱ्या पुराव्यावरून जें एक सत्य निष्पन्न होतें तें मात्र सांगावयाचें राहिलें आहे. तें सत्य हें कीं, वैवाहिक नीति उन्नत प्रकारची असल्यावांचून सामाजिक स्थिति चांगली असण्याचा संभव नाहीं. मध्यमावस्थेंत असणाऱ्या लोकांच्या स्थितीवरून जरी ही गोष्ट तितकी स्पष्ट दिसत नाहीं तरी रानटी लोकांच्या व सुधारलेल्या लोकांच्या स्थितीवरून ती स्पष्ट दिसते. आस्ट्रेलियाच्या नैर्ऋत्य भागीं राहणारे कुकाठा म्हणून लोक आहेत ते विश्वासघात, कृतघ्नपणा, खोटेपणा आणि हरएकप्रकारची ठकबाजी ह्या दुर्गुणांविषयीं प्रसिद्ध आहेत. त्या लोकांजवळ मालमत्ता वगैरे कांहीं नसतें. अपराध्यांना शिक्षा होईल ही दहशत त्यांना नाहीं आणि न्याय—अन्याय ह्यांच्यामधील भेदही त्यांस समजत नाहीं. वैवाहिक नीतीच्या संबंधानें तर त्यांस कल्पनाही नाहीं. आतां सुधारणेच्या मार्गांत ज्यांचें पाऊल सर्वांत पुढें आहे अशा यूरोप व अमेरिका खंडांतील राष्ट्रांची स्थिति पाहिली असतां असें दिसून येईल कीं, त्यांची वैवाहिक नीति बरीच वरच्या पायरीची असून ( निदान स्त्रियांची तरी ), समाजाच्या सुस्थितीला अवश्य लागणाऱ्या ज्या इतर गुणांचा आस्ट्रेलियन् लोकांत अभाव आहे ते गुणही ह्या लोकांच्या अंगीं बरेच आहेत. सुधारलेल्या समाजांची पू-

वींची स्थिति आणि अलीकडली स्थिति ह्यांची तुलना केली असतांही वरील सत्य स्पष्ट दिसून येतें. उदाहरणार्थ इंग्लंडची हल्लींची स्थिति आणि द्वोनशें वर्षांच्या पूर्वींची स्थिति ह्यांची, वैवाहिक नीति व इतर प्रकारची सुस्थिति, ह्यांसंबंधानें तुलना केली असतां दोहोंमध्येंही लोकांचें पाऊल सारखें पुढें पडत चाललें आहे असें दिसून येईल.

उच्चप्रकारच्या वैवाहिक नीतीनें समाजाच्या उन्नतीला तीन प्रकारांनीं मदत होते. पहिल्या प्रकाराचा उल्लेख पूर्वींच एकेठिकाणीं केला आहे. पुरुष स्वस्त्रीरत असला म्हणजे त्याचें लक्ष्य नेहमीं घराकडे असतें व तो आपल्या बायकोची आणि मुलांची काळजी घेतो. ह्यामुळें बालसंगोपनाचें काम चांगल्या रीतीनें होतें. बहुतेक सर्व ठिकाणीं व विशेषतः जेथें चढाओढीमुळें मुलांची काळजी घेणें हें बऱ्याच त्रासाचें काम असतें त्या ठिकाणीं बापाची मदत नसली तर मुलांच्या पोषणाचा सर्व बोजा आईवरच असतो. व तो तिला न झेंपल्यामुळें तिजवर व मुलांवर वाईट परिणाम होतात. ह्यासाठीं वैवाहिक संबंधाच्या शिथिलतेमुळें कमी प्रतीचीं मनुष्यें निपजण्याचा संभव आहे. व कोणत्याही समाजांत हा प्रकार बराच माजल्यास त्या समाजाला उतरतीकळा लागल्यावांचून राहणार नाहीं.

दुसरें कारण म्हटलें म्हणजे एकपत्नीकत्वाच्या संबंधानें स्त्रीपुरुषांच्या मनांत ज्या उन्नत प्रकारच्या मनोवृत्ति उत्पन्न होत असतात त्यांचा व्यभिचारानें विघात होतो हें होय. ज्या समाजांत कमी प्रतीचे विवाह

प्रचारांत असतात किंवा अनियंत्रित व्यवहार बराच चालतो त्या समाजांत ह्या मनोवृत्तींची फारशी वाढ होण्याचा संभव नाहीं. विवाहपाशानें बद्ध झालेल्या स्त्रीपुरुषांमधील अप्रतिम प्रेम, परस्परांविषयीं विलक्षण प्रकारची आवड, व जणूं काय दोन जीवांचा एकच जीव बनला आहे कीं काय असें एकमेकांच्या सुखदुःखाचें एकवटणें, हे अवर्णनीय मनोधर्म अत्युन्नत प्रकारच्या वैवाहिक नीतीवांचून उत्पन्न होणें शक्य नाहीं. मनुष्याच्या कामवासनेपासून मोठ्या अतर्क्यरीतीनें ह्या अमोलिक मनोधर्मांची उत्क्रान्ति झाली आहे. ह्या मनोधर्मांनीं युक्त अशी कामवासना जगांतून नाहींशी झाली तर मनुष्याच्या जीविताला रमणीयता व मनोवेधकत्व आणणारें एक अत्यंत महत्त्वाचें कारण नाहीं-सें झाल्यासारखें होईल. व्यभिचारानें उन्नतप्रकारच्या कामवासनेचें पृथक्करण होतें व मनुष्याच्या श्रेष्ठपदवीस शोभणारे जे अत्युच्च घटकावयव, म्हणजे वर सांगितलेले मनोधर्म, ते नाहींसे होतात आणि पशुपक्ष्यादिकांस साधारण असें जें इंद्रियसुख तेवढें मात्र शिल्लक राहतें. असें झाल्यानें प्रजोत्पादनाचें काम सुरू राहील, परंतु स्त्रीपुरुषांच्या समागमापासून होणाऱ्या अत्यंत श्रेष्ठ प्रतीच्या सुखाला मनुष्यें मुकतील.

व्यभिचारानें मनुष्याचीं दुसरींही रसिकपणामुळें उत्पन्न होणारीं कित्येक सुखें नाहींशीं होतात किंवा बरींच कमी होतात. कादंबऱ्या, नाटकें, काव्यें आणि गायनाचीं मधुर पद्यें ह्यांत नायक व नायिका ह्यांजमधील विलक्षण प्रेमांत अत्युन्नत प्रकारचा भाग किती अस-

तो व त्यामुळें आपणांस किती आनंद होतो हें मनांत आणिलें म्हणजे, ज्या गोष्टींची प्रवृति वरील कल्पनेच्या उलट असेल त्यांमुळें ह्या सुखाचा समूळ नाश झाला नाहीं तरी तें बऱ्याच अंशांनीं कमी होईल असें सहज दिसून येईल.

# प्रकरण १४

## सामान्यविचार व गोषवारा

थोड्या व निश्चयात्मक गोष्टींवरून बिनचूक अनुमानें काढितां येणें शक्य आहे. परंतु पुष्कळ गोष्टी असून त्याही अनिश्चित असल्या म्हणजे त्यांवरून काढिलेल्या अनुमानांविषयीं कांहीं खात्रीपूर्वक सांगतां येत नाहीं. गणितशास्त्रांतील अनुमानें पहिल्या प्रकारचीं उदाहरणें होत व समाजशास्त्रांतील अनुमानें दुसऱ्या प्रकारचीं होत. व्यक्तीच्या जीविताविषयीं जे प्रश्न उद्भवतात ते तर गुंतागुंतीचे आहेतच, पण अनेक व्यक्तिघटित समाजाच्या जीविताचे प्रश्न त्यांहूनही गुंतागुंतीचे आहेत. आणि त्यांत परिस्थिति सारखी नसल्यामुळें व एका ठिकाणींही ती वारंवार बदलणारी असल्यामुळें त्या प्रश्नांचा बिकटपणा फारच वाढला आहे.

सामाजिक गोष्टींविषयीं सामान्य सिद्धांत काढण्याच्या मार्गांत आतां सांगितलेल्या वस्तुस्थितीसंबंधाच्या अडचणी असून, त्या वस्तुस्थितीबद्दल आपलें अपूर्ण ज्ञान असल्यामुळें आणखी अडचणी उत्पन्न होतात त्या निराळ्याच. ज्या पुराव्यावरून वादग्रस्त प्रश्नांचा निकाल करावयाचा असतो त्यांत अनेक दोष असतात. संशयात्मकता, अपूर्णता आणि असंबद्धता ह्यांच्या जाळ्यांत सांपडलेलें सत्य बाहेर काढावयाचें असतें. सर्वच प्रवाशांनीं सांगितलेल्या हकीकतीवर विश्वास ठेवितां येत नाहीं. कित्येकांना यथार्थ अवलोकन करितां येत नाहीं, कि-

त्येकांचे मनांत श्रद्धेमुळें किंवा रूढीमुळें दुराग्रह उत्पन्न झालेले असतात व कित्येकांची स्वतःचीच आवडनावड असते; आणि त्या सर्वांनाही खरी माहिती मिळविण्याला बऱ्याच अडचणी असतात. त्याचप्रमाणें इतिहासकारांची स्थिति असते. त्यांनीं दिलेल्या हकीकतींपैकीं फारच थोडा भाग प्रत्यक्ष माहितीचा असतो व बाकीचा सर्व अप्रत्यक्षरीतीनें मिळविलेल्या माहितीवरून दिलेला असतो. ही माहिती इतिहासकारांशीं येऊन पोहोंचेपर्यंत तिजवर अनेक प्रकारचे संस्कार झालेले असतात. पक्षाभिमान, धर्माभिमान आणि देशाभिमान ह्यांमुळें कित्येक ठिकाणीं अतिशयोक्ति होत असते, कित्येक भाग अजीबात गळून जात असतात व कित्येक ठिकाणीं विपरीत भास करून देण्याचा प्रयत्न केलेला असतो. ह्यामुळें लोकांच्या नीतिविषयक समजुतींविषयीं पुरावा दिला आहे त्यांत अपुरतेपणा असण्याचा संभव आहे.

एकाच नांवाखालीं मोडणाऱ्या अनेक लोकांमध्यें बरेंच स्वभाववैचित्र्य आढळून येतें. उदाहरणार्थ आस्ट्रेलियन् लोक घ्या. ह्यांपैकीं कित्येक जातींचे लोक गरीब स्वभावाचे असून त्यांना वांकवावें तसे ते वांकतात. परंतु दुसऱ्या कांहीं जातींचे लोक कडवे असून त्यांना दाबांत ठेविणें फार जड जातें. ह्यामुळें एकाच लोकांविषयीं अनेक प्रवाशांनीं दिलेल्या माहितींत मेळ न पडणें शक्य आहे. एका प्रवाशाचा एका पोटजातीच्या लोकांशीं संबंध आल्यामुळें एका प्रकारचा समज होईल व दुसऱ्याचा दुसऱ्या पोटजातीच्या लोकांशीं संबंध आला तर भिन्न

प्रकारचा समज होईल. प्रवाशांमध्यें मतभेद होण्याला आणखीही एक कारण आहे. लोकांच्या कल्पना, समजुती आणि आचरण ह्यांमध्यें कालभेदानें फरक पडत जाण्याचा संभव आहे. तेव्हां दोन प्रवासी एकाच ठिकाणीं भिन्नकालीं गेले असतील व त्या कालांमध्यें बऱ्याच वर्षांचें अंतर असेल तर त्या दोघांनीं दिलेल्या माहितींत विसंगतपणा असण्याचा संभव आहे. कित्येक ठिकाणच्या लोकांच्या मूळच्या कल्पना आणि समजुती मिशनरी लोकांच्या प्रयत्नांनीं पालटण्याचा संभव आहे व त्यापेक्षांही युरोपियन व्यापारी आणि वसाहत करून राहणारे लोक ह्यांच्या सहवासामुळें तसें घडण्याचा अधिक संभव आहे. जगाच्या बहुतेक भागांतील मूळचे रानटी लोक गोऱ्या लोकांच्या सहवासानें बिघडून गेले आहेत अशाविषयीं पुरावा सांपडतो. अशा अनेक आगंतुक कारणांमुळें स्वाभाविकरीतीनें मनुष्यांवर जे परिणाम घडून यावयाचे त्यांत बदल होतो.

लोकांचीं राहण्याचीं ठिकाणें व त्यांचे नित्यव्यवसाय ह्यांत बदल झाल्यामुळें त्यांच्या समजुतींत फरक पडतो तो आणखी आहेच. एका ठिकाणच्या लोकांना शेजाऱ्यांशीं लढणें भाग पाडिलें जातें व दुसऱ्या ठिकाणच्या लोकांत जुलमानें शांतता राखिली जाते. ह्याचा परिणाम असा होतो कीं, पूर्वस्थितींतील मनोविकार व समजुती नवीन स्थितींत देखील पुष्कळ कालपर्यंत कायम राहतात. आणि त्या तत्कालीन स्थितीशीं विसंगत दिसतात.

अशा स्थितींत पुराव्यांत विसंगतपणा आढळणारच

व त्यावरून काढिलेलीं अनुमानें सर्व ठिकाणीं लागू पडणें असंभवनीय आहे. असल्या गुंतागुंतीच्या प्रश्नांत स्थूल दृष्टीनें विचार केल्यावांचून गत्यंतर नाहीं. सरासरीचें मान चुकलें नाहीं म्हणजे झालें.

सामाजिक स्थितींतील परस्परावलंबनांचें स्वरूप नीटपणें लक्ष्यांत आणिल्याशिवाय नीतिसिद्धांतांचें महत्त्व समजणार नाहीं. नीतिमीमांसेंत नीतिशास्त्राचा सामाजिकदृष्ट्या विचार करितांना असें दाखविण्यांत आलें आहे कीं, नीति म्हणजे त्या त्या सामाजिक स्थितीस योग्य असे मनुष्याच्या वर्तनाचे मार्ग, दुसरें कांहीं नाहीं. प्राथमिक स्थितींतील कित्येक जातींचे लोक एकमेकांशीं संबंध न ठेवितां परस्परांच्या संनिध राहतात. लोकांच्या अशा संनिध राहण्याला ‘ सामाजिक स्थिति ’ हें नांव देतां येणार नाहीं. कोणाच्या वाटेस न जाणाऱ्या व कोणाला मदतही न करणाऱ्या अशा लोकांचीं अपवादात्मक उदाहरणें सोडून इतर लोकांविषयीं विचार केला असतां दिसून येईल कीं, कोणत्याही समाजाची सामाजिक स्थिति कायम राहण्याला त्याच्या घटकांच्या सहकार्याची अत्यंत अवश्यकता आहे. केव्हांकेव्हां बाहेरच्या शत्रूंपासून आपलें रक्षण करण्याकरितां परस्परांच्या साह्याची अवश्यकता लागेल व केव्हांकेव्हां मनुष्यांच्या पोषणासाठीं संघशक्तीनें यत्न करणें अवश्यक होईल. ज्या समाजाच्या संबंधानें इतर सर्व गोष्टी सारख्या असतील त्यांचा उत्कर्ष, सहकार्याचे अत्यवश्यक नियम त्यांच्या घटकांकडून ज्या प्रमाणानें पाळिले जात असतील त्या प्रमाणावर अवलंबून राहील. आणि जीव-

नार्थ कलहामुळें अधिकसामर्थ्यवान् समाजच शिल्लक राहिल्यामुळें सहकार्यविषयक नीतिनियमांविषयीं मनुष्यांच्या मनोवृत्ति व समजुती फार प्रबल होतात. परंतु व्यक्तीच्या ज्या वर्तनाचा सहकार्याशीं संबंध येत नाहीं त्याविषयींच्या मनोवृत्ति व समजुती तितक्या प्रबल होत नाहींत व त्याविषयीं अनेक लोकांमध्यें मेळ राहत नाहीं.

गेल्या दोन प्रकरणांत खाण्यापिण्याचा नेमस्तपणा आणि वैवाहिक नीति ह्या दोन विषयांचें जें विवेचन केलें आहे त्यावरून स्पष्ट दिसतें कीं ह्या विषयांबद्दल लोकांच्या कल्पना, मनोवृत्ति आणि समजुती ह्यांचा विशेष प्रकारच्या सामाजिक स्थितीशीं किंवा उन्नतीशीं फारसा संबंध नाहीं. परंतु पूर्वींच्या प्रकरणांत सांगितलेल्या अनेक विषयांबद्दल लोकांचे विचार सामाजिक स्थितीवर अवलंबून असलेले दिसतात. ह्या गोष्टीचा उलगडा वर सांगितलेल्या कारणावरून होण्यासारखा आहे. कारण खाणेंपिणें आणि स्त्रीपुरुषांमधील व्यवहार ह्या गोष्टी व्यक्तीच्या खाजगी संबंधाच्या आहेत. खाण्यापिण्याच्या कामांत अत्याचार करणारे लोक जर समाजांत पसरलेले असले तर त्यांपासून समाजावर जे वाईट परिणाम व्हावयाचे ते अप्रत्यक्षरीतीनेंच काय होण्यासारखे असतील ते होतील. जोंपर्यंत शिपायांचा नियमितपणा व शक्ति ह्यांजवर परिणाम होण्यासारख्या रीतीनें दारूबाजपणाचें किंवा खादाडपणाचें व्यसन सैन्यांत प्रवेश करणार नाहीं तोंपर्यंत राष्ट्राच्या लष्करी सामर्थ्यांत म्हणण्यासारखा फरक पडत नाहीं, ही पहिली गोष्ट. आणि जोंपर्यंत दारूबाज किंवा खादाड

मनुष्य आपल्या शेजाऱ्याच्या वाटेस जाऊन त्यांना कोणत्याही प्रकारें त्रास देत नाहीं तोंपर्यंत समाजाच्या औद्योगिक व्यवसायांत कोणत्याही रीतीचें प्रत्यक्ष विघ्न उत्पन्न होऊन समाजाच्या पोषणास हरकत येत नाहीं, ही दुसरी गोष्ट. मनुष्य जरी दारूबाज किंवा खादाड असला तरी दुसऱ्याच्या जीविताला किंवा वित्ताला त्याच्याकडून कोणत्याही प्रकारचा धक्का न पोंचणें शक्य आहे, व तो आपले करारही पूर्णपणें पाळूं शकेल. इतकें झालें म्हणजे सहकार्याच्या अत्यवश्यक नियमांचें त्याजकडून पालन झालें. त्याच्या वर्तनामुळें समाजाचें नुकसान म्हटलें म्हणजे त्याच्या एका घटकाची अवनति झाल्यामुळें काय होईल तेवढेंच. पातिव्रत्य किंवा पत्नीव्रत ह्यांचें उल्लंघन करण्याचा परिणाम सुद्धां बहुतेक वरच्यासारखाच होईल. त्याच्या योगानें राष्ट्राच्या संरक्षणाला किंवा पोषणाला ज्या सहकार्याची अवश्यकता आहे त्यांत कोणत्याही प्रकारें प्रत्यक्षरीतीनें व्यत्यय येऊं शकत नाहीं. त्यापासून कालान्तरानें लोकसंख्या कमी होणें किंवा लोकांच्या अंगचा जोम कमी होणें असे अप्रत्यक्ष रीतीचे वाईट परिणाम घडूं शकतील. खाणेंपिणें व वैवाहिकसंबंध ह्यांमधील अत्याचारांचे समाजावर जे दुष्परिणाम घडतात त्यांचा समाजांना चांगला उमज न पडल्यामुळें ह्या संबंधानें लोकांच्या समजुती संगतवार दिसत नाहींत.

ज्या वर्तनानें सहकार्याच्या नियमांचें उघड रीतीनें उल्लंघन होतें त्यांविषयीं अशी स्थिति दिसून येत नाहीं. भितरेपणा किंवा आज्ञाधारकपणाचा अभाव ह्यांमुळें रा-

ष्ट्राचें सामर्थ्य कमी होतें ही गोष्ट ढळढळीत दिसत असते. कारण ह्या दोषांमुळें राष्ट्राच्या लढाऊपणांत लागलीच कमतरता उत्पन्न होते. ह्या परिणामांमुळें लवकरच ह्या दोषांच्या स्वरूपाची राज्यकर्त्यांना आणि त्यांच्या द्वारें लोकांना ओळख पटते व त्यांविषयीं स्वाभाविकपणें समाजहिताला अवश्यक अशा कल्पना आणि समजुती उत्पन्न होतात. त्याचप्रमाणें समाजबांधवांचे खून करणें, त्यांच्या अंगावर चालून जाऊन त्यांना दुखापत करणें, त्यांच्या मालमत्तेचें हरण करणें व परस्परांमधील करार मोडणें ह्या गोष्टींनीं लोकांच्या नित्य व्यवसायांमध्यें इतक्या उघड रीतीनें व्यत्यय येतो कीं, अशा प्रकारच्या गोष्टींविषयीं लोकांचे मनांत तिरस्कारबुद्धि उत्पन्न होण्याचें कार्य बहुधा नियमितरीतीनें घडून आलेलें आढळतें. ह्यामुळें असल्या अपराधांविषयीं जरी निरनिराळ्या समाजांतील लोकांच्या समजुतींत पुष्कळच भेद दिसून येतो तरी त्या भेदाचा संबंध लोकांच्या सामाजिक स्थितीशीं व त्यांच्या व्यवसायांशीं असतो. ज्या अपराधांमुळें लोकांच्या नित्यव्यवसायांत म्हणण्यासारखा व्यत्यय येत असेल त्यांविषयीं लोकांच्या मनांत विशेष तिरस्कारबुद्धि उत्पन्न होऊन इतरांकडे दुर्लक्ष्य होतें.

ह्या पुस्तकांतील अनेक प्रकरणांत ज्या नीतिविषयक प्रवृत्तींचें विवेचन केलें आहे त्यावरून सांग्रामिक स्थितींत मनुष्यांच्या अंगीं कोणत्या प्रवृत्तींचा उत्कर्ष होतो हें कळून येईल. शेजारच्या लोकांशीं लढणें हाच ज्यांच्या व्यवसायांचा मुख्य रोंख असतो व जे फुरस-

तीच्या वेळांतही युद्धाचीच तयारी करीत असतात त्या लोकांमध्यें मारहाण व दरोडेखोरी हे गुण अभिमानास्पद मानिले जातात; सूड घेणें हें अत्यवश्यक कर्तव्य होऊन बसतें; पटाईतागिरीचें खोटें बोलणें शहाणपणाचें लक्षण ठरतें; आणि ( ज्या लहान टोळ्यांची उन्नति होऊन त्यांचे विस्तृत समाज बनण्याचा संभव नसतो त्याशिवाय करून बाकीच्या टोळ्यांत ) जुलुमी राजांच्या हुकुमांत वागणें हा सर्वांत श्रेष्ठ सद्गुण समजला जातो. पण उद्योगाविषयीं तिरस्कार उत्पन्न होतो आणि न्यायाचें फारसें महत्त्व वाटत नाहीं. समाजाच्या अस्तित्वाला अगदींच अवश्यक असेल तेवढ्याच पुरतें मात्र न्यायाकडे लक्ष्य दिलें जातें. आतां ह्याच्या उलट ज्या समाजांची स्थिति असते त्यांतील लोकांच्या स्वाभाविक प्रवृत्ति ह्याच्या उलट असतात. सांग्रामिक व्यवसाय बरेच कमी झाले किंवा अगदीं नाहींसे झाले व लोकांच्या व्यवसायांचा रोंख समाजाच्या पोषणाला व वृद्धीला अत्यवश्यक अशीं औद्योगिक साधनें उपलब्ध करण्याकडे असला म्हणजे निष्कारण जुलुमाचें वर्तन लोकांना आवडेनासें होतें; चोरी—मग ती शत्रूंची कां असेना—अपमानास्पद वाटूं लागते; सूड घेण्याची तितकी अवश्यकता वाटत नाहीं; खोटें बोलणें सर्वत्र तिरस्कारास्पद मानिलें जातें; लोकांच्या परस्परांमधील व्यवहारांत न्यायाची अत्यवश्यकता मानिली जाऊन त्याची अंमलबजावणीही केली जाते; राजाज्ञापालन सरसकट भूषणास्पद मानिलें जात नाहीं; जुलुमी राजाच्या हुकुमापुढें मान वांकविणें निंद्य समजलें जातें; आणि उद्यो-

ग करणें हें हलकेपणाचें तर समजलें जात नाहींच, पण उलट प्रत्येक मनुष्यानें कोणत्या तरी स्वरूपानें उद्योग केलाच पाहिजे अशी लोकांची समजूत बनत जाते.

वर जे संबंध सांगितले ते प्रत्येक समाजांत जसेच्या तसेच आढळून न येण्याला पुष्कळ कारणें आहेत. अत्यंत प्राचीन कालापासून निरनिराळ्या समाजांतील मनुष्यांवर झालेले आनुवंशिक परिणाम, दीर्घकालपर्यंत चालत असल्यामुळें ज्यांना विलक्षण महत्त्व आलें आहे अशा रूढींचे परिणाम, धर्मश्रद्धेमुळें मनावर होणारा संस्कार व प्रत्येक समाजाची भिन्न परिस्थिति ह्या सव गोष्टींमुळें वरील संबंधांत थोडाबहुत तरी फरक पडणारच. तथापि स्थूलदृष्टीनें पाहिलें असतां ह्या अनुमानांचें सत्यत्व दिसून आल्यावांचून राहणार नाहीं.

निरनिराळ्या समाजांत किंवा एकाच समाजांतल्या परंतु भिन्न स्थितींत राहणाऱ्या लोकांत आढळून येणाऱ्या नीतिविषयक समजुती अनेक प्रसंगीं परस्परांशीं अगदीं विरुद्ध असतात. ह्या गोष्टीची सत्यता दाखविणारीं पुष्कळच उदाहरणें एवढावेळपर्यंत देण्यांत आलीं आहेत. पण ही महत्त्वाची गोष्ट मनावर चांगली ठसण्याकरितां ज्यांत परस्परांमधील विरोध स्पष्टपणें दिसत आहे अशीं कांहीं उदाहरणें एकत्र दिलीं असतां बरें पडेल.

बहुतेक सुधारलेल्या लोकांत खून करणें हा अपराध इतका भयंकर समजला जातो कीं, तो करणाराच्या कीर्तीला जो कलंक लागतो तो अनंतकालपर्यंत कशानेंही धुपून जात नाहीं. व कांहीं पिढ्यांपर्यंत त्या मनु-

ष्याच्या आप्तांचेंही नांव खराब होतें. परंतु पठाण लोकांमध्यें ह्याच्या अगदीं उलट समजूत आढळून येते. एका पठाणानें एका मौलवीचा खून केला होता. पुढें त्याचा सूड उगविणाऱ्या लोकांबरोबर आपला निभाव लागत नाहीं असें पाहून तो सरतेशेवटीं म्हणालाः—"मी कांहीं तरी चांगलें कृत्य करून मरेन. मी जाईन आणि एका साहेबाला मारीन." नंतर त्यानें खरोखरच सैन्यांतल्या एका सार्जंटाला गोळी घालून मारिलें आणि त्या अपराधाबद्दल तो फांशीं गेला.

इंग्लंडांत साधारण लोकमत असें आहे कीं, एकादा मनुष्य जर सगळा स्वाभिमान टाकून दुसऱ्याच्या अगदीं ताब्यांत राहूं लागला व त्याचा बंदागुलाम झाला तर त्या मनुष्याविषयीं जिकडेतिकडे तिरस्कार उत्पन्न होतो. परंतु फिजी बेटांत डूकेट म्हणून एक गुलामांचा प्रदेश आहे, तेथील लोकांचें मत अगदीं भिन्न आहे. ते म्हणतातः—" आपल्या राजांच्या भक्ष्यार्थ उपयोगीं पडणें आणि त्यांच्या यज्ञांत बलि होणें हें आपलें कर्तव्य आहे. आणि असल्या पुण्यकृत्यांना आपण योग्य आहों असें मानिलें जाणें हें आपणांस भूषणावह आहे. "

इतक्या कमालीचें नव्हे परंतु अशाच स्वरूपाच्या विरोधाचें एक उदाहरण इंग्लंडच्या इतिहासांत घडून आलें आहे. थोड्या शतकांपूर्वी इलिझाबेथ राणीच्या कारकीर्दीत इंग्लंड देशांत गुलामांच्या व्यापाराची सुरुवात झाली. त्यावेळीं हें विलक्षण महत्कृत्य समजलें जाऊन त्याचा उपक्रम ज्याच्या हातून घडला त्या स-

रदाराचा मोठा आदरमान होऊन त्याला नवीन किताब मिळाले व विशेषप्रतिष्ठासूचक एक प्रकारचा पोषाग घालण्याची सरकारांतून परवानगी मिळाली. अशा रीतीनें सर जान हाकिन्स ह्याच्या कृत्याचा संमाननीयपणा कबूल केला जाऊन त्याची कीर्ति चोहोंकडे पसरली. परंतु चालू शतकांत लोकमत किती बदललें तें पहा. मनुष्यांना गुलाम करणें हें कृत्य अत्यंत नीचपणाचें समजलें जाऊं लागलें. वेलसली ह्यानें एकदां अशा अर्थाचे उद्गार काढिले कीं, ह्या कृत्यांत मनुष्याच्या दुष्टपणाची कमाल होते. ह्या लोकमताचा परिणाम लागलाच कृतींत दिसून आला. गुलामांचा व्यापार बंद करण्यासाठीं इंग्लंडानें पुष्कळ वर्षेंपर्यंत एक आरमार ठेविलें होतें.

जे लोक प्रथमावस्थेंतील कौटुंबिक समाजपद्धतींतून पुढें गेले आहेत त्यांना असें वाटतें कीं, ज्या मनुष्यानें अपराध केला असेल त्यालाच त्याबद्दल शिक्षा झाली पाहिजे. आणि एकाच्या अपराधाबद्दल दुसऱ्या कोणास शिक्षा करणें म्हणजे अन्यायाची कमाल करणें होय असेंही त्यांना वाटतें. परंतु बहुतेक सुधारलेल्या लोकांच्या फार प्राचीन पूर्वजांचें मत अगदीं भिन्न होतें व हल्लींही आस्ट्रेलियन् लोकांना तसेंच वाटत आहे. त्यांचें ठरलेलें मत असें आहे कीं, जर अपराधी सांपडला नाहीं तर त्याचे सर्व आप्त त्या अपराधांत सामील असले पाहिजेत. आणि त्या सर्वांनाही त्याबद्दल शिक्षा झाली पाहिजे. स्वतः अपराध करणारा मनुष्य

जितका दोषी असतो तितकेच आपणही दोषी आहों असें गुन्हेगारांच्या भावांना वाटत असतें.

सुधारलेल्या देशांत स्त्रियांविषयीं बरेच उन्नत विचार दिसून येतात व त्यांप्रमाणें त्यांना थोडेबहुत हक्कही मिळाले आहेत. तिच्या जीवावर आणि स्वातंत्र्यावर नवऱ्याचा हक्क नाहीं असें आतां मानिलें जातें. कित्येक स्त्रियांना स्वकष्टार्जित वित्त संपादन करण्याचाही अधिकार मिळाला आहे व त्या आतां गृहकृत्यांत आणि सामाजिक व राष्ट्रीय कामांत पूर्णस्वातंत्र्य मिळविण्यासाठीं खटपट करीत आहेत. परंतु फिजियन् लोकांमध्यें ह्याच्या उलट स्थिति आहे. फिजियन् सरदारांच्या बायकांना नवऱ्यांचें प्राणोत्क्रमण झाल्याबरोबर आपणांला लोकांनीं गळे दाबून मारणें व आपण तें सहन करणें हें अतिपवित्र कर्तव्य वाटतें. वुइल्यम्स ह्यानें एका बाईला अशा प्रसंगांतून सोडविलें होतें. परंतु तिचें मन पुन्हां बदललें आणि ती रात्रीं तेथून पळून गेली व नदींतून पोंहत जाऊन पलीकडल्या बाजूला ज्या ठिकाणीं तिचे जातभाई होते त्या ठिकाणचा रस्ता तिनें धरला. तेथें पोहोंचल्यावर तिनें त्यांचेजवळ जाऊन आपला अपराध कबूल केला व शिरस्त्याप्रमाणें आपली वाट लाविण्याविषयीं त्यांना आग्रहपूर्वक विनंति केली. विल्कीज ह्यानें आपल्या माहितीची आणखी एक गोष्ट दिली आहे. ह्या गोष्टींत ज्या बाईचा जीव वांचविण्यांत आला होता तिनें आपल्या त्रात्याला अगणित शिव्याशाप दिले आणि पुढें मरेपर्यंत ती त्याचा विलक्षण द्वेष करीत असे.

सुधारलेल्या देशांत चोरीच्या अपराधाला तीन प्रकाच्या शिक्षांचें भय असतें. चोरी करूं नये अशी धर्माज्ञा असल्यामुळें ती मोडिली तर ईश्वराचा आपणावर कोप होईल व मेल्यानंतर ह्या पापाबद्दल शासन होईल हे विचार मनांत येऊन आपलेंच मन आपणास खाईल हें एक भय. दुसरें, चोरी करणें हा कायद्याच्या दृष्टीनें गुन्हा समजला जातो, आणि त्याबद्दल आपणास शिक्षा होईल हें भय. आणि तिसरें, लोकांत आपली अपकीर्ति होईल व आपणास तोंड दाखविण्यास जागा राहणार नाहीं हें भय. पण बलूचीस्थानांत ह्याच्या अगदीं विरुद्ध कल्पना व मनोविकार आढळतात. त्या लोकांची एक आवडती म्हण आहे तिचा अर्थ असा आहे कीं जो बलुची मनुष्य चोरी व खून करितो त्याचे सात पिढ्यांचे पूर्वज स्वर्गास जातात.

जगाच्या बऱ्याच भागांत सुधारलेल्या व रानटी अशा दोन्ही लोकांकडून असत्य भाषण तिरस्कारास्पद मानिलें जातें. परंतु जगाच्या कित्येक भागांत ह्याच्या विरुद्ध स्थिति आहे. म्याक्डोनल्ड सांगतो कीं, व्लांटायर म्हणून एक प्रदेश आहे तेथील लोकांना 'खोटें बोलणारा' हें विशेषण अपमानास्पद न वाटतां भूषणास्पदच वाटतें.

आपल्या लोकांत स्त्रियांच्या व्यभिचाराविषयीं इतका तिटकारा आहे कीं, एकाद्या स्त्रीच्या वर्तनाविषयीं नुसती शंका आली तरी तिच्या साऱ्या जन्माची माती होऊन जाते. परंतु असेही लोक आहेत कीं त्यांना व्यभिचाराबद्दल कांहीं वाटत नाहीं व कित्येकांना तर तो

उलटा आवडतो. वोट्याक्स लोकांमध्यें व्यभिचार हा सद्गुण मानिला जातो.

ह्यावरून दिसून येईल कीं, मनुष्याच्या वर्तनाचे जे मुख्य विभाग आहेत त्यांविषयीं निरनिराळ्या जातींतील लोकांचीं व एकाच जातींतल्या परंतु निरनिराळ्या स्थितींतील लोकांचीं मतें परस्परविरुद्ध आहेत व त्यांमुळें त्यांचे मनोविकारही एकमेकांच्या अगदीं उलट दिसून येतात.

वरील विरोधात्मक उदाहरणांत ह्या पुस्तकांतील पुराव्याचें सार आलें आहे. ह्याचें शांतपणें मनन केलें असतां सदसद्विवेकबुद्धीविषयीं कित्येकांचा जो चुकीचा ग्रह आढळतो तो नाहींसा होईल. पण शांतपणें मनन होणेंच कठिण आहे. अनुभवावरून असें दिसून येतें कीं, बहुतेक मनुष्यांच्या हाडीं खिळलेले ग्रह कसल्याही युक्तिवादानें, पाहिजे तितक्या मजबूत पुराव्यानें व लागतील तितक्या उदाहरणांनींही जाण्यासारखे नसतात.

ईश्वरानें मनुष्याला उत्पन्न केलें व त्याचवेळीं त्यानें त्याला सदसद्विवेकबुद्धि दिली असा ज्यांचा श्रद्धेमुळें दृढग्रह झालेला असेल त्यांच्या मनावर वर दिलेल्या उदाहरणांचा कांहींएक परिणाम न होवो, परंतु ज्यांचा कोणत्याही प्रकारचा दृढ ग्रह झालेला नसेल त्यांना खचित असें दिसून येईल कीं, सर्व मनुष्यांना साधारण अशी सदसद्विचारशक्ति मनुष्यांत मूळापासून उत्पन्न झालेली नाहीं. खुद्द स्पेन्सरसाहेबांचेंही मत आरंभीं अगदीं निराळें होतें. बरेंवाईट ओळखण्याची जी शक्ति सर्व मनुष्यांत आढळते तिनें सर्वांस सारखेंच ज्ञान होतें असा त्यांचा स-

मज होता. व त्यांनीं आपल्या 'समाजस्थितिशास्त्र 'नांवाच्या फार वर्षांपूर्वीं लिहिलेल्या ग्रंथांत ह्या मताचें प्रतिपादनही केलें आहे. परंतु पुढें ह्या मताला बाध आणणाऱ्या अनेक गोष्टी त्यांचे नजरेस येऊं लागल्या तेव्हां हें मत सर्वस्वीं खरें नसून अंशतः मात्र खरें असावें असें त्यांस वाटूं लागलें. आणि सरतेशेवटीं इतक्या अपवादक गोष्टी दिसूं लागल्या कीं, तसें मत प्रतिपादन करण्यांत कांहीं अर्थच नाहीं असें त्यांस दिसून आलें. जो मनुष्य चोरी करितो त्याला दुर्गति प्राप्त झाल्यावांचून राहणार नाहीं असा जर कांहीं लोकांत समज आढळतो व जो चोरी करणार नाहीं तो ईश्वराच्या प्रीतीस पात्र होणार नाहीं असा बलूची लोकांप्रमाणें दुसऱ्या कित्येकांचा ग्रह दिसतो, तर असल्या निर्विवाद पुराव्यापुढें बरेंवाईट ओळखण्याची शक्ति सर्व मनुष्यांना साधारण आहे हें मत कसें टिकणार?

सदसद्विचारशक्तीविषयीं लोकांचा जो साधारण समज आहे तो खोटा असला तरी तो उत्पन्न होण्याला जीं कारणें झालीं आहेत त्यांचा विचार केला असतां खरोखर स्थिति काय आहे हें लक्ष्यांत येईल. मनुष्याचे अंगीं सद्सद्विचारशक्ति आहे ही गोष्ट इतकी स्पष्ट आहे कीं ती कोणासही नाकबूल करितां यावयाची नाहीं, ही गोष्ट इतकी स्पष्ट असल्यामुळेंच वर सांगितलेला गैरसमज उत्पन्न झाला. मनुष्याचें ज्ञान फारच अल्प असल्यामुळें जगावरील नानाप्रकारच्या लोकांच्या समजुती काय आहेत हें कळण्याला त्यांना साधन नव्हतें. ज्या लोकांशीं संघट्टनाचे प्रसंग येत त्यांचे

मुख्य गोष्टींत बहुतेक सारखेच समज असत. त्यामुळें सदसद्विवेकबुद्धि सर्व मनुष्यांत सारखीच असावी असा ग्रह उत्पन्न झाला. क्वचित् एखादें विरुद्ध उदाहरण आढळलें तर तें अपवादक म्हणून सोडून द्यावें अशी स्थिति झाली. एकदां कोणत्याही प्रकारचे ग्रह बनल्यानंतर ते दूर होण्याला फार काळ लागत असतो. त्यामुळें अजून चुकीचेच ग्रह कायम राहिले. परंतु वर दिलेला निःसंशय पुरावा जसजसा लोकांचे मनांत बिंबत जाईल तसतसा पूर्वीचा खोटा ग्रह नाहींसा होत जाऊन खऱ्या ज्ञानाचा प्रवेश होण्यास त्यांचे मनांत अवकाश राहील.

अनेक समाजांतील वस्तुस्थिति दर्शविणाऱ्या एकामागून एक ज्या गोष्टी ह्या पुस्तकांतील प्रत्येक प्रकरणांत दिल्या आहेत त्या सर्वांवरून असें सिद्ध होतें कीं, कोणत्याही समाजांतील मनुष्यांच्या समजुती त्यांच्या नित्यव्यवसायांच्या धोरणावर बनत असतात. युद्धाच्या व्यवसायांतच मनुष्यांचा बहुतेक काळ जात असला म्हणजे त्यांना जुलूम करणें, जय मिळविणें, सूड घेणें इत्यादि गोष्टींविषयीं आवड व शांततेच्या व्यवसायांविषयीं तिरस्कारबुद्धि उत्पन्न होते. ह्याच्या उलट शांततेच्या व्यवसायांत मनुष्यांचा बहुतेक काळ जात असला म्हणजे न्याय, प्रामाणिकपणा, सत्य, दुसऱ्याच्या हक्कांविषयीं चाड, इत्यादि सहकार्याला अवश्य अशा गुणांविषयीं प्रीति उत्पन्न होते. आणि जर ही शांतता दीर्घकालपर्यंत कायम राहिली तर नीतिनियम त्या समाजस्थितीस अनुरूप बनतात एवढेंच नव्हे, तर

मनुष्याच्या मनोवृत्तिही तशाच बनत जाऊन त्यांच्या सदसद्विवेकबुद्धीलाही तेंच वळण लागतें. एका समाजांतील मनुष्यांची सारखीच परिस्थिति असल्यामुळें नीतिविषयक गोष्टींच्या संबंधानें त्यांच्या आवडीनिवडी बहुतेक सारख्या असतात आणि मनुष्याची सदसद्विवेकबुद्धि त्या समाजाच्या स्थितीला योग्य अशा वर्तनाचा मार्ग दाखविण्यास समर्थ होते. ज्या सद्गुणांची आपणांस कल्पना मात्र आहे व जे फार थोड्या लोकांच्या आचरणांत दिसूत येतात ते ज्यांच्या आचरणांत स्वाभाविकपणें दिसून येतील अशा मनुष्यांनीं भरलेला समाज उत्पन्न होणें शक्य आहे. परराष्ट्रांशीं युद्धें करण्याचे प्रसंग न येतां राष्ट्रांतल्याराष्ट्रांत कोणाचा कोणावर जुलूम होऊं नये अशाविषयीं कडक कायदे होऊन ते सक्तीनें अमलांत येऊं लागले व अशी स्थिति दीर्घकालपर्यंत कायम राहिली तर वर सांगितल्या प्रकारचे समाज दृष्टीस पडूं लागतील.

वर ज्या सामान्य सिद्धान्ताचें निरूपण केलें त्याला एका विशेष सिद्धान्तानें बळकटी येते. जे बऱ्याच गोष्टींत सुधारलेल्या लोकांच्या फार मागें आहेत, परंतु नीतीच्या कित्येक विभागांत जे सुधारलेल्या लोकांहून फार पुढें गेलेले आढळतात अशा अशिक्षित लोकांचीं पुष्कळ उदाहरणें पूर्वींच्या अनेक प्रकरणांत दिलीं आहेत. आणि त्याच ठिकाणीं असें दाखविण्यांत आलें आहे कीं, त्या सर्व लोकांना शेजारपाजारच्या लोकांशीं युद्धाचे प्रसंग बिलकुल येत नाहींत. मनुष्यजातीच्या अनेक शाखांपासून उत्पन्न झालेल्या लोकां-

मध्यें अशीं उदाहरणें आढळतात. मांगोलियन्, कोलारियन् आणि द्रविडियन् शाखांचे* लोक हिंदुस्थानांतील डोंगराळ प्रदेशांत राहणारे आहेत. मलाक्का आणि ब्रह्मदेश ह्यांतील रानांत आणि चीनदेशांतील निर्जन प्रदेशांत निराळ्याच शाखांचे लोक आढळतात. पूर्वेकडील बेटांत पाप्युअन् शाखेचे लोक आहेत. ज़पानांत आयनो म्हणून लोक आहेत त्यांमध्यें युद्धाच्या दंतकथाही नाहींत. आणि मेक्सिकोच्या उत्तरभागीं प्यूएब्लास म्हणून लोक आहेत ते ह्या सर्वांहून भिन्न आहेत. ह्या सर्व लोकांचें रक्त परस्परांपासून किती तरी भिन्न आहे व ते एकमेकांपासून किती तरी दूर राहतात. असें असून दोन गोष्टींत सर्वांचा सारखेपणा दिसून येतो. एक, ते अगदीं एकान्त प्रदेशांत राहणारे असल्यामुळें त्यांना शेजारच्या लोकांपासून उपद्रव झाला नाहीं व त्यामुळें ते सांग्रामिक व्यवसायांपासून दी-

* भाषांचे सारखेपणावरून मनुष्यजातीचे अनेक वर्ग केले आहेत त्यांपैकीं मांगोलियन्, कोलारियन् आणि द्राविडियन् हे आहेत. मोंगल लोक हे मांगोलियन् वर्गातलेच आहेत. मांगोलिया हें त्यांचें मूळठिकाण असल्यामुळें त्या लोकांना मांगोलियन् असें नांव पडलें. आर्यलोक येण्यापूर्वीं तीन वर्गांचे लोक हिंदुस्थानांत होते. टिबेटोबर्मीज, कोलारियन् आणि द्राविडियन्. ह्या अनुक्रमानेंच ते हिंदुस्थानांत आले. बोडो, धिमाल, लेप्का वगैरे पूर्वीं उल्लेख केलेल्या जाति टिबेटोबर्मीज वर्गांतील होत. सांथाळी, कोल, सवार वगैरे कोलारियन् वर्गांतील आहेत आणि तेलगू, खोंड वगैरे जाति द्राविडियन् वर्गांतील आहेत. कोलारियन् लोक ईशान्यकोंपऱ्याकडून व द्रविडियन् वायव्यकोंपऱ्याकडून आले. द्रविडियन् लोक अधिक सामर्थ्यवान् होते ते कोलारियन् लोकांना मागें टाकून आपण दक्षिणेकडे पसरले.

र्घकालपर्यंत अगदीं अलिप्त राहिले. व दुसरी, नीतीच्या कित्येक विभागांत ते सुधारलेल्या लोकांहून फार पुढें आहेत. ह्यापेक्षां चांगला पुरावा तो कसा असावयाचा ?

सुधारणेची शेखी मिरविणाऱ्या लोकांमध्यें दिसून येणाऱ्या चांगल्या गुणांवांचून दुसरा चांगुलपणा ज्यांच्या दृष्टीस पडला नाहीं ते लोक अगदीं प्राथमिक स्थितींतील मनुष्यांत श्रेष्ठ प्रतीच्या सद्गुणांचा उदय झालेला पाहून आश्चर्यानें चकित होतात. त्यांना असें वाटत असतें कीं, मनुष्यांत जे थोडेसे सद्गुण दिसून येतात ते सुधारणेमुळें व शिक्षणामुळें उत्पन्न झालेले आहेत. परंतु ह्या उदाहरणांवरून सिद्ध होतें कीं ते उत्पन्न होण्याला विशेष प्रकारची परिस्थितिच पाहिजे. ओरीली ह्यानें लेट्हाट् लोकांविषयीं जी हकीकत लिहिली होती तीवर जनरल फिच् ह्यानें पुढील अभिप्राय दिला आहे. " त्यांची नीतिविषयक चांगुलपणाची अभिज्ञता व त्यांचें शुद्धाचरण ह्यांविषयीं त्यानें जी माहिती दिली आहे ती त्यांच्याच शेजारीं राहणाऱ्या अर्धवट सुधारलेल्या लोकांच्या स्थितीशीं ताडून पाहिली असतां हें केवळ कादंबरींतील वर्णन आहे कीं काय असा भास होतो. "

एकान्त स्थळीं राहणाऱ्या लहानलहान टोळ्यांतील अशिक्षित लोकांमध्यें ज्या कारणांनीं हे गुण उत्पन्न झाले त्याच कारणांची अनुकूलता शिक्षित लोकांस मिळाल्यास त्यांच्या अंगीं त्यांहूनही श्रेष्ठ प्रतीचे गुण उत्पन्न होतील असें अनुमान करणें चुकीचें होईल काय?

पण पुढें अशा प्रकारची स्थिति येणार आहे हा वि-

चार मनांत आल्यानें सर्वच लोकांना आनंद होईल असें नाहीं. हिंदुलोक हे केवळ आपल्या सुखाकरितां आहेत असें ज्या इंग्लिश लोकांना—विशेषतः हिंदुस्थानवासी इंग्लिश लोकांना—वाटत असतें त्यांना हा विचार आनंददायक होणार नाहीं. सैन्यांतल्या सोल्जरांनाही हा विचार दुःखद होईल. वरिष्ठांचा हुकूम सुटल्याबरोबर न्याय-अन्याय न पाहतां पाहिजे त्या मनुष्यावर गोळी घालावयास तयार होणाऱ्या लोकांचें पुढें कामच राहणार नाहीं. आज काय ही लढाई मारिली, उद्यां काय ह्या लोकांना जिंकिलें, अशा गोष्टींची ज्यांना संवय झालेली आहे त्यांना समतेची स्थिति कशी पसंत पडेल? ज्या लोकांना मनुष्याचें मांस खाण्याची चटक लागलेली असते त्यांमधील मनुष्यभक्षकपणा नाहींसा केला असतां तो त्यांना खपत नाहीं. त्याचप्रमाणें दुर्बल लोकांचीं राज्यें घशांत टाकावयास संवकलेल्या इंग्लंडासारख्या समाजभक्षक राष्ट्रांना, लढाया वगैरे बंद होऊन आपली राज्यतृष्णा तृप्त करण्यास अवकाश राहणार नाहीं हा विचार दुःसह होतो. "शिपायाच्या कामगिरीइतका प्रतिष्ठित व श्रेयस्कर दुसरा धंदा नाहीं" असे उद्गार ज्या इंग्लिश सरदाराच्या तोंडून निघाले त्याला असला विचार कधींच आवडणार नाहीं.

मनुष्याला सदाचरणानें वागण्याविषयीं उपदेश करणाऱ्या पाद्र्यांना व इतर धार्मिक लोकांनाही मनुष्याच्या पुढील नैतिक उन्नतीचा हा विचार प्रिय होणार नाहीं. हें म्हणणें प्रथमदर्शनीं विपरीत वाटेल परंतु तें तसें नाहीं. हा विचार त्यांना विषम वाटण्याचें कारण

एवढेंच कीं पुढील नैतिक उन्नतीची जी संभवनीयता येथें दाखविली आहे ती त्यांच्या विचारसरणीला धरून नाहीं. मनुष्यजातीला जो चांगुलपणा यावयाचा आहे तो मनुष्यांनीं ख्रिस्ती धर्माचा स्वीकार केला तरच येणें शक्य आहे, दुसऱ्या कोणत्याही साधनांनीं तो येणें शक्य नाहीं असा ह्या मंडळीचा पूर्ण विश्वास आहे. आणि येथें तर तो विशेष प्रकारची परिस्थिति दीर्घकालपर्यंत कायम राहिल्यानें प्राप्त होईल असें प्रतिपादन केलें आहे. तेव्हां श्रद्धा आणि युक्तिवाद ह्यांचें पटावें कसें? मनुष्यप्राणी हा स्वभावतः दुष्ट आहे व तो स्वर्गाची आशा आणि नरकाची भीति ह्यांनींच चांगला होणें संभवनीय आहे असें अनेक धर्मांतील श्रद्धालु लोकांचें व विशेषतः ख्रिस्ती धर्माभिमान्यांचें मत आहे व हें मत त्यांना ह्या पुस्तकांत ध्वनित केलेल्या मतापेक्षां चांगलें दिसतें. ह्या पुस्तकांत ध्वनित केलेलें मत असें आहे कीं, मनुष्य हा स्वभावतः वाईट नसून त्याची परिस्थिति जर अशी असेल कीं तींत नीचमनोवृत्तींना अवकाशच सांपडूं नये, तर त्याच्या श्रेष्ठ मनोधर्मांना उत्तेजन मिळून तो चांगला होईल. ख्रिस्ती धर्मांतील श्रद्धालु लोकांचा पूर्वीं सांगितल्याप्रमाणें आणखी असा समज आहे कीं त्यांचाच धर्म कायतो ईश्वराला प्रिय आहे व मनुष्य जातीचें जें तारण व्हावयाचें तें ख्रिस्ती धर्मानेंच होईल. हा त्यांचा समज होण्याला कांहीं कारणेंही झालीं आहेत. ख्रिस्ती धर्माच्या लोकांचा आज कित्येक शतकें सर्व गोष्टींत पुढें पाय आहे. व जीं राष्ट्रें ख्रिस्ती नाहींत तीं अनेक गोष्टींत ख्रिस्ती रा-

ष्ट्रांच्या फार मागें दिसून येतात. असें होण्याचें कारण ख्रिस्ती लोक ईश्वरास प्रिय आहेत हेंच असावें असें श्रद्धालु ख्रिस्ती लोकांस वाटत असतें. आणि ह्याच्या उलट पुरावा पुढें आला तरी त्या लोकांना त्याजकडे पाहण्याची बुद्धिच होत नाहीं; कारण आपल्या धर्मावर गदा आणण्याचा त्याचा रोंख आहे असें त्यांस वाटत असतें.

वर जी श्रद्धालु लोकांची स्थिति सांगितली ती प्रस्तुतच्या सामाजिक स्थितीचा विचार करून पाहिला असतां शोचनीय आहे कीं काय, हा प्रश्न आहे. सामाजिक स्थिति, सरासरीच्या मानानें लोकांचे स्वभाव आणि त्यांच्या समजुती ह्यांमध्यें बराच मेळ असणें जरूर आहे. व तो बहुतेक प्रसंगीं असतोही. 'हे तुमचे ज्ञानी लोकांचे विचार अज्ञान्यांस काय उपयोगी?' असा पुष्कळ लोकांकडून प्रश्न होत असतो व त्या प्रश्नांत बराच अर्थ आहे. आपल्या पुण्यकृत्यांबद्दल बक्षीस देणारा व पापकृत्यांबद्दल शासन करणारा सर्व शक्तिमान् ईश्वर आपल्या पाठीवर आहे हा विचार लोकांच्या मनांत जागृत असल्यामुळें बरींच चांगलीं कृत्यें लोकांचे हातून होत आहेत व वाईट कृत्यांपासून ते दूर राहत आहेत ही गोष्ट खोटी नाहीं. लोकांची इतर सर्व प्रकारची स्थिति कायम राहून हा समज मात्र नाहींसा झाला तर अनिष्ट परिणाम होतील हें कबूल केलें पाहिजे. तथापि ह्या ज्ञानाचा प्रसार करण्याला भिण्याचें कांहीं कारण नाहीं. अनेक युगांचे मनुष्याच्या मनावर घडलेले संस्कार नाहींसे होऊन नवीन विचारांचा त्यावर ठसा उमटविण्यास किती श्रम पडतात व

किती काळ लागतो ह्याची ज्यांस पूर्ण कल्पना होईल त्यांना 'अशा प्रकारचे प्रयत्न किती झाले तरी थोडे' असें वाटल्यावांचून राहणार नाहीं. उत्क्रान्तीचें काम फारच सावकाश चाललेलें असतें. आणि मनुष्याचे मनावर असंख्य वेळां नवीन विचारांचे आघात झाल्यावांचून त्याच्या समजुतींत फरक पडणें संभवनीय नाहीं. आणि समजुतींत फरक पडला तरी आचरणांत फरक पडण्यास आणखीही किती तरी काळ लागत असतो. इतक्या अवकाशांत त्याची इतर प्रकारची स्थितिही बदलून जाईल. आणि ती बदलली नाहीं तर ह्या विचारांचें पूर्णपणें ग्रहण करण्याचें सामर्थ्यच त्याच्या अंगीं येणार नाहीं. कित्येक लोकांना एक निष्कारण भीति वाटत असते तिचें येथें निरसन करणें जरूर आहे. कसलेंही भय मनांत न बाळगितां पाहिजे तीं भयंकर कृत्यें करणारे आडदांड लोक प्रत्येक समाजांत आढळतात. ह्या प्रकारचे लोक असल्या विचारांच्या प्रसारानें उत्पन्न होऊन जिकडेतिकडे अनर्थ होईल अशी पुष्कळांना भीति वाटते. पण हे आडदांड लोक आज नवीनच उत्पन्न झाले आहेत असें नाहीं. ते पूर्वींपासूनच आहेत व अजूनही कांहीं काळपर्यंत राहतील. पूर्वी ज्या कारणांनीं ते उत्पन्न झाले व अजून कायम राहिले तीं कारणें नाहींशीं झालीं म्हणजे ते नाहींसे होतील. आडदांडपणानें 'देवबीव सर्व झूट आहे' असें म्हणणें निराळें, व विचारानें 'धर्मपुस्तकांतून ईश्वरस्वरूपाचें जें वर्णन केलें आहे तें युक्तीच्या दृष्टीला असंभवनीय वाटतें व कोणी जगच्चालक असेल तर त्या-

ची बरोबर कल्पना करणें मनुष्याच्या शक्तीच्या बाहेर आहे ' असें म्हणणें निराळें. ईश्वर आणि परलोक हे विषय मनुष्याला अज्ञेय आहेत अशी पूर्ण खात्री झाल्यामुळें ज्यांनीं केवळ विचाराच्या व युक्तीच्या दृष्टीनें योग्य असें आपल्या वर्तनाला वळण दिलें आहे असे सदाचरणी लोक पुष्कळ आढळून येतात; व कित्येक तर संतमालिकेंत घालण्याच्या योग्यतेचे आहेत, आणि धार्मिक लोकांनाही ते पूज्य वाटतात. ह्या विचारांतच जर दुष्टपणा असता तर त्यांचें प्रतिपादन करणाऱ्या मंडळींत वंदनीय पुरुष उत्पन्न झाले नसते. तेव्हां हे विचार पसरले म्हणजे जिकडेतिकडे हाहाःकार होईल अशी भीति बाळगिण्याचें कारण नाहीं. दुसरें, ह्या विचारांचें ग्रहण करणें ही गोष्ट सामान्य मनुष्याच्या शक्तीबाहेरची आहे, आणि ह्यामुळें अजून दीर्घकालपर्यंत पुण्यकृत्यांबद्दल बक्षिस देणाऱ्या व पापकृत्याबद्दल शासन करणाऱ्या देवाची कल्पना बहुतेक लोकांच्या मनांत कायम राहील.

परंतु नीतीचें खरें स्वरूप काय आहे व मनुष्याची नैतिक उन्नति कोणत्या उपायांनीं होणें शक्य आहे हें ज्यांस कळूं लागलें आहे असे थोडेसे लोक आजही आढळून येतात व त्यांची संख्या दिवसेंदिवस वाढतच जाण्याचा संभव दिसतो. गेल्या हजारों वर्षांत कोणत्या कारणांनीं मनुष्यस्वभावांत किती फरक पडला आहे हें पाहून पुढल्या हजारों वर्षांत कोणत्या तऱ्हेचा आणखी फरक पडणें संभवनीय आहे ह्याचा त्यांस अजमास करितां येतो. पूर्वीं ज्या नैतिकउन्नतीचा उल्लेख केला

आहे व जी बऱ्याच लोकांना आवडणार नाहीं म्हणून सांगितलें तिचा विचार ह्या थोड्या लोकांना फार आल्हाददायक होईल. बक्षिसाची आशा किंवा शिक्षेचें भय नसतां मनुष्याच्या हातून स्वाभाविकपणें न्याय्य वर्तन होऊं लागावें अशा उन्नत स्थितीचें चिंतन करणें व जेणेंकरून त्या स्थितीकडे जाण्याचा मार्ग सुलभ होईल अशा प्रकारचा फरक प्रस्तुतच्या परिस्थितींत पाडण्यासाठीं झटणें ह्या गोष्टींपासून वर सांगितलेल्या थोड्या लोकांस जो आनंद होतो त्याची कल्पना इतरांस व्हावयाची नाहीं.